# श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन

: लेखक :

**कै. प्रा. चिंतामण नीळकंठ जोशी,**

एम्. ए., एस् टी सी

मराठीचे माजी प्राध्यापक, उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद (दक्षिण)
मुंबई, मद्रास, नागपूर, अलाहाबाद आणि उस्मानिया या विद्या
पीठातील व दिल्ली सिव्हिल सर्व्हिसमधील मराठीचे परीक्षक

सन १९५१

**किमत दहा रुपये**



जन्म २०-९-१८८० } ग्रंथकर्ता { मृत्यु १६-६-१९४८

# निवेदन

केल्यानें होत आहे रे । आधीं केलेच पाहिजे ।।
यत्न तो देव जाणावा । अतरीं धरिता बरे ।।
कष्टेविण फळ नाहीं । कष्टेविण राज्य नाहीं ।।
केल्यावीण होत नाहीं । साध्य जनीं ।। रामदास

कित्येक वर्षे सतत परिश्रम करून तयार केलेला "श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन" हा ग्रथ प्रसिद्ध झालेला पहाण्याची ग्रथकर्त्याची फार इच्छा होती. पण 'नियतिरेव बलीयसी' या सुभाषितानुसार, अनेक कारणानीं, विशेषत: १९४७-१९४८ मधील हैद्राबादेतील कठीण व अनिश्चित परिस्थिति आणि अखेरचे दुखणे यामुळे ती अतृप्तच राहिली. आपल्या मृत्यूनन्तर इतक्या उशीरा का होईना पण हा ग्रथ आज वाचकापुढे येत आहे हे पाहून त्याच्या आत्म्यास समाधान वाटेल यात शका नाहीं

वाचकाच्या माहितीकरिता ग्रथकर्त्याचा जीवनवृत्तान्त त्याच्या प्रकाशित वाङ्मयाच्या सूचिसह थोडक्यात खालीं दिला आहे.

प्रा. चितामण नीळकंठ जोशी आपल्या मित्रमडळींत 'काकासाहेब' या नावानें परिचित होते त्याचा जन्म 'चौल' येथे ता. २० सप्टेम्बर

१८८० या रोजीं झाला. 'चौल' हे गाव कुलाबा जिल्ह्यातील अलिबाग तालुक्यात आहे. इतिहासकालीं 'चौल' हे प्रसिद्ध शहर होतें. पण सध्या कालगतीने त्याचे एका खेड्यात रूपान्तर झाले आहे.ती. काकाचे प्राथमिक व पहिल्या चार इयत्तापर्यन्तचे इंग्रजी शिक्षण चौलास झाले. आमचे आजोबा वैद्य व शास्त्री असून ते पुण्यातील संस्कृत कॉलेजात प्राध्यापकाचें काम करीत होते. त्यानीं ती काकाना लहानपणापासून संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासाची गोडी लाविली. पुढील शिक्षणाकरिता ती. काका मुंबईस त्यांचे वडील बंधु पुरुषोत्तमंपत याच्या शांतारामाच्या चाळींतील बिऱ्हाडीं आले त्याचे पुढील शालेय व उच्च शिक्षण मुंबईतच झाले. घरची गरिबी असल्यामुळे विद्यार्थिदशेत त्याना कष्ट झाले परन्तु प्रतिकूल परिस्थितींतून मार्ग काढीत ते सन १९०१ मध्ये बी. ए. झाले. कॉलेजात असताना त्याचा म. म. डॉ. पांडुरंग वामन काणे व हैद्राबादचे सुप्रसिद्ध वकील कै. पांडुरंग वासुदेव जोशी यांच्याशी स्नेह जमला व तो अखेरपर्यन्त वृद्धिंगत होत गेला.बी.ए.पास होण्यापूर्वींच त्या वेळच्या रूढी प्रमाणे त्याचा विवाहही झाला होता. संसाराची जबाबदारी पार पाडण्या साठीं त्यानीं प्रथम खाजगी व नन्तर सरकारी शाळातून शिक्षकाचे काम केल आणि अभ्यासही चालू ठेविला. सन १९११ सालीं ते मराठी विषय घेऊन एम्. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. याच सुमारास त्यानीं एस टी. सी. ची परीक्षा पण दिली. सन १९११ नन्तर त्यानीं पुणे येथील ट्रेनिंग कॉलेजात अध्यापकाचें काम केले.

सन १९१९ सालीं हैद्राबादेत उस्मानिया विद्यापीठाची स्थापना झाली. त्यावेळीं मराठी व संस्कृतचे पहिले प्राध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली. तेव्हापासून त्याचे वास्तव्य हैद्राबादेसच असे अध्यापनाचे काम व

विषय त्याच्या आवडीचे असल्यामुळे ते त्यात तन्मय होत. त्याना मुंबई, मद्रास, अलाहाबाद, उस्मानिया व नागपूर या विद्यापीठामध्ये आणि दिल्ली येथील आय. सी. एस्. च्या होणाऱ्या परीक्षेत परीक्षकाचा मान मिळाला होता. घरच्या सर्व मडळीसही त्यानीं ' श्रीगणेशायनमः ' पासून तों बी ए पर्यन्त हौसेने शिकविले. प्रतिपाद्य विषयाचे गाढ ज्ञान आणि शिकविण्याची मनोवेधक शैली यामुळे शिष्याच्या मनात त्याच्याविषयीं अत्यन्त आदर असे. त्याच्या अनेक शिष्यापैकीं काहीं मोठ्या पदवीस चढले तर काहीं साहित्यक्षेत्रात चमकले. रिझर्व्ह बॅकेचे माजी गव्हर्नर व सध्याचे भारताचे अर्थमत्री श्री. चितामणराव देशमुख, न्या. मू. जी एस. राजाध्यक्ष, प्रा. र. म. मुसारी, डॉ. नारायणराव नादापूरकर व कै. मनाठकर कवि हे त्याच्या प्रमुख शिष्यापैकीं होत. आपले साहित्यिक मित्र म.म द वा पोतदार, डॉ. के. ना. वाटवे व प्रा. वि भि कोलते याच्याविषयीं त्याच्या मनात अत्यन्त आदर व प्रेम वसत असे.

ते समाजात मिळून मिसळून वागत आणि हैद्राबादेत होणाऱ्या बहुतेक सर्व मराठीविषयक सभा–समेलनें, गणपति–उत्सव, वगैरेंत कधीं वक्ता, कधीं मार्मिक श्रोता तर कधीं अध्यक्ष या नात्याने उत्साहानें भाग घेत असत त्यामुळें ते हैद्राबादेतील महाराष्ट्रीय समाजास सुपरिचित होते महाराष्ट्र–साहित्यसमेलन, प्राच्यविद्या–परिषद् ( All India Oriental Conference), भा. इ. स मडळ वगैरे परिषदातून ते उत्साहाने भाग घेत असत व विविध विषयावर निबंध वाचीत असत. पुणे 'वसन्त' व्याख्यानमालेचेही त्यास व्याख्यान देण्याकरिता आमत्रण येत असे, पण उस्मानिया विद्यापीठाच्या अधिकाऱ्यानीं ते स्वीकारण्यास त्याना कधींच परवानगी दिली नाहीं.

ती.काकानी 'विविध ज्ञान-विस्तार', 'चित्रमयजगत्', 'महाराष्ट्र साहित्य-पत्रिका,' 'सह्याद्रि,' 'समीक्षक,' राजवाडे सशोधक मडळाचे ' संशोधक ' त्रैमासिक वगैरे नियतकालिकातून विविध विषयावर निबध प्रसिद्ध केले. त्याचे बहुतेक सर्व लेख जुन्या मराठी वाङमयासबधीं आहेत

सन १९३३ सालीं खटपट करून त्यानीं उस्मानिया विद्यापीठात मराठी वाङ्मयाच्या सशोधनार्थ एक शिष्यवृत्ति सुरू करविली आणि स्वतःही सशोधनास सुरवात केली. त्यानीं मराठवाड्यातील खेडोपाडीं दोनदा दौरा काढ्न मोठया परिश्रमानें शभर मराठी व सस्कृत हस्तलिखित ग्रथ जमविले. नन्तर, त्या सर्व ग्रथाचा अभ्यास करून त्याची वर्णनात्मक यादी तयार केली व त्यापैकीं महत्त्वाच्या ग्रथावर सशोधनात्मक व परीक्षणात्मक लेख प्रकाशित करून त्याची ओळख मराठी वाङ्मयरसिकास करून दिली.

सन १९३९ मध्ये त्यानीं प्रयत्न करून उस्मानिया विद्यापीठात मराठीस एम्. ए च्या अभ्यासक्रमात स्थान मिळवून दिलें याच सुमारास त्याचा ' मराठवाड्यातील अर्वाचीन मराठी वाङ्मय ' हा ग्रथ प्रकाशित झाला या ग्रंथात सन १८३८-१९३८ या कालखडात झालेल्या मराठवाड्यातील मराठी लेखकाची व त्याच्या वाङ्मयाची सकलित व विश्वसनीय माहिती प्रथमच देण्यात आली

हैद्राबादला आल्यावर थोड्याच दिवसात त्याना मराठी ग्रथालयाची उणीव भासू लागली, म्हणून त्यानीं काहीं मित्राच्या सहाय्याने मराठी ग्रथसग्रहालयाची स्थापना केली आणि त्याच्या अभिवृद्ध्यर्थ अतिशय परिश्रम केले. मराठी ग्रथसग्रहालयाच्या इमारतीसाठीं हैद्राबाद

शहराच्या मध्यवर्तीत सरकारकडून जागा मिळविली व इमारतीकरिता देणगीचेही आश्वासन मिळविले. नन्तर घरोघर हिंडून इमारतीकरिता निधि जमा केला व इमारतीचा कोनशिला—समारम्भही घडवून आणला.

वरील तीन परिच्छेदात निदर्शिलेले कार्य यशस्वी रीतीने पार पाडण्यासाठीं त्याना हैद्राबादेंतील कांहीं प्रमुख सरकारी अधिकाऱ्याचीही विशेषतः कार्यकारी मडळाचे अध्यक्ष सर अकबर हैदरी, शिक्षणमत्री नवाब मेहेदियार जग बहादूर व उस्मानिया विद्यापीठाचे उपकुलगुरु नवाब अली यारजग बहादूर याची सहानुभूति आणि मदत मिळाली.

ती. काकाचे बालपण गरिबींत गेले व अल्पवयातच त्याना जीवन-कलहात पडावे लागले. आयुष्यात त्याना नाना प्रकारचे सुखदुःखाचे प्रसग अनुभवावे लागले. त्यापासून बोध घेऊन त्यानीं व्यवहारचातुर्य व कणखरपणा हे गुण सपादन केले, आणि आपली सर्व कर्तव्ये उत्तम रीतीने पार पाडलीं. प्रस्तुत निवेदनाच्या प्रारभीं जी रामदासाची उक्ति दिली आहे ' केल्याने होत आहे रे ' ती त्यानीं आपल्या मनात पूर्णपणें ठसवून त्याप्रमाणे वागणे हे त्याचे ब्रीद होते, व ते आम्हा सर्वास तोच उपदेश करीत एखादे काम अगावर घेतल्यावर ते धडाडीने पार पाडीपर्यंत ते स्वस्थ बसत नसत ते बुद्धिवादि होते तरी सध्या, गणपति, अथर्वशीर्षादि कर्म रोज करीत असत. लहान वयापासून योग्य व्यायाम व मिताहार याची त्याना सवय लागली होती. त्यामुळे त्याची प्रकृति बहुधा निकोप असे. त्याच्या आयुष्यातील मोठे दुखणे म्हणजे शेवटचेच होय. त्याना तोडात कॅन्सर झाला होता व त्याचे निदान डॉक्टरास बऱ्याच उशीरा झालें. या दुखण्यात त्याना फार यातना झाल्या. तथापि त्या अत्यन्त

धैर्याने सहन करून त्यांनीं १६ जून १९४८ या रोजीं पुणें मुक्कामीं राम-नामाचें स्मरण करीत प्रयाण केलें !

पुणें.
ता. ५–३–५१ } विनायक चिंतामण जोशी

* * *

# निवेदन—पुरवणी

प्रस्तुत ग्रंथ आमच्या परमपूज्य मातोश्री श्री. जानकीबाई चिंतामण जोशी यांच्या नावानें प्रकाशित करावयाचा संकल्प मनाशीं केला होता व त्याप्रमाणे त्यांचें नावही प्रकाशकाच्या स्थानीं घातलें होतें. परन्तु, 'मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यत्र चिंतयेत्' हेंच खरें. निर्घृण काळानें अनपेक्षितरीत्या ता. २१ मार्च १९५१ या रोजीं त्यांना आमच्यांतून ओढून नेलें ! त्यांची आज्ञा शिरसावन्द्य मानून प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाचें काम शिरावर घेतलें खरें, परन्तु, संबंध ग्रंथ पुरा होऊन त्यांच्या हातांत एक प्रत टाक-ण्याची इच्छा अपुरीच राहिली ! दुःखांत सुख एवढेंच कीं, त्यांनीं प्रस्तुत ग्रंथप्रकाशनाचा समारम्भ ता. २४ फेब्रुवारी १९५१ या रोजीं म. म. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडल्याचें ऐकलें. कारण, शारी-रीक दौर्बल्यामुळें त्यांना समारम्भास उपस्थित राहातां येणें शक्य नव्हतें. त्यांनीं प्रस्तुत ग्रंथ सहाशें पृष्ठापर्यंन्त छापलेला आपल्या डोळ्यांनीं पाहिला हेंच अल्प समाधान.

पुणें.
ता २५-४-५१ } विनायक चिंतामण जोशी

* * *

# प्रा. चिंतामण नीळकंठ जोशी यांचें प्रकाशित वाङ्मय

## पुस्तकें

मराठी

१ मराठी गद्यपद्यावली ( इ. स. १९१२ )

२ मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि ( इ स १९१३ )

३ अनुवादविचार

४ निरंजन माधवाच्या स्तोत्रसंग्रहावर टीकात्मक निबंध ( इ. स. १९३५ )

५ मराठवाड्यातील अर्वाचीन मराठी वाङ्मय ( इ.स. १९३९ )

संस्कृत

६ मुंबई मॅट्रिकचे संस्कृत पेपर्स—उत्तरासहित ( इ. स. १९००-१९२२ )

७ वाल्मीकिरामायण—बालकाण्ड—नोटस् व भाषान्तरासह ( इ. स. १९१८ )

८ उत्तररामचरित- इंग्रजी भाषांतर, ( P. V. Kane's Third Edition, 1929 )

९ महाभारतप्रवेशिका (इंग्रजी भाषान्तर)

# निबंध

१ ज्ञानेश्वरीसंबंधीं कांहीं विचार
( विहंगमाला, पुस्तक ७,८,९ पृष्ठें १–१०, इ. स. १९३१ )

२ कवीश्वर भास्करपंडिताचा 'शिशुपालवध'
(विविध–ज्ञान--विस्तार, वर्ष ६४, पृष्ठे ७१–८० इ.स.१९३३)

३ श्रीधराचा जैमिनिअश्वमेध
(विविध–ज्ञान--विस्तार)

लेखांक १ ला, वर्ष ६४, पृष्ठे २४३–२५०, इ. स. १९३३

लेखांक २ रा, वर्ष ६५, पृष्ठे ५३–६२, इ. स. १९३४।

लेखांक ३ रा, वर्ष ६५, पृष्ठे ९३–१०५, इ स. १९३४

लेखांक ४ था, वर्ष ६५, पृष्ठे १८३–१९१, इ.स १९३४

४ मराठी–द्राविडी संबंध व ज्ञानेश्वरींतील द्राविडी शब्द
(विविध-ज्ञान-विस्तार, वर्ष ६५, पृष्ठे २३७–२४४ इ.स.१९३४)

५ A few thoughts on Kanarese and some other words from Dnyneshwari.

( Proceedings of the 7 th All–India Oriental Conference, Pp 937–950.)

६ सांप्रदाय परिमळाचा कर्ता कोण ? ( निरंजनच )
विविध–ज्ञान -विस्तार, वर्ष ६६, पृष्ठे ३–१२ व १२१–१२८, इ. स. १९३५

७ भास्करभट्ट बोरीकर
(प्रतिभा, वर्ष ४, पृष्ठें २१–२३ इ. स. १९३६)

८ भाषादृष्ट्या रघुनाथपंडित आर्यां कीं मोरोपंत आर्या ?
(महाराष्ट्र–साहित्यपत्रिका, वर्ष ९, पृष्ठे १–६)

९ मुसळमानाची मराठी वाङ्मयात भर
(मराठी साहित्यसंमेलन, इंदूर, पृष्ठे १–३०, इ.स. १९३५)

१० मराठवाड्यांतील मराठी बोलीचे विशेष
(ज्योत्स्ना, मे, १९३८, पृष्ठे २०–२३)

११ हरिपंडितकृत भावबोधिनी
(महाराष्ट्र–साहित्यपत्रिका, वर्ष १७, पृष्ठे २७–३२

१२ ज्ञानेश्वरीविषयक चर्चा–ज्ञानेश्वरीच्या नवीन पोथ्या व पाठभेद (सह्याद्रि, मे, १९४४, पृष्ठे ३११–३१४)

१३ मराठवाड्यांतील प्राचीन हस्तलिखित ग्रथ व त्याचें संशोधन
(हैद्राबाद समाचार, जून, १९४४, पृष्ठे १–२)

१४ मराठी ग्रंथाचें संशोधन व त्याचे महत्व
(हैद्राबाद समाचार, मार्च, १९४५, पृष्ठे ३१-३४)

१५ श्रीधराविषयीं आणखी कांहीं माहिती
(महाराष्ट्र--साहित्यपत्रिका.जुलै, १९४५, पृष्ठे१०१–१०४)

१६ A Ms. of Ghatakharpara K-aya with a new commentary, (Bharatiya Vidya, March, 1945, Pp.49–57)

१७ श्रीधरस्वामी नाझरेकर–नवीन माहिती
( चित्रमयजगत् वर्ष ३६, अंक १२, पृष्ठे ४५७ – ४६१,
इ स. १९४५ )

१८ कृष्णामृत- नट, ( चित्रमयजगत्, नोव्हेंबर, १९४६,
पृष्ठे ६३१–६३५ )

१९ एक अज्ञात कवि–जनपंडिताचा भागवत दशम–पूर्वार्ध
( समीक्षक, फेब्रुवारी, १९४७, पृष्ठे १७–२१ )

२० 'ज्ञानेश्वरीसर्वस्वा'तील काही चित्य स्थळे
(सह्याद्रि, फेब्रुवारी, १९४७, पृष्ठे ९७–१०२ )

२१ ज्ञानेश्वरी–१६ वा अध्याय–परीक्षण
( Fergusson College Magazine, March,
1947, Pp 5-11 )

२२ 'ब्रह्मांड'पुराणाचे म्हणजेच 'शिवलीलामृता'चे मराठी अवतार
( प्रतिभा, मार्च, १९४८, पृष्ठे २३–२७ )

२३ सुगमबोध व वेदान्तप्रक्रिया (संशोधक, वर्ष १६, पृष्ठे ७–१३)

२४ ज्ञानेश्वरी–विस्तार–विवेचन
( ज्ञानेश्वर–दर्शन–साहित्यखण्ड, पृष्ठे १०८–१०५
इ स १९३२ )

२५ ज्ञानेश्वरी व स्त्रीसमाजस्थिति
(ज्ञानेश्वरदर्शन–दर्शनप्रवेश, पृष्ठे १२०–१३८)

## किरकोळ लेख, भाषणें वगैरे

१ अमृतराय व त्याची कविता
( हैद्राबाद-समाचार, डिसेंबर, १९४५, पृष्ठे ३९-४० )

२ मशोधनाची पूर्व तयारी ( हैद्राबाद-समाचार, जून, १९४५, पृष्ठे ३७-३९ )

३ श्रीधराची कविता ( हैद्राबाद-समाचार, ऑक्टोबर, १९४५, पृष्ठे ३४-३५ )

४ घटखर्पर आणि खापर्डे ( सह्याद्रि, ऑक्टोबर, १९४६, पृष्ठ ७२७ )

५ एच् ई. एच् निजाम याचा राज्यारोहणदिन
( हैद्राबाद-समाचार, सप्टेंबर, १९४६, पृष्ठे ३१-३३ )

६ हैद्राबाद सुधारणाचे कांहीं विशेष
(पुणे, ३०-९-१९४६)

* * *

# पुरस्कार

दुःख आणि आनंद यांनीं समिश्र अशा अवस्थेत या पुरस्काराचे लेखन मी आरंभीत आहे. दुःख अशासाठीं कीं, प्रस्तुत ग्रथाचे कर्ते माझे स्नेही हैदराबाद येथील उस्मानिया विद्यापीठांतील मराठीचे प्राध्यापक श्री. चिंतामणराव जोशी हे कालाधीन झाले आणि हा ग्रथ मुद्रित आणि प्रकाशित झालेला पाहण्यास आज आपणामध्ये नाहींत! अनेक वर्षे प्रयत्न करून आणि अभ्यासपूर्वक 'श्रीधरचरित्र आणि काव्यविवेचन' या ग्रंथाची रचना जोशीबुवानीं चालविलेली मला ठाऊक होती! अखेरीस शरीराला जेव्हा दुर्धर रोगानें ग्रासिले तेव्हा पुढील भविष्य ओळखून त्यानीं जोराने हात चालवून ग्रंथाचा आराखडा लिहून पुरा केला आणि परलोकी प्रयाण केले! त्यावेळीं त्याना काय वाटलें असेल तें त्याचे त्यानाच माहीत! अशा परिस्थितींत आपल्या एका व्यासगी मित्राचे आणि सहकाऱ्याचे देहावसान झाल्याचें स्मरण होताच मनात दुःख का दाटणार नाहीं?

पण या दुःखासमवेतच आनंद वाटावा अशी दुसरी एक घटना घडून आली! आपल्या पूज्य पित्याचें वरील लिखित घेऊन त्याचे चिरंजीव श्री. विनायकराव हे एक दिवस माझ्यासमोर येऊन उभे राहिले. श्री. विनायकराव कॉलेजमध्यें पुण्यास शिकत होते त्यावेळीं मराठीचे विद्यार्थी

म्हणून त्यांचा माझा जुना संबंध होताच. शिवाय हैदराबादेस कै चिंतोपंतांचे आतिथ्यही मला अनुभवावयास मिळत असल्याने या संबंधास दृढता आली होती. दुखवट्याचें व सांत्वनाचें भाषण संपताच विनायकरावांनीं आपल्या वडिलांचे हस्तलिखित मजपुढें ठेवून ते प्रकाशित करण्याचा आपला मनोदयही कळवून टाकिला ! या सत्पुत्राचे हे भाषण ऐकताच मला आनंदाने गहिंवरून आलें ! कांहीं दिवसापूर्वीं कै कवि राधारमण यांचे चिरंजीव ही असेंच सत्कृत्य सिद्धीस नेऊन माझ्या भेटीस आले होते. सांप्रतकाळीं असे गोड अनुभव विरळच येतात ! उलट अनुभवांना तोटा नाहीं ! एका प्रसिद्ध साहित्यकाच्या वडिलांचें उपेक्षित लिखाण आज मीच सांभाळीत आहे ! त्यातून जुनी मराठी कविता, कोण पहातो तिच्याकडे ? पण विनायकराव व त्यांचे बंधु या उभयतांनीं वडिलांचा अपूर्ण हेतु कितीही खर्चवेंच पडला तरी पूर्ण करण्याचा चंग बांधलेला पाहून मी अगदीं हरखून गेलों आणि तात्काळ 'मागाल ते साहाय्य देईन' असें म्हणून विनायकरावास शाबासकी दिली ! मला खरोखर धन्यता वाटली !

एवढ्यावरच थांबले नाहीं ! विनायकराव यांनीं मी केलेल्या सूचना अमलात आणण्यासाठीं पंढरपूरच्या वाऱ्याही केल्या, वडिलांचे अनुकरण करून श्रीधरमठातील बाडें धुंडाळलीं, श्रीधर-वंशज श्री. तुकारामपंत-यास नेऊन ते येथे आले, कांहीं निवडक बाडें येथे आणलीं, श्रीधरहस्ताक्षराचा निर्णय करून घेतला, हस्ताक्षरादिकांच्या प्रतिमा करविल्या, नवीन शोधांत मिळालेली माहिती पुरवणीरूपाने जोडण्याची तत्परता दाखविली, आणि शेवटीं मला पंढरपुरीं नेऊन राऊळवाड्यात वडिलांची सेवा श्रीधरचरणीं समर्पण करण्याचा समारंभही घडवून आणिला ! ! आणखी काय पाहिजे ?

आणि जे पाहिजे असें मला वाटत आहे ते हे उत्साही सुपुत्र अवश्य पुरवितील असा भरवसा मला वाटतो! आनदाने आणि संतोषाने माझें मन भरून गेलें आणि याच उत्फुल्लावस्थेंत हा पुरस्कार विनायकरावाच्या विनतीवरून मी लिहिण्यास सिद्ध झालो आहे.

'काव्येतिहाससग्रहा' तील इतिहासविभागाचे सपादक 'विष्णुपत' चिपळोणकराचे सहकारी, आणि आमच्या भारत इतिहास संशोधक मडळाचे अध्यक्ष कै. रा ब. काशिनाथपत साने यानीं आमच्या भारत इतिहास सशोधक मडळापुढे श्रीधराविषयीं माहितीचे एक टिपण शके १८३३ सालीं म्हणजे चाळीस वर्षापूर्वी सादर केले, आणि 'श्रीधरस्वामी–पुन्हा एकदा' म्हणून शके १८३५त त्यानीं त्यात भर घालून ती भर विविध-ज्ञान-विस्तारात इ. स १९१४ त प्रसिद्ध केली. मग यावर शका,उत्तरे,पुरवणी कै. पा. न. पटवर्धन, कै. भारद्वाज (भारदे) प्रभृतींनीं केली आणि हे सर्व वाचून साने याची सूचना मनात भरल्यामुळे मयूरचरित्रकर्ते कै. लक्ष्मणरावजी पागारकर याच्याप्रमाणेंच श्रीधरकवीचा परामर्श आपण घ्यावा असे कै प्रो. चिंतोपत जोशी यानीं ठरविले. प्रथम त्यानीं पढरपुरास जाऊन श्रीधर–मठातील साहित्य धुडाळले व अभ्यासिले.त्यात नवीन माहिती मिळाली ती आमच्या भारत इतिहास सशोधक मडळासमोर वाचली. आणि विविध ज्ञान–विस्तारातून वगैरे लेख प्रसिद्ध केले. सवेंच श्रीधरकाव्य–समुद्राचे आलोडण चालू ठेविले. याप्रमाणे 'श्रीधर:चरित्र आणि काव्यविवेचन' या ग्रथाची सिद्धता त्यानीं चालविली आणि साधारणपणें आठ दहा वर्षे कष्ट करून आपला संकल्प पुरा करीत आणला! आज त्याच्या श्रमाचे फळ ग्रंथरूपाने आपणापुढे येत आहे. जोशीबुवानीं कसलाही कंजूषपणा केला नाहीं त्यामुळेच हा सुमारे साडेसहाशे सातशे पृष्ठाचा ग्रथ आपल्या परितोषार्थ सादर झाला आहे.

जुन्या प्राचीन थोर पुरुषाची फारच थोडी माहिती आज आपणास उपलब्ध आहे. कालक्रमवार आणि विविध तपशीलानीं सजविलेली अशी माहिती लिहून ठेवण्याची प्रथाच आपल्याइकडे अगोदर विशेष रूढ नाहीं. त्यातून जी काय थोडीं थोडकीं टिपणे टाचणें या कामीं उपयोगीं पडावीं त्यातील बहुतेक नष्ट झालेलीं ! त्यामुळं आज जी आम्हाला जुन्या-काळची यथावत् व साधार चरित्रें पाहण्याची तीव्र क्षुधा लाभलेला आहे तिचें काहींच शमन होऊं शकत नाहीं.

एवढे मोठमोठे शूर योद्धे, वीर, राज्यसस्थापक, मत्री, साधुसत, आचार्य, कवी आणि विद्यासेवक आमच्यांत होऊन गेले, पण साधार, सुसंगत आणि विश्वसनीय असे त्याच्याविषयीं अगदींच अल्प ज्ञान आपणास होऊं शकते. चालत चालत आलेल्या आख्यायिका, असभाव्य चमत्कार, असबद्ध गोष्टी, याचाच भरणा फार ! कोणाचें केवळ नाव मिळते तर गावाचा पत्ता नाहीं, गाव आढळतें तर कुळाचा थाग नाहीं, कुळ मिळाले तर काळाचा शोध नाहीं, मग भरींव चरित्र मिळावें कसें ? म्हणून तर केवळ दीडदोनशे वर्षांपूर्वीं होऊन गेलेल्या मोरोपतासारख्या पडित कवीचें चरित्र जुळविण्यासाठीं पागारकरानीं वणवण केली आणि अखेर हातीं जे काय लागलें ते पाहून ते मला म्हणाले, " काय करावे ! चरित्र म्हणून तर ऐवज थोडा", मग त्यानीं युक्ति योजून ' चरित्र आणि काव्यविवेचन ' असें नामकरण योजिले ! तोच नमुना आमच्या चितोपतानाही गिरवावा लागला. घरोघर श्रीधराचे ' रामविजय ' ' हरिविजय' आम्ही वाचीत असतों ! पण 'चरित्र' ? बालपणीं माझी मातोश्री मजकडून महिपतीचे ग्रंथ वाचवून घेई. हा अनुभव माझ्या पिढींतल्या अनेकाप्रमाणे मलाही आलेला आहे ! पण कोणी चरित्राचे नाव काढले असेल तर शपथ ! 'लीलामृत'हाच आमच्या चरित्राचा पर्याय ! !

अशा दुर्धर परिस्थितीत काहीं तोडगे अजूनही करण्यासारखे आहेत. ते वेळेवर केले तर अद्यापिही विश्वसनीय असे काहीं ज्ञान आपल्या हातीं लागेल ! पण ती विद्या हस्तगत केली तरच ना ? जोशीबुवा या मार्गात आले पण जरा उशीराच म्हणाना !

कुळाची व कुळातील व्यक्तींचीं नावे गावे पाहिजे असतील तर आज महाराष्ट्रात एकच निदानींचे साधन आहे ! अद्यापि जिवत आहे ! उद्याचा भरवसा कोणी द्यावा ?

हें साधन म्हणजे आमच्या तीर्थोपाध्यायाकडील नामावळ्या व लेख ! आज नाशिक–त्र्यंबकेश्वरीं निदान ३०० ते ३५० वर्षांचे म्हणजे दहाबारा पिढ्यांचे जुने मूळ लेख जपून ठेवलेले आढळतात. अशा निदान पंचवीस हजार वह्या नाशिकला असाव्यात. आता तीर्थोपाध्यायावरील श्रद्धा उडत चालली आहे. त्यामुळे अत्यंत जुने जुने लेख असलेल्या जीर्ण वह्या नष्ट होण्याच्या पथास लागल्या आहेत आम्ही सुमारे महिनाभर हिंडन या वह्यांचीं स्वरूपे पाहिलीं ! केवळ महाराष्ट्रीय ब्राह्मण,क्षत्रिय, साळी, माळी, सुतार लोहार,वाणी–उदमी इत्यादी शेकडो कुळांचे लेखच या तीर्थोपाध्या-जवळ आहेत असे नव्हे, तर शीख, मारवाडी वगैरे अनेकांचे लेख आहेत. असे कळते की, श्रीधर–कुळाचे नाशिकचे तीर्थोपाध्ये ‘वारे’ आहेत. तेव्हा ‘ वारे ’ यांचेकडील नाझरेकर, देशपांडे, खडके, घोडके यांचे सर्व लेख पाहिले पाहिजेत आणि त्याबरहुकुम छापून प्रसिद्ध केले पाहिजेत. भाऊबंदकीच्या वादात वंशावळी केलेल्या आढळतात या अपूर्ण व पक्ष-पातीही असण्याचा संभव असतो. तीर्थोपाध्यायाकडील धर्मबुद्धीने दिलेले लेख, काल, नावे व नातीं यांचा अधिक तपशील देणारे असतात. श्रीधरकुलासंबंधाने हीं साधनें तपासून शोधून प्रसिद्ध व्हावयास पाहिजेत.

त्यामुळे अनेक प्रश्नांचा उलगडा होईल. मग रंगनाथ श्रीधराचा चुलता कीं चुलत-चुलता अशा शंका चटकन् उलगडून जातील ! हे शोधाचे काम आजवर झालेलें नाहीं. ते व्हावयास पाहिजे तसे झालें म्हणजे आपण जोशीबुवांच्यापुढे आणखी एक पाऊल टाकू.

आपल्याकडील वंशावळयांतून आधीं स्त्रियांचीं नावेंच बहुधा नसतात. कन्या असल्या तर सासरचें कुळ नोंदलेले नसते, पत्न्या असतात तेथे माहेरचे नावगाव नोंदलेलें नसते त्यामुळें आज आपणास श्रीधरपत्नी 'पार्वतीबाई' यांच्या माहेरचा पत्ता काढणे कठीण होऊन बसले आहे पण नाशिक-त्र्यंबक येथील तीर्थोपाध्यायाचे संग्रह येथेही काहीं उपयोगीं पडतील पंढरपूर-नाझरें याखेरीज बारामती-पाथरी वगैरे गावीं श्रीधरानीं ग्रंथलेखन केलें. त्यांशीं असा घरच्या नात्याचा किंवा शिष्यपरंपरेचा संबंध संभवतो. आमच्या जोशीबुवानीं श्रीधरानें तीर्थयात्रा केली असें आपल्या मतें सिद्ध केले आहे. पण तीर्थोपाध्यायाकडे डोकावण्याचें व विचारपूस करण्याचे त्यास सुचले नाहीं. असो. यापुढील शोधकानीं हें काम आता केले पाहिजे.

तसेच श्रीधराने शके १६३९ त पंढरपुरीं घर खरेदी केल्याचे व शके १६५९ त श्रीधरपुत्रांत वाटणी झाल्याचे मूळ कागद श्रीधरमठात जोशीबुवानीं पाहिल्याचे नमूद केले आहे. परंतु, हे कागद कोणीच प्रसिद्ध केले नाहींत. पांगारकरानींही तुकारामचरित्रात लोहगावीं किंवा बहिणाबाईमठात पाहिलेले घरगुती कागदपत्र प्रसिद्ध केले नाहींत ! त्याचें महत्त्वच यावे तसें या मंडळींच्या लक्ष्यात आलेलें दिसत नाहीं. हेंच पहा कीं, श्रीधरखरेदीपत्रावर पाचपन्नास साक्षी आहेत. अर्थात् या मंडळींत पंढरपूरचे श्रीधर शिष्य, आप्त, श्रेष्ठी वगैरे कोणी असण्याचा

संभव आहे. त्यांची नांवे व सद्याही या गोष्टी–मार्शीन आपणास मिळ–ण्याचा पुष्कळ संभव आहे. तसेंच खरेदीपत्रात घराची लांबी-रुंदी व चतुःसीमा नोंदलेल्या असतात. त्यावरून काहीं पडताळा पाहता आला असता. आम्ही जेव्हा परवा श्रीधर पुण्यतिथिनिमित्त विनायकराव जोशांच्या निमंत्रणावरून हा चरित्रग्रंथ श्रीधरसमाधिस्थळीं समर्पण करण्यासाठी गेलों, त्यावेळीं पाहिले तो प्रस्तुतचे श्रीधरगृह पांचपन्नास वर्षांपूर्वी बांधलेले किंवा दुरुस्त केलेलें दिसले. पण शेजारचे 'ताठे' यांचे घर डोकावून पाह–ण्याचा प्रसंग आला तेव्हा तेथे मात्र खांब-तुळया वगैरेचा ठेवण दोन–अडीचशे वर्षांची जुनी दिसली.मग बारकाईने पाहता ताठे–घराच्या आणि श्रीधरगृहाच्या माठीव जोत्याची चाल मात्र एकच दिसून आली. त्याव–रून वाटलें की, एके काळीं हे जोते एकच असावे व घर व त्यावरील इमलाही कधींकाळीं एकच असावा. जर श्रीधरगृहाची इमशाई लांबीरुंदी खरेदीपत्रावरून पडताळून पाहता आली असती तर या शंकेचे निरसन होऊ शकले असते. श्रीधरमठाचा वरचा इमला मोडून नादुरुस्त झाल्यामुळें नवा बांधला आहे. ताठे–इमला पुरातन आहे पण हा बारीक तपास मूळ खरेदीपत्राशिवाय करता येणार नाहीं आणि तो तर घरगुती म्हणून प्रसिद्धीस अनावश्यक समजून कोणी केला नाहीं. वाटणीपत्र-ही अशाच बारीक सारीक बाबींसाठीं उपयोगी पडेल.

तसेंच श्रीधर व त्याचे पुत्र यानीं संपादिलेल्या इनामाच्या सनदा अस्सलबरहुकुम शास्त्रशुद्ध यथाप्रति मुद्रित करून चरित्रात जोडावयास पाहिजे होत्या. हा सर्व साधन–विभाग 'पुरवणी' म्हणून देणे उपयुक्त ठरले असतें. साने यानीं सनदा छापताना त्यात नसलेलीं विरामचिन्हे घातलीं, तींच जोशीबुवानीं उतरलीं. जोशीबुवाना शिक्के गोलाचे चौकोनी छापावे

लागले पण जोशीबुवांच्या उताऱ्यातील शिक्क्यांचीं अक्षरे उघड ओळीवार व शिस्तवार मूळाप्रमाणें यथाप्रति नाहींत ! म्हणजे हें कामही झाले असले तरी अपुरेंच झालें आहे. पुन्हा शास्त्रोक्त संस्कार करून केलें पाहिजे. रुजु–समते,शेरे अक्षरातरे सर्व दिलीं पाहिजेत. याच्याच जोडीला श्रीधर–वंशजाजवळ भोगवट्याचे आणखी कांही कागद असल्यास निवडून प्रसिद्ध केले पाहिजेत पेशवे–दप्तरांत गांवझाडे व मूळ सनदा आढळतील. ते भाडार शोधकास पाहाण्यास आतां मोकळीक झाल्याने तोही शोध केला पाहिजे. म्हणजे यायोगेही आपणाला श्रीधरासंबंधीं कांहीं नवीन माहितीचे तुकडे मिळतील.

श्रीधरचरित्राची रचना जोशीबुवांनीं पागारकरांची कृति पुढे ठेवून केलेली आहे. या ग्रथातील चौथे प्रकरण 'श्रीधराचें भक्तमडळ व समकालीन कवि' असे आहे. त्यात सामराज, सिवराम, मध्वमुनीश्वर वगैरेंनीं श्रीधराविषयीं लिहिलेल्या पुष्पाजुळ्या व काव्यग्रथित पत्रें आहेत. श्री जोशी यानीं श्री. साने याच्या सामग्रींत श्रीधरमठातून शोधून कांहीं चागली भर घातली यात सशय नाहीं ! तथापि मध्वमुनीश्वर प्रभृतींचीं पत्रें व श्रीधराचीं उत्तरे म्हणून जें साहित्य पुढें आलें आहे त्याची अधिक चिकित्सा व्हावयास पाहिजे. कारण त्यात सहज कांहीं शंकास्थळें मनाला आडवितात. या पत्रोत्तरातील पुढील ओळींकडे घटकाभर लक्ष द्याः—

'लिखित म्या लिहिले तुजला करें
उची ( चि )त दर्शन दे मजला त्वरे "

नेमक्या याच ओळीं मध्वमुनीश्वराला श्रीधरानें लिहिल्या व दुसऱ्याही उत्तरात पुनरुक्त झालेल्या आहेत. त्यातून दुसरे उत्तर तर केवळ चारच

ओळींचे आहे. इतकीच शंका नाहीं तर मच्छमुनीश्वराच्या दुसऱ्या पत्रात जवळजवळ तशाच ओळी आलेल्या आहेत:—

" लिखित म्या लिहिले आपल्या करीं।
उची ( चि )त मानेल जें तुज ते करी ॥ "

" लिखित म्या लिहिले " इ. हा कांहीं ठराविक मायन्यासारखा प्रकार होता असे ठरविता आले पाहिजे आणि तसे करावयास आणखी श्रीधरादिकांचीं पत्रेंही मिळालीं पाहिजेत. तोंवर मनाचा संशय कायमच राहील आणि या पत्राचे प्रामाण्यही घोटाळतच राहील.

याच चौथ्या प्रकरणात ग्रंथकर्त्यांने पृष्ठ सत्तरमध्ये श्रीधराने समर्थ रामदासस्वामी यास " खास " पाहिले असावें वगैरे विधाने केलीं आहेत. पण एवढ्या खात्रीचें विधान करण्याला पाहिजे तेवढा सबळ पुरावा कांहीं दाखल केलेला नाहीं. समर्थसांप्रदायी गिरिधरस्वामी यानीं ' श्रीधर कुटुंबी' म्हणून ' रामविजय ' ' कृष्णविजय ' ('हरिविजय' ?) कर्त्या श्रीधराचा जो उल्लेख केला आहे तो आणि आपल्या 'संतमालें'त श्रीधराने रामदासाचा जो गौरव केला आहे तो असे पुरावे पुढे मांडले आहेत. शिवाय त्यांच्या लिहिण्यावरून ' खड्चा श्रीधर ' ही ग्रंथकर्त्यांने खोटी ठरविलेली कथाही त्यांच्या मनासमोर खेळत होती हे उघड होते.

आता ग्रंथकर्त्यांबरोबर जरा मागे "कुलवृत्तान्त" प्रकरणाकडे जाऊ तेथें शेवटीं पृष्ठ तेरामध्ये ग्रंथकर्ता म्हणतो कीं, श्रीधराची पहिलीं वीस वर्षें –ग्रंथकर्त्यांच्या मताप्रमाणे शके १५८०–१६००–' माणनदीचे परिसरात ' नाझरे येथेंच त्याने घालविलीं असावीं. आणि हे त्याचे म्हणणे पुष्कळसें सयुक्तिक दिसते. समर्थरामदासाचा निर्याणकाल शके १६०३ हा निश्चितच

आहे. श्रीधराचे पिते व सद्गुरु ब्रह्मानद नाझऱ्याहून पढरीस शके १६०० त आपल्या कुटुंबीयासह आले असें ग्रंथकर्त्यांचे अनुमान आहे, आणि या ब्रह्मानंदयतींनीं श्रीधराच्या उपदेशार्थ व शंकासमाधानार्थ ' आत्मप्रकाश ' नामक वेदान्त–ग्रथ शके १६०४ मध्ये सपविला हे तर निश्चित आहे. अर्थात् श्रीधर शके १६०४ या काळापर्यंत ब्रह्मानदयतींच्या सेवेंत, छायेंत व शिक्षेतच आहे. श्रीसमर्थ पंढरीस गेले असले तरी वाकेनिशी टिपणा- ( रामदास रामदासी ) मध्यें ते चरित्र शके १५७१ त झाल्याचें नमूद आहे. एवच, उपलब्ध पुरावे पाहता समर्थनिर्याणकाळीं जरी श्रीधरांचे वय तेवीस धरलें तरीही तो त्यावेळेपावेतों नाझरें व पढरीबाहेर गेला असण्याचा काहीं सभव नाहीं, आणि आपल्या विद्वान् यतिवर्य वडिलाच्या सान्निध्यांत व सेवेतच तो या काळीं होता. त्यामुळें बाहेर जाऊन समर्थांची भेट त्यानें घेण्याचा सभव नाहीं आणि समर्थ तर श्रीधराच्या ग्रथ- कर्त्यानें ठरविलेल्या शके १५८० च्या जन्मशकाच्या अगोदर नऊ दहा वर्षे म्हणजे शके १५७१ त पढरीस गेले होते असे मानावे लागतें. मग श्रीधरानें समर्थास पाहणें " खास " सभवणार कोठून ? रगनाथाने 'खडू' चा श्रीधर केला ह्या कथेत रामदासाचा संबध आला आहे पण ही कथा ग्रथ कर्त्याने खोटी ठरविली आहे. तथापि वरील विधान करताना तीच कथा थोडीशी त्याचे मनावर चिकटलेली असावी एवढाच हिशेब खरा दिसतो. गिरिधरानें श्रीधराच्या 'हरिविजया'चा ' कृष्णविजय ' केला आहे आणि समर्थांना श्रीधराच्या पंक्तींत परामर्षासाठीं आणलें आहे. तेव्हा ते केवळ गौरवाचें बोलणे धरावें लागेल गिरिधर आणि श्रीधर एकाच वर्षीं इहलो- कातून गेले. तथापि उभयताचा परिचय असावा असे दिसत नाहीं. मात्र श्रीधराची ऐकून माहिती गिरिधरास असली पाहिजे. श्रीधरानें 'त्या राम- दासें ध्वज लावियेला ' इत्यादि स्तुति केली. त्यावरून या प्रकरणीं पुरावा

म्हणून उपयुक्त असे काहीं हातीं लागू शकत नाहीं अशा अनेक साधु-संतांच्या प्रशंसा श्रीधराने इतरत्र केलेल्या आहेत. येथे सहज हे सांगितलेले बरें कीं, वरील रामदासचरणाचा अर्थ लावतांना 'ध्वज लावणे' म्हणजे कीर्ति-पराक्रम करणे, नांव कमाविणे एवढाच अर्थ आहे. ग्रंथकर्त्याप्रमाणें या ध्वजाचा संबंध शिवाजीच्या भगव्या ध्वजाशीं जोडणें प्रत्ययोत्पादक वाटत नाहीं. पहा कीं, "'सतमालें'मध्ये (पृ. १७९) याच ग्रंथकर्त्यांने श्रीधरकृत मुकुंदराजस्तवनाचा श्लोक दिला आहे. त्यातही नेमका असाच उद्गार आहेः—" मुकुंदराजे ध्वज लावियेला." येथे कीर्ति केली एवढाच अर्थ असून दुसरा तिसरा काहीं अर्थ नाहीं हे स्पष्ट आहे.

तीच गोष्ट वरील श्लोकात (पृ. ७१) रंगनाथी 'योगवासिष्ठा'-बद्दल म्हणता येईल. श्रीधराने 'रामविजय' व 'हरिविजय' यात केलेले 'योगवासिष्ठा'चे उल्लेख छत्तीस हजाराच्या 'योगवासिष्ठा'चे म्हणजे उघड उघड मूळ संस्कृत 'योगवासिष्ठा'चे आहेत. रंगनाथाच्या नावावर म्हणून जें 'योगवासिष्ठ' मराठींत प्रसिद्ध झालें आहे ते निगडीकर रंगनाथाचें कीं मोगरेकर रंगनाथाचें हे संशयास्पद आहे. भावे यानीं आपल्या महाराष्ट्र-सारस्वत (आवृत्ति दुसरीः इ. स. १९१९ पृ. १४२ व पृ. २३३ पहा) या ग्रंथात 'योगवासिष्ठसार' रंगनाथ मोगरे-कराने शके १५३० त केल्याचें आणि रंगनाथ निगडीकराने त्याच नावाचा म्हणजे 'योगवासिष्ठसार' नावाचाच ग्रंथ शके १५८४ मध्ये केल्याचें नमूद केले आहे! आणि मौज ही कीं, दोन्ही ग्रंथ 'दहा' प्रक-रणाचेच आहेत. चांदोरकरकृत 'संतकविकाव्यसूचि' मध्ये 'योगवासिष्ठ' व 'योगवासिष्ठसार' या नावाचे अकरा ग्रंथ नोंदले आहेत! संस्कृतातही 'बृहद्योगवासिष्ठ,' 'लघुयोगवासिष्ठ' वगैरे

नावाचे ग्रथ आहेत. चादोरकरानीं ज्ञानेश्वराचे मराठी ' योग वासिष्ठ ' प्रसिद्ध केले आहे. त्यात ( प्रस्तावना पृ. १४ ) चार रगनाथाचा उल्लेख केला आहे आणखी घोटाळ्याला कारण असे की, रगनाथ मोगरेकर व रंगनाथ निगडीकर दोघेही ' आनद ' साप्रदायी आहेत. रगनाथ निगडीकराची ' सतमालिका ' छापली आहे, तींत काशीराज व विश्वनाथ याचा उल्लेख आहे. ( पृ. १५ प्रस्तावना, धुळे, गो का. चादोरकर याचा ' योगवासिष्ठ '–ज्ञानेश्वर ). काशीराज हा रगनाथ निगडीकर याचे बधु विठ्ठल आत्यास्वामी याचा पुत्र. रगनाथ मोगरेकर परपरेंतही रगनाथ काशीराज–हीं नावे कै. गो. का चादोरकर देतात. हा सर्व तपशील ध्यानात घेतला असता येथे बराच घोटाळा आहे हें उघड आहे रंगनाथ निगडी-कराच्या मठातील ' योगवासिष्ठसार ' मिळवून प्रसिद्ध करणारे श्री. मानकर ( शके १८११ ) याच्या प्रस्तावनेत अशी माहिती आढळतें कीं, निगडी–मठात व इतरत्र अशा रगनाथी ' योगवासिष्ठसारटीका ' ग्रथाच्या अनेक पोथ्या होत्या. पैकीं मठातील पोथी दृष्टाताने पसत ठरली व दृष्टातानेंच ती श्री. मानकर याजकडे प्रकाशनासाठीं गेली. यासबधीं श्री. मानकर याना श्री. वामनबुवा निगडीकर यानीं लिहिलेल्या पत्रात " हा ग्रथ कित्येक वेळा करण्यात आला " असा मजकुर आहे. त्यावर सपादक लिहितातः—

" सर्व प्रतींवरून पाहता असें दिसतें कीं, हा ग्रथ स्वामींनीं पुष्कळवेळा सुधारून पुनः पुनः केला असावा. " सुलभतेकरिता भाषा-सुधारणाही पुष्कळ करण्यात आलेली त्यास आढळली. ते आणखी सागतात, " पूर्वीच्या प्रतींतून दहाव्या प्रकरणाच्या शेवटीं जास्त असलेल्या सुमारे दीडशे ओंव्या निगडी येथील प्रतींत स्वामीनींच घेतल्या नाहींत

म्हणून छापिल्या नाहींत. " म्हणजे या वादाव्याच्या ओव्याचात्र संबंध मोगरेकर रंगनाथाशीं असेल नव्हे, असावाच असा दाट संशय पक्केपणीं मनात भरतो, कारण संहिता बव्हंशी नव्हे सर्वांशीं उभय रंगनाथी प्रतींत तीच आहे. काय चुरस असेल कीं आणखी काहीं असेल न कळे, पण जशी मानकरांनी निगडीकर रंगनाथी योगवासिष्ठ–प्रत शके १८११ त छापून प्रसिद्ध केली त्याप्रमाणे त्याच १८११ शके मध्यें आत्माराम यशवंत यानीही मुंबईसच पण सोहनी यांच्या जगदीश्वर छापखान्यात श्रीयोगवासिष्ठ-सार- पोथी प्रसिद्ध केली !

आम्ही मानकरी व जगदीश्वरी दोन्ही छापील पोथ्या ताडून पाहिल्या. त्यात १ ते ९ या प्रकरणात फक्त १३ ओव्या 'जगदीश्वरींत' अधिक आहेत, आणि शेवटच्या दहाव्या प्रकरणात 'येथे समाप्ति जाली ग्रंथासि' अशी ओवी लागली. त्यापासून जगदीश्वरी प्रतींत १५३ ओव्या निराळ्या आहेत लक्ष्यात घेण्यासारखी गोष्ट ही कीं, वर मानकर प्रतींत ज्या १५० ओव्या मुळात असून गाळल्या आहेत म्हणून आम्ही नमूद केले आहे त्याच ह्या १५३ ओव्या असल्या पाहिजेत हें अनुमान अगदीं सरळ निष्पन्न होते आणि संशय बळावतो. जगदीश्वरी प्रतींतील वादाव्याच्या या १५३ ओव्यात रंगनाथ मोगरे त्याचें गाव, गुरु कृष्णानंद, बाप आपेराज ग्रंथ समाप्तीचे स्थळ नाशिक आणि ग्रंथसमाप्तीचा शक १५३० इत्यादि रंगनाथ मोगरेकराची सर्व माहिती आली आहे. आणि हीच नेमकी निगडी मठातील प्रतींत असली पाहिजे. मानकरी प्रत तीवरून छापताना निगडीकराच्या संमतिसंतोषाने छापिली नाहीं !

बरे, एवढ्यावरच घोंटाळा संपत नाहीं. प्रकरणशः ओव्या तपासता फरक एवढाच आढळला कीं, जेथे एकींत ( मानकरी )' सहज -पूर्ण–निज-

रग ' असा सपूर्ण किंवा अपूर्ण उल्लेख आहे तेवढा चरण, चरणार्ध किंवा सबंध ओवीच तेवढी फिरविलेली आणि त्या जागीं मूळातील ' रंगनाथु ' किंवा ' रगनाथु कृष्णदासु ' किंवा रगंनाथ कृष्णानंद अशा सारखीं अक्षरें बदललेलीं आढळतात !

एकदरींत निगडीकरापेक्षा मोगरेकराकडेच 'योगवासिष्ठाचे' कर्तृत्व द्यावें हे अधिक बरे वाटू लागते. कारण 'चित्सदानदलहरी' व 'योगवासिष्ठ' यांत अधिक भाषासाम्य दिसून येतें. रगनाथींपदाची भाषा पाहता ही ती निराळी वाटते. जगदीश्वरी प्रतींत उकारी वळण ही अधिक आढळते. अडचण एकच कीं, निगडकरी 'योगवासिष्ठा'त ही समाप्तिशकच नव्हे तर दिवसवार वगैरे १५३० आश्विन अष्टमी गुरुवार हाच म्हणजे 'चित्सदानदलहरी'चाच दिला आहे. एवढे दोन ग्रथ एकाच दिवशीं समाप्त कसे होतील? शिवाय 'वासिष्ठ' लिहिल्यावर गीताटीका केली असें ' चित्सदानदलहरींत ' म्हटले आहे. अर्थात् ते खरें धरले तर ' योगवासिष्ठ ' शके १५३० च्या आधीं लिहिले असे मानावें लागेल. असा हा महान् घोटाळा आहे. अनेक हस्तलिखिते जमवून, तपासून, वंशवेल, स्थळशोध वगैरे सर्व चिकित्सा–सस्कार केल्याशिवाय आपण निश्चित विधाने करणे धोक्याचे आहे. असे होईल तेव्हाच श्रीधराने रगनाथी ' योगवासिष्ठ ' अभ्यासिल्या-बद्दल आपणास निश्चयानं बोलता येईल. तावर नाहीं. आणि बोललोंच तर फार सावधपणाने, बेताने आणि सशयानेच बोलले पाहिजे निश्चयानें नव्हे.

श्रीधरकृत 'जैमिनिअश्वमेध' प्रकरणीं ही असेच एक शकास्थान मनात उभें रहातें सुप्रसिद्ध विद्वान् क. भारद्वाज ( भारदे ) यानी इ. स. १९१४ मार्चमध्ये 'विविधज्ञान विस्तारा'त हे शकास्थान प्रगट केले. 'जैमिनिअश्वमेधा'च्या अर्वा एके प्रतींत आढळणाऱ्या ओव्या त्यानीं दिल्या आहेत. त्या येथे उतरूनच दिलेल्या बऱ्या:—

अ) " आता वदू कुलदैवत । जे नमो प्रसिद्ध सिद्धनाथ ॥
ब्रह्माडमंडपनगरीं राहत । भक्तमनोरथ पुरवावया ॥१३॥

( अध्याय १ )

आ) सकलजनकविकिंकर । या आदि निमित्य श्रीधर ॥
पूर्वी निवास कृष्णातीर । अष्टग्रामीं मिरासी ॥७३॥
श्रीविडाडीसिद्ध कुलदैवत । विडाडी जनक निश्चित ॥
माता तरी आणि पुण्यवत । लक्ष्मी नामे पतिव्रता ॥७४॥
त्यांच्या चरणप्रसादाची धूळी । बाळपणापासुनि दुर्लभ झाली ॥
म्हणुनि अग्रजें त्र्यंबकें तनु वाढविली । प्रकाश केला बुद्धिचा ॥
साधुनी त्याचे प्रसादाजन । किंचित् लावलो मी निधान ॥
त्या पुण्ये वर्णिलें हरिमहिमान । तें पुण्य त्याचें तो घेवो ॥७६॥
अंतरीं प्रवेशोनि श्रीहरि । ग्रंथ करविला पार्थनगरीं ॥
समाप्त झाला तेच नगरीं । करविला तेणें दयेने ॥७७॥
इंदुकला शतांकित शक । मुनित्रयःब्दें जाण अधिक ॥
वर्तमानाब्दे प्रतिनायक । मास पौष शुक्लपक्षीं ॥७८॥
सप्तमी सोमसुत दिवसात । दक्षिणायनाचा असे प्रांत ॥
ते दिवशीं ग्रंथ समाप्त । पाथरीमाजी जालासे ॥७९॥

( अध्याय ९६ )

'जैमिनिअश्वमेधा'च्या ज्या बहुतेक छापील उपलब्ध प्रति आहेत त्यात या ओव्या आढळल्या नाहींत. हेगिष्टे प्रत शके १७८६, (दाते–सूचि) पाहाण्यास मिळाली नाहीं. या प्रचलित व उपलब्ध प्रतींतून अध्यायसंख्या मात्र शहाण्णवच आहे. अर्थात् शहाण्णवाव्या अध्यायाच्या

शेवटीं श्रीधर–ब्रह्मानदाची परपरा इतरत्र आहे तशीच दिलेली आहे. शिवाय शकाचा निर्देश प्रत्यक्ष सोळाशे सदतीस असा स्पष्ट केलेला आहे. मात्र ग्रथसमाप्तीचे स्थळ 'पाथरी' हेंच दिलेले आहे

पण याशिवाय एक गोम येथें आहे. प्रथमाध्यायात पुढील ओवी आलेली आहे:–

" आता वदू कुलदैवत । जो नामें प्रसिद्ध सिद्धनाथ ॥
ब्रह्माडकपित्थ नगरीं राहत । भक्त मनोरथ पुरवावया ॥१॥
( आर्यभूषण प्रत, व गणपत कृष्णाजी प्रत शके १७९१ )

घोटाळ्याचे एक मुख्य बीज या ओवींत सापडते भारदे यानीं उद्धृत केलेली व ही ओवी बहुतेक सारखीच आहे ग्रथकर्ते प्रो.जोशी यानी पृ. ४६२ मध्ये नमूद केले आहे कीं,श्रीधर या ग्रथात सागतो:–"आरभींच आपलें कुलदैवत कवि (पि) त्थ ( कवठगावीं ) नगरीं असलेला सिद्धनाथ होय. " परतु श्रीधरानें आपल्या कोणत्याही इतर ग्रथात आपले कुलदैवत बिऱ्हाडासिद्ध असल्याचे सागितलेले नाहीं. वर कपित्थ गावचा सिद्धनाथ म्हटला आहे तो कवठ्याचाच बिऱ्हाडसिद्ध होय हे उघड आहे. हे बिऱ्हाड सिद्धाचे कवठे सागली तासगाव लगतचे प्रसिद्ध देवस्थानचे गाव होय ग्रथारभीं कुलदैवत बिऱ्हाडासिद्ध ( कवठे ) सागितल्यावर भारदे प्रतींतला श्रीधर अतीं तेच कुलदैवत सागतो ते अधिक जुळणारे वाटून ते खर मानण्याला एक कारण तरी मिळते. मात्र दोन ' श्रीधर ' असतील तर दोघानींही आपला ' जैमिनीअश्वमेध ' एकाच म्हणजे ' पाथरी ' गावीं लिहिला असे सागावे आणि सांगितले तरी त्यावर विश्वास ठेवावा हें फारच विचित्र होईल ! प्रो. जोशी कवठेसिद्धनाथ कुलदैवत जेव्हा पृ

४६२ मध्यें सांगतात व पुढे पृ.५९९ मध्ये श्रीधराच्या 'मल्लारिमहात्म्या'च्या आधारे " मणिमल्लमर्दन आमचे कुलदैवत " म्हणून ' खंडोबा ' हे श्रीधराचें कुलदैवत असून नाझऱ्याजवळ वाटंबऱ्यास या कुळातील खंडोबाचे स्थान असल्याची श्रीधराची ग्वाही ही आपणच कथन केली आहे (पृ ६००) हा विरोध अगदीं विसरतात,हे कसे ? तात्पर्य,जोवर 'जैमिनि-अश्वमेधाच्या' प्रारभीं बिऱ्हाडसिद्ध कुलदैवत म्हणून उभा आहे तोवर भारद्वाजानी उभा केलेला त्र्यंबकानुज ' श्रीधर ' एकाएकीं टाकता येणार नाहीं. मग पृ. ५८३ मध्ये ग्रंथकर्त्यांने ठरविलेले आहे त्याप्रमाणे त्यास इतक्यातच 'चोर' म्हणून फाशीही देता येत नाहीं. या कुलदैवत प्रकरणीं नुकतीच श्री वि. चिं. जोशी यानीं विचारणा केल्यावरून श्रीधरवंशज चिं. गोविंद कृष्ण देशपांडे, हे कळवितात कीं," आमच्या घरात 'मल्लारि' आणि 'सिद्धनाथ' (ज्योतिबा) हीं दोन कुलदैवते आहेत. पैकीं सिद्धनाथाचा उत्सव दर चैत्री पौर्णिमेला आमचेकडे होत असतो त्या दिवशीं आम्ही सवाष्ण–ब्राह्मण सांगतो. तसेच पंढरपुरच्या आमच्या घरीं सिद्धनाथाच्या पितळेच्या दोन मूर्ति एका सिंहासनावर बसविलेल्या आहेत मूर्ति सुमारे २॥ ते ३ इंच उंचीच्या आहेत. चैत्री पौर्णिमेच्या दिवशीं डौरी बोलावून नैवेद्य देतात. नाझरेकर घराण्यात मुलाचे लग्न झाल्यावर जोतिबास–सिद्धनाथास–बोहर जातात. या सिद्धनाथाला ' जोतिबा ' म्हणतात व हे जोतिबाचे प्रसिद्ध स्थान कोल्हापुरनजीक आहे वरील सिद्धनाथमूर्ति आमचे देव्हाऱ्यातील इतर देवात असून मल्हारी–मूर्ति मात्र स्वतंत्र आहे आणि तिचा उत्सव ही स्वतंत्र होतो "

ही माहिती उपयुक्त आहे पण याने घोटाळा न सुटता थोडा वाढलाच आहे. कारण येथें कवठ्याचा सिद्धनाथ श्रीधर–घराण्यात येण्याऐवजीं कोल्हापुरजवळचा जोतिबा–सिद्धनाथ कुळदैवत म्हणून आला आहे.

कै. प्रो. जोशी यांचे श्रीधरसंशोधन चालू असतांना त्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळापुढे त्याविषयीं निबंध वेळोवेळीं वाचले होते, ते त्यांनी अन्यत्र प्रसिद्ध ही केले आहेत. पैकीं ' श्रीधरस्वामी नाझरेकर ' हा त्यांचा निबंध डिसेंबर १९४५ ( वर्ष ३६ अंक १२ ) च्या 'चित्रमयजगत्' मध्ये प्रसिद्ध झाला आहे. त्यात श्रीधरविषयक अनेक बाबींची चर्चा आहे तिचा समावेश या ग्रंथात त्यांनीं केला आहे परंतु त्यातच सातवा विषय 'श्रीधरस्वामी नाझरेकर व पाथरीकर असे दोन कवि आहेत काय ? ' हा घेऊन भारद्वाजाच्या शंकेचा सविस्तर विचार केला आहे त्यांनी बिडाडी श्रीधराला ' तोतया ' ठरविला असला तरी संशोधकांना या विषयाकडे लक्ष्य देण्यास विनविलेलें आहे. तो लेख जिज्ञासूनी पहावा. कै. प्रो. जोशी यांना आपला प्रस्तुतचा ग्रंथ अगदीं परिपूर्ण करितां आला नाहीं. दुर्धर रोगाने अखेर पछाडल्यामुळे त्यांचे कार्य थोडेसे अपुरेंच राहिलें. ' जैमिनिअश्वमेध ' प्रकरणीं त्यांनीं इ. स. १९३३ मध्ये जे लेख विविध—ज्ञानविस्तारात प्रसिद्ध केले तेच विनायकराव यांना या ग्रंथात समाविष्ट करावे लागले. वरील १९४५ मधील लेख त्यांना कै. वडिलांचे कागदपत्रसंग्रहात आता आढळला व अभ्यासाची त्यावरील त्यांची टिपणे ही आढळलीं म्हणून वरील सर्व उल्लेख येथें आता केला आहे.

कोल्हापुर ग्याझेटीअर मधील जोतिबाची हकीकत जिज्ञासूनी पाहावी त्यात जोतिबाच्या ' सिद्धनाथ ' असें कोठे ही म्हटलेले नाहीं. जोतिबाची पितळी मूर्ति यमाईच्या विवाहासाठीं जाते. तेथें केदारेश्वर, केदारलिंग, रामलिंग, हीं स्थानें आहेत. मात्र मोठा उत्सव चैत्री पौर्णिमेलाच होता. बिऱ्हाडसिद्ध हे सिद्धाचे ठाणे आहे. आणि श्रीधराची 'सतमालिका' ग्रंथात पृ. १७८व१७९ वर दिली आहे त्यात 'बिऱ्हाडसिद्धाचा' उल्लेख (पृ. १७९) आलेला आहे.

आम्ही आपली प्रमाणे वर दिलेलीच आहेत. आमच्या मतें हे कोडे उलगडलेले नाहीं. कै. जोशी यांच्या लेखात (१९४५) खात्रीशीर प्रमाणे काहीं मिळत नाहींत. म्हणून अद्यापि माहिती, प्रमाणे, वगैरे मिळवून चर्चा-चिकित्सा होणें अवश्य आहे.

कुलदैवत आणि ' पाथरी ' गाव हे घोटाळ्याचे दोन पदर झाले. आता तिसरा ही एक पदर आम्हास आढळला तो येथे दाखवून देऊं हा पदर आपणास प्रथममातीच्या काळनिर्देशात गुतलेला आढळेल. प्रथम प्रचालित ब्रह्मानदी–श्रीधराचा समाप्तिनिर्देश घेऊ. तो शके १६३७ ' दुर्मुख ' संवत्सर असा आहे. खरे जत्रीवरून पाहता १६३७ ला 'दुर्मुख' येत नाहीं. ' दुर्मुख ' शके १६३८ ला येतो; परतु याचा परिहार होण्यासारखा आहे. ग्रथकर्त्यानें ज्याप्रमाणे ' आत्मप्रकाश ' या ग्रथाचा काळ ठरविताना १६०३ गत शक धरला (पृ.१२९) तोच प्रकार येथेही अवलंबावयास पाहिजे होता. परतु, हे प्रकरण त्यानीं मोघम ठेविले आहे. तथापि आपण जत्रीवरून पाहिले व गताची युक्ति वापरून शका फेडून घेतली.

आता श्रीधरानें दिलेला अक्षरातील काल आकड्यात करताना भारदे यानीं शक १६२१ काढला आहे 'इदुकला शताकित' यातील इदुकला=१६. तेव्हा या पदाचा अर्थ शके १६०० असा झाला आणि या सोळाशेत 'मुनित्रय' अधिक मिळवावयाचे भारदे यानी मुनित्रय=२१ असे ठरविले आहे. मुनि=७ आणि त्याच त्रय, म्हणजे तिप्पट म्हणून ७×३= २१ असा हिशेब भारदे यांनी लाविला. गणितदृष्ट्या यात दोष नाहीं. आणि पडताळून पाहण्यास संवत्सराचा स्पष्ट निर्देश ही बिडाडी श्रीधरानें केलेला नाहीं. मात्र गमत ही कीं, चिडाडी आणि ब्रह्मानदी दोन्ही श्रीधरानीं–– तूर्त या घोटाळा प्रकरणासाठीं आपण दोन

श्रीधर ही भाषा वापरीत आहेत किंवा आपणास वापरावी लागत आहे– ग्रंथसमाप्तीचें जसे गाव ' पाथरी ' हे एकच दिले आहे तशी ग्रथसमाप्तीची मिति हीही पण एकच म्हणजे पौष शुद्ध सप्तमी हीच दिली आहे. चमत्कार आहे कीं नाहीं ? पण घोटाळा वाटण्यास मदत करणारी आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे चिडाडी-श्रीधर दिवस देतो ' सोमसुत ,' तर ब्रह्मानंदी वार सागतो सोमवार सोमसुत म्हणजे बुधवार !

खरे जत्रीवरून पाहता शके १६२१ च्या पौष शुद्ध सप्तमीस 'सोमवार ' येतो. सोमसुताचा दिवस म्हणजे बुधवार येत नाहीं. आणि शके १६३७ च्या पौष शुद्ध सप्तमीस तर बुधवार येतो ! आणि शके १६३८ च्या पौष शुद्ध सप्तमीस मात्र सोमवारच येतो यावरून नीट विचार केला तर बरोबर ध्यानात येते कीं, कालनिर्देशाचा घोटाळा कृत्रिम म्हणजे जाणून बुजून केलेला असला पाहिजे. आणि तसें करणारा हा गणित–ज्योतिष जाणणारा दिसतो. 'मुनित्रय' शब्दात मेख आहे मुनि=७ त्रय=३. हे जर सातवर तीन धरले तर त्र्यहात्तर होतात ७×३ केले तर २१ होतात पण उलटे केले म्हणजे 'त्रयमुनि' असे केले तर ३, ७ म्हणजे सदतीस होतात !! 'त्रयमुनि'च पद असावे. प्रो जोशी यानीं ' चित्रमयजगत् ' लेखात ( १९४५ ) ' अकाना वामनो गति. ' सूत्र लावून मुनित्रय ३७ सुचविलें आहेच पण घोटाळा करणाऱ्याने गणित पाहिले तो १६३७ पौष शुद्ध सप्तमीला बुधवार येतो. म्हणून त्याने 'सोम' ऐवजीं 'सोमसुत'=बुधवार असा बदल शिताफीने केला ! त्याला गत संवत्सराची युक्ति किंवा पद्धति अवगत असती तर सोमा'चे 'सोमसुत' करण्याचे कारणच पडते ना ! सर्व योग जुळून जाता ! चिडाडी श्रीधर म्हणजेच अष्टेकर–श्रीधर असो कीं ब्रह्मानंदी–श्रीधर असो १६२१ आणि १६३७

या दोन्ही शकात ग्रथ करू समवतात, किंवा ब्रह्मानंदी–श्रीधराला कोणी जडवूही शकतात !!

असा हा घोटाळा मुद्याच्या बाबी निर्दिष्ट करून येथे माडला आहे. श्रीधराकडे 'जैमिनिअश्वमेधा'चे कर्तृत्त्व निखालसपणे देण्यापूर्वी या शकास्थानाचा नीट व समाधानकारक उलगडा झाला पाहिजे. ही पोथीपरीक्षा सोडून जर इतर काहीं फार बळकट पुरावा मिळाला तरी ते एक साधन निर्णयास होईल.

'योगवासिष्ठ' प्रकरणीं आणि 'अश्वमेध' प्रकरणीं उद्भवणारीं शंकास्थाने येथे दाखवून दिलीं श्रीधरावर प्रमाणभूत ग्रथ लिहिणाऱ्याला त्याचा विचार केलाच पाहिजे.नवीन साधने त्याला मिळविता येतील तितकी त्याने मिळवावींतच. सबद्ध स्थळे पाहावीं हे सर्व करावे. परतु इतकें घडलें नाहीं तर निदान उपलब्ध व प्रकाशित साधने तरी बारकाईने अवलोकून त्याची सूक्ष्म चिकित्सा मात्र त्यानें अवश्य केली पाहिजे.

के. प्रो. जोशी याच्या मागून जे अभ्यासक येतील त्यानीं वरील शंकास्थानाची पुनः परीक्षा व चिकित्सा केली पाहिजे. शके १५०० ते १६५० या काळातील ग्रथाची मूळ हस्तलिखिते मिळवून शास्त्रीय पद्धतीने सहिताशुद्ध केल्याशिवाय या कामीं फारशी प्रगति होणार नाहीं. जितक्या लवकर हस्तलिखिते गोळा करून ती सार्वजनिक अभ्यासालयात शास्त्रीयरीत्या सुरक्षित ठेविलीं जातील तितकें बरे ! मध्यतरीं झालेल्या जाळपोळीत अनेक हस्तलिखितसंग्रह व जुने कागदपत्र 'अग्नयेस्वाहा' झाले. नव्हे, जाणून बुजून करण्यात आले ! युद्धकालीन परिस्थितींत 'ए. आर. पी.'च्या निमित्ताने जुने माळे साफ झाले आणि जुन्या लिखिताचे अनेक गळाठे नष्ट झाले ! म्हणून आणखी अशी हानि होण्यापूर्वींच हें



५

काम विद्यापीठे, शोधसस्था, सरकार व सशोधक यानीं केले पाहिजे अनेक मठातून सग्रह आहेत. परवा दक्षिणेत एका देवळात उघड्याच ठेविलेल्या जुन्या ताडपत्री पोथ्या तशाच पडलेल्या पाहिल्या ! कधीं कचरापेटींत, कधीं वाण्याच्या रद्दींत, कधीं जलनिधींत तर कधीं अग्निकुडात याप्रमाणे लिखिताचा प्रत्यहीं नाश होत आहे ! शिवाय भाऊबदकीच्या वाटण्या होतात तेव्हां जुनीं हस्तलिखितें ही घराबाहेर जातात ! या देशातून परक्यानीं ग्रथाची लूट काहीं थोडी नेली नाहीं. त्यातील काहीं आज कित्येक स्थळीं निर्वासित होऊन पडलीं आहेत. खेरीज उदीर, घुशी, वाळवी झुरळें इत्यादि कीटकाचे हल्ले लिखितावर सतत होत असतात ! साप्रत काळीं लिखिते खाजगी घरात किंवा मठा–देवळात ठेवण्यापेक्षा त्याची रवानगी आपण होऊन सुस्थळीं करणेच उचित ठरेल ! घरीं योग्य सभाळणूक होणे कठीण ! यासाठीं मायामोह थोडा सोडावा लागल पण त्यात कल्याणच होईल !

श्रीधराने सर्वत्र आपला साप्रदाय ' आनद ' साप्रदाय सागितला आहे. त्याचे पिते ब्रह्मानंद हेच श्रीधराचे पारमार्थिक गुरू. श्रीधराचे चुलत–चुलते याचाही साप्रदाय 'आनद' साप्रदायच ! रगनाथ मोगरेकर याचा ही तोच ! इतरही कित्येक मराठी कवि आपला सप्रदाय सागताना त्यात ' आनन्दान्तक ' नावे सागतात. काहींत ' आनद–दास ' याच मिश्रही आढळते. पुन. बहुतेक सर्व भागवतधर्मीच दिसतात खुद्द श्रीधरा बद्दलही त्याचे साप्रदायिक नाव ' कान्तानन्द ' असल्याचे ' भक्तमजरी-माले 'च्या आधारे कै. गो. का चादोरकर यानीं आपल्या ' संतकवि काव्यसूचि ' ( पृ. १ ) मध्यें नोदले आहे इतरत्र काहीं आधार न आढळल्यामुळे आणि श्रीधराने सन्यास घेतल्याचा कांहींच पुरावा न सापड-

त्याने ग्रंथकर्त्याने ' कान्तानन्द ' कथा नोंदिली नाहीं असे वाटतें. मात्र ' श्रीधरानद ' या नावाची काहीं चिकित्सा त्याने केली आहे. श्रीधरानंद– कान्तानन्द कथा घटकाभर बाजूस ठेवू. पण रंगनाथस्वामी यांचें तरी साप्रदायिक नाव कोठे माहित आहे ! रगनाथस्वामींनी बद्रिकेदारीं योगसाधन केले होते आणि पुढें आपल्या प्रत्यक्ष पित्यास पूर्णानदाकडून अनुग्रह देऊन त्याच निजानदाकडून स्वतःही अनुग्रह घेतला असे त्याच्या चरित्रात ह. भ. प. निगडीकर वगजानीं प्रसिद्ध केले आहे. ( श्रीरगनाथकृत पदसंग्रह पृ. ८–१० ). सस्कृत ग्रथातून अनेक ' आनद ' साप्रदायिक यतिवर्यांची नावे आढळतात. अशा इतरही तीर्थ, दास, चैतन्य, आश्रम, गिरी, भारती वगैरे परपरा आहेत. त्याबाबत ग्रथातून व इतर स्थळातून जेवढी प्रमाणभूत माहिती मिळेल ती गोळा करून, त्याची समाधिस्थळें, मूळ वश, शिष्य-शाखा, उपासना, ग्रंथरचना, जीवनकाल इत्यादींविषयीं अवश्य तो सर्व शोध करून जर कोणी प्रबंधरचना करील तर त्याचा मोठाच उपकार होईल.

कै. प्रो. जोशी यानीं आपल्या ग्रथास दिलेल्या नावातच त्या ग्रथाचे दोन भाग स्पष्ट दिसतात. यापैकीं पहिला म्हणजे ' श्रीधर–चरित्र ' आणि दुसरा 'श्रीधर'काव्य–विवेचन.' यापैकीं पहिला म्हणजे चरित्र–विभाग. याला एकशेतीस पृष्ठें खर्चीं पडलीं आहेत, आणि दुसऱ्या विभागासाठीं सुमारें चारशेसत्तर पृष्ठे खर्चीं पडलीं आहेत. आणि या दुसऱ्या विभागात वडिलाचे पश्चात् चिरंजीव विनायकराव यानींही महत्त्वाची भर टाकली आहे. ती जमेस धरली तर चरित्र–विभागाच्या चौपट जागा काव्य विवेचन–विभागास मिळाली आहे.

ही वाटणी अपरिहार्यच होती. श्रीधराचें मुख्य कर्तृत्व म्हणजे त्याचा काव्यसभार हा होय. याच त्याच्या सपत्तीची महती व अपूर्वाई वाचकाच्या

मनात भरवून दिली तर ते त्याच्या कर्तृत्वाचे वर्णन अथवा विवेचन हें श्रीधराच्या चरित्राचाच एक प्रकारें भाग होय असेही म्हणता येईल. श्रीधराच्या कुटुंबाचे नांव ' पार्वतीबाई ' हें एका वाटणीपत्रावरून कळेत. पण या ' पार्वतीबाई ' चे माहेर कोठले हे सुद्धा आपणास आज सांगता येत नाहीं. असा साधनाचा अभाव हे तर एक प्रमुखच कारण आहे कीं, ज्याच्यायोगे श्रीधराच्या चरित्राचीं इतर अंगे आपणास आज विस्तृतपणे सजवितां येत नाहींत. काव्यसंपत्ति घेतली तरी त्याची ही संपूर्ण व व्यवस्थित मोजदाद करण्यास अवश्य तितकीं साधनें आपल्या हातीं अद्यापि आलेलीं नाहींत. शकास्थळे तेथेंही आहेतच कालनिर्णय श्रीधराच्या कृपेने मुख्य मुख्य ग्रंथापुरता तरी त्यानेच नोंदून ठेविलेला आहे. पण त्याचीं जीं विविध स्फुट–प्रकरणे आहेत त्यावर कांहीं रचनाकाळाची नोंद नाहीं. अर्थात् येथें तर्कावरच काम भागवावे लागते

ग्रंथकर्त्याचे हे तर्क पृ. १९० व पृ २०३ या ठिकाणीं आपणास वाचावयास मिळतील. आपलीं ' स्फुट–प्रकरणे ' थोर ग्रंथ हातीं घेण्यापूर्वीं श्रीधराने पूर्वाभ्यास म्हणून रचिलीं, आणि म्हणून ही सर्व रचना श्रीधराचा प्रथम ग्रंथ जो ' हरिविजय ,' जो शके १६२४ त समाप्तीस गेला, त्या काळापूर्वीं रचलीं गेलीं असलीं पाहिजेत '' असे हें त्याचे प्रतिपादन आहे. पण हे कबूल करावे तर शंका येते कीं, मग या कित्येक ' स्फुट–प्रकरणा'त प्रत्यक्षच जो श्रीधराच्या ग्रंथाचा उल्लेख आला आहे त्याची वाट काय ? आधीं रचलेल्या प्रकरणात मागाहून रचलेल्या ग्रंथाचे नाव कसें येईल ? ( पहा, पृष्ठ १७० )—

''पांडवप्रताप ग्रंथ विशद । शेवटास पाववि जे'' ॥ किंवा
''पांडवप्रताप ग्रंथ विशेष । त्यात नलोपाख्यान सुरस'' ॥ किंवा
( पृ. १७१ ) ''तव वरदे जगदाधारा । ग्रंथ पुढे चालों कां'' ॥

इत्यादि जे उद्गार प्रत्यक्ष ग्रंथकर्त्यानेंच स्फुट–प्रकरणांत उतरून दिले आहेत ते त्याच्या तर्कास विरोध आणीत नाहींत काय ?

आणि एवढाच तर्क संभवतो असें ही नाहीं अनेक रचना एका वेळीं ही कमी-अधिक चालू असतात त्या काळी हरिकीर्तनें चालत. तसेंच पुराण–कथाही चालत. त्यासाठीं छोटीं–मोठीं विविध स्फुट–प्रकरणें निवडून रचून ठेवावीं किंवा रचून द्यावीं असें घडणें सहज शक्य आहे हा तर्क ग्राह्य केल्यास या 'स्फुट-प्रकरणां'त प्रसंगविशेषीं आपला अमका ग्रंथ लवकर शेवटास जावो अशी तळमळ व्यक्त होणें हे अगदीं सहज वाटतें.

पण असा काहीं अधिक संभवनीय तर्क काढण्यापेक्षा ग्रंथकर्त्यानें श्रीधराला विस्मरण झाल्याचा टोमणा मारला आहे ( पृ. ३५४ ) श्रीध–राची वकिली पत्करून आम्ही आमच्या मित्रास विचारू शकतो कीं, विस्मरण कोणास झाले ? तुम्हास कीं श्रीधरस्वामींस ? पृ. १७० मध्यें प्रत्यक्ष ' पांडवप्रताप ' ग्रंथ शेवटास लावावा म्हणणारा श्रीधर निदान तीं 'स्फुट-प्रकरणें' तरीं 'पांडवप्रतापा'चें लिहिणें चालू केल्यावर आणि तो 'प्रताप' पूर्ण होण्यापूर्वीं लिहून गेला हे स्पष्ट आहे. पण हीं सर्व "स्फुट प्रकरणें" श्रीधरानें 'पूर्वाभ्यास' म्हणून 'पांडवप्रताप' हातीं घेण्यापूर्वी आणि 'हरिविजय' रचण्याच्याही आधीं लिहिलीं हे म्हणताना हे 'पांडवप्रतापा'चे स्फुटांतील उल्लेख कोण विसरला ? छे ! पण आम्हीं कोणास प्रश्न करीत आहो ! आणि त्याचें उत्तर देण्यास आमचा मित्र कोठें आहे ? का आम्हांला ही विस्मरणानें झपाटलें ? खरा प्रकार असाच संभवतो कीं कवि, नाटककार वगैरेंच्या मनांत अनेक संकल्प एकसमयावच्छेदेंकरून घोळत असतात, काहीं मागाहूनही सुचतात, काहीं पूर्वी नुसतेच मनांत येऊन

गेलेले असतात, पण ते फार मागाहून काहीं निमित्त घडून आकाराला येतात, काहीं अर्धवट जन्माला येऊन अर्धेमुर्धे तयार होऊन पडलेले असतात ते तसेच राहून जातात किंवा काळांतराने पूर्णत्वाला ही जातात हाच प्रकार श्रीधराच्या स्फुटानाही लागू केला म्हणजे सर्व संगति सुसूत्र लागेल.

'पांडवप्रतापा'तील 'स्वर्गारोहणपर्व' न लिहिल्याबद्दलचा जो श्रीधरी खुलासा ग्रंथकर्त्यानें दिला आहे ( पृ. ३५४ ) तो केवळ कविलाघव आहे हे उघड आहे. 'स्वर्गारोहण' गाळल्याबद्दल संभाव्य आक्षेपाला कवीने अगो-दरच जाब देऊन ठेविला आहे. स्फुटे वाऱ्यावर विरून जातात ग्रंथाचे तसे नाही. ते स्थलरूपानें नित्य पठणात रहातात. स्फुटे जन्माला येतात आणि दहादिशाना जातात ! तीं डोळ्यात भरून आक्षेप निघण्याचा संभव कमी असतो. किंबहुना तीं रचलेलीं पाहून कोणी आक्षेप केला असला पाहिजे म्हणूनच 'प्रतापा'तून तो विषय गाळून श्रीधराने ही लाघवी मल्लिनाथी करून सफाईचा बचाव केला असला पाहिजे असें मानणेंच युक्तीला धरून होईल.

ग्रंथकर्त्याचे असेच एक दुसरे अनुमान आमच्या बुद्धीस तरी पटत नाहीं. 'हरिविजय' झाला कीं 'लगेच' ( पृ. २६९ ) 'रामविजय' आणि 'रामविजया'च्या मागोमाग 'लगेच' ( पृ. ३२५ ) 'वेदान्तसूर्य' असे ग्रंथ श्रीधराने रचिले असले पाहिजेत असे अनुमान ग्रंथकर्त्यानें केले आहे. आणि या अनुमानाचा आधार दिसतो–तो ग्रंथा–ग्रंथाच्या शेवटीं दिलेला रचनाशक ! अर्थात् या कल्पनेप्रमाणे एक ग्रंथ संपेपर्यंत दुसऱ्याची काहींच तयारी श्रीधर करीत नव्हता अशी मांडणी ग्रंथकाराला करावी लागली. म्हणून त्याने श्रीधरास निरनिराळ्या रामायणाचें वाचन करण्यास चार-पाच

महिने ( पृ. २७० ) आणि महाभारताचे अध्ययन करण्याला तीन वर्षे ( पृ. ३४० ) दिलीं आहेत. पण आम्हास ही समजूत युक्तिसिद्ध वाटत नाहीं. 'हरिविजय' श्रीधराने रचिला त्यातच 'ब्रह्मांड,' 'नारद,' 'पद्म' इत्यादि पुराणातून त्याने काहीं कथा घेतल्याचा निर्देश स्वतः ग्रथकर्त्यानेच केला आहे.(पृ.१९९-२००) मग काय श्रीधराने आधीं भागवत-हरिवंश व वरील ब्रह्माडादि पुराणे वाचलीं आणि 'हरिविजय' रचिला आणि तोवर ' रामायण ' ' महाभारत ' याना हातही लाविला नाहीं, आणि ' हरिविजय ' पुरा होताच चार पाच महिन्यात त्यानें एकोणीस विविध रामायणे वाचलीं ( पृ. २०१ ) आणि ' रामविजय ' सपविल्यावर तीन वर्षे महाभारतात घालविलीं हे म्हणणे सयुक्तिक ठरेल ? एवढा व्युत्पन्न श्रीधर, तो रामायण–महाभारत यासारखे ग्रथ तसेच वाचल्याशिवाय राहील कसा आणि यात क्रम लावण्याचे कारण तरी काय ? रामायण–महाभारत न वाचता त्याला विद्वानात उठवस कशी शक्य असेल ? पुन: आम्हास सागणे अवश्य दिसते कीं, रामायण, भारत, भागवत हे ग्रथ त्याने अनेकवेळा वाचले असतील, किंबहुना तो त्याचा नित्याचा आवडता व्यासंगच असला पाहिजे आणि त्यावर जुळेल तशी ग्रथरचना ही मनात योजून त्यानें यथाशक्ति सर्वच रचना अधूनमधून चालू ठेविली असेल आणि मग मनाला पटलें त्याप्रमाणे एक एक ग्रथ हातावेगळा केला असेल जव्हा जेव्हा एक एक ग्रथ सागितला गेला त्या त्या वेळीं तो काळ त्याने त्या त्या ग्रंथात नोंदून टाकिला. पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांनं मूळ सस्कृत ग्रंथाचे वाचन ही त्याच काळानुक्रमाने केले ! अशा पवित्र ग्रथाचें वाचन व अध्ययन हा त्याचा जीवन व्यासगच. तो सतत चालू असणारच ! फरक एवढाच कीं, जो ग्रंथ बराच आकाराला आणावयाचा हव्यास धरला असेल त्या त्या वेळीं त्या त्या ग्रथाचा किंवा त्यातील प्रकरणाचा विशेष बारकाईने व्यासंग

व विचार करावयाचा ! ग्रंथकर्त्याने तर आपल्या अनुमानाच्या भरात 'रामविजय' रचनेचा रोजचा रतीब अडतीस ओव्याचा काढिला आहे ! ही प्रमाणे व सरासरी काढण्याचा नवीन चिकित्सकाचा सांप्रदाय आहे तो अन्य विनियोगासाठी क्वचित् उपयोगी पडतो ! वास्तविक कवींची रचना अशा रोजरतीबाने होत नाहीं कधीं स्फूर्ति अनुकूल असली म्हणजे शिडात वारें भरते तशी भडाभड रचना होऊन जाते, नाहींतर मोरोपेतानीं एका पत्रात लिहिल्याप्रमाणे 'वर्षाकाळीं माद्य' येऊन किंवा अन्य कारणाने रचना मंद होते किंवा बंदच राहते ! विद्वान् ग्रंथकर्त्यास हे अवगत आणि मान्य ही असणारच! परंतु हें स्पष्टीकरण जोडण्याचे काम त्याला अखेरची सफाईकरिता आली असती तर त्याने सहज उरकले असते !

'वेदान्तसूर्या–'नन्तर नऊ वर्षांनीं 'पांडवप्रताप' पूर्ण झाला, याबद्दल काहीं निश्चित सांगता येत नाहीं हे ग्रंथकर्त्यांचे म्हणणे ( पृ. ३४० ) वाजवीच आहे.तथापि कदाचित् त्याचे कारण वस्तुत: काहीं सांसारिक आपत्ति त्यावर ओढवली असावी हे एक संभवतें. त्याचा पुत्र रंगनाथ ग्रंथकर्त्याच्या मताप्रमाणे शके १६५५ पूर्वींच वारला असला पाहिजे. कदाचित् त्याचा अंत याच नऊ वर्षांतील काळात झाला असेल आणि त्यामुळे श्रीधराला उदासीनता व त्याच्या प्रतिभेला म्लानत्व आलें असेल !

आता कित्येक स्फुट बाबींचा वा विधानाचा निर्देश करू:—

१) पृ. ११६:—सत्यामलनाथाचा बारा हजार अभंगाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला असे ग्रंथकर्त्याने लिहिलें आहे. पण तशी वस्तुस्थिति नाहीं. सत्यामलनाथाच्या अभंगाचें भले मोठे सुवाच्य लिहिलेले बाड आमचे मित्र

कै. सदाशिवराव दिवेकर यानीं मिळविले होतें. ते भारत इतिहास संशो–' धक मंडळात दाखविलें होते. ते आम्हीं पाहिलें होते भावे व पागारकर यानींही ते पाहिलें होते पुढें ते दिवेकराच्या हातीं आले नाही पागार–करानीं याच बाडाची थोडीशी माहिती व उतारे आपल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड पहिला यात पृ ४९९ ५०० व पृ ५०६-५११ येथे दिली आहे

२) पृ. ५९ व ६५:—यात मानपुरी गोसावी व श्रीधर याचा संबंध वर्णिला आहे. तथापि मानपुरी गोसावी याचा काळ देऊन उभयताच्या समकालीनत्वाचे समर्थन केलें नाहीं. मानपुरी गोसावी दौलताबादेकडील होत. आणि त्याचा समाधिशक १६५२ ज्येष्ठ शु० ५ असा गो. का. चांदोरकर यानीं आपल्या 'संत–कवि–काव्यसूची' त दिला आहे. म्हणजे हे श्रीधराच्या मागून लगोलग समाधिस्थ झाले. अर्थात् उभयता समकालीन होते, म्हणून त्याचा पत्रव्यवहार व मैत्री संभवते हे सिद्ध होते.

३ ) पृ १४४ :——महानुभावपंथाची गुप्त लिपि स्वतःच्या बुद्धि-बळाने उकलून त्या वाङ्मयाचे गुप्त भांडार खुलें करून देण्याचे सर्व श्रेय श्री. वि. का. राजवाडे याचे आहे. हे करण्यापूर्वीं महंत दत्तलक्षराज याच्या साहाय्यानें 'गद्यराज' राजवाडे यानीं ग्रंथमालेत छापविला होता. देशपांडे, भावे वगैरे सर्व राजवाड्यापासून स्फूर्ति घेऊनच या मार्गात शिरले.

४ ) पृ. २०३ :——'देवानेंच माझे श्रीधर हे नाव ठेविले.' हें श्रीधराचें विधान नुसते लाघव नसावें. खंडोबाचा श्रीधर रंगनाथाने केला ही कथा जरी अग्राह्य म्हणून बाजूस टाकली तरी पृ. १७ मध्ये पिता ब्रह्म-



६

नदानेच ‘ श्रीधर ’ नाव ठेविले आणि आई मात्र ‘ खंडेराय ’ म्हणे. ( पृ. १२।१३ ) या उल्लेखावरून मूळ नाव ‘ खंडेराव ’ असून ते बदलले एवढा गाभा खरा हातीं लागतोच. कथा ‘समूळ’ ढासळून पडत नाहीं

५ ) पृ.१७७:—नृपतिमाला—ही उत्तड उत्तड पौराणिक राजाची नामावळ. मग मराठी राजाचीं नावे यात नाहींत याचे आश्चर्य वाटण्याचे कारणच नाहीं ! जर आलीं तरच आश्चर्य ! !

६ ) पृ. ३४।३५:—दिलेली ग्रथाची यादी पाहता ‘यावरून श्रीधरास सस्कृत व मराठी कविता लिहून घेण्याचा हव्यास ’ कसा स्पष्ट होतो ? यादींतील ग्रथ श्रीधरानेच लिहून किंवा लिहवून घेतले याला आधार काय ? क्र.१७ चा ‘अमृतानुभव’ हा लिहून घेणारा गोपाळ रघुनाथ आपले नावच देतो. अर्थात् हा ग्रथ काहीं श्रीधराने लिहून घेतलेला नाहीं ! तसेच वसली साहेबाच्या वेळचा लावणीकार मल्हार बहिरु किंवा बहिरु मल्हार याची लावणी या सग्रहात आहे. याचाच अर्थ ही यादी श्रीधरकालीन नाहीं ! क्र. १७ ची नोद देताना शकाचा आकडा दिलेला नाहीं, खरे जत्रीवरून पाहाता हा शक १६०४ असला पाहिजे.

७) पृ ७०:–‘लोकरजन करून लोकशिक्षण देण्याचा पायडा मुक्तेश्वराने प्रथम पाडला’–असे ग्रथकर्त्याचे म्हणणें आहे. एकनाथानीं भारुडे वगैरे रचना करून जे लोकशिक्षणाचें भरींव कार्य केले तसे श्रेय मुक्तेश्वरासारख्या पडितकवींच्या पदरीं बाधता येणार नाहीं

८) पृ १०८:–अच्युतानंदाची समाधि कोठे आहे काय ? पृ.१२१ वर ग्रथकर्त्यांने अप्पाजीपर्यंतचे म्हणजे अच्युतानदाचे नातवापर्यंतचे सर्व पुरुष पढरपुरातच निवर्तल्याचे म्हटलें आहे. अधिक शोध हवा.

अशा काहीं बाबी अभ्यासकाच्या उपयोगासाठीं व विचारासाठीं कित्येक उल्लेखिल्या आहेत. कित्येक आणखीही आहेत. पण त्या नोंदल्या नाहींत.'

मुख्य सांगावयाची गोष्ट अशी कीं, कै. प्रो. जोशी यांनी श्रीधरी साहित्याचें करून मंथन केलें यांत काहीं शंका नाहीं आणि तदुत्तर आपले निष्कर्ष त्यानीं या ग्रंथात रसिक व शोधक जनास सादर केले आहेत. वर एकदा सांगितल्याप्रमाणे श्रीधराच्या काव्यसंभाराचें विस्तृत परीक्षण जोशी यानीं या ग्रंथाच्या उत्तरार्धात केले आहे. त्यानीं क्रमाने स्फुट प्रकरणे, हरिविजय, रामविजय, वेदान्तसूर्य, पांडवप्रताप, जैमिनिअश्वमेध, शिवलीलामृत इत्यादि श्रीधर कविता–संपदेचा परामर्ष घेतला आहे.

साधारणपणे या परामर्षाचा आराखडा त्यानीं मनाशीं ठरवून हें काम पूर्ण केले आहे. हा आराखडा असाः–प्रथम ग्रंथ, ग्रंथनाम, ग्रंथाधार वगैरे प्रास्ताविक विवेचन करावयाचे.यांत जरूर तेथें आकडेमोडी-चाहि समावेश केलेला असावयाचा. मग ग्रंथातील कथासार सांगून रसपरि-पोष, अलंकार, साहित्य–भाषणे किंवा संवादचतुरालाप, नंतर भाषावि-शेष, सुभाषितें, म्हणीं, कोड्या यांची नोंद करून मग काहीं दोषदर्शन केल्यावर शेवटीं त्या त्या ग्रंथातील उत्कृष्ट उतारे द्यावयाचे.याप्रमाणे विस्तृत संग्राहक व विवेचक असा हा परामर्ष आहे. प्रसंगीं काहीं विशेष प्रश्न उद्भवले तेथें त्याचा समाचार घेतलेला आहे. जसें श्रीधर व मुक्तेश्वर, यांच्या संबंधाने पांगारकर,भावे प्रभृतींनीं घेतलेले आक्षेप तपासून आपले मत साधारपणे जोशी यानीं सादर केलें आहे. कोठें समाजस्थिति-चाहि विचार केला आहे.

प्रत्येक ग्रंथाचा निरनिराळा आणि पोटभर परामर्ष घेतला आहे. त्यामुळें तेच तेच गुण, आणि तेच तेच दोष दाखवावे लागल्याने श्रीधरा-

प्रमाणेच पुनरुक्ति व पाल्हाळ या दोषास कारण घडले आहे पण वाचक व अभ्यासक यांच्या सोईसाठींच ग्रंथकर्त्यांने ही मांडणी केली आहे. ग्रंथ–वार परामर्ष घेतल्यानें ज्या कोणा अभ्यासू विद्यार्थ्यास तो जो ग्रंथ अभ्यासित असेल त्याच्या परामर्षाच्या मिषाने श्रीधराच्या लेखनकामाठीचा ठसा तेथल्यातेथेंच पाहावयास मिळतो.

हीं चारशे पृष्ठे लिहिण्यासाठीं कै प्रो. जोशी यानीं किती दीर्घ परिश्रम केले असतील त्याची यथार्थ कल्पना तीं पाने वाचावीं तेव्हाच येईल. मूळ संस्कृत ग्रंथातील कथासंदर्भ हुडकून काढून श्रीधरानें काय गाळले, काय भर घातली, इत्यादि सर्व विवेचन ग्रंथकर्त्यांनें श्रीधराच्या सर्व महत्त्वाच्या ग्रंथाच्या परामर्षांत केलेले आहे. ते पडताळून पाहाणारास तितकेच परिश्रम करावे लागतील. तसेंच अलंकार, सुभाषिते, म्हणी, कोट्या वगैरेचा जो श्रीधरी वाङ्मयातून संग्रह ग्रंथकर्त्यानें केलेला आहे तो वाचकास अत्यंत उपयुक्त वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. श्रीधरी ग्रंथाचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थीमंडळास तर हें विवेचन फारच मार्गदर्शक असल्याचें अनुभवास येईल. आम्हाला असा भरंवसा वाटतो कीं, जोशीबुवाचा श्रीधरावरील ग्रंथ यापुढे आमच्या विद्यापीठातून मराठीचा अभ्यास जसजसा अधिकाधिक सखोल होत जाईल व वृद्धि पावेल तसतसा सर्वत्र अध्ययनअध्यापनार्थ उपयोजिला जाईल.तसं झाल्याचें पाहून त्याना केवढा श्रमपरिहार वाटला असता ' आणि ' क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ' या वचनानुसार त्यानीं अलीकडे जे कित्येक सुंदर अप्रसिद्ध मराठी हस्तलिखित काव्यग्रंथ मोगलाईतून उस्मानिया विद्यापीठातर्फे मिळवून तेथें ठेविले आहेत, त्यातील कित्येकाचा परामर्ष त्यानीं यापुढें घेतला असता किंवा महिपतीसारख्या श्रीधरतुल्य लोकप्रिय कवीचेंही चरित्र आणि काव्यविवेचन आपणास सादर

केले असतें. पण आता ती आशा खुटली याला उपाय नाहीं तथापि त्यांनी एक सुदर आदर्श मराठीच्या अभ्यासकास व रसिकास समर्पित केला यातच संतोष मानला पाहिजे,

सशोधनाप्रमाणेच रसग्रहणातही मतभेदाला वाव असतोच. पहि ल्यात निदान रुचिभेदाला अवकाश नसतो. तो दुसऱ्यात भरीला येऊन पडतो. असा विचार मनात आला म्हणजे ग्रथकर्त्याशीं मतभेद दर्शविणारे रसिक यद्यपि आढळले तरी त्याचे परिश्रम आणि त्याची मर्मज्ञता या-विषयीं मात्र मतभेद दर्शविणारे कोणी भले रसज्ञ आढळणार नाहींत याविषयीं आम्हाला अगदीं सदेह वाटत नाहीं.

प्रसगच आहे म्हणून येथे सहज अशा काहीं स्थळाचा किंचित् प्रपच करितो. श्रीधराची विद्वत्ता ग्रथकार वर्णीत आहे किंवा स्थापन करीत आहे.

१) पृष्ठ २३४–२३५ येथे फलज्योतिषातले जे योग दिले आहेत ते इतके मामुली आहेत कीं, म्हाताऱ्या आजीबाईला आजही त्यात विशेष ज्ञानाचा वास येणार नाहीं. मग श्रीधराच्या पांडित्याच्या विवेचनात याची आवर्जून नोंद कशाला ? पृष्ठ २५, २६ व २७ मध्यें असले उल्लेख नोंद-ताना त्याचा सामान्यपणा अथवा मामुलीपणा ग्रथकर्त्याला उमगल्याचे त्यानेच लिहिलें आहे हें लक्षात घेता 'बहुश्रुतता', 'गाढ' पांडित्य या विषयाच्या अनुसधानात हे उल्लेख देण्यात औचित्य काय ?

२) तसेंच पृष्ठ २८ मध्यें ' परदारा नयनीं न पाहाव्या,' हे साधें मामुली वचन निवडकपणे माडून त्याला समानार्थक 'शाकुन्तला'तील वचन देण्यात किंवा 'सग्रामाच्या गोष्टी ऐकिजे कानीं, या वचनाला 'युद्धस्य

वार्ता रम्या ' हे वचन जोडण्यात कितपत प्रयोजकपणा साधला आहे ग्रंथकर्त्यानें ?

३) पृ. २००-२०१:—'लीन' शब्दाचा एक 'गुप्त' असा अर्थही घेता येतो असें सांगून ग्रंथकार एका विरोधाचा परिहार सांगत आहे परंतु, यात विरोध खरोखर मुळात आहे काय ? पहिला अभेद दृष्टीचा वेदान्ती उद्गार आहे, तर दुसऱ्यात अद्भुत चमत्काराची दाट छाया आहे. खरोखरच 'उदकात लवणाप्रमाणे' राधा हरींत 'लीन' झाली, अगदीं एकरूप, शरीरात शरीर प्रत्यक्ष मिळून जाऊन झाली, किंवा 'बाळकृष्णाने राधा भोगली,' या गोष्टी सत्यसृष्टींत घडल्या असे स्वतः ग्रंथकर्त्यास म्हणावयाचे आहे काय ? नसेल तर, विरोधपरिहारासाठीं शब्दार्थाचा खटाटोप व्यर्थ नव्हे ?

४) पृ. ३०२-३०३:-'सुभाषितें' नोंदलीं आहेत त्यातलीं किती खरीं सुभाषितें म्हणून जिभेवर राहतील ? किंवा राहावींत ? नामांकित असतील तेवढींच नोंदलीं तर शोभा !

५) पृ. ५८२-५८३:-'शिवलीलामृता'च्या ( ढवळे ) छापील आवृत्तींत एक पंधरावा अध्याय आला आहे तो कोणीतरी अर्वाचीनाने मूळ श्रीधरी 'शिवलीलामृतां'त घुसडून दिल्याचें आपलें मत ग्रंथकर्त्याने मांडलें आहे या घुसडणाऱ्यानेच मूळ चौदा अध्याय होते ते पंधरा केले असें म्हटलें आहे. पण ही पंधराव्याची भर श्रीधर-ब्रह्मानंदानेच जणू घातली असा मांडणीचा आव त्याने आणला आहे. तथापि हा पंधरावा अध्याय कोणी केव्हां घुसडला याचा अधिक बारकाव्याने छडा लावणे जरूर आहे. ग्रंथकर्त्याने जी काहीं साक्ष-प्रमाणे पृ. ५८२ मध्ये दिलीं आहेत तीं या कामीं विशेष मार्गदर्शक होण्यासारखीं नाहींत. 'वेदार्थज्ञानास पाणिनीची

मदत कशी काय होते ?' हा विद्वान् ग्रथकर्त्याचा प्रश्न चमत्कारिक वाटतो. निर्मळ ( वसईजवळ ) येथे शकराचार्यांचे स्थान मानतात, तेव्हा यासाठी क्रमिक पुस्तकाकडे जाण्याचे कारण नाहीं. अलीकडील क्रमिक पुस्तकात निर्मळची जत्रा यासारखे धडे असतात ते पाहून पधरावा नवा अध्याय तयार झाला व घुसडला गेला असा जो ध्वनि ग्रथकर्त्यानें तसा टोमणा मारताना काढला आहे तो काढण्याइतपत अर्वाचीनपणा या घुसडलेल्या अध्यायाच्या पदरीं ठामपणे बाधण्यापूर्वी अधिक शोध व अधिक चिकित्सा आवश्यक होती. ही पधराव्याची भर प्रथम कोणच्या छापील प्रतींत आढळते ? या प्रतीचे मूळ हस्तलिखित कोठचे, केव्हाचे ? 'शिव–लीलामृता 'ची सर्व उपलब्ध हस्तलिखितें मिळविणे व तपासणे हेही अवश्य होते.

श्री. पा. मा. चादोरकर यानीं भारत इतिहास सशोधक मडळ–पचम–समेलन–वृत्तात श्रीधरी 'शिवलीलामृता'वर एक निबध लिहिलेला छापलेला आहे. पृष्ठ ४० मध्ये ग्रंथकर्त्याने या निबधाचा उल्लेख श्रीधरी हस्ताक्षर प्रकरणी केला आहे. परतु त्याहिपेक्षा श्रीधरी सहिता ( टेक्स्ट ) प्रकरणीं, अर्थात् या ग्रथाच्या 'शिवलीलामृत' या १७ व्या प्रकरणात, या निबधाचा थोडा विस्तृत परामर्श घेणे अवश्य होते.

त्याप्रमाणेच कै. गो. का. चादोरकर यानीं भारत इतिहास संशो-धक मडळापुढे रघुकविकृत 'ब्रह्मोत्तरखडा' सबंधीं एक टिपण वाचलें व दुसऱ्या एका टिपणात त्याबद्दल काही उल्लेख केला. ( भा. इ. स. म अहवाल शके १८३७ व भा. इ. स. म. तृतीय समेलन वृत्त पृ. १७९ ) यापैकीं शके १८३७ च्या अहवालातील टिपणाचा उल्लेख ग्रथकर्त्यानें पृ ५८० मध्यें केला. पण तेथेही नजरचुकीनें एक चूक घडून आली.

रघुकविनें आपले ' ब्रह्मोत्तरखंड ' शके १६४० त लिहिलें असे जे ग्रंथात विधान पडलें आहे तेथे तो शक १६६४ असा पाहिजे.

हा रघुकविचा उल्लेख एका निराळ्या दृष्टीनें फारच महत्वाचा आहे. मागे आम्ही 'योगवासिष्ठ' प्रकरणीं आणि 'जैमिनिअश्वमेध' प्रकरणीं काहीं शकास्थळें प्रपंचिली आहेत येथें शकारथळ नाहीं, घोंटाळा नाहीं. पण एकाच विषयावर साधारणपणे वीस पचवीस वर्षांच्या अवधींत सांरखीच सरस अशी काव्यरचना त्या काळीं प्रत्यक्ष झाल्याचा पुरावा येथ आहे आणि तो वरील शकास्थळाच्या समाधानप्रसगीं कदाचित् थोडासा मार्गदर्शक होण्याचा संभव आहे. पा. मा चांदोरकरानीं प्रत्यक्ष श्रीधराच्या मठातून गेलेल्या मूळ पोथीच्या आधारें ' शिवलीलामृता 'च्या चौदा अध्यायी सहितेचें स्वरूप वर्णिले आहे. अर्थात् मूळ श्रीधरी ' शिवलीलामृता 'ची सहिता चौदाच अध्यायाची असली पाहिजे असे गृहीत धरण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं, म्हणून पधरावा अध्याय श्रीधरी नव्हे, बनावट म्हटला पाहिजे. हा बनावट अध्याय रघुकवीचा म्हणावा तर त्याचा कथाभाग पाहता त्यालाही काहीं धागा मिळत नाहीं. पण ज्यापेक्षा रघुकविसारखे साधारणपणें समकालीन गुणी लोक त्याच विषयावर त्याच तोलाची रचना करण्यात उत्सुकतेने मग्न झालेले दिसतात, त्यापेक्षा असाच कोणी, त्याचा अधिकार तसा नसतानाही, धाडसास प्रवृत्त होऊन पंधराव्या सारख्या एका अध्यायाची भर घालण्यास प्रवर्तला असेल. पण तो अगदीं अर्वाचीनकाळींच प्रवर्तला किंवा कसें याबाबत निश्चय करण्यास अधिक तपास व प्रमाणें याची आवश्यकता आहे.

असा सर्व शोध करून अजूनही मूळ श्रीधरी ' शिवलीलामृता'ची सहिता मिळविण्याची आशा न सोडता, या ग्रथाची प्रमाण आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा यत्न कोणीतरी केला पाहिजे. वास्तविक श्रीधर–वंशजानींच या

कामीं कबरा कसल्या तर ते श्रीधराच्याच ऋणांतून मुक्त होतील एवढेच नव्हे तर दुसऱ्या अर्थानेही 'श्री-धर' होऊन जातील !

प्राचीन मराठी हस्तलिखिताचे एक सर्वश्रेष्ठ संशोधक, प्रकाशक व संरक्षक धुळ्याचे समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांनीं सत्कार्योत्तेजक सभेंत जो बहुमोल संग्रह केला आहे त्यात श्रीधर--ब्रह्मानंदाचीं अनेक प्रकरणे आहेत त्यात 'शिवलीलामृता'च्या संहितेची एक प्रत शके १७०५(बाडांक १७१९) आणि दुसरी सचित्र पोथी(बाडांक १३७५)आणि तिसरी संहिता-प्रत शके १७०८ ची (बाडांक ९९८) अशा या ग्रंथाच्या लिखित संहिता आहेत. या संहिता श्रीधरानंतर सुमारे साठपासष्ट वर्षांच्या आतल्या आहेत. त्याचाही उपयोग करता येईल. प्रयत्न केल्यास आणखीही संहिता हातीं येतील. म्हणून पंढरपुरीं आम्ही गेलो असतां जे 'श्रीधरमंडळ' स्थापन झाल्याची घोषणा झाली त्याने हीं कार्ये अवश्य हातीं घ्यावीं अशी आमची सूचना आहे.

कै. जोशीबुवांच्या ग्रंथाच्या पुरस्काराच्या प्रसंगाने उद्भूत झालेल्या प्रश्नावर येथवर यथामति दिग्दर्शन केले. जोशीबुवांनीं केलेल्या कामाची कोणालाही मुक्तकंठानें प्रशंसाच करावी लागेल. तथापि त्यांच्या हातून सर्व कार्य मृत्यु समोर उभा असल्यामुळें यथास्थित पूर्णतेला गेले नाहीं. ती जबाबदारी त्यांच्या चिरंजीवांनीं उचलली आणि ईर्ष्या धरून ते वडिलांच्या पावलावर पावलें टाकू लागलेही आहेत. निदान तसा सुमार आम्हाला स्पष्ट दिसतो. उपसंहार, परिशिष्टे, वगैरेंची जोड देऊन यथासांग त्यांनीं ग्रंथ पूर्णतेला नेला आहे. थोडा त्याचाही परामर्ष घेणें उचित होईल.

विशेषेकरून परिशिष्ट तीनमध्ये त्यांनीं या ग्रंथात प्रतिमुद्रित केलेल्या श्रीधरस्वामींच्या हस्ताक्षराचा विचार केला आहे.

या हस्ताक्षरामाटीं त्यानीं पढरपुरीं मठातील पोथ्यापत्रे पाहिलीं आणि श्रीधरवशज श्री. तुकारामपत हे त्याच्याबरोबर काहीं निवडक पोथ्या-पत्रे घेऊन पुण्यास आले. तें साहित्य पाहून ज्याचीं छायाचित्रे ग्रथात दिलीं आहेत ती दोन पत्रे श्रीधराच्या समान्य हस्ताक्षराची ठरवून प्रसिद्ध करावी असा अभिप्राय आम्हीही दिला त्या निर्णयास अनुसरून या ग्रथात दोन नमुने श्रीधराच्या हस्ताक्षराचे म्हणून दिले आहेत श्री विनायकराव जोशी यानीं यापूर्वी, भावे यानीं आपल्या–'महाराष्ट्र-सारस्वत' या सुप्रसिद्ध ग्रथात, श्रीधराचे हस्ताक्षर म्हणून एक पृष्ठ प्रतिमीकृत करून दिलें आहे. आणि त्यावर श्रीधराचे 'म्हणून समजलें जाणारें' असा शेरा केला आहे. कै. भावे यानीं जे लिहिले ते यथाशास्त्रच लिहिले. भावे यानीं छापिलेलें पान 'सीवलीळामृत' पैकीं आहे. बहुशः, ज्याचा उल्लेख श्री. पा. मा. चादोरकर यानीं भारत इतिहास सशोधक मडळ–पचम समेलनवृत्तात केला आहे त्या, श्रीधरमठातून बाहेर (नूलकराकडे ?) गेलेल्या पोथींतील एका पानाचीच प्रतिमा भावेयानीं दिलेली असावी. हे मठातील पुस्तक श्रीधराचेच 'अरसल'–स्वहस्तलिखित असल्याबद्दल पा मा. चादोरकर यास शंका वाटत नाहीं ! इतकी आपल्या मनाची खात्री पटली तरी ती दुसऱ्याची पटविण्याइतकी बलिष्ठ असावयास पाहिजे. त्याला मिळाली याहूनही बळकटी पाहिजे म्हणून आबा चादोरकरानीं सावध–गिरीनें तेवढी कूस ठवून दिली. तशीच सावधगिरी ठवलेली असावी इतक्यासाठींच भावे यानीहा ' म्हणून समजले जाणारे ' असे शब्द लिहून ठेविले. पण एवढ्यावरून ते हस्ताक्षर 'विश्वसनीय नाहीं हेंच खरे ' असा शेरा आपणास मारता येणार नाहीं. कारण नाहीं म्हणण्यालाही आहे म्हणण्याइतका बळकट व भक्कम प्रमाणांचा पुरवठा लागतो.

आता आपल्या प्रस्तुत ग्रथात दोन पाने श्रीधरी हस्ताक्षराचीं म्हणून दिलीं आहेत. कधीं कधीं ' स्वहस्तेन लिखित, ' हस्त–आक्षर ' इत्यादि बळकटीचे धागे उपलब्ध असतात तेथे निःसंशयपणा अगदीं गाळीव समजावयास चिंता वाटत नाहीं पण जोवर तितका पक्केपणा किंवा बळकटपणा हातीं आला नाहीं तोवर सावधपणे बोलणे आणि एक कदम मागे राहाणे, हेच शास्त्राला आणि सत्यानिर्णयाला उपकारक असते

आपण फक्त एवढेच केले म्हणजे आपले काम झाले कीं, ज नमुने आपण श्रीधरी हस्ताक्षराचे म्हणून प्रस्तुत केले आहेत त्याची विश्वास्यता कोणत्या कसाची ठरू शकेल तो कस दाखवून द्यावयाचा. या दृष्टीने आम्ही ज्या दोन पानाची निवड केली आहे त्यापैकीं एका पानावर प्रमाणपणाची मुद्रा विशेष स्पष्टपणे उमटलेली आम्हास दिसते. दुर्दैवाने तेच पान चोळवटून बरेच जीर्ण झाले आहे आणि त्यामुळे त्यातील उजवीकडील काहीं भाग नष्ट व काहीं अस्पष्ट झालेला आहे तथापि आहे त्यात मुद्याचा विशेषतः डावे बाजूचा भाग मात्र सुदैवाने शाबूत राहिला आहे. हा सर्व मजकुर चामडी पुठ्यावर काळ्या शाईने लिहिलेला आहे. ग्रंथात दिलेली प्रतिमा पुष्कळच स्पष्ट आली आहे तथापि तींतील मजकूर येथे उद्धृत करितो. —

( मूळाच्या फोटोवरून

## ॥ श्री दे व द त्त प्र स न्न

श्री ब्र ह्मा न द य ती रा ज

॥ श्री ध र गो सा वीं ना झ रे क र दे श

पी ता ब्र म्हा न द ॥ मा ता सा वी त्री त
॥ श्री ध र व सी स्ट गो त्री ॥ व ही प ढ र
॥ ली ही ली शके १६१७ यु वा ना म स व छ
का र्ती क मा सी पा ठ त र स वें ली ही ल
आ भी ळा श न क रा वा चो रू न ने यी
चा [ नी ] र्वे श हो यी ल

वरील मजकुर काळजीपूर्वक वाचणाऱ्या कोणाचीही खात्री होईल कीं, ही वही श्रीधराची पाठातराची वही असून तीवर आपले नाव-गाव लिहून, ती कोणी नेऊ नये, तिचा अभिलाष धरू नये, तसे करील त्याचा निर्वंश होईल असा धाकही त्याने घालून ठेविला आहे हा मजकुर शके १६१७ मध्ये म्हणजे श्रीधराचे पिते ब्रह्मानद याच्या समाधिनतर दोन वर्षांनीं लिहिलेला आहे. स्वत. श्रीधर विद्यमान असताना मुद्दाम चामडी पुठ्ठ्यानें मढविलेल्या खाजगी वहींवर त्याच्याशिवाय इतर कोणी असा हक्काचा मजकूर लिहिणे सर्वथा असभवनीय वाटते.आणि हा हक्काचा पुरावा आम्हास इतका बळकट वाटतो कीं, हा मजकूर श्रीधराचा दस्तुरखुद्दच समजला पाहिजे. आणखी पुराव्याची आता अपेक्षा राहू नये तथापि शास्त्रगौरव अवश्य आहे म्हणून आम्ही नावाला तशी मोकळीक ठेवणें प्रशस्त मानतो

दिलेले दुसरे पान या वरील पानाशीं अक्षराचे दृष्टीने मिळते असेच आहे. या पानाची दिलेली प्रतिमा अगदींच स्वच्छ उठली आहे म्हणून तिचें वाचन येथे देण्याचे कारण नाहीं. यातही श्री देवदत्त पुन: आहेच. या देवदत्ताचा विशेष उलगडा व्हावयास पाहिजे पाडवप्रतापाच्या-

शेवटच्या चौसष्टाव्या अध्यायाचा येथे निर्देश आहे. आणि त्या ग्रथाची श्रीधरस्वामींनीं ' हे प्रथम प्रती लिहीली सत्य ॥ ' असा शेरा आहे. तेव्हा हेंहि महत्त्वाचे पान आहे आणि यावरील हा शेराही श्रीधरस्वामींच्या हातचाच दिसतो.

याप्रमाणे आमचे मित्र कै. प्रो जोशी यानी अभ्यासपूर्वक लिहिलेला पण अमुद्रितच राहिलेला हा ग्रंथ आस्थापूर्वक पूर्ण करण्यासाठीं पडतील ते श्रम आणि धन खर्च करून त्याचे चिरजीव यानीं प्रसिद्ध केला आहे. या ग्रथाने मराठी वाङ्मयात एक अत्यत मोलाची भर पडली आहे असाच सर्व रसिकजनाचा अभिप्राय पडेल व ते पिता–पुत्र जोशी यास मनःपूर्वक धन्यवाद देतील अशी सबळ आशा आहे

चि. विनायकराव यानीं मजकडून ज्या साहाय्याची अपेक्षा केली त्याच्याच परिपूरणार्थ हा पुरस्कार सिद्ध झाला. तो श्रीधरसाहित्याचे अभ्यासक, चिकित्सक, सशोधक आणि भक्त ह्या सर्वांच्या सतोषास कारण होवो !

ज्येष्ठ शु. ३०, शके १८७३
४।७।५१
' लोककल्याण ', पुणे.

दत्तो वामन पोतदार

* * *

# पुरवणी

इतक्यातच वरील 'पुरस्कारा'स पुरवणी जोडावी लागेल असे वाटले नव्हतें, तथापि आज कित्येक महिने धाकटे जोशी याच्या आमच्यावरील लोभामुळें अधिक लक्ष्य लागल्यामुळे या पुरवणीचें इतक्या सत्वर प्रयोजन पडलें. आमच्या आवडीच्या उद्योगाला थोडी नवीन चालना मिळाली, कारण या अवधींत श्रीधरी ग्रथाच्या दोन हस्तलिखित प्रति उपलब्ध झाल्या त्याचा श्री. विनायकराव जोशी यानीं आस्थेने सग्रह केला ही फार सतोषाची गोष्ट होय दोन्ही ग्रथ सुवाच्य टपोऱ्या अक्षराचे व संपूर्ण आहेत :—

## १. हरिविजय

या प्रतीच्या शेवटीं प्रति-लेखक व प्रति–लेखनकाल याची नोंद येणेंप्रमाणें आढळली. –

" स्वस्ति श्री नृप शालीवाहान शके १७०३ प्लवनाम सवत्सरे ।। माहे कार्तीक शुद्ध ११ भानुवासरे ग्रथलेखण संपुर्ण ।। १ ।। हे पुस्तक करवीले ।। दादु पदमशेट मौजे वडगाव साहाणी तरफ नारायणगाव प्रगणे जुन्नर ।। १ ।। हास्ताक्षर बाळाजी सिवराम जोसि कुळकरणी मौजे वड-

गाव व मौजे सावरगांव व वस्ति नीरगुडे व काळे ॥ पुस्तकं सपुर्णमस्तु ॥ शुभ भवतु ॥ १ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरस्तु ॥ १ ॥ १ ॥१ ॥

( मोडक जत्रीवरून सर्व योग बरोबर येतात. वार मात्र शनिवार येतो. लेखक भानुवासर अथवा रविवार देतो. हा एक दिवसाचा फरक मोडक–जंत्रींत येऊ शकतो हे सर्वमान्य आहे याची इग्रजी तारीख २७ ऑक्टोबर १७८१ इसवी. अर्थात् ही प्रत श्रीधराच्या शके १६५१ माघातील निर्याणानतर सुमारे बावन्न वर्षांनीं जुन्नर गावीं तयार झाली.

## २ पांडवप्रताप

या प्रतीच्या शेवटची नोद जरा मौजेची आहे ती अशी:—

“ व्यासोक्त भारत पूर्ण पर्व चाष्टदश स्मृत ।
श्रीधरस्य कृता टीका रसाना अद्भुत रस ॥ १ ॥
पाडवस्य प्रतापोय भक्तियुक्तेन साधयेत् ॥
पुसाळ उपनाम्ना च गोपालस्य च सूनुना ॥२॥
वास्तव्य राजुरग्रामे मल्लारि देवसन्निधौ ।
महालक्ष्मीप्रसादेन कर्त्तव्य ग्रथसग्रहं ॥३॥
दुदुभी नाम सवत्सरी । ग्रथ लिहिला राजुरी ॥
शके सत्राशे चोवीस वरी । ग्रथ समाप्त तेथे जाला ॥१॥
मार्गशीर्ष शुद्ध पौर्णमेसी । गुरुवासर ते दिवसी ॥
मृगनक्षत्र शुभप्रदेसी । तृतीय यामी सपविला ॥२॥
यज्ञेश्वर लेखक तेथे । दुसरा जाणिजे भगवंत ॥
तिसरा चिंतामणि गणेशसुत । तिघा मिळोनि संपविला ॥३॥

उपनाम पुंसाळकर । गोपाळपत याचा पुत्र ॥
बळवत नामे प्रतापशूर । यास लेहुन दिधलासे ॥४॥ शुभ भवतु"॥

( मोडकजत्रीप्रमाणे वर नमूद केलेले काळाचे योग बरोबर जुळतात. इसवी सनाप्रमाणे काळ निघतो ९ डिसेंबर, १८०२. म्हणजे ही प्रत श्रीधरानंतर सुमारे ७३ वर्षांनी सिद्ध झाली. मौज म्हटले एवढ्यासाठीं कीं, 'ही तिथा मिळोनि समपविली. ' राजुरीचे बळवत गोपाळ पुसाळकर, कोणी शूर सरदार असावेत याचेसाठीं ही लिहिली. हीही प्रत पुणें प्रांतातलीच. )

अद्यापि श्रीधरी ग्रंथाच्या प्रमाण संहिता प्रसिद्ध व्हावयाच्या न आहेत. धार्मिक ग्रंथाचे प्रकाशक यानी भाविकासाठीं यथामति शुद्ध करून छापलेल्या ग्रंथाची रेलचेल आहे. जोंवर मूळ किंवा निकटमूळ संहिता आपणासमोर नाहींत तोवर आपलें ज्ञान व चिकित्सा अपुरी राहिली तर नवल नाहीं. तेव्हा या संहिताशुद्धिच्या कामीं अशा हस्तलिखित प्रतींचा आपणास बहुत उपयोग आहे.

शिवाय जेथे प्रतींचा काळ, लेखक, मालक, लेखनस्थळ याच्या नोंदी मिळतील तेथें कोणत्या संतकवीची कीर्ति आणि काव्य कोणत्या मार्गांनीं आणि कसकसे पसरत गेले याचा माग आपणास लावता येतो. वरील अंत्योल्लेख त्या दृष्टीनें उपयुक्त ठरतील.

## ३ रंगनाथ--योगवासिष्ठसार

रंगनाथी मराठी योगवासिष्ठसार–टीका ही एक घोटाळ्याची बाब कशी होऊन बसली आहे याची सप्रमाण चर्चा आम्ही वर पुरस्कारात केलीच

आहे. त्यात छापून प्रसिद्ध झालेली ही मराठी टीका रंगनाथ निगडीकरा-पेक्षा मोगरेकराचीच मानण्याकडे आमचा कल असल्याचेही आम्ही प्रतिपादिले. गजानन चिंतामण देव यानीं शके १८२७ त या टीकेची जी प्रत प्रसिद्ध केली तिचे संपादक कै. गोविंदशास्त्री दातार यानी देखील भाषेवरून वगैरे ' या ग्रथाचे कर्तृत्व मोगरेकर रग नाथाकडेच जाऊ पाहाते ' असा आपला अभिप्राय नमूद केला असून निगडीमठात ते कर्तृत्व 'बदलण्याचा खटाटोप पुढे केला असावा' असा सभवही दर्शित केला आहे.

शके १८११ मध्ये दोन प्रकाशकानीं रगनाथी–योगवासिष्ठ–टीका मुबईत छापून प्रसिद्ध केल्यावर दोन वर्षांनींच शके १८१३ त ( इ स १८९१ ) तेडुलकर यानीं रगनाथकृत ' चित्सदानदलहरी ' नावाची गीतेवरील प्राकृत ओवीबद्ध मराठी टीका प्रसिद्ध केली ! या टीकेला प्रस्तावना वगैरे काहीं सस्कार त्यानीं केलेले आढळत नाहींत. या टीकेच्या शेवटीं मोगरेकर रगनाथाची गुरुपरपरा वगैरेसबंधीं ज्या ओव्या आलेल्या आहेत त्या आणि 'योगवासिष्ठसारा'च्या ज्या प्रकाशकानीं मोगरेकर रगनाथाच्या निराळ्या अधिक ओव्या त्या 'वासिष्ठ' ग्रथाच्या प्रतींत जोडून दिल्या आहेत त्या बहुतेक एकसारख्या म्हणजे जवळ जवळ अक्षरपदशः त्याच ओंव्या आहेत उकारबाहुल्य, विद्वत्तायुक्त व्याख्यान इत्यादि भाषिक व इतर अतर्गत ठेवणीवरून हा ग्रथ निगडीकर रगनाथाच्या काळाचाही वाटत नाहीं आणि त्याच्या हातवटीचाही दिसत नाहीं तथापि ' चित्सदा नदलहरी' आणि ' योगवासिष्ठसार ' या दोन्ही ग्रथाची समाप्ति एकाच दिवशीं झाल्याचे या ओंव्यातून आलेल्या उल्लेखावरून मानावे लागते ते असभाव्य दिसते तसेच अत्योल्लेखाच्या १२५–१५० ओंव्याही नेमक्या दोन्ही ग्रथात त्याच याव्या हेहीं असभाव्यच समजावे लागते.

मोगरेकर रंगनाथाची 'आनंद' परंपराच पण ती अशी:– १) श्री-शंकराचार्य २) श्रीवासुदेवानंद (सिद्धानंद) सरस्वती–(कुरुक्षेत्र) ३) श्रीवासुदेवानंद (बदरीकेदार–अलकानंदा)–४ श्रीकृष्णानंद (गोदावरी-तीर) ५) श्रीरंगनाथ (ग्रंथरचना नाशिक, गोत्र कपिल, कुलदैवत गोदा तीरीं–मोगरे गावचा श्रीनृसिंह, आजा अनंत, बाप–आपेराज. आणि तर्क असा कीं, भक्त किंवा आश्रयदाते कोणी विठ्ठल गोविंद.)

याच रंगनाथाचे शिष्य श्रीकाशीराज, काशीराजाचे शिष्य - श्रीरघुनाथस्वामी–श्रीरघुनाथाचे आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर–याप्रमाणें परंपरा ब्रह्मनाळमठात पठित आहे कागदपत्र, पोथ्या, आरत्या वगैरेंचा भरपूर आधार या प्रकरणीं उपलब्ध आहे

सांगलीचे श्री. ओक यानीं इ. स १९३५ त ब्रह्मनाळचे आनंद-मूर्ति यांचे शके १७७१ त लिहिलेले 'आनंदचरितामृत' नामक चरित्र व इतर काहीं माहिती प्रसिद्ध केली आहे. या 'आनंदचरितामृतात पहिल्या अध्यायात श्रीवासुदेवानंद-श्रीवैकुण्ठानंद-सरस्वती कृष्णानंद-सरस्वती अशी परंपरा देऊन या कृष्णानंदाचे शिष्य रंगनाथ यांचेविषयीं पुढील ओंवी लिहिली आहे:—

"तच्छात्र श्रीरंगनाथ । गौतमी तटीं जगविख्यात ॥
नाशिकासंनिध वाघरे येथ । वास्तव्य केलें स्वइच्छें ॥ २६ ॥
त्याचे पुत्र काशीराज समर्थ । पित्याचा अनुग्रह घेत ॥

आणि या काशिराजाचे शिष्य श्रीरघुनाथस्वामी आणि त्याचे शिष्य आनंदमूर्ति.

या माहितीप्रमाणे श्रीरंगनाथस्वामी आणि त्यांचे पुत्रशिष्य काशि-राज हे नाशिकप्रांतीं 'वाघरे' येथे राहात असे होते. या काशिराजाचे शिष्य नाशिक येथील यजुर्वेदी माध्यंदिनशाखी विश्वामित्र–गोत्री श्रीरघुनाथस्वामी हे शके १५६७ त आपला कावडीचा नेम चालवीत, काशीहून रामेश्वरा-कडे जात असतां कृष्णाकाठीं निमजढालगावकडे आले असतां ढालगावचे कमावीसदार अप्पाजीपंत देशपांडे त्यांचे चरणीं लागले या प्रसंगाच्या वर्णनांत 'आनंदचरितामृत'कर्ता म्हणतो:

"प्रत्यहीं एकांतामाजि जाण । 'योगवाशिष्ठसार' विवेचन ॥
'पंचरत्न' गीता' सह व्याख्यान । निरूपण चालविले ।।६।। (अ २)

येथे पुढील तीन ग्रंथांचा स्पष्ट उल्लेख आला आहे: —१) योगवासिष्ठसार २) पंचरत्न आणि ३) गीता यापैकीं पहिले दोन ग्रंथ रंगनाथ मोगरेकर यानीं केलेले प्रसिद्ध झाले आहेत ' योगवासिष्ठ सारटीके ' बद्दल आता अधिक लिहावयास नको. कृष्णानंदशिष्य रंगनाथ ( मोगरेकर ) कृत 'पंचरत्न' शके १८२७ त भावे यानीं 'महाराष्ट्र-कवि' मासिकात प्रसिद्ध केलें आहे. आणि तिसरा ग्रंथ 'गीता' अर्थात् ही रंगनाथ मोगरेकर कृष्णा-नंदशिष्यकृत 'चित्‌सदानंदलहरी' नांवाची गीतेवरील प्रसिद्ध झालेली प्राकृत ओवीबद्ध टीकाच होय यांत शंका नाहीं. आणि श्रीरंगनाथाचे प्रशिष्य श्रीरघुनाथस्वामी यानीं आपल्या परम गुरूने रचिलेले थोर ग्रंथ अप्पाजीपंतास पढवावे हे सरळच आहे

या सर्व विवेचनावरून ज्याला रंगनाथ मोगरेकर म्हणून भावे यानीं संबोधिले आहे तो एक फार विद्वान् आणि आनंदसंप्रदायातील मोठा अधि कारी सत्पुरुष होऊन गेला असे ठरते आणि दासपंचायतनातील आनंदमूर्ति

त्याच गुरुपरंपरेतील सत्पुरुष ठरतात, हे मान्य करण्यास काहींच अडचण राहात नाहीं

नाशिक प्रातात कसून शोध करणे अत्यत अगत्याचे आहे म्हणजे नाशिकचेच श्रीरघुनाथस्वामी आणि त्याचे परम गुरु नाशिक प्रातातील ' वाघरे ' येथे राहाणारे श्रीरगनाथस्वामी याच्याविषयीं विश्वसनीय माहिती मिळूं शकेल एवढ्या योग्यतेच्या ग्रथकाराविषयीं त्याचा शोध लागल्यापासून अधिक माहिती मिळविण्याचा सफळ यत्न होऊ नये याविषयीं विषाद वाटतो. याच शोधाचे एक अग अर्थात् ' योगवासिष्ठ–सार–टीका ', ' चित्सदानदहरी ' वगैरे ग्रथाची माहिती मिळेल तितकी मिळविणे आणि पुढे मागें या ग्रंथाच्या शुद्ध आवृत्ति काढणे हेही असले पाहिजे.

हे श्रीरगनाथस्वामी ' मोगर 'कर आपलें गाव ' मोगरे ' देतात आणि ते गाव प्रसिद्ध नृसिंहक्षेत्र असल्याचे लिहितात. ते ग्राह्य धरल्यास रगनाथ याचीं गावे ' वाघरें ' आणि ' मोगरे ' अशी दोन होतात दोन्ही गावे नाशिक प्रातातलीं त्याच्या गुरूपदेशाचे स्थान ' धारा ' नगरीच्या पश्चिमेकडील देशदुर्गातील जी विशाळ गुहा तीही तिकडचीच ! ही सर्व स्थळे निश्चित केलीं पाहिजेत. हाही शोध नाशिक प्रातीं कसून केला पाहिजे. गोदेच्या दक्षिणभागीं केला पाहिजे. या गोदा–दक्षिण भागात इगतपुरीच्या उत्तर-पूर्व भागात मराठी नकाशात एक ' वाघरें ' व त्याजवळ ' मोगरे ' आणि पश्चिमभागात ' त्रिंगलवाडी' दुर्गाच्यावर ' धार गावही नोंदलेलें आहे एक ' वाघरें ' नाशिकच्या पश्चिमोत्तर भागीही असल्याचें नोंदले आहे. नरसिंहक्षेत्राचे ' मोगरे ' आणि

गोदेच्या नाभिभागात ' अब्जक ' म्हणून रंगनाथ मागतो ते काय हेंहि पाहिले पाहिजे. स्थळनिश्चिती करून केली पाहिजे.

रंगनाथाचा ग्रंथरचनाकाल शके १५३० दिलेला आढळतो. ' चित्-सदानंदलहरी ' च्या प्रत्येक अध्यायात गुरु कृष्णानंद आणि 'रंगनाथ सद्-गुरूचा' ' कृष्णानंदाचा ' हे उल्लेख व्यवस्थितपणें आलेले दिसतात तेव्हा शके १५३० हा ' चित्सदानंदलहरी'चा रचनाकाल होय यात शंका वाटत नाहीं. याच ' लहरीं ' त ' वासिष्ठ-टीका ' पूर्वी केल्याचे दोन उल्लेख आहेत:—

१ ) " कां रामपदव्याख्यानाशें । पूर्वी वासिष्ठसारीं निरुपिलें असे " ॥ १७३३ ॥ अ. १८ वा

२ ) " हे वासिष्ठसाराचें निरूपण । जालें असे पैं संपूर्ण ॥
त्याउपरी ग्रंथराज निर्माण । गीता नामें संपूर्ण झाला असें "
॥ ९४ ॥ अ. १८ वा

येथे छापील प्रतींत ओंवीगणनेंत घोटाळा आहे (१७) ६६ च्या नंतर ९४ ते १८०० असे आकडे आल्याने मधील ओव्याच गळल्या कीं काय ते समजत नाहीं. असो. येथे नुसता 'गीता' असा निर्देश आला आहे, तो 'चित्सदानंदलहरी'चाच धरला पाहिजे. मागे आनंदचरितामृता'त–ही 'गीता' म्हणून याच ग्रंथाचा उल्लेख आलेला दिला आहेच.

काहींही असले तरी ' चित्सदानंदलहरी'चा काल शके १५३० मानावा हें प्रशस्त दिसते. 'वासिष्ठ टीका' ही ' त्यापूर्वी'ची आणि 'गीता' 'त्याउपरी'ची याचा स्पष्ट अर्थ 'वासिष्ठ–टीका'शके १५३० पूर्वीच

सिद्ध झाली असा स्वच्छ आहे. म्हणून भावे प्रभृतींनीं 'वासिष्ठ—टीका' शके १५३०ची म्हणून लिहिलें ते घोटाळयाच्या ओघ्यावरून लिहिलें आहे. हा घोंटाळा काढला पाहिजे म्हणूनच हा सारा प्रपच केला आहे

श्रीरगनाथाचे प्रशिष्य श्रीरघुनाथस्वामी याचा समाधिशक ब्रह्मनाळ—कर परपरेत शके १५८९ म्हणून नोंदलेला आहे. त्यावरून शके १५३० हा शक श्रीरगनाथाचा बहुधा त्याच्या अगदीं उत्तर काळाच्या शेवटचा दिसतो.

पुढे हा श्रीरगनाथस्वामी केवळ आनदमूर्ति साप्रदायपरपरापठणात राहिला आणि आनदमूर्ति प्रभृति पचायतनातील निगडीकर रगनाथ लोकात गाजू लागला हळू हळू पहिला रगनाथ विस्मृतच होत गेला आणि त्याचे ग्रथ व कदाचित् कथाही—जसे बदरीकेदारगमन—याचें कर्तृत्व मागाहून आलेल्या लोकानीं अज्ञानाने दुसऱ्या रगनाथाचे नावावर चढवून मढवून दिलें ! ही मढवामढवी बहुधा शके १७५० च्या आगेमागे राजाराम प्रासादि प्रभृतींच्या काळीं चागलीच भरभरीस आली असावी.

रगनाथाविषयीं एवढा प्रपंच श्रीधर—प्रकरणीं साक्षात् आवश्यक नव्हता, तरी ' घोंटाळे ' कळण्यास, काढण्यास, उकलण्यास व जोरानें पुढे शोधकार्य चालविण्यास चालना मिळावी या लोभास्तवच केला आहे.

आषाढ शु. ७, शके १८७३
११।७।५१
पुणें २

दत्तो वामन पोतदार

* * *

# कांहीं जुन्या श्रीधर-मुद्रित ग्रंथांची नोंद

१) जैमिनिअश्वमेध. बापू सदाशिव हेगिष्टे याचा छा० (शिळाछाप) मुंबई, शके १७८६

२) बभ्रुवाहन आख्यान गणपत कृष्णाजी, मुंबई. शके १७९७, (पोथी पांडवप्रतापातील)

३) बभ्रुवाहन आख्यान. हरि लक्ष्मणशेट मापुस्कर याचा छा० (शिळाछाप), मुंबई, शके १७९२ [पोथी]

४) लहुकुश आख्यान. बुद्धिप्रकाश (शिळाछाप) पुणे, शके १७८४ [पोथी रामविजयातील]

५) बभ्रुवाहन आख्यान. रघुनाथ कृष्ण मुळे "श्री कल्पतरु" छापखाना, मुंबई [पोथी, पांडवप्रतापातील] किं ३ आणे.

६) सावित्री आख्यान. सखाराम भिकुशेट खातू, मुंबई [पोथी]. शक दिला नाहीं.

टीप —वर उल्लेखिलेले क्रमांक १–४ हे ग्रंथ शं. ग दाते यांच्या मराठी-ग्रंथ-सूचींतून उद्धृत केले आहेत. (खंड १, पृ. ४९७–४९८). क्रमांक ५ व ६ हीं स्फुट-प्रकरणे म. म. द. वा. पोतदार यांचे संग्रहीं आहेत. उपरिनिर्दिष्ट स्फुट-प्रकरणाच्या नोंदीवरून हे सहज लक्षात येईल कीं, श्रीधराचीं काहीं स्फुट-प्रकरणे छापलेलीं आढळतात. श्रीधराच्या इतर छापील ग्रंथाची नोंद प्रस्तुत ग्रंथात ठिकाठिकाणीं आल्यामुळे त्याची पुनरावृत्ति केली नाहीं.

* * *

# ग्रंथकर्त्यांची प्रस्तावना

श्री विठ्ठलोपासक व लोकप्रिय श्रीधरस्वामी नाझरेकर (शके १५८० ते १६५१) याच्या काव्याची प्रसिद्धि त्याच्या हयातींतच झाली होती. त्याचे ग्रथ निर्माण होतांच त्यांच्या नकला भराभर होऊन त्याचा प्रसार गावोंगावीं होत असे, असे त्याच्या दप्तरातील काहीं विद्यमान नकलांवरून वाटतें. 'हरिविजय' शके १६२४ त पूर्ण होतांच त्याची प्रत लगेच १६२५ मध्यें झाल्याचें आढळतें. 'वेदान्तसूर्या'ची नक्कल तो ग्रंथ झाल्यानन्तर दोन वर्षांनीं शके १६२७ मध्ये पढरपूरचे पाटील नारायण-सुत कृष्ण उपनाम आराध्ये यांनीं केली आहे. पाडुरंगमाहात्म्याची नक्कल भास्कर बाबूराव कुलकर्णी यांनीं केली आहे. 'व्यंकटेशमाहात्म्या'च्या दोन प्रती शके १७५७।७४ च्या आहेत. त्याचे समकालीन मित्र मध्वमुनींनीं 'हरिविजया'दि पांची ग्रंथाची स्तुती केली आहे तर गिरिधरानें 'समर्थ-प्रतापा'त त्यास वाङ्मयभोजनांत "हरिविजय" कार असें म्हणून सन्त-पंक्तींत बसविलें आहे. नन्तर महिपति व मोरोपंत यांनीं त्याच्या ग्रंथांचा मोठ्या गौरवपूर्वक उल्लेख करून त्यांस वन्दन केलें आहे. तर राजाराम-प्रासादी यांनीं आपल्या 'भक्तमंजरीमाले'त ( शके १७५६ ) त्यांचें चरित्र देऊन ग्रंथस्तुती केली आहे. श्रीधरास ज्ञानदेवाप्रमाणे ( ज्ञानेशो भगवान्-विष्णुः ) विष्णूचा अवतार त्याचा पणतु मनोहर याने दिलेल्या समाधि-

कथेत म्हटलें असून तो देहावसानानन्तर विमानात बसून वैकुण्ठास गेल्या-चेंही त्यात वर्णिलें आहे. त्याचा एक शिष्य सामराज यानें जी संस्कृत पुष्पांजली वाहिली आहे त्यात "श्रीधरः श्रीधरः साक्षात् श्रीश्च यस्य मुखे स्थिता" असे वर्णिलें आहे. साराश, श्रीधरस्वामींच्या ग्रथाचा त्याच्या निर्मितीपासून सन १८३४ त ल्या राजाराम प्रासादीपर्यन्त सारखा जय-जयकार झालेला आढळतो.

ही झाली ब्रिटिश–पूर्वकालची हकीकत. सन १८१८ मध्ये पेशवाई जाऊन नवा इग्रजी जमाना सुरू झाला पाश्चात्य विद्याच्या अभ्यासाने नवी चिकित्सक दृष्टि लोकास आली. आणि ज्या पण्डितवर्गाने पूर्वी मराठीला नाकें मुरडलीं होतीं त्यानेच त्या कालात तिच्या उन्नतीचे यशस्वी प्रयत्न केले. सन १८३७ ते १८४० च्या दरम्यान[१] जीं जुनीं मराठी काव्ये प्रथमच छापलीं गेलीं त्यात ज्ञानेश्वर एकनाथ याच्या ग्रथांबरोबर 'हरिविजय''रामविजय' या ग्रंथासही हा मान मिळाला आहे.पुढे रसिकवर परशुराम तात्यांनीं सन १८५४ मधील आपल्या नवनीताच्या पहिल्याच आवृत्तींत श्रीधरस्वामींचें छोटेसें चरित्र देऊन त्यांच्या ग्रंथातील सुन्दर उतारे दिले. पुढें सन १८६४ त श्रीधरस्वामीचे ग्रथ पुनः छापल्याचें आढळतें. त्यानन्तर पुराणप्रकाश मडळीनें सन १८९६ मध्यें ते छापले. तदनन्तर पाडुरंग जावजींनीं आपल्या निर्णयसागर छापखान्यातून व इतर प्रकाश-कांनीं श्रीधरी ग्रथाच्या रफ, ग्लेझ, रेशमी अशा निरनिराळ्या आवृत्त्यावर आवृत्त्या काढण्याचा सपाटा आजपर्यन्त चालविला आहे.एकट्या 'जैमिनि-अश्वमेधाच्या' बा. ल. पाठक, मनोहर मुरलीधर नागपूरकर, दामोदर

---

१ चिं. नी. जोशी. मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि, पृ. २

लक्ष्मण लेले, मा. ज. दाडेकर व के. वा. ठाकूर व निर्णयसागर अशा पांच स्वतंत्र आवृत्त्या निघाल्या आहेत. एवढेंच नव्हे, तर गोष्टरूपानें त्याचे ग्रंथ बालवाङ्मयातही अवतरले. यावरून श्रीधरस्वामींचे ग्रथ अद्यापिही लोकप्रिय आहेत हें सिद्ध होत आहे.

हें झाले श्रीधरस्वामींच्या ग्रंथप्रकाशनासबंधीं. पण त्याच्या चरित्राचे लेखन, चर्चा व संशोधन या गोष्टींकडेही आजपर्यन्त अनेक विद्वानांनीं लक्ष पुरविलें आहे. 'नवनीता'नन्तर रामचन्द्र जनार्दनजींच्या कविचरित्रात स. १८६० मध्ये श्रीधरस्वामींचें चरित्र आले आहे. त्यानन्तर दत्तात्रय अनन्त आपटे, 'वेदान्तसूर्य'प्रकाशक, रामचंद्र सदाशिव राजाध्यक्ष, अर्वाचीन कोशकार भास्कर रघुनाथ गोडबोले, महाराष्ट्र सारस्वतकार भावे, महाराष्ट्रकोशकार डॉ केतकर, केकावलीकार प्रा. श्री. वि. परांजपे, "मराठी भाषेची घटना" करणारे रा.भि.जोशी, ह.भ प. ल.रा.पांगारकर, 'मयूरकाव्यविवेचन'कार प्रा. बनहट्टी, 'रसतरंगिणी'कार सी. वा. पेडसे वगैरेनीं श्रीधरस्वामींच्या काव्यावर व चरित्रावर बराच प्रकाश पाडला आहे. पा. मा. चांदोरकर, भारद्वाज, लक्ष्मण विसाजी वैद्य ( ग्वाल्हेर ) व पा. न. पटवर्धत इत्यादिकाच्या पत्रव्यवहारानें बऱ्याच गोष्टींचा निश्चय झाला आहे. पण या सर्वात रा. ब. का. ना. साने यांनीं अत्यन्त चिकाटीनें सतत प्रयत्न करून जें संशोधनपूर्वक लिखाण केलें ते फारच बहुमोलाचें आहे. त्यानीं देशपाडे डे.एज्युकेशनल इन्स्पेक्टरामार्फत श्रीधराच्या पढरपूर येथील दप्तरातून पुष्कळ माहिती मिळवून ती भा.इ.स.मंडळाच्या इतिवृत्तात व विविधज्ञान-विस्तारा'त प्रसिद्ध केली· तरी पण त्याच्या कित्येक शंकाचें समाधान झाले नाहीं म्हणून शेवटीं त्यानीं आपलीं आशंसा पुढीलप्रमाणें प्रगट केली आहे.[२]:–

२ भा. इ. सं. मडळ. अहवाल, शके १८३३ लेख १३ वा, का. ना. साने,

"मयूरभक्त रा. रा. ल. रा. पांगारकर यानीं बहुत परिश्रम करून माहितीचा छडा लावून त्याचें चरित्र लिहिलें. त्याप्रमाणें कोणी श्रीधरभक्त नाझरे व विशेषत: पंढरपूर येथें जाऊन त्याच्या वंशजापाशीं आहे ती सामग्री मिळवून व त्याच्या ग्रंथाचे मार्मिकतेनें अवलोकन करून जर या लोकप्रिय कवीचें चरित्र लिहील, व त्याच्या ग्रंथाचें गुणदोष–विवेचन करील, तर त्यानें निःसंशय मोठेंच काम बजाविलें असें होईल."

सन्तकवींचे जसे कांहीं प्रशंसक तसे काहीं त्याचे दूषकही असतात. मोरोपंताप्रमाणें श्रीधरस्वामींनीं जरी स्वतंत्र निन्दापंचक लिहिलें नसलें तरी त्यानीं निन्दकांचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केला आहे. भारद्वाजानीं आपल्या जवळच असलेल्या एका अप्रकाशित हस्तलिखित प्रतीवरून 'अश्वमेध' लिहिणारा श्रीधर दुसरा आहे असें प्रतिपादिलें. श्री. वि. परांजपे यानीं कसलाही आधार न देतां तो ग्रंथ श्रीधरस्वामींच्या शिष्याचा असावा अशी शंका प्रदर्शित केली. भावे, ह. भ. प. पांगारकर म्हणतात कीं, त्यानें 'पांडवप्रतापा'त मुक्तेश्वराची नक्कल केली. प्रा. बनहट्टी, व प्रा. कोलते म्हणतात कीं, श्रीधराने दिलेले कथासंदर्भ बिनचूक नसतात. तर ढवळे कंपनीनें कोणाचा तरी एक जादा अध्याय घुसडून पंधरा अध्यायाचें 'शिवलीलामृत' छापले आहे प. रघुनाथशास्त्री कोकजे यानीं त्यांत नवमतवाद हुडकून काढला आहे,[३] तर ना. गो. चापेकर म्हणतात कीं, "असे ग्रंथ हे आमच्या धर्मविषयक सडलेल्या कल्पनाचें मूर्तिमंत स्वरूप होय."[४] चि. वि. जोशी यानीं श्रियाळकथेचें विडंबन केले आहे तर 'कुलकर्णीलीलामृत' हा ग्रंथ तर सबंधच Parody

---

३ 'स्त्री' मासिक. आगस्ट १९४२ ; ४ सह्याद्रि, मार्च १९४५

आहे. पण पंताच्या कवितेबद्दल जसे पूर्वपक्ष व उत्तरपक्ष होऊन वाद–विवाद गाजले तसे श्रीधरस्वामींच्या बाबतींत कांहीं झालें नाहीं; कारण, या आक्षेपास आजपर्यन्त कोणीं उत्तरेंच दिलीं नाहींत. एकन्दरींत पाश्चात्य संस्कृतीच्या वाढत्या प्रभावामुळें श्रीधरस्वामींचे ग्रथ मोठमोठ्या शहरामधून जरी फारसे वाचले जात नाहींत तरी अजून सामान्य शिक्षितामध्यें व खेड्यापाड्यामध्यें ते आवडीने वाचले जातात.

श्रीधरस्वामींचे " चरित्र व काव्यविवेचन " असा ग्रंथ आपण लिहावा असे फार दिवसांपासून मनात होते. परंतु कांहींना काहीं कारणांनीं त्याच्या ग्रंथाचा अभ्यास खण्ड न पडता नेटानें होण्याचे लांबणीवर पडत चालले. सन १९३३ मध्यें 'विविधज्ञानविस्तारा'त त्यांच्या 'जैमिनिअश्वमेधा'वर एक लेखमाला लिहिली. पढरपुरास श्रीधरस्वामींचें दप्तर पाहण्यासाठीं सन १९४० मध्ये गेलों. विद्यमान वंशज रा. कृष्णाजी-पन्तांनीं पोथ्या व बाडें बिन्हाडीं देण्याचें नाकारल्यावरून त्याच्या घरींच बसून दप्तरे चाळलीं व बरीचशी टिपणे करून पुण्यास गेलों. तेथें भा. इ. सं. मंडळांतील माझे मित्र व नैष्ठिक संशोधक रा. शंकरराव जोशी व खरे याच्याशीं मिळविलेल्या सामग्रीबद्दल चर्चा केली. जोशी यांनीं असा निर्णय दिला कीं," छे ! ही तुमची माहिती संपूर्ण दिसत नाहीं. तुम्ही पुनः पंढरपुरास जा व राहिलेलीं सर्व बाडे व पोथ्या बारकाईनें तपासून त्यांचीं भरपूर टिपणें करून आतां कांहीं एक पहावयाचें शिल्लक उरलें नाहीं असा निर्वाळा देता येईल असें करा. नाहींतर हे केलेले श्रम फुकट जातील. "

अर्थात् ही तज्ज्ञ मित्रांची कळकळीची सूचना प्रमाण मानून मीं पुनः सन १९४१ च्या जून महिन्यात .पंढरपूरास गेलो. या वेळीं पंढरपूर-

म्युनिसिपालिटीचे सुप्रसिद्ध डॉ. फडके याच्या कडील उदार आतिथ्याचा लाभ मिळाल्यामुळें उन्हाळ्याचा जोर फारच कडक असतानाही अभ्यासाचें काम मोठ्या नेटानें व स्वस्थपणें झालें. शिवाय रा. कृष्णाजीपतानीं या खेपेस थोडीशी आपुलकी दाखविली. त्यामुळें पोथ्या व बाडें घरीं नेण्याची परवानगी मला मिळाली. एक एक बाड न्यावें तें तपासून व त्यातील अवश्य तीं टिपणें करून झालीं कीं, तें परत करावें असा क्रम सु॰ झाला; व अशा रीतीनें आठदहा दिवस ऐन उन्हाळ्यांत रोज दहा ते बारा तास काम करून श्रीधरस्वामींचें सर्व दप्तर निःशेष नजरेखालीं घातले व महत्त्वाच्या गोष्टींची भरपूर टिपणे करून परत आलो.

नन्तर श्रीधरस्वामींच्या ग्रथाचा क्रमवार अभ्यास करून त्या प्रत्येकावर एक एक स्वतंत्र प्रकरण लिहिलें. मिळविलेल्या नवीन माहितीवरून भा. इ. सं. मंडळाच्या सभातून श्रीधरस्वामीवर दोन विस्तृत निबंध वाचले. ते अनुक्रमें महाराष्ट्र साहित्यपत्रिका[५] व चित्रमयजगत्[६] यांत प्रसिद्ध झाले आहेत. पण काहींसें उस्मानिया युनिव्हार्सिटीसाठीं मिळवून आणिलेल्या हस्तलिखितासंबंधींचे काम व त्यातील नवीन नवीन कवींवर निबंधलेखन, काहींसें प्रकृतीचे अस्वास्थ्य व प्रापचिक अडचणी यांच्या समुच्चयानें या ग्रथाचें लेखनकार्य रेंगाळत रेंगाळत चाललें आहे. आणि ईशकृपेनें आज कित्येक वर्षांनन्तर हातावेगळें होत आहे हें पाहून एक प्रकारचें मोठें समाधान वाटत आहे.

आभारप्रदर्शनः—या कामीं मला ज्या सद्गृहस्थानीं साह्य दिलें आहे. त्या सर्वांचा मी फार आभारी आहें. सर्वांचा नामनिर्देशपूर्वक त्यांच्या

५ महाराष्ट्र साहित्यपत्रिका जुलै, १९४५ पृ. १०१–१०४

६ चित्रमयजगत्. डिसेंबर, १९४५, पृ. ४५७–४६१

विशिष्ट साह्याचा उल्लेख करणें मी अवश्य समजतों. म. म. पां. वा. काणे, डॉ. बेलवेलकर, डॉ. अ. प. करमरकर, प्रा. नादापूरकर वगैरे विद्वानांनी 'पांडवप्रतापा'दि ग्रथांत आलेल्या कथासदर्भाविषयीं व इतर गोष्टीविषयीं माहिती दिली. पढरपूरचे माझे मित्र रा. न. बा. देशपांडे म्यु. शाळा नं १ चे हेडमास्तर यानी नाझरें संबंधीची माहिती मोठ्या आस्थेनें पुरविली. नगरचे सशोधक अमृत बापूजी रसाळ यानीं भारद्वाजांच्या शकेचा थोडासा खुलासा केला.

या सर्वांचे मी अन्तःकरणपूर्वक आभार मानतो. आपल्या आकाक्षे-प्रमाणे हा ग्रंथ कितपत उतरला आहे हें पहाण्यास आज रा. ब. का. ना. साने व ह. भ.प. पागारकर हयात नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट आहे, तरी पण विद्यमान रसज्ञास त्याच्या आकांक्षा अशतः जरी सफल झाल्या असें वाटल्यास माझ्या प्रदीर्घ परिश्रमाचे चीज झाल्यासारखें वाटेल.

हैद्राबाद ( दक्षिण )
ता ३-३-१९४७

चिं. नी. जोशी

* * *

# ग्रंथनामसंक्षेप

| | |
|---|---|
| आत्मप्रकाश ( हस्तलिखित प्रत ) | आ. प्र |
| आनन्दरामायण ( प्र. गो. ल ठक्कर, शके १८०९ ) | आ. रा. |
| ऋग्वेद | ऋ. वे |
| एकनाथी भागवत ( स. मा. कृ देशमुख, इ. स. १९११ ) | ए भा |
| ऐतरेय ब्राह्मण | ऐ ब्रा |
| अंबिकाउदय ( हस्तलिखित प्रत ) | अं उ |
| कविचरित्र (द. अ. आपटे, खण्ड २, भाग २,इ.स १९०७) | क.च.ख |
| कविचरित्र भाग १ (ज. र आजगावकर, इ. स. १९०७) | क च भा. |
| श्रीमद्भगवद्गीता | गी |
| श्री छत्रपति राजाराम महाराज याचे चरित्र–जिंजीचा प्रवास. ( केशवपंडितकृत, स. वा. सी चेंद्रे, शके १८५३ ) | छ.राजाराम-चरित्र |
| जैमिनिअश्वमेध ( प्र. गोपाळ नारायण क, शके १८१० ) | जै. अ |
| तैत्तिरीय संहिता | तै. सं. |
| पंढरीमाहात्म्य ( प्र. ना. रा. मोहनी, इ. स. १८८७ ) | पंढरी मा. |
| पांडुरंगमाहात्म्य ( हस्तलिखित प्रत ) | पांडुरंग मा. |
| पांडवप्रताप ( निर्णयसागर प्रेस, शके १८१० ) | पां. प्र |
| पेशवेकालीन महाराष्ट्र ( वा कृ भावे, इ स. १९३५ ) | पे का. म |

भरतमुनि, नाट्यशास्त्र (सं. पंडित केदारनाथ, इ. स १९४३) भ. ना
श्रीमद्भागवत स्कंध ( प्र ना रा सोहनी, शक १८१६ ) भा स्कं
मयूरकाव्यविवेचन (श्री. ना. बनहट्टी, इ. स १९२६ ) मयूर. का.
मराठी वाङ्मयाचा इतिहास, खण्ड २ ( ल रा पांगारकर, इ स. १९३५ ) म वा इ
मराठी भाषेची घटना ( रा भि जोशी, इ स १९२३ ) म.भा.घ
मोरोपतकृत केकावली मोरो. केका.
मोरोपती वेचे ( सं. ल रा पांगारकर, इ स १९०५ ) मोरो वेचे
मल्लारिमाहात्म्य ( हस्तलिखित प्रत ) म. मा किंवा मल्लारि–मा
महाराष्ट्र–सारस्वत ( वि ल. भावे, इ. स. १९१९ ) म. सा
महाराष्ट्र–कवि अमृतरायकृत कवितासंग्रह ( सं. वा दा ओक, इ स. १९१० ) महा. कवि.
महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण ( श्री व्यं. केतकर, इ. स. १९१० ) महा–काव्यपरीक्षण
श्रीरंगनाथस्वामीकृत पदसंग्रह ( सं वि. ल. भावे, शके १८२० ) रंगनाथ पद सं
रामविजय ( प्र. श ना जोशी, चित्रशाळा प्रेस ) रा. वि
रुक्मिणीस्वयंवर ( नरेन्द्रकविकृत, सं वि भि कोलते, इ. स. १९४० ) रु. स्व
रुक्मिणीहरण ( सं. गो वि तुळपुळे, इ. स १९४० ) रु ह
व्यंकटेशमाहात्म्य ( हस्तलिखित प्रत ) व्यंकटेश मा
वाल्मीकि रामायण वा रा
वेदान्तसूर्य ( हस्तलिखित प्रत ) वे सू.
शाकुन्तल ( कालिदास ) शाकु

श्री छ. शिवाजी–चरित्र भाग ( कृ. अ केळुसकर, इ. स. १९२० ) शिवाजी च. भा

शिवलीलामृत ( प्र. ग ना. जोशी. इ. स. १९११ ) शि. ली

श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन (प्रस्तुत ग्रंथ) श्रीधर.च. आणि का.

साहित्यदर्पण ( विश्वनाथ, Ed by P. V. Kane, 1923) साहित्य–द

सुभाषितरत्नभाण्डागारम् (Selected & arranged by K P. Parab, 1905 ) सु.र भा

हनुमन्नाटक ( पंडित मोहनदासविरचित, शके १८३१ ) ह. ना

हरिविजय (प्र गोपाळ नारायण आणि क, इ स १८८०) ह वि.

ज्ञानेश्व(श्व)र चरित्र ( हस्तलिखित प्रत ) ज्ञा. च.

ज्ञानेश्वरी ( अनुवादक, बा अ भिडे, शके १८५६ ) ज्ञाने

---

## इतर संक्षेप

भारत इतिहास संशोधक मंडळ भा. इ सं, म

राज्याभिषेक शक रा. श.

वार्षिक इतिवृत्त वा. इ वृ.

विविध–ज्ञान–विस्तार वि. ज्ञा. वि.

---

टीप: —पद्यग्रंथाच्या संदर्भापुढील आकडे अनुक्रमे अध्याय व ओव्या किंवा श्लोकाचे आहेत.

* * *

# अनुक्रमणिका



भाग पहिला

## श्रीधर-चरित्र

**नांव** **पृष्ठ**

## परिशिष्टें



## नकाशा व छायाचित्रे



* * *

धन्य स्वामी हा श्रीधर । याच्या ज्ञानासी नाहीं पार ॥
तो आहे बहुताचि थोर । त्याचें नाम जपा रे सार ॥
ज्याची कीर्ति हे अद्भुत । वर्णिताति साधुसंत ॥

# श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन

## — १ —

### कुलवृत्तान्त व जन्म

जे विवेकद्रुमाचे मुळीं । बैसले आहाति नित्यफळीं ।
तया योगियाचिया कुळीं । जन्म पावे[1] ॥

( १ ) कुल व गोत्र, ( २ ) राघोपंताचे नाझरें येथें आगमन, ( ३ ) नाझरें आता व तेव्हा, ( ४ ) ब्रह्माजीपंत व सावित्री–श्रीधरजन्म, ( ५ ) दत्तानंद, ( ६ ) ब्रह्मानंद, ( ७ ) श्रीधराचा जन्मशक व बालपण.

१. श्रीविठ्ठलोपासक व अत्यंत लोकप्रिय कवि श्रीधर, याचा जन्म नाझरेकर कुलात झाला. याचे घराणे देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मणाचे असून, ते वाजसनेय माध्यंदिन शाखेचे आहे. याचे गोत्र वासिष्ठ[2] व सूत्र कात्यायन असून

१ ज्ञाने. ६,४५१

२ शाहूमहाराजाची टाकळीची सनद, रा. श. ५५, इ. वि. १,९९

सप्रदाय आनन्द आहे. याची कुलस्वामिनी कोल्हापुरची श्री महालक्ष्मी[३] व कुलदैवत[४] मल्लारि हीं होत मार्गशीर्ष शु॥ ६, म्हणजे चंपाषष्ठीस रविवारीं मणिमल्लमर्दन परमेश्वर, प्रेमपूर क्षेत्रांत अवतरला. प्रेमपूर म्हणजे हल्लींचे पेंबरें. या ठिकाणीं चपाषष्ठीपासून पुढे सहा दिवस मोठा उत्सव होत असून तेथे मोठी यात्रा जमते. श्रीधराचे पूर्वज योगीश्वर होते, तरी पण त्यांनीं सगुणभाक्ति सोडली नव्हती व ते याच देवाची अर्चा करीत असत. या घराण्याचे मूळचे नाव खडके[५] असे होते. कारण ती मडळी प्रथम खडकी या गावीं रहात असत. हें गाव मोगलाईत चैसाळे महालात होतें. त्याचेच पुढे औरगाबाद झालें असे म्हणतात या घराण्याचा मूळ पुरुष राघोपत हा तेथून विजापूर येथील दरबारात नोकरीसाठीं गेला. तो शिपाईगिरी करीत असे. त्यास अश्वपरीक्षा उत्तम करता येत असे, म्हणून त्यास घोड्याच्या पथकावरील अधिकाराची जागा मिळाली. त्यावरून त्यास घोडके म्हणू लागले व कालातराने तेच त्याच्या कुलाचे उपनाव झाले. पुढील पिढ्यात शिपाईगिरी सुटली आणि ते कीर्तनकार बनले. तरी पण पुढे रगनाथ महाराजानीं आपला शिपाईबाणाही पूर्णपणे राखल्याचे सुप्रसिद्ध आहे. यासबधीं श्रीधरच आपल्या एका पत्रात म्हणतो[६]:—

३ पा. प्र. १,३१; जे करवीरपूर विलासिनी। आदिमाया त्रिजगज्जननी । इ.

४ म. मा. १,४ ( मणिमल्लमर्दन आमचें कुलदैवत ); वि. ज्ञा. वि. १९१४ जाने.

५ रंगनाथ पद–स. प्रस्तावना; महाराष्ट्र काव्यग्रंथ ( ४ ), भावे, श. १८२७; म. सा. पृ. २३१

६ भारद्वाजलेख वि. ज्ञा. वि. १९१४ मार्च, पृ. ११९

आह्मी 'खडके' अमुची कीर्तनगगा असे पुरातन हो ।
भावें श्रवण करी जो वास कदा त्यास यमपुरात न हो ।।

२. सुमारे १५ व्या[७] शतकात राघोपंत घोडके हे नाझरे महालाचे देशपाडे ऊर्फ देशकुलकर्णीपणाचे वतन मिळवून तेथें राहण्यास गेले. तेव्हापासून त्यास नाझरेकर असे उपनाव पडले. म्हणजे खडके, घोडके व नाझरेकर अशी तीन उपनावें या घराण्यांस कारणपरत्वे पडलीं. पैकीं शेवटल्या दोहोंचाच उल्लेख कागदपत्रात व सनदातून असून खडके हें नाव पुढे लुप्त झालेसे दिसतें. नाझरे येथें राघोपतानंतर[८], चद्राजीपंत, दत्तोपंत, व रंगोपंत अशा तीन पिढ्या झाल्यावर रगोपंतास रामाजी, बोपाजी, कृष्णाजी व दत्तात्रय असे चार मुलगे झाले. रामाजी व कृष्णाजी हे निपुत्रिक होते. बोपाजीस सुप्रसिद्ध साधु रगनाथ व इतर दोन मुलगे झाले आणि दत्तात्रय यास ब्रह्माजीपंत या नावाचा एक मुलगा झाला. हाच श्रीधराचा पिता होय. यावरून रगनाथस्वामी हे श्रीधराचे चुलत चुलते निःसशय ठरतात. यासबधींचा अधिक खुलासा पुढे यथास्थळीं होईल. हे सर्व कुटुब नाझरे येथेच चारपाच पिढ्या एकत्र रहात होते. पण शके १५६४[९] मध्यें बोपाजी ( निजानद ) नें जलसमाधि घेतल्यानंतर रंगनाथ हा आपल्या उर्वरित कुटुबासह निगडी येथे जाऊन कायमचा राहिला. त्यानन्तर या दोन शाखांचा परस्परसबध दुरावला. पण बाकीचे कुटुब मात्र नाझरें येथेच राहिलें. तेव्हा नाझरे नगराची माहिती देणें आता क्रमप्राप्तच आले.

---

७ वि. ज्ञा. वि. १९१४

८ भावे. म. सा. पृ. ३३९

९ भावे. म. सा. पृ. २३१

३. नाझरें गांवाचा इतिहास असा उपलब्ध नाहीं. पण ते फार जुने गाव आहे. ते सोलापूर जिल्ह्यातील सागोला तालुक्यात आहे. तेथे जाण्यास दोन मार्ग आहेत. बी. अेल्. रेल्वेच्या पढरपूर मिरज मार्गावर सांगोला स्टेशन आहे. तेथें उतरून बैलगाडीनें नाझरें येथें जाता येतें. पण पंढरपुराकडून जाण्याचा दुसरा मार्ग अधिक सोईचा आहे. पढरपुराहून सव्वीस मैल मोटारीनें गेल्यावर वाटबरे गाव लागते. येथे श्रीधराच्या पूर्वजांची भक्ति पाहून मल्लारि[10] अवतरला आहे, असें श्रीधर सागतो. तेथून पुढें चार मैल जाऊन 'मठ' या ठिकाणीं मोटारचा प्रवास सपतो. नंतर दोन मैल पायीं अथवा गाडीनें गेल्यावर नाझरें येते. म्हणजे पढरपुरापासून तीस मैल मोटारचा व दोन मैल गाडीचा असा हा बत्तीस मैलाचा प्रवास आहे. पाऊस वेळेवर पडला तर काळ्याभोर जमिनीवरील ज्वारीचीं पिके बहारीचीं येतात; नाहींतर दुष्काळ! पण शरदृतूत हा प्रवास घडल्यास दोन्ही बाजूंची सृष्टिशोभा फारच मनोहर दिसते. नाझरे हा गाव एका सपाट मैदानावर वसलेला आहे. माण नदीमुळे त्यास शोभा आली आहे. दोन्ही तटावरील करजाचीं झाडे वसंतऋतूत जेव्हा पुष्पपल्लवानीं नटतात तेव्हा ती शोभा द्विगुणित होते. या गांवाचा साधारण आराखडा बाजूस दिला आहे. माण नदी गावाच्या उत्तरेस आहे. ती पश्चिमेकडून दक्षिणेकडे वहात येऊन पुनः पूर्वाभिमुख झाली आहे. माण नदीच्या उत्तरेस पैलतीरावर 'वझरें' व दक्षिणेस ऐलतीरावर "नाझरें" अशीं हीं जोडगावें वसलेलीं आहेत. उत्तर तीरावर श्रीधराचा आजा दत्तानद याची समाधि आहे. तिचा जीर्णोद्धार रा. दत्तात्रय बळवंत देशपाडे, शिक्षक, पंढरपूर सेंट्रल स्कूल, यानीं केला आहे. हे त्या वशातलेच आहेत.

---

१० म. मा. २,१५३

# नाझरें गांवचा नकाशा

उत्तर

पूर्व

पश्चिम

दक्षिण

बलवडी

वझरें

टेकडी

दत्तानंद जिवंत समाधि

पूर्णानंद समाधि.

माण नदी

गोंदीया ओढा

बुरूज

तट

पटांगण

मशीद

धनगर वाडा

कुंभार वाडा

विठोबा देऊळ

मारुती देऊळ

घाट

रस्ता

देशपांडे वाडा

पाटील घरे

नरसोबाचे देऊळ

श्रीधर वाडा

लोहारवाडा

होळार वाडा

पोलिस गेट

पेठ

वेस

चावडी

पोलिस चौकी

मांग वाडा

महार वाडा

शाळा

पाटील वाडा

महादेव देऊळ

या समाधीस नवस करून तो फेडण्याची प्रथा अजूनही काहीं भोळ्या भाविक लोकात दिसून येते. ह्या समाधीपुढील भुयारात एक दुसरी समाधि आहे. ती पूर्णानंदाची म्हणून सांगतात. परतु ती त्याची नसून दुसऱ्या कोणाची तरी असावी. कारण पूर्णानंदाची समाधि गोळवणास[११] आहे. मागें उल्लेखिलेल्या मठापासून नाझरे गांवाकडे आपण आलो की, प्रथम बाहेरील बाजूस महारवाडा व मागवाडा हे लागतात. पुढे गावाची वेस येते. आत गेल्यावर चावडी लागते. तिच्या पलीकडे लोहारवाडा व होलारवाडा हे आहेत. उत्तरेकडील रस्त्यानें गेल्यावर पाटलाचीं घरे लागतात. त्याच्या समोरच मुख्य देशपाडे याचा वाडा आहे. हे गौतमगोत्री आहेत. या वाड्याच्या दक्षिणेस श्रीधराचा वाडा आहे. या गावाची लोकवस्ती हल्लीं अदमासे तीन हजार आहे. ब्राह्मणाचीं फक्त वीसच घरे आहेत. ते शेतीच करतात. काहीं नोकरीनिमित्त परगावीं गेले आहेत. विद्वान् असा ब्राह्मण आता तेथे एकही नाहीं. लिंगायत, रड्डी व धनगर याची वस्ती मोठी असून ते शेती करतात व मेंढरे पाळतात. हा गाव उत्तम घोंगड्यासाठीं प्रसिद्ध आहे. नाझरे येथील वाड्यात फक्त रंगनाथस्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव प्रतिवर्षी मार्गशीर्ष व॥ १० होत असतो. या मठास सालीना शंभर रुपयाचे इनामी उत्पन्न आहे. श्रीधराच्या विद्यमान वशजांचा याशीं आता काहींएक सबध राहिलेला नाहीं.

हें झालें आजचे नाझरे. पण श्रीधरकालीन नाझरे मोठे भरभराटीचे नगर होतें. तें विद्या, कला, हुन्नर व शेतकी यांचें माहेरघर होते. श्रीधराच्या पूर्वजांच्या तेथें तीनचार पिढ्या होऊन गेल्या. त्याचा आजा दत्तानद

---

११ भावे. म. सा. पृ. ३४०; परंपराश्लोक, पृ. ३

तेथेंच जन्मला व तेथेच समाधिस्थ झाला. ब्रह्माजीपत व श्रीधर या पितापुत्राची जन्मभूमि तीच होती. माण नदीच्या परिसरात ते खेळले व वाढले. त्यामुळे या सर्वांना आपल्या मातृभूमीचा फार अभिमान होता. तो त्यांनीं आपल्या ग्रथातून जागोजाग मोठ्या प्रेमाने व्यक्त केला आहे. ब्रह्मानदाचे नाझरें वरील पद पहाः—

## ॥ नाझरें ॥ पद

आमची मिरासी अक्षय पाहीं । नाझरेची सर्वथा ही ॥ १ ॥
नित्य सुकाळ आम्हा पाहीं । नाहीं दुकाळ काळत्रेई ॥ २ ॥
नाझरेंची मिरास देखा । जे का विश्राति सकळ लोका ॥ ३ ॥
झरें ना जें कदाकाळीं । आवतरले सत कळीं ॥ ४ ॥
ब्रह्मानंदस्वामी तेथ । नादे अक्षय श्रीदत्त ॥ ५ ॥

या पदातील जन्मभूमीचा अभिमान, तिचे प्रेम, तिचे शुचित्व, तेथील नित्यसुकाळ व नावावरील कोटी हीं सर्वच अत्यत हृदयगम झालीं आहेत. श्रीधराने " पढरीहून पश्चिमेस देख । नाझरे नगर पुण्यकारक " असे वर्णन केले आहे;[१२] व हरिविजय,[१३] रामविजय,[१४] पाडवप्रताप[१५] व जैमिनिअश्वमेध[१६] या ग्रथात व लघुग्रंथांतही तसेंच वर्णन केलें आहे. जुन्या वाङ्मयात हे मातृभूमिप्रेम आदर्शवत् होऊन राहिले आहे.

४. अशा प्रकारे वर्णिलेल्या नाझरेनामक पुण्यनगरींत व देशपाडे यांच्या पवित्र वशीं व ब्रह्माजीपत व सावित्री याच्या पोटीं श्रीधर जन्मला.

---

१२ म. मा. २,२५२ १३ ह. वि. ३६,२५०
१४ रा. वि. ४०,२०२ १५ पा. प्र. ६४,१८९
१६ जै. अ. ९६,९५

अलौकिक पुरुष व महात्मे बहुधा सत्कुलांतच जन्मतात. त्र्यंबकपंत, गोविंदपंत व विठ्ठलपंत ही ज्ञानेश्वराची पितृपरंपरा किंवा भानुदास, चक्रपाणि व सूर्यनारायण ही एकनाथाची परंपरा, विद्वत्ता, भगवद्भक्ति व सदाचरण याविषयीं जशी प्रथित होती, तशीच वर उल्लेखिलेली श्रीधराची परंपराही होती. रंगोपंताच्या दोन्ही शाखा. म्हणजे त्रोपाजी व दत्तात्रेय, या विद्वत्ता, साधुत्व व कीर्तनें याविषयीं प्रसिद्धि पावलेल्या होत्या. म्हणूनच या प्रकरणाच्या प्रारंभीं दिलेली कव्युक्ति श्रीधराच्या बाबतींत उचित वाटते

५. आता श्रीधराचा आजा दत्तानंद व पिता ब्रह्मानंद याच्याविषयीं जी थोडीबहुत माहिती मिळते तिजकडे वळू. दत्ताजीपंत याचा जन्म नाझरें येथे झाला व त्याची समाधीही तेथेच असल्याचे वर आलेच आहे. त्याचा जन्मकाल व इतर माहिती उपलब्ध नाहीं. पण त्यानें पूर्णानंदाचा अनुग्रह घेऊन सन्यासदीक्षा घेतली होती. हा मोठा योगी व ज्ञानी होता. ब्रह्माजीपंताचा हाच विद्यागुरु व मोक्षगुरु होता. श्रीधरानेही संस्कृतपरंपरेत

पूर्णानंदकृपापूर्ण दत्तात्रयमहामुनिः ॥ ७ ॥
दत्तात्रयसमुत्पन्नो ब्रह्मानंदमहायतिः ।
कैवल्यपददातारं महाराजं नमाम्यहम् ॥ ८ ॥

असेच म्हटलेले आहे. ‘ आत्मप्रकाश ’ या आपल्या ग्रंथात ब्रह्मानंदाने पहिल्या ‘ गुरुस्तवन ’ या प्रकरणात आपला पिता व गुरु जो दत्तानंद यास आदराने नमन केले आहे; आणि चौदाव्या प्रकरणांत त्याच्या समाधिकालाचा जो उल्लेख त्याने केला आहे त्यावरून तो काल शके १५९० असा निश्चित ठरतो. याविषयींचा खुलासा पुढे यथास्थळीं आढळेल. दत्तानंदासंबंधींची याहून जास्त माहिती मिळत नाहीं.

६. ब्रह्मानंदासंबंधीं मात्र थोडी अधिक माहिती मिळते. हरिविजयाच्या नमनांत श्रीधराने त्याच्याविषयीं जो गौरवपूर्वक उल्लेख

केला आहे त्यावरून पुढील गोष्टी आपणास कळतात.

वर सागितल्याप्रमाणें ब्रह्माजीपतांचा विद्याभ्यास दत्तानदाजवळच झाला. त्यानें योगाचे व वेदाताचें तात्त्विक व अनुभविक ज्ञान त्याच्यापासूनच सपादन केले होते. श्रीधर म्हणतो:–जे निस्सीम वेदांतज्ञान । तें ज्यास करतळामल पूर्ण[१७] ॥ त्याने ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व सन्यास असे चारही आश्रम यथाशास्त्र पाळले होते. बाळपणापासूनच त्याचा सदाचरणाकडे ओढा होता. तो परद्रव्य वमनासारखे मानी, तर परनारी मातेसमान मानी. तो सूर्यासारखा तेजस्वी असून तापसियामध्यें धूर्जटीप्रमाणें शोभत असे. कामक्रोधादि षड्रिपु त्यानें पूर्णपणे जिकले होते. म्हणूनच त्याच्या नुसत्या कृपावलोकनानेंच पहाणारास ज्ञानप्राप्ति होत असे. मल्लारिमाहात्म्यात श्रीधर सागतो कीं आमचे सर्व पूर्वज योगीश्वर होते. याच्या पत्नीचे नाव सावित्री. ती मोठी पतिव्रता होती. या दोघाचा उल्लेख श्रीधराने मोठ्या प्रेमादरानें प्रत्येक ग्रथात केला आहे. तो सागतो:—

श्रीधर म्हणे ब्रह्मानद पिता । सावित्री माता गुणसरिता[१८]
तो ब्रह्मानंद पिता निश्चिती । सावित्री तयाची शक्ती[१९]।
हे तो आदिपुरुष मूळप्रकृती । मातापिता वदिली

यात अमृतानुभवातील मंगलाचरणाची पूर्ण छाया पडलेली दिसत असून श्रीधराने आपल्या मातापित्यास मूळ प्रकृतिपुरुषाच्या पदवीस चढविले आहे. याने ‘ आत्मप्रकाश ’ नावाचा ग्रथ लिहिला असून पुष्कळ पदेंही रचलीं आहेत. त्याचा परमर्श पुढील भागात घेतलेला आढळेल. दत्तानंद शके १५९० मध्ये समाधिस्थ झाल्यानतर ब्रह्माजीपंत निदान आठ दहा वर्षें तरी नाझरें तेथेच रहात असावा. त्यानंतर शके १६०० ते १६०३

---

१७ ह. वि. १,४७
१८ पा प्र. २८,१४८
१९ ह. वि. १,४२

चे दरम्यान तो पंढरपुरास गेला असावा. कारण त्याने १६०४मध्ये लिहिलेल्या आपल्या 'आत्मप्रकाश' ग्रंथात आपला उल्लेख 'ब्रह्मानद स्वामी' 'ब्रह्मानद यति' असा केला आहे. विठ्ठलभक्तीसाठीं गाजलेल्या, व दक्षिण काशी म्हणून प्रसिद्धि पावलेल्या पंढरपूर क्षेत्रीं जाऊन तेथे सन्यास घ्यावा व आपले उर्वरित आयुष्य तेथे व्यतीत करावे या हेतूने त्याने शके १६०० चे सुमारास नाझरे सोडलें असावे.

श्रीधर हरिविजयात सागतो[20]—

'पुढें पंढरीस जाऊन । मग केले सन्यास ग्रहण'

यावरूनही पढरीस काहीं काल राहिल्यावर त्यानें संन्यास घेतला हे सिद्ध होतें. संन्यासानंतर सुमारे १२ वर्षे त्याने पढरपुरात आश्रमधर्माचरणात व लोकोपदेशात घालविलीं व तो शके १६१५ मध्ये तेथे भीमातटीं समाधिस्थ झाला. श्रीधराने या गोष्टीचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे:—

श्रीधर म्हणे पढरीये भीमातटीं । स्वामी माझा वाळवंटीं ।
समाधिस्थ जगजेठी । ब्रह्मानद यतिराज ।। ज्ञा. च. २–२६१
श्रीमुख सवत्सर सतेज । मार्गेश्वर शुद्ध बीज ।
ब्रह्मानंद महाराज । समाधिस्थ पाडुरगीं ।। ज्ञा. च. २–२६२

हा योग जत्रीवरून रविवार ता. १९ नोव्हेंबर सन १६९३ मध्ये येतो. का. ना. साने यांनीं यासबधी पुढील श्लोक दिला आहे[21]:—

शाके बाणमहीरसेन्दुप्रामिते वर्षाव्हये श्रीमुखे ।
मासे मार्गशरे सिते द्वयतिथौ भानौ तु याम्यायने[22] ।।

---

२० ह. वि. ३६, २५१

२१ भा. इ. सं. मं. वा इ. वृ. श. १८३७ लेख १७७, पृ. ३०८

२२ याम्यायने=दक्षिणायने

श्रीमद्विठ्ठलसस्थिते पुरवरे भीमातटे सुन्दरे ।
ब्रह्मानदयतींद्रयोगपदवीं सौख्ये समाधौ स्थितः ॥

याच प्रकारचा आणखी एक श्लोकः–स्वस्तिश्रीनृपशालिवाहन–
शके इ०

कमलजामुखसशितवर्षे दाक्षिणायनगते वसुमित्रे ।
मासिवैष्णवतिथिद्वयभानौ व्यक्तता तु मुमुचे यतिराजः ॥ वगैरे

मला श्रीधराच्या दप्तरात सापडला आहे. या सर्वावरून ब्रह्मानंदाचा वर दिलेला समाधिकाल अगदीं निश्चित झालेला आहे.

७. अशा योगियांच्या व बुद्धिमताच्या कुळात जन्म पावलेला व अद्यापिही लोकप्रिय असलेला जो नामवत श्रीधर कवि त्याच्या जन्माची तिथि, वार व शक यासंबधीं निश्चयपूर्वक माहिती अद्यापि उपलब्ध झालेली नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. नवनीतकारापासून पुढें सर्वजण त्याचा जन्मशक १६०० हाच धरून चालले आहेत. पण या समजुतीस कोणताही आधार नसता आजपर्यंत तिजबद्दल कोणीही नुसती शकाही प्रदर्शित केली नाहीं याचे आश्चर्य वाटते ! का. ना. साने यानीही या गोष्टीस लेखी आधार नाहीं असे म्हणून त्याच शकाचा स्वीकार केला पण मी त्याचा जन्मशक बराचसा निश्चितपणे ठरविण्याचा साधार प्रयत्न केला आहे तो असाः—ब्रह्मानदाने ' आत्मप्रकाश ' हा ग्रथ शके १६०४ मध्यें लिहिला आहे. त्यात तो लिहितोः—

जाला ग्रथाचा उतारा । आत्मप्रकाश प्रकाशला पुरा ।
जेथ संशयास थारा । नाहींच मुळींहूनि ॥ १३–५९
हा ग्रथ व्होवावयास कारण । श्रीधरें केले होते प्रश्न ।
मग जें केले निरोपण । तैसाच ग्रथ पूर्ण लिहीजेजी ॥ १३–६१

पूर्वाश्रमींचा निजपुत्र । सत् शिष्यही परम चतुर ।।६२।। इ.
श्रीधर प्रश्न न करिता । तरी का आत्मप्रकाश प्रकाशता ।।
त्याचेन प्रश्नें या ग्रंथा । नामरूप प्रगटलें ।।१३-६६।।

यावरून निःसंशय स्पष्ट होते कीं, प्रथम श्रीधराने ब्रह्मानदास काही प्रश्न केले, आणि ही गोष्ट गुरूपदेशानतरच घडलेली आहे. नतर त्यानें त्याचीं उत्तरे दिलीं. मग काहीं कालानें ही प्रश्नोत्तरे त्याने सर्वांच्या हितार्थ लिहून काढून हा ग्रंथ निर्माण केला. हा ग्रथ या कारणामुळेच गुरुशिष्य संवादात्मक रचलेला आहे. हा ग्रथ त्याच्या नावावरूनच तत्त्वज्ञानात्मक आहे हें उघड दिसतें. तेव्हा त्यातील आत्मज्ञानाचे प्रश्न विचारण्याची व त्याचीं उत्तरें समजण्याची योग्यता श्रीधराचे अगीं त्यावेळीं आली असली पाहिजे. एवढेंच नव्हे, तर श्रीधराने ग्रंथाचे शेवटीं जी बत्तीस ओव्याची कृतज्ञतापूर्वक सुमनमाला गुरूस वाहिली आहे, तिजवरून त्याची कवित्वशक्तीही चागली होती असे दिसते; व अशी योग्यता येण्यास श्रीधराचे वय त्यावेळीं निदान चोवीस वर्षांचे तरी मानणे अवश्य आहे. दोन चार वर्षे ते कमी जास्त असू शकेल. पण इतर पुराव्याचे अभावीं तूर्त तो त्यावेळीं चोवीस वर्षांचाच होता असे धरून चालू. म्हणजे त्याचा जन्म शके १६०४ हा जो या ग्रथाचा काल त्याचे पूर्वी चोवीस वर्षे मानला पाहिजे. अर्थात्, तो शके १५८० हा ठरतो[२३]. आतापर्यन्त मानला गेलेला शके १६०० हा श्रीधराचा जन्मकाल असंभाव्य ठरतो कारण या ग्रथाचे वेळीं त्याचे वय चार वर्षांचे होते असे म्हणण्याची आपत्ति येते. आणि चार वर्षांचा

---

२३ का. ना. साने हाच शक सुचवितात. ( वि. ज्ञा. वि., १९१४ पृ. १० )

मुलगा असले वेदाताचे प्रश्न विचारूं शकणार नाहीं; त्याचीं उत्तरें समजण्याची त्याची पात्रताही नाहीं, व त्यास कोणताही गुरु ती सागणारही नाहीं. श्रीधराचा जन्मकाल याहून अधिक निश्चितपणें ठरविण्यास त्याचे समग्र दप्तरात, बाडात वा ग्रथात मला दुसरा काहीं पुरावा मिळाला नाहीं. तो पुढें येईतों, त्याचा जन्मकाल शके १६०० न मानता तो आता शके १५८० असा मानणे उचित आहे असे वाटते.

लहानपणीं आठ दहा वर्षांचा असताना श्रीधराने आपले आजोबा दत्तानद यास पाहिले असावे. ब्रह्माजीपतास हा एकटाच मुलगा असल्यामुळे त्याचे आजोबानीं व मातापितरानीं चागले लाड पुरविले असतील. नाझरे येथील देशपाड्याचे वतन त्याचेकडे असल्यामुळे त्याची सापत्तिक स्थितीही चागली असावी. गुणसरिता सावित्री त्याची माता तर त्याचे फारच हट्ट पुरवीत असेल. बालकृष्णाने एकदा दहीभात जेवताना लिंबाचें लोणचे व त्यातील आले याचा हट्ट घेतला व तो पुत्रवत्सल यशोदेनें सोवळे विटाळून पुरविला असें वर्णन करणारा श्रीधर स्वानुभवाचे बोल बोलतो आहे असे खास वाटते. मग तो अनुभव स्वतःसबधाचा अगर त्याचे मुलासबधाचा असो ! नाहींतर यशोदेसारख्या गौळणीकडे इतकें कडक सोवळे कोठचे ?

‘ खंडोबा ’ या कुलदेवतेच्या नावावरून त्याची आई त्यास ‘ खडेराय ’ असे म्हणत असें तर वडील‘श्रीधर’म्हणून त्यास हाक मारीत. यास एका बाडात मला पुढील आधार मिळाला आहे.[२४]

---

२४ ‘ श्रीधरस्वामिप्रसादेन शुभं भवति सर्वदा ’ यावरून हे श्लोक श्रीधरपुत्र दत्तात्रयानें लिहिले असावे असे वाटते. मागें जो ब्रह्मानंद प्रयाणाचा दुसरा श्लोक मी दिला आहे तो पाचवा असून हा सहावा आहे. लेखन शुद्ध नाहीं हें सागणे नलगे.

खडेरायो मातृसन्यस्तनामा ब्रह्मानंदेन श्रीधरेति प्रीतिष्ठम् ।
विष्णुशम्भ्वोरैक्यमेवंगतःस्यात् सौख्ये लीन तं भजे द्वैतहीनम् ॥६॥

त्याचप्रमाणे कृष्णाचे बाळपणचे चेंडूफळी, वावडी, लपडाई, भोवरा, इटीदाडू, चक्के, हमामा, हुतुतू, हुमली, झोबी इत्यादि खेळाचे वर्णन तसेच पिपळपान, वाघनखें, डूल, वाकी, बिदुली, पैजण, वाळे इत्यादि बाळलेण्याचीं वर्णने व पायाची माती लावून, व दडाला भालदोरी बाधून दृष्ट काढण्याच्या प्रकाराचे वर्णन श्रीधराने स्वानुभवावरूनच केले असावे असे खास वाटते.

येणेप्रमाणे नाझरे येथील माण नदीचे परिसरात श्रीधराने आपल्या वयाचीं सुमारें वीस वर्षे तरी घालविलीं असावीं. या कालच्या बालमित्राचीं व सहाध्यायी सौगड्याचीं नावे उपलब्ध नाहींत. पण या कालात त्याने उत्तम शरीरप्रकृति कमावली, व घरच्याघरींच जुन्या पद्धतीप्रमाणे त्याचे सर्व प्राथमिक शिक्षण व पुष्कळसे वैदिक, सस्कृत व प्राकृत ग्रथाचे अध्ययन पूर्ण झाले असावे. यापुढे तो नाझरे सोडून पढरपूरकर कसा झाला व पुढील विद्याव्यासग त्याने किती केला हें पुढील प्रकरणीं पाहू.

* * *

— २ —

## बालपण व विद्याभ्यास

तद्दिव्यमव्यय धाम सारस्वतमुपास्महे ।
यत् प्रसादात् प्रलीयन्ते मोहान्धतमसच्छटा : ॥

सुभाषितम्

(१) खड्याचा श्रीधर कसा झाला ही दंतकथा व तिचे खंडन, (२) श्रीधराचे संस्कृत अध्ययन व शास्त्राचा नामनिर्देश, (३) नाटकाचा व साहित्यशास्त्राचा अनुल्लेख, (४) श्रीधराचे ग्रंथातील शास्त्रे व कला याचे उल्लेख, (५) संस्कृत ग्रंथातील साहृश्यें, (६) मराठी कवि व साहृश्ये, (७) श्रीधराचे वाडातील ग्रंथांची यादी, (८) श्रीधर पडित होता.

१. श्रीधराचा विद्याभ्यास नाझरें येथेच त्याचे बापाचे देखरेखीखालीं झाला व तोच त्याचा विद्यागुरु असल्याचे मागील प्रकरणाचे शेवटीं सांगितलेंच आहे. पण यासबधीं अशी एक बलवत्तर दतकथा प्रचलित झाली आहे कीं, सर्व विद्या त्यास त्याचे चुलत चुलते रगनाथस्वामी याचे कृपाप्रसादानें प्राप्त झाल्या व तेच त्याचे विद्यागुरू होत. म्हणजेच खड्याचा ‘ श्रीधर ’ कसा झाला हें आता पाहू.

राजारामप्रासादी याने भक्तमजरीमाला या नावाचा महिपतीच्या ग्रंथाच्या धर्तीवर १०९ अध्यायाचा व १३००० ओव्या असलेला एक चरित्रात्मक ग्रथ लिहिला आहे.[1] त्यातील पहिल्या खंडात १९ व्या अध्यायात ही कथा आहे. तिचा साराश असा:—

खडोबा पुतण्या श्रीरगमूर्तिचा । स्वामिचरणीं भाव तयाचा ।
काळ सारिला सेवेत साचा । निःशीम भक्तिचा पुतळा जो ॥११॥
परि बुद्धिहीन मतिमद । उगा चि बैसे सदा स्तब्ध ।
म्हणता नये येक पद । अभग विविध काहीं च पै ॥ १२ ॥

एकदा रगनाथ पढरीस खंड्यासह गेले होते. त्यावेळीं तेथे जयरामस्वामी, तुकाराम, वामनपडित, आनदमूर्ति, केशवस्वामी, समर्थ व शिवराम अशी मडळी जमली होती. रगनाथाचे रोज सायंकाळीं कीर्तन होत असे. एके दिवशीं त्यास येण्यास उशीर झाला. 'लौकरच येतो' असा निरोप त्यानीं खडोबाबरोबर पाठविला. रामदास म्हणाले:– "ठीक आहे" पण ते येईतो तूच कीर्तनास सुरवात कर. हे ऐकताच खळखळा रडत तो बिऱ्हाडीं गेला. म्लानवदन पाहून रगनाथानीं त्यास दुःखाचे कारण विचारिले ते समजताच त्यानीं खंडोबाला जीभ बाहेर काढावयास सागितली व

मग वैखरि माजि श्री अक्षर । लिहिले स्वामिनिं स्वकरे ।
नाम ठेउनि श्रीधर । कीर्तन गजर कराविति ॥ ३८ ॥

तेव्हापासून वाग्देवता त्याचे जिव्हेवर बसली व त्यानें पुढें अनेक ग्रथ लिहिले. हीच दतकथा थोड्याशा फरकाने बरीच प्रसृत झालेली आहे. रगनाथाचे विद्यमान वंशज रा. रा. शंकर दत्तात्रय गोसावी, निगडीकरबुवा,

---

१ हा ग्रंथ शके १७५६ मध्यें लिहिलेला आहे.

कीर्तनकार, यानीं याच आशयाची पण थोड्याशा फरकानें ही दंतकथा सागून पुढील आर्या तत्पुष्ट्यर्थ मला म्हणून दाखविली.—

श्री जिव्हेवरी लेहुनि श्रीधर हें नाव ठेविलें त्यास ।
श्रीगुरुचरणा वदुनि उत्तम कवि जणुं जुनाट हरिदास ॥

याच आधारावर रा. अनंत गोपीनाथ हिंगणीकर यानीं श्रीधरास निगडीकर मानून "श्रीधर निगडीकराचें चरित्र" असे एक लहानसे पुस्तक लिहिलें आहे. श्रीधराचा पणतु मनोहर यानेंही बहुधा वरील दतकथेवरच विसंबून या प्रसंगाचा उल्लेख केला आहे. खुद्द नाझरे येथे ही दंतकथा सर्वतोमुखीं आहे. का. ना. साने यानीं पण ही आख्यायिका, तिजविषयीं काहीं एक संशय प्रगट न करता विविधज्ञानविस्तारात दिली आहे.[२]

आता या दतकथेच्या विरुद्ध पुरावा किती सबळ आहे तो पहा:—

( १ ) पंढरपूर येथील श्रीधराच्या विद्यमान वशजास ही दतकथा मान्य नाहीं.

( २ ) ही गोष्ट रामदासासमक्ष घडली. तेव्हा ती अगदीं उशिरा म्हणजे त्याच्या समाधिकालाच्या वर्षी शके १६०३ मध्ये घडली असे मानले तरी श्रीधराचे वय त्यावेळीं ३ वर्षांचे येतें. कारण, १६०० हा त्याचा जन्मशक म्हणून आजपर्यंत सर्वत्र मानला गेलेला आहे. ही आपत्ति टाळण्याकरता साने वर निर्दिष्ट केलेल्या लेखात असे सुचवितात कीं, श्रीधराचा जन्म शके १५८४ किंवा १५८० असा धरावा. पण, लगेच पुढे म्हणतात कीं, यास दुसरा प्रत्यतर पुरावा पाहिजे तो नाहीं.

( ३ ) ही दतकथा खरी धरल्यास शके १५७२ व शके १५९४ मध्यें अनुक्रमे समाधिस्थ झालेले तुकाराम व जयरामस्वामी हे शके १६०३

---

२ वि. ज्ञा. वि. जानेवारी १९१४.

मधील या प्रसगीं हजर होते असें म्हणावें लागेल म्हणून ही ऐतिहासिक दृष्ट्या खोटी ठरते.

( ४ ) रगनाथ शके १५६४ त निगडीस गेल्यावर दोन्ही शाखाचें दळणवळण साहाजिकच कमी झाले होतें. तेव्हा त्याच्याकडे लहानग्या श्रीधरास त्याच्या पित्याने विद्याभ्यासार्थ पाठविलें असावे हें शक्य दिसत नाहीं; शिवाय ब्रह्माजीपतासारखा तेजस्वी ज्ञानसूर्य घरींच असताना लहान मुलास दुसरीकडे जाण्याचे प्रयोजनच नव्हते.

( ५ ) श्रीधराचा जन्म पंधरावीस वर्षे अलीकडे काल्पिला व त्याला रगनाथकृपेने दतकथेप्रमाणे सरस्वती प्रसन्न झाली असे मानले, तर तो रगनाथाचा विद्यागुरु म्हणून अवश्य उल्लेख करता. कारण त्याच्या ठिकाणीं कृतज्ञतेची उणीव नव्हती.[3] उलट ब्रह्मानंदासच तो विद्यागुरु व मोक्षगुरु मानतो हे मागे सागितलेच आहे. रगनाथाचा उल्लेख त्याने आपला चुलता ( चुलत ) म्हणून परमादराने आपल्या अनेक ग्रथात केला आहे.[४]

( ६ ) मागील प्रकरणीं सागितल्याप्रमाणे ब्रह्मानंदानेच त्याचे श्रीधर हे नाव ठवले होते. पुनः पहाः—"त्या ब्रह्मानदे कृपा करून। श्रीधर हें नाम ठेवून[५] " ।। इ. असे श्रीधर स्वतः सागतो. तेव्हा या नावावरच आधारलेली ही दतकथा समूळ ढासळून पडते.

( ७ ) शिवाय दतकथेत म्हटल्याप्रमाणें श्रीधर हा बाळपणापासून, जड, मूढ, व मतिमंद नव्हता. तर तो मोठा बुद्धिमान् व चतुर होता.

३. साने—" कृतज्ञता कोठे दर्शविली नाहीं हें मोठे चमत्कारिक दिसते."

४. रा वि. १, १०१, म. मा., नामावलि व संतमालिका.

५. वे. मू. १२, १७०

ब्रह्मानंद म्हणतो[६]:—“पूर्वाश्रमींचा निजपुत्र। सत् शिष्यही परमचतुर” ॥

(८) संतप्रतापात श्रीधरानें अनेक सताचे चमत्कार वर्णिले आहेत. त्यात रगनाथाचा एक चमत्कार त्याने दिला आहे तो हा कीं त्यानीं समाधि घेतल्यावरही त्यास एकदा दर्शन दिले. पण त्यात त्याच्या स्वतः-सबंधींच्या प्रस्तुत चमत्काराचा उल्लेख नाहीं. एवढा मोठा चमत्कार तो खात्रीने नमूद करता.

२. या सर्व कारणपरपरेवरून ही दंतकथा अगदीं कुचकामाची व कायमची त्याज्य ठरली आहे. आता त्याच्या विद्याभ्यासंगाकडे वळू गुरूपदेश झाल्यावर ब्रह्मानदानें आपला ‘आत्मप्रकाश’ ग्रंथ मुद्दाम त्याच्यासाठीं तयार करून त्यास वेदान्तशास्त्राचे तात्त्विक ज्ञान उत्कृष्ट रीतीने करून दिले. त्यानतर त्याने स्वतःच अभ्यास करून अनेक शास्त्रात व कलात पारगतता मिळविली असली पाहिजे. आपला पिता कवि् व ग्रथकार आहे. तेव्हा आपणही तसेंच झाले पाहिजे अशी महत्त्वाकाक्षा त्यास झाली असावी हे अगदीं साहजिक आहे. रुद्रट म्हणतो[७]:—

त्रितयमिदं व्याप्रियते शक्तिर्व्युत्पत्तिरभ्यासः ॥

व पुढें सागतो[८]:—

छदोव्याकरणकलालोकस्थितिपदपदार्थविज्ञानात् ।
युक्तायुक्तविवेको व्युत्पत्तिरिय समासेन ॥

अशी व्युत्पत्तीची त्यानें परिस्फुटता केली आहे. तर नाट्यशास्त्र-काराचे मते[९]—

६ आ. प्र. १३, ६२

७ श्रीरुद्रटप्रणीत काव्यालकारः १, १४ पृ. ६

८ श्रीरुद्रटप्रणीत काव्यालंकारः १, १८, पृ. ६

९ भ. ना. १९, १२२.

न तज्ज्ञान न तच्छिल्प न सा विद्या न सा कला।
न तत्कर्म न योगोऽसौ नाटके यन्न दृश्यते ॥

या वरील गोष्टींपैकीं श्रीधरानें कोणकोणत्या संपादिल्या होत्या याचे काहीं गमक मिळते का तें पाहू

श्रीधराने संतमाला, ऋषिमाला, नृपतिमाला, तीर्थमाला अशा अनेक मालाबरोबर एक ग्रंथमालाही गुंफिली आहे. तिजवरून त्यानें पाहिलेल्या, वाचलेल्या व अभ्यासिलेल्या अनेक ग्रंथाची माहिती आपणास मिळते. ही समग्र ग्रंथमाला दुसऱ्या भागात पहावयास मिळेल. यातील काहीं प्रमुख ग्रंथांचा उल्लेख मात्र खालीं केला आहे:–

यात दोन प्रकार आहेत:—

( अ ) मुखोद्गत ( आ ) लेखन-पठन ज्ञान.

( अ ) मुखोद्गतः—

| | | |
|---|---|---|
| १ | अमरकोश | अमरसिंह |
| २ | एकाक्षरकोश | — |
| ३ | अष्टकोश | — |
| ४ | निघण्टु | वैदिक शब्दाची यादी |
| ५ | सिद्धान्तकौमुदी | भट्टोजीदीक्षित |
| ६ | अष्टव्याकरणप्रक्रिया | — |
| ७ | तर्कभाषा | केशवमिश्र |
| ८ | षट्शास्त्रे | न्याय, वेदान्त, व्याकरण, मीमांसा इ. |
| ९ | सोळा संस्कार | गर्भाधान, जातकर्म, उपनयन, विवाहापासून तों अंत्यविधिपर्यंत. |
| १० | याज्ञिक | — |
| ११ | षडंगासहित चतुर्वेद | शिक्षा, कल्प व्याकरण, छंद आणि ज्योतिष; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद. |

(आ) लेखन–पठन–ज्ञानः—

( १ ) पंचमहाकाव्यें, कादबरी, हनुमन्नाटक.

( २ ) देशभाषा ग्रथ ( सर्व ).

( ३ ) कलाः—( अ )–रागरत्नाकर, सगीतरत्नाकर.

( ब ) शिल्प.

( ४ ) शास्त्रेः—( अ ) वेदान्त, वेदान्तसार, पचदशी, आचार्यभाष्य. उपदेशसाहस्त्री, शारीरभाष्य, कठवल्लि, भृगुवल्लि, आत्मबोध, योगवासिष्ठ, महावाक्यनिर्णयसग्रह, निगमसार, अपरोक्षानुभव, इ.

( ब ) धर्मशास्त्रः—स्मृतिकौस्तुभ, निर्णयसिन्धु, विज्ञानेश्वर, ( मिताक्षरा ) लघु व महापाराशर.

( क ) ज्योतिषः—सिद्धान्ताशिरोमणि,लीलावती

( ड ) योगः—पवनविजय, हटप्रदीपिका, योगसिद्धान्त.

( इ ) छन्दः शास्त्रः—छन्दोरत्नाकर.

( फ ) नीतिशास्त्र, रतिशास्त्र, सामुद्रिक वगैरे

( ग ) आयुर्वेद, धनुर्वेद.

( ५ ) पुराणेंः—अठरा पुराणे, भारत, भागवत, रामायण, शिवरामायण, जैमिनीभारत, अध्यात्मरामायण, इ.

ही मालिका पाहिली म्हणजे सामान्य माणसाची छाती दडपून जाईल हे खरें. पण वरतीं दिलेल्या व्युत्पत्तिच्या कसोटीस ही श्रीधराची

तयारी तंतोतत उतरते. दशग्रथी ब्राह्मण अद्यापिही थोडे तरी आढळतात. जिल्हा कुलाबा, तालुके अलिबाग, येथील नागाव या गावीं वे. मू. भातखडे व त्याचे गुरु वे मू. केळकर भटजी हे दशग्रथी ब्राह्मण आज विद्यमान आहेत.

या यादीचे निरीक्षण केल्यास मुखोद्गत केलेल्या ग्रंथाचे अध्ययन श्रीधराने नाझरे येथेच पूर्ण केले असावे. पुढ पढरीस आल्यावर पच-महाकाव्यें, देशभाषा ग्रथ याचा अभ्यास त्याने केला असावा, आणि शके १६०४ मध्ये आपल्या पित्याजवळ ‘आत्मप्रकाश’ हा ग्रथ अभ्यासिल्यावर वेदान्तशास्त्रावरील अनेक ग्रथ त्यानें हाताळले असावे. इतर शास्त्रे, पुराणे व कला यावरील ग्रथाचे त्याचें वाचन यानतर झालें असावें असे या प्रचड विद्याभ्यासगाच्या क्रमाबद्दल अनुमान करता येते.

३. विषयाच्या दृष्टीने पाहिल्यास श्रीधराने अध्ययनात वेदान्त-शास्त्रास अग्रस्थान दिलेलें दिसतें; आणि त्यातही आचार्यांच्या ग्रथावर त्याचा विशेष भर होता, हेही स्पष्ट होते. पण इतर सस्कृत ग्रथाकडे दृष्टि-क्षेप केल्यास त्यात जरी पचमहाकाव्ये आपणास दिसून येतात तरी शाकु-तल, विक्रमोर्वशीय, उत्तररामचरित्र, मालतीमाधव, मृच्छकटीक व मुद्राराक्षस अशा अभिजात नाट्यकृतींचा उल्लेख त्यात नाही नाहीं म्हणायला एकट्या हनुमन्नाटकाचा तेवढा त्यात समावेश झालेला आहे. यावरून ललितवाङ्मयापेक्षा आध्यात्मिक, धार्मिक व शास्त्रीय ग्रथाकडे श्रीधराचा ओढा विशेष होता असें दिसतें. पण शास्त्रातही इतर अनेक शास्त्राचा समावेश झाला असता कवीला विशेष महत्त्वाचे जे साहित्यशास्त्र त्याचा उल्लेख या यादींत कसा आलेला नाहीं याचे आश्चर्य वाटते ! पण त्याने जरी या विषयाचा अभ्यास स्वतत्र रीतीने केला नसला तरी त्याची

सामान्य माहिती त्याने मिळविली असली पाहिजे हें त्याने आपल्या अनेक ग्रंथात योजलेल्या अनेक शब्दार्थालकारावरून सिद्ध होते.

ग्रथमालेप्रमाणे श्रीधराने सतमालाही रचली आहे. त्यात गौडपादाचार्य, गोविदपादाचार्य, शकराचार्य, आनन्दगिरि, पुष्पदन्त, जह्लण, मधुसूदन व जयदेव वगैरे ग्रथकाराचा उल्लेख केला आहे. पण त्यात दण्डी, भामह, रुद्रट, मम्मट, जगन्नाथपण्डित, राजशेखर व विश्वनाथ वगैरे साहित्यशास्त्रकारापैकी एकाचाही नामनिर्देश त्याने केलेला नाहीं. अर्थात्, ते सतमालेंत बसण्यासारखे नसल्यामुळे त्याचीं नांवें श्रीधराने त्यात समाविष्ट केलीं नसतील हें जरी उघड दिसतें, तरी पण साहित्यशास्त्र हे ‘ चतुर्वर्गफलप्राप्ति ’ करून देणारे एक शास्त्र आहे, असे मत विश्वनाथाने प्रतिपादिले आहेच.[१०] एकदरीत, श्रीधराचा ओढा या शास्त्राकडे फारसा नव्हता असें म्हणणे भाग पडतें. एवढी गोष्ट जर वगळली तर श्रीधराचा विद्याव्यासग इतका विस्तृत व जबर होता कीं, त्यास विद्वानाच्या किवा पडिताच्या पक्तींत बसविण्यास कोणी अनमान करीलसें वाटत नाहीं. मागें मोरोपंत हे केवळ पुराणिक होते कीं, महापंडित होते यासबधीं वादाचीं रणें माजली होतीं.[११] पण पुढे पागारकरानीं याबद्दल सोदाहरण चर्चा करून मोरोपंत पडित होते हें उत्तम रीतीनें सिद्ध केलें [१२] श्रीधराबद्दल असा वाद तर झाला नाहींच, पण वामन, रघुनाथ व मोरोपत या पडिताबरोबर त्याचा नामनिर्देशही आज-

१० विश्वनाथ. साहित्य. द. प्र. प. २.

११ चिपळूणकर. निबध. अ. ४७

१२ पागारकर. मोरोपत च. आणि का. प्र. ३, पृ. २२–४९

पर्यंत कोणी केलेला आढळला नाहीं. तो एक उत्तम गोष्टीवेल्हाळ एवढाच त्याचा गौरव झालेला आहे. नाहीं म्हणावयास वा. कृ. भावे यानीं मात्र "त्याचे शिक्षण घरच्या घरींच पण विद्वानात गणना होण्याजोगे झाले होतें" असे म्हटले आहे.[१३] विनायकराव भावे पण असेच म्हणतात.[१४] असो.

४. अनेक ग्रथमाला व सतमाला रचून त्यात अनेक ग्रथाचीं व ग्रंथकाराचीं नुसतीं नावे गुफल्याने कोणी कवि, विद्वान अगर पडित या पदवीस पात्र होतो असे नाहीं. तर त्याच्या बहुश्रुततेची वा विद्वत्तेची छाप याच्या ग्रथावर कितपत पडली आहे, व त्याने आपल्या ज्ञानाचा उपयोग प्रसंगानुरूप किती चातुर्याने केला आहे यावरून त्याची पात्रता ठरते. तेव्हा या दृष्टीने आपण श्रीधराच्या ग्रथाकडे पाहिलें तर आपणास काय माहिती मिळते ते पाहू याः—

हरिविजयात भागवत व हरिवश याशिवाय ब्रह्माडपुराणातील क्षीराब्धिवर्णन, नारदपुराणातील महाबळकथा, पद्मपुराणातील शाचि वगैरेच्या तीन कथा, जैमिनीभारतातील ब्राह्मणप्रेत उठविल्याची कथा अशा कथा आल्या आहेत. वसिष्ठकृत योगवासिष्ठाचा उल्लेख आला असून कृष्णाचे सर्वव्यापकत्व सागताना अनेक दृष्टातात " वाचारभण विकारो नामधेयम् मृत्तिकेत्येव सत्यम् ॥" या औपनिषदिक दृष्टाताचा उपयोग केलेला आहे.[१५] रासक्रीडेत गोपीगर्वहरणार्थ कृष्ण गुप्त झाला त्यावेळीं सांख्यतत्त्वज्ञान, चार वेद, षट्शास्त्रे, अठरा पुराणे, अठरा उपपुराणे, चौदा विद्या, चौसष्ट कला, अष्टागयोग, हठयोग वगैरेना परमात्मा सापडला नाहीं, तर

---

१३ भावे. पे. का. म. प्र. ८, पृ. ११३, १४ भावे. म. सा. पृ. ३३७
१५ ह. वि. ४, ३५

त्याना काय सापडणार असे म्हटले आहे.[१६] पुढें अस्ति, भाति, प्रियरूप, या त्रिपुटी पलीकडे ब्रह्म असते असें प्रतिपादिले आहे.[१७] गोपीस केलेल्या उद्धवाच्या उपदेशात भरपूर वेदान्त आहे. कृष्णस्त्रियापैकीं प्रत्येकजण आपणच पतीची लाडकी आहों हे सिद्ध करण्यास्तव त्यानीं केलेल्या पूर्व व उत्तरपक्षात पाडित्याची मौज दृष्टीस पडते.[१८] पण याच्या तत्त्वज्ञानाचे पूर्ण स्वरूप आपणास सादीपनीनें कृष्णास केलेल्या उपदेशात पहावयास मिळते. यात पिडब्रह्माडरचना, जिवशिव, ' द्वा सुपर्णा ' ही श्रुति इत्यादि पाडित्य मोठे डौलदार झाले आहे. यात श्रीधराचे अध्यात्मशास्त्राचे ज्ञान किती गाढ आहे व तें प्रतिपादन करण्याची त्याची शैली किती सुबोध आहे याची साक्ष पटते. प्रतिपादनात चद्रचकोरन्याय, चातकजलदन्याय, धेनुवत्सन्याय, भृगकीटकन्याय, बिंबप्रतिबिंबन्याय, वगैरेच्या उल्लेखाने त्यास भारदस्तपणा आला आहे.

रामविजयः—यात एकोणीस रामायणाचा श्रीधराने उल्लेख केला आहे, तर हनुमन्नाटक, वाल्मिकीरामायण, आनन्दरामायण यातील बराच कथाभाग त्याने वैचित्र्यार्थ घेतला आहे. या अनेक रामायणाची नुसती नावें सुद्धा पुष्कळ विद्वानास अज्ञात असतील ! यात अग्निपुराणातील अहिरावण महिरावणादि कथा आल्या आहेत. वेदान्त, षट्दर्शने, योग याचें जागोजाग केलेले प्रतिपादन त्या त्या विषयातील त्याचें प्राविण्य सहज सिद्ध करते.

पाडवप्रतापातील अध्याय सतरा व सव्वीस मध्यें अनुक्रमे

---

१६ ह. वि. १७, ११७–१२३ १७ ह. वि. २१
१८ ह. वि. २७

श्रीकृष्णाचे परब्रह्मस्वरूप व अष्टावक्रबंदीसंवाद, त्याचप्रमाणे अध्याय सत्तावीस मधील अद्वैतानिरूपण व सत्तेचाळीस मधील चार्वाक-मीमांसक-कौलिक या मताचे वेदान्ताशीं केलेले तुलनात्मक विवेचन हीं त्याची बहुश्रुतता व विद्वत्ता दर्शवितात. यातही जैमिनीभारत व जैमिनिअश्वमेध यातील कथाभाग आला आहेच. शिवलीलामृतातही स्कंदपुराणातील व शिवपुराणातील कथा आल्या आहेत. जैमिनिअश्वमेधात भविष्यपुराण, अग्निपुराण, पद्मपुराण, ब्रह्मांडपुराण, शाक्तिपुराण व स्कन्दपुराण यातील कथा श्रीधराने वर्णिल्या आहेत. येणेप्रमाणे त्याचे ग्रंथ त्याच्या अफाट बहुश्रुततेची साक्ष देतात.

आता इतर शास्त्रे व कला यासंबधींचे श्रीधराचे उल्लेख पाहूः—

( १ ) ज्योतिषशास्त्रः—गर्गाचार्यांनीं श्रीकृष्णाचे जातक केले[१९] महाबळ ब्राह्मणाने मूळ नक्षत्राचें अरिष्ट सांगितले.[२०] षष्ठी, नवमी, भद्रा, व्यतिपात, वैधृति व कल्याणी हे कुयोग होत.[२१] कृष्णदानास मुहूर्त[२२] " पुष्यार्क योग उत्तम बहुत " ॥ असे हे उल्लेख आहेत.

( २ ) सामुद्रिक :—-कृष्णाचीं पदचिन्हे व त्याचीं फळे. ( १ ) ऊर्ध्वरेखा—साधकास ऊर्ध्वमार्ग दाखविते. (२) अंकुश—विद्यामदनिवारणार्थ. ( ३ ) पद्म—पद्मासेवा करते म्हणून पायीं पद्म ( ४ ) अहंकार पर्वतावर वज्रधारण ( ५ ) जडजीवाचे पापच्छेदनार्थ चक्र ( ६ ) भक्त तारावया भक्तिध्वज. पण यात शास्त्रापेक्षा कविकल्पनेचा भाग अधिक दिसतो

१९ ह. वि. ४,४४
२० ह. वि. ४,१३०
२१ ह. वि. १८, १–३
२२ ह. वि. ३०, १०५



४

( ३ ) वास्तु व शिल्पकला :—क्षीरसमुद्रातील सभामडपवर्णन व मयसभावर्णन यात या कलाचें त्याचे ज्ञान दिसून येतें [२३]

( ४ ) वैद्यक :––नवज्वरितास दुधाने तात्काळ मरण येते. [२४]

उद्धव वैद्य परम सत्यज । अर्धमात्रा दिधली रसराज ।। [२५]
सशय रोग निरसोन तेजःपुंज । सर्व गोपिका त्या केल्या ।।

बचनाग खाण्यास गोड पण मृत्युदायक. [२६] अर्थात् हे ज्ञान अगदीं सामान्य प्रकारचे आहे.

( ५ ) शालिहोत्रः—पुढे नऊ खडातून छप्पन्न देशातून आणलेले चित्रविचित्र रगाचे व लक्षणाचे अश्व. [२७]

( ६ ) नृत्य,गायन,वादनकलाः—ग्रथारभीं गणपतीचे नृत्यवर्णन [२८]

धिमकिटी धिमकिटी कथा विचित्र । राग गौलता सगीत शास्त्र ।।
नृत्यकळा देखोनि देवाचे नेत्र । पातीं हालवू विसरले ।।

जाबवती विवाहानंतर नारदाचा गायनगर्व हरण केल्याचे वर्णन आहे. चिमण्या अस्वलानीं वीणा हातीं घेऊन स्वराचा थाट बसविला, मग त्याने साही राग, छत्तीस भार्या, चौसष्ट मूर्च्छना दाखवून अनेक उपराग गाऊन दाखविले. गीतप्रबधाबरोबर नृत्यकलाही दाखविली. कल्याण, गौडी, श्रीराग, वसत, पावक, पञ्चसुरग, नीलाबर हे राग कृष्णाने मुरलींत वाजविले. [२९]

---

२३ ह वि २, १७, ३४, १२२
२४ ह. वि. ९, ७
२५ ह. वि. २१, २६७
२६ ह. वि. १८, ३०
२७ ह. वि. २२, ४६
२८ ह. वि. १, १३
२९ ह. वि. १०, ११७

येणेंप्रमाणें त्याच्या हरिविजय ग्रथात उल्लेख सापडतात. त्यावरून त्या त्या शास्त्राची व कलाची त्यास माहिती होती असे दिसतें. पण त्यातल्या त्यात सगीतकलेची त्याची माहिती विशेष सूक्ष्म दिसते. बाकीच्या शास्त्रातील माहिती सामान्य दर्जाची आहे. पण त्याची त्यास तोडओळख तरी खास होती असे म्हणण्यास हरकत दिसत नाही.

५. आता श्रीधराच्या ग्रथात सस्कृत ग्रथातील काही सादृश्ये मिळतात का पाहू :—

१ ) धरित्रीचे करूनि पत्र । कुधर कज्जल जलधि मषीपात्र ।
सुरद्रुमलेखणी विचित्र । करूनि लिहीत कंजकन्या ।। इ. शि. ली. १, २७

असितगिरिसम स्यात्कज्जल सिधुपात्रे ।
सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी ।
लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वकालम् ।
तदपि तव गुणानामीश पार न याति ।। महिम्न, ३२

२ ) अवचक स्त्री मुख्यप्रधान । होय मित्रामाजी चूडारत्न ।
सुखदुःखाची भागीण । सागातीण अतकाळी ।। पा. प्र. २५, १५१
गृहिणी सचिवः सखी मिथः ।। कालिदास. रघुवश.

३ ) सकळ विद्यामाजीं मुगुटमणी । अध्यात्मविद्या ज्ञान खाणी ।। पा. प्र.
अध्यात्मविद्या विद्यानाम् ।। गी. १०, ३२

४ ) जन्माधापुढें नेऊन । व्यर्थ काय रत्ने ठेवून ।
कीं उत्तम सुस्वर गायन । बधिरापुढे व्यर्थ केले ।। पा. प्र.
अधस्य दीपो बधिरस्य गीतम् । मूर्खस्य कि धर्मकथाप्रसंगः ।।

५ ) गंगेमाजी काष्ठे मिळालीं । ती एकवटोनिया विघडलीं ॥

शि ली.७,१२९

यथा काष्ठ च काष्ठ च ॥ इ.

६ ) परदारा नयनीं न पहाव्या शि. ली. ५,७२.

अनिर्वर्णनीय परकलत्र । शाकु. ॥

७ ) मायामय प्रपंचवृक्षीं । जीव शिव हे बैसले पक्षी

शिव साधक सर्वसाक्षी । जीव भक्षी विषयफळ ॥ शि.ली. ७,१३२

द्वा सुपर्णा सयुजा सखाया ।

८ ) धुळीनें भरले अंगवदन । हासती येकाकडे येक पाहोन ।

झळकती लघुलघु दशन ॥ ह. वि. ५, ५०

धुळीने भरले निजांग । मातेने उचलिला सवेग ॥ ह. वि. ५, ५४

पदरे पुसिली अंगींची धुळी । मातेचे वदन विलोकी वनमाळी ।

धन्य ते यशोदा वेल्हाळी । चुंबन देत हरीते ॥ ह. वि. ५, ५५

आलक्ष्य दंतमुकुलानानिमित्तहासैः ..

धन्यास्तदंगरजसा मलिनीभवन्ति शाकु. ७, १७

९ ) सबळ काष्ठे भ्रमर कोरी ।...। परी कमळास निर्धारीं ।

धका न लावी सर्वथा ॥ ह. वि. ७—२०

बन्धनानि किल सन्ति बहूनि । प्रेमरज्जुकृतबन्धनमाहुः ॥

दारुभेदनिपुणोपि षडांघ्रिः । निष्क्रियो भवति पंकजबद्धः ॥

१० ) सर्पाच्या माथा मणी दिसत । परि घेऊं जाता बहु अनर्थ ।

ह. वि २०, ७९

मणिना भूषितः सर्पः किमसौ न भयंकरः ॥

११ ) संग्रामाच्या गोष्टी ऐकिजे कानीं ॥

युध्दस्य वार्ता रम्या ॥ ह. वि. २६.१३७.

१२ ) जरी मंडित दिसे उडुगणीं परि पतिहीन रजनी ते ॥ शि. ली. २,३६
नक्षत्रताराग्रहसंकुलापि ज्योतिष्मती चंद्रमसेव रात्रिः ॥

१३ ) योगभ्रष्ट कर्मभूमीस पावती । इ. शि. ली २, ४०
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभि जायते ॥ गीता. ६, ४१

याशिवाय अनेक संस्कृत सुभाषितांचीं मराठी भाषांतरे श्रीधराच्या काव्यांत जागोजाग आढळतात. पण एकंदरीने पाहतां काव्यनाटकादि ग्रंथापेक्षा संस्कृतांतील आध्यात्मिक ग्रंथांचीच छाप त्याच्या काव्यावर अधिक ठळकपणे पडलेली दिसते.

६. यानंतर मराठी वाङ्मयाचा त्याचा अभ्यास किती दिसून येतो ते पाहूं. श्रीधराने नामावलि, संतमालिका, संतमालाश्लोक, व संतप्रताप अशीं स्फुट प्रकरणे लिहिली आहेत. तीं पुढील भागांत सविस्तर दिलेलीं आढळतीलच. त्यांत पुढील महाराष्ट्रीय संतकवींचा उल्लेख त्यानें केलेला आहेः मुकुंदराज, निवृत्ती वगैरे चार भावंडे, चांगदेव, नामदेव, विसोबा खेचर, गोरा कुंभार, चोभा, भानुदास, एकनाथ, जनार्दन, नृसिंहसरस्वती, रामाजनार्दन, कृष्णदास मुद्गल, मुक्तेश्वर, वामन, रामदास, तुकाराम, मृत्युंजय, मैराळ, संतीदास, केशवस्वामी, वडवानलसिद्ध नागेश, बहिरा-जातवेद, ब्रिऱ्हाडसिद्ध भोजलिंग, लीलाविश्वंभर, जयरामस्वामी, रमावल्लभदास, संतबा लतीफ, मालो नरहरि, विश्वनाथ, शिवराम, निरंजन ( पंढरपूरकर ), रंगनाथ, कान्हो पाठक, शांतलिंग, अशा पस्तीस चाळीस संतकवींचा नामावलींत उल्लेख श्रीधराने केलेला आहे. त्यापैकीं संतमाला श्लोकांत अनेकांच्या ग्रंथांचा व संतप्रतापांत त्यांच्या अनेक चमत्कारांचा त्या त्या वैशिष्ट्यासह त्याने नामनिर्देश केला आहे. तेव्हां या सर्वांच्या चरित्राचा, व त्यांच्या ग्रंथांचा त्यास चांगला परिचय होता यांत संशय

दिसत नाहीं. मात्र त्याने आपल्या प्रसिद्ध ग्रथात फक्त ज्ञानेश्वर, एकनाथ व मुक्तेश्वर याचाच मोठ्या भक्तीने व आदराने उल्लेख करून त्याना वदन केले आहे. आता त्याच्या ग्रथाकडे पाहिले असता, त्यात वरील तिघाचा व वामन पडित आणि तुकाराम याच्या ग्रथाचा पुष्कळच प्रभाव पडलेला दिसतो. त्यातल्या त्यांत मुक्तेश्वर त्याचा फार आवडता असून त्याच्या महाभारताचे प्रतिबिंब श्रीधराच्या पांडवप्रतापात पडले असल्याचे चागलेच प्रत्ययास येतें. यावरून श्रीधराने आपल्या ग्रथमालावर्णनात " देशभाषा ग्रथ " सर्व वाचले असल्याचे जे सागितलें तें यथार्थ दिसतें. कारण श्रीधराच्या कालापर्यंत होऊन गेलेल्या बहुतेक सर्व सतकवींचा परामर्श त्याने घेतलेला आहे. आता काहीं प्रसिद्ध मराठी कवींच्या व श्रीधराच्या काव्यातील काहीं सदृश स्थळाकडे अगुलीनिर्देश करू:—

१ ) ज्ञानेश्वरः—श्रीधराचे पुढील ओंव्यात ज्ञानेश्वरींतील त्या त्या कल्पनाचे व क्वचित् शब्दाचेंही सादृश्य ज्ञानेश्वरीच्या वाचकास सहज दिसेल.

अ ) कीं आधळे हातरू माजलें । कीं सिहाने प्रतिबिंब देखिले
कूपामाजीं व्यर्थ मेले । जीवा झालें तैसेची ॥ ह. वि. ७, २३४

आ ) सबळ काष्ठे भ्रमर कोरी । पिष्ठ करी क्षणाभीतरीं ।
परी कमळास निर्धारी । धका न लावी सर्वथा ॥ ह. वि. ७, २०

इ ) दर्दुर कमळाजवळी बैसोन । सुवास नेणोनि चिखली लोळे ।
ह. वि. ३०, ९३

कमल सुवास सुदर । परि काय घेऊ जाणे दर्दुर ।। पा.प्र. ३९, ५२

ई ) जैसें देवाचे शिखर पाहून । पोवळीं भोवतीं रचियेली । ह.वि. ३०, १३०

वसतें मोडूनिया सदन । माडव पुढें घातला ॥ ह. वि. ३०, १३१

उ ) निःशेष पुशिला ठाव । निवांतकवचदैत्याचा । पा. प्र. ३१ ७

ऊ ) पाडव प्रताप—वार्धक्य वर्णन. ५४

ऋ ) कीं विषाचे शीतळपण । की वोडबरीयाचे भूषण ।
कीं गधर्वनगरीचे सैन्य । तैसे जाण स्वर्गसुख ॥ ह. वि. १३, २६

ॠ ) गुरुमाहत्म्य वर्णन. ह. वि. २०, ४७–६४

ऌ ) योगमाया वर्णन. ह. वि १, ३७–४३

ॡ ) जैसा धरूनि शिशूचा हात । अक्षरे लिहवी पडित ॥ शि.ली. १, ३३

२ ) तुकारामाचे कल्पनासादृश्य पुढील ओव्यात आढळेलः—

अ ) की अबळा कन्या परदेशीं दूरी । परी तिचे मन सदा माहेरीं ॥
ह. वि. १७, १०

आ ) कामधेनु आली मदिरीं । ते मूर्खे पिटून घातली बाहेरी
ह. वि. ३०,२०.

इ ) वृश्चिक निघता सदनीं । पादरक्षेने ताडिजे ॥ पा. प्र ३३, ४५

ई ) जाखाई जोखाई मायराणी । मारको मेसको यक्षिणी ॥
ह. वि १३, ६७

३ ) वामनः—

अ ) भलत्या मिसे घडो शिवस्मरण । ..शुष्क तृणपर्वत अद्भुत ॥
नेणता बाळक अकस्मात । अग्निस्फुलिग टाकित ।
परी भस्म यथार्थ करी कीं ॥ शि. ली. २, १–४
न कळता पद अग्निवरी पडे न करि दाह असें न कधीं घडे ॥

आ ) दाने शोभे सदा हस्त । ककण मुद्रिकाभार समस्त ।
श्रवणीं कुडलिका यथार्थ ॥ श्रुतेचिकी इ. शि. ली. ७, १९३.

इ ) न कळोनि निराळाचा अत । शक्ति ऐसें द्विजक्रमित । ह.वि. २, ७
आकाश अत न कळो निति अतरिक्षीं ॥ इ.

४ ) रघुनाथ पंडितः—

कनकवृक्ष धोत्र्यास म्हणती । पा. प्र. २९, १९८
धत्तूर हा कनक नाम सदा धरीतो ॥

५ ) मुक्तेश्वरः—पांडव प्रतापात तर श्रीधराने मुक्तेश्वराचे पुष्कळच अनुकरण केले आहे. नळराजवर्णन अ. २५, १–५ पुढे दमयतीचा विरह—

अर्धवस्त्र छेदोनि निर्धारीं । नळ तेथूनि निघाला । पा. प्र २५, १६२

अहा पुण्यश्लोका नलराया । मी मुक्तकेशीं झाडीन तुझे पाया ॥ इ.
पा. प्र. २५, १७२

येथे केवळ नमुन्याकरिता म्हणून श्रीधराच्या बहुश्रुततेचें दिग्दर्शन केलें आहे. पण आतापर्यंत जें सोदाहरण व साधार विवेचन वर केले आहे त्यावरून श्रीधराची गणना जाड्या विद्वानाच्या वा पंडिताच्या श्रेणींत करण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. श्रीधरपुत्र दत्तात्रय त्याचा उल्लेख गायक पंडित, वैदिक, दीक्षित, असा एका आरतींत करतो, तर दुसरा पुत्र मनोहर म्हणतो " तो सकळ पुराणाचे माहेर, सर्व ठाईचे शास्त्राधार ॥". श्रीधराचे ग्रंथ अगदीं साधे, सरळ, सोपे असा समज आजपर्यंत दृढ झालेला असल्यामुळे त्याच्या विद्वत्तेची व पांडित्याची छाननी करण्याकडे कोणाचेच लक्ष वेधलें गेले नव्हते. पण आता या गोष्टीवर चांगलाच प्रकाश पडला असल्यामुळें त्याजविषयीं वाचकाचे मनात आदर उत्पन्न होईल यात शंका वाटत नाहीं. या ठिकाणीं ही सावधगिरी ठेविली पाहिजे कीं, श्रीधरानें आपल्या अपात्रतेसंबधीं जे उद्‌गार काढले आहेत ते अगदीं औपचारिक आहेत, व त्यात विनयाचा अतिरेक झालेला आहे. हरि-विजयात तो म्हणतोः–" मी नाहीं वाचले संस्कृत, मला नाहीं कळत

विभक्तिज्ञान; तेव्हा हा ग्रंथ पंढरीनाथानेंच करविला."[३०] इ. इ. त्याने मुखोद्गत केलेल्या ज्या ग्रंथाची यादी मागे दिली आहे तिजवरून या विनयावर कोण विश्वास ठेवील? पण खरी मौज ही कीं, श्रीधरानें इकडे विनयाचा अतिरेक केला तर तिकडे त्याने आपल्या ग्रंथप्रशस्तीचाही अतिरेक केला आहे. डॉ. केतकर म्हणतात[३१]:—" आपण ईश्वरी कृपेमुळे काव्य करीत आहो अशी वृत्ति संतकवि दाखवीत. हा प्रयत्न आपल्यावरील परीक्षणे चुकविण्यासाठीं ते करीत असावेत असे वाटतें." पण डॉक्टर-साहेबाचा हा तर्क साधार दिसत नाहीं; कारण संतकाव्याचीं परीक्षणे तत्कालीं कोणीं केल्याचें आढळत नाहीं. मग तीं चुकविण्याची अवश्यकताच कोठे उरते? ईश्वरी प्रेरणेची भावना ही त्याच्या श्रद्धाळू वृत्तींतून उगम पावललेली दिसते. असो.

७. आता श्रीधराचें दप्तर तपासीत असताना निरनिराळ्या बाडात नकललेले जे ग्रंथ आढळले त्याची यादी पुढें दिली आहे:—

## संस्कृत ग्रंथ

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जयदेवकृत आर्यामुक्तामाला | ७ | जनकयोगीसंवाद पद्मपुराणातर्गत |
| २ | रामसहस्रनाम | ८ | स्फुट श्लोकसंग्रह |
| ३ | नारायणोपनिषद् | ९ | राघवाष्टकें |
| ४ | महाभारतातर्गत ब्रह्मबोधपंचीकरण | १० | गोविंदाष्टके |
| ५ | अनंतव्रतकथा | ११ | अंबिकास्तवन |
| ६ | अवधूतगीताश्लोक-टीकेसह. नागेशात्मज | १२ | चौदा विद्या व चौसष्ट कलांची पूर्ण यादी |

३० ह. वि. १७, २१२–१४, ३६, २१२–१३

३१ केतकर. महा–काव्यपरीक्षण प्र. ७, पृ. ४.

## मराठी ग्रंथ

१ पाळणे
२ लिंगयाचे अभग
३ गवळणी
४ गोसावीनंदनाचे अभग
५ दत्तात्रेय–गोरक्ष सवाद
६ मृत्युजयकृत स्वरूपसधान, लेखक–कृष्णा आराध्ये, ओव्या ३९३, शके १६४९
७ रागरागिण्याचे वर्णन. उदा. कानडा इ.
८ भीष्मप्रतिज्ञा–पूर्ण ( वामनाचे नावावर मोडणारी )
९ भक्तिमहिमा :–भक्ति न सेवी जन तो सुटेना। ससारबेडी सहसा तुटेना ।। ८ ।।
१० लघुगजेंद्रमोक्ष वामन
११ मनीषापचक–सिवरामस्वामी-कृत टीका
१२ पूतनाशोषण--आरणीचा शिपाई ( आनंदतनय )
१३ अमृतरायकृत दामाजी
१४ अमृतरायकृत सुदामचरित्र
१५ अमृतरायाचे कटिबध
१६ प्रियदासकृत प्रवृत्ति-निवृत्ति
१७ अमृतानुभवः–
" हा अमृतानुभव
प्रकट अर्थ ग्रथवैभव ।
करिता ज्ञानदेव ।
श्रीनिवृत्तिदासु ।।३०।।
शके बाराशे बाग ।
तै केला ग्रथ उभारा ।
परिसावया चतुरा ।
म्हणे निवृत्तिदासु " ।।३१।।
शालिवाहन शके, दुदुभी सवत्सरे, आषाढ, कृष्ण ८ सोमवारी ग्रथ समाप्त लिखिते.गोपाळ रघुनाथ, वाशिष्ठ गोत्र
१८ अर्जुनगीता से पानदेवकृत टीका
१९ केशवस्वामींचीं पदे ( जीर्ण बाडात )
२० द्रौपदीस्वयवर
२१ मध्वमुनीश्वराचीं पदें
२२ रामदासाचे अभग
२३ रामीरामदासाचे अभग
२४ ज्ञानदेवाचे अभग
२५ नामदेवाचे अभग

२६ येकाजनार्दनाचे अभग २७ मल्हारी बाहिरूची लावणी
२८ मुक्तेश्वराची महाभारत पर्वे (विराटपर्व).

यावरून श्रीधराचा सस्कृत व मराठी कविता लिहून घेण्याचा हव्यासही फार मोठा होता हें स्पष्ट दिसते व त्याच्या बहुश्रुततेची व पाडित्याची चागलीच साक्ष पटते. आता त्याच्या गृहस्थाश्रमाची माहिती आपण पुढील प्रकरणी पाहू

* * *

## — ३ —

# श्रीधराचा गृहस्थाश्रम व तीर्थयात्रा

न्यायार्जित धनस्तत्वज्ञाननिष्ठोऽतिथिप्रियः ।
शास्त्रवित्सत्यवादीच गृहस्थोऽपि विमुच्यते ॥

सुभाषितम्

दारा धन आणि पुत्र । यासीं आसक्त नसावें अणुमात्र ।।
अलिप्तपणे ससार करोनि असक्त असावे[1] ॥

( १ ) श्रीधराचे लग्न व घर, ( २ ) उत्तम कीर्तनकार, ( ३ ) श्रीधराचें स्वरूप व छायाचित्र, ( ४ ) श्रीधराचे पुत्र व दिनक्रम, ( ५ ) श्रीधराचा स्वभाव, ( ६ ) चुलत चुलते रगनाथस्वामी, ( ७ ) श्रीधर द्वैती होता काय ? ( ८ ) श्रीधराच्या तीर्थयात्रा.

१. श्रीधराने चौदाव्या वर्षीच सन्यास घेतला ही जी दुसरी दतकथा त्याजविषयीं आजपर्यंत प्रसृत झाली आहे, ती साफ खोटी असून तिचें निराकरण पुढें योग्यस्थळीं यावयाचेंच आहे. तूर्त तो गृहस्थाश्रमी होता व त्यास मुलेंबाळे झालीं होतीं हें सिद्ध करण्यास

१ श्रीधर. शि. ली. ७, १८३

पुढील पुरावा अगदीं निर्विवाद आहे. तो असा कीं शाहूमहाराजानीं रा. श. ५९ मध्ये दिलेल्या सनदेत " रा. दत्तोबा गोसावी व मनोहर गोसावी बिन श्रीधर गोसावी उपनाम घोडके " असा श्रीधराच्या दोन पुत्राचा उल्लेख केला आहे.

आता श्रीधराचें लग्न कधीं झाले, त्याची बायको कोणत्या कुळातील व कोठे रहाणारी होती वगैरे माहिती मिळण्याचे साधन मुळींच उपलब्ध नाहीं. श्रीधराने आपल्या मातापितराचा नामोल्लेख तरी केला आहे पण त्यानें आपल्या पत्नीचा नुसता नामनिर्देशही कोठें केलेला नाहीं. त्याचे पुत्र दत्तात्रय व मनोहर या दोघानीं जी काहीं ग्रथरचना केली आहे तींत त्यानीं आपल्या पित्यास मोठ्या प्रेमादरानें वदन केले आहे. पण श्रीधरानें जसा आपली माता ' सावित्री ' हिचा आपल्या पित्याच्याबरोबर उल्लेख केला आहे तसा त्यानीं आपल्या मातेचा उल्लेख केलेला नाही. पण पढरपूरच्या दप्तरात श्रीधराच्या दोन्ही पुत्रानीं आपसात केलेले वाटणीपत्र आहे त्यात तिचा ' पार्वतीबाई ' म्हणून उल्लेख केलेला आहे. हे फारकत शके १६५९ माघ व ॥ १० चे आहे. त्यात "या खेरीज पार्वतीबाई मातोश्रीपासी तोळा व मासा आहे तो तीमाघारा दो ठाई करून घ्यावा." असा मजकूर आहे. यावरून श्रीधराच्या बायकोचे नाव ' पार्वती ' होते हे सिद्ध होते.[२]

श्रीधराचें लग्न त्या कालास अनुसरून झाले असावे. निदान ब्रह्माजीपंत आपले मडळीसह नाझरे सोडून पढरपुरास आले त्याच्या पूर्वींच तें झालें असावें. हें कुटुब नाझरें सोडून पंढरपुरास कायमचे राहण्यास

२ भा. इ. स. म. वा. इ. वृत्त. श. १८३७, लेख १७६, पृ. ३०५, यातही या गोष्टीचा उल्लेख आला आहे, भावे. म सा. पृ. ३३६

का आलें असावें यासबधीं वरीलप्रमाणेंच कांहीं लेखी पुरावा नाहीं. पण मागें सुचविल्याप्रमाणे ब्रह्मानंदास पढरपूर क्षेत्राच्या वाढत्या कीर्तीचें मोठें आकर्षण वाटले असावे. कारण या कुटुंबातील सर्व पुरुष ज्ञानी असूनही भक्तिमार्गाकडे त्याचा ओढा विशेष होता. श्रीधराच्या विद्यमान वशजाचे घर हल्लीं पाडुरगाच्या देवालयाच्या डाव्या बाजूस जी पुरुषाची बारी आहे तिच्या लहानशा बोळात सुमारें पन्नास साठ पावलावर आहे. (घर न. २५२४.) ब्रह्माजीपत पढरपुरास आले त्यावेळीं त्यानीं विठ्ठला-समीप त्याच घरात वस्ती केली असावी. त्या कालाच्या मानानें त्या घराबद्दल मालकास अल्पस्वल्प भाडेंही ते देत असावेत. कदाचित् ब्रह्माजीपतासारख्या विद्वान्, तेजस्वी व सज्जन गृहस्थास त्याने तें विनामूल्यहि राहण्यास दिलें असल्याचा सभव आहे. पण ब्रह्माजीपतानतर सुमारे चोवीस वर्षांनीं तें श्रीधरानें खरेदी केल्याचा दाखला पढरपूरच्या दप्तरात आहे. हें खरेदीखत शके १६३९ मधील असून त्यात पुढील गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या आहेत:—'महजर खत छ १ माहे १४ सफर शके १६३९ हेमलंबी नाम सवत्सरे पौष व ॥ १ सोमवार रोजीं ( ता. ६ नोव्हेंबर स. १७१८ ) अप्पाजी विठ्ठल काटे यानीं सव्वादोनशें रुपयास रा. श्रीधर ब्रह्मानद देशपाडे यास विकत दिले.' खतावर रा. काटे याची सही असून त्यावर सुमारे पन्नास गृहस्थाच्या साक्षी आहेत. फरोक्त खत साध्या जुन्नरी कागदावर असून त्यावर स्टॅप, तिकिट, छाप, वगैरे काहींएक नाहीं. त्याकालीं याचे अस्तित्वही नव्हतें. या घराचे व विद्यमान वशजाचे छाया-चित्र पुढें दिलेले आढळेल. ही माहिती प्रथमच पुढे येत आहे.

२. या कुटुबाचा चरितार्थ नाझरें येथील देशपाडेपणाच्या वतनावरच मुख्यत्वे चालत असावा. श्रीधराचा उत्तम कीर्तनकार म्हणून फार लौकिक

होता. वेदान्ताचे गाढ ज्ञान, अनेक सस्कृत व प्राकृत ग्रंथांच्या अवलोकनाने त्यास आलेली बहुश्रुतता, व भारत, भागवत, रामायण व अष्टादश पुराणे यांतील अभिनव कथाचें वैचित्र्य व या सर्वास शास्त्रोक्त गायनकलेची जोड वगैरे गुणसमुच्चयाने त्याच्या कीर्तनाचा पूर्वरग व आख्यान हे भाग अतिशय रगत असतील, आणि त्याच्या कीर्तनावर भोळ्या भाविक भक्ताच्या तशाच विद्वान् शास्त्रीपंडिताच्या उड्या पडत असतील यात संशय नाहीं. ही आमची नुसती कल्पना नव्हे. त्याचा पुत्र दत्तात्रय एका आरतींत म्हणतो:—" तव कीर्तन जगजीवन भूषण श्रवणाचें "। याने आमच्या तर्कास चागलीच पुष्टी मिळते; शिवाय श्रीधरानें आपल्या कीर्तनास ' नित्य नव रंग भरो ' अशी वरयाचना ब्रह्मानदाजवळ केली आहे. श्रीधराने कीर्तनासंबधीं आपले विचार अनेक पदात प्रगट केले आहेत. तो म्हणतो, " कथागगा तीर्थाहून विशेष आहे. तिच्या नुसत्या श्रवणाने दोष भगतात. या गगेची श्रोता व वक्ता हीं दोन तीरें होत. हरिलीला हे तिचे पाणी. तेथे प्रेमाचा पूर व नामघोष हीच त्या पुराची गर्जना. मनोवृत्ती हीं जळचरे कथेत सावकाश क्रीडतात गगेचे पाणी डहुळते पण कथागगा सदा निर्मळ. गगेत बुडी मारता मरणाची भीति. पण कथाजीवनान बुडले असता मनुष्य तरतो आणि " उभा कीर्तनीं स्वामी श्रीधरवर ।। " या शब्दानीं ते पद त्यानें सपविले आहे. दुसऱ्या एका पदात तो म्हणतो :— " श्रोता सावधान नसेल तर निरूपण व्यर्थ आहे. कथेत झोप घेणे, गोष्टी करणे, लेंकरे आणणे वर्जावे, एक भावाने जो ऐकतो तोच भगवंतास प्रिय होतो. " ब्रह्मानद विश्वंभर । उभा कीर्तनीं स्वामी श्रीधरवर " ॥ असा याचा शेवट आहे .याचा मित्र सक्रोबा एका पत्रात म्हणतो :—"ज्याच्या कीर्तनें रग सुरगे । श्रवणेच ताप भगे । रमवी जो निजनामीं " ॥ इ यावरून त्याच्या

कीर्तनाची ख्याति किती होती हें सहज समजते. मानपुरी गोसावी तर त्याच्या कीर्तनाची फारच तारीफ करतोः—"कीर्तनकी तेरी ढाल लगी है। श्रवन करत हम रीझो ॥" त्याचा शिष्य एकनाथही "तुझ्या कीर्तनें संत सुखें निवाले ॥" अशी ग्वाही देतो. या सर्व पुराव्यावरून श्रीधर अलौकिक कीर्तनकार होता यात सशय नाहीं. मात्र कीर्तनाबद्दल तो बिदागी घेत नसेल. कारण कोणी काहीं देईल काय म्हणून श्रोत्याकडे आशाळभूतपणाने पहाणाऱ्या कथेकऱ्यावर त्यानें कडक टीका केली आहे. पण श्रीधरासारख्या निस्पृही सज्जनाचा योगक्षेम सुखानें चालावा या बुद्धीनें प्रेरित होणारे सधन श्रोते त्यास प्रपचात कशाचीही वाण पडू देत नसावे हे निश्चित.

३. ज्ञानदेव, तुकाराम, रामदास वगैरे सत कवींचीं छायाचित्रे प्रसिद्ध झालीं आहेत. पण श्रीधराच्या बाबतींत एवढे सुदैव नाहीं. हीच गोष्ट त्याच्या हस्ताक्षराच्या सबंधीं. विश्वसनीय असे त्याचे हस्ताक्षर आज उपलब्ध नाहीं. भावे यानीं शिवलीलामृताच्या अध्याय नऊ मधील त्याचे म्हणून जे छापले आहे, त्याबद्दलची त्याची त्यासच खात्री नाहीं.[३] शिवाय शिवलीलामृताचे मूळ हस्तलिखित श्रीधराच्या दप्तरात नसल्याचें पा. मा. चांदोरकर यानीं प्रसिद्ध केले आहे.[४] तेव्हा या दोन्ही बाबतींत निराशाच आहे. पण श्रीधराचा एक शिष्य सामराज याने त्यास जी पुष्पाजली वाहिली आहे, तिच्यातील श्रीधराच्या स्वरूपाचें शब्दचित्र इतकें सुंदर व ठसठशीत झालें आहे कीं त्यावरून एकाद्या कुशल चित्रकारानें श्रीधराचे छायाचित्र सहज काढावें! असा प्रयत्न

---

३ भावे. म. सा. पृ. ३३६ नतर.

४ भा. इ. सं. मं. पंचम संमेलन वृ. श. १८३९. लेख ७.पृ. २१–३०.



श्रीधरः श्रीधरः साक्षात् श्रीश्च यस्य मुखे स्थिता ॥

आमचे मित्र शं. ना. आळंदकर यानीं केला असून त्याची प्रतिमा दुसऱ्या बाजूस पहावयास मिळेल. या पद्यमालेचा गद्यसाराश असा :—

सामराजानें आपल्या श्रीधर गुरूचे वर्णन नम्रभावाने चरणापासून मस्तकापर्यंत केलें आहे. तो म्हणतो—

" श्रीधराचे पादतल रम्य असून जणूं काय ससारसागरांतून तारण्यास्तव ते श्रीधराच्या ( विष्णूच्या ) चरणाप्रमाणें ध्वजाकुशयुक्त झाले आहेत. दोन्ही पायांचे गुडघे व माड्या निर्मळ व प्रशस्त आहेत. श्रीधरानें पिवळा पितांबर धारण केला असून त्याचा कटिपश्चाद् भाग सुवर्णमेखलेनें वेष्टिलेला आहे. लोकाना उत्तम सुखाचा आश्रय देण्यास्तव रोमावलीने विराजित असणाऱ्या त्याच्या रम्य उदरानें जणूं काय तुदिलभाव धारण केला आहे. त्याचप्रमाणें त्या करुणानिधीचे वक्षःस्थलही विशाल असून तें भक्तप्रभायत्रित आहे. बाहु पुष्ट व वर्तुल असून हाताच्या बोटाचीं पेरें अगदी ठसठशीत आहेत. ग्रीवा उच्च असून ती फुलाच्या व सोन्यामोत्याच्या हारानीं मडित केलेली आहे. रक्त ओष्ठानीं युक्त अशा त्याच्या मुखकमलावर सदैव मधुर हास्य विलसत असते. सुदर व शुभ्र दतावलीने त्याचे सौष्ठव अधिकच खुलून दिसते. दीर्घ व सरळ नासिका, आकर्णान्त व विशाल नेत्र आणि कुंडलयुक्त व रुद कर्ण यायोगें त्याच्या चेहऱ्यास काहीं अवर्णनीय शोभा आली आहे, भालप्रदेश विशाल असून तो कस्तुरीतिलकाने अलकृत आहे. आणि मस्तकावर त्याने सुंदर फेटा धारण केला आहे. असा माझा हा श्रीधरगुरु साक्षात् श्रीधरच(विष्णूच) होय. ब्रह्मानंदाने नेहमीं विलसणारे त्याचे मुख इतकें प्रसन्न दिसतें कीं, केवळ त्याच्या दर्शनानेंच मनुष्यास सुखप्राप्ति व्हावी " इ. इ.

४. यातील काव्यगत अतिशयोक्ति जरी बाजूस ठेविली तरी श्रीधर

हा भव्य, देखणा व रुबाबदार देहयष्टीचा पुरुष होता यात संशय नाहीं.[५] त्याचप्रमाणे त्याची सांपत्तिक स्थितिही चांगली असावी असें खास वाटते. त्याचें घर स्वतःच्या मुलाबाळांनीं, अनेक शिष्यांनीं व भेटीस येणाऱ्या त्याच्या भक्तगणांनीं नित्य गजबजलेले असे. श्रीधरास दत्तात्रय, मनोहर व रंगनाथ असे तीन पुत्र झाले. श्रीधरानें आपल्या चुलत चुलत्याचें म्हणजे रंगनाथस्वामींचे नांव आपल्या तृतीय पुत्रास ठेविले, त्यावरून त्याचा जन्म रंगनाथाच्या समाधीनंतर म्हणजे शके १६०६ नंतर लौकरच सुमारे शके १६०७ मध्यें झाला असावा. त्याच्या वडील भावाचा जन्मकाल अनुक्रमे शके १६०३ व १६०५ असा संभवतो. त्यास आणखीं कांहीं अपत्यें झालीं होतीं कीं नाहीं हे समजण्यास मार्ग नाहीं. दत्तानंद व ब्रह्मानंदापासून चालत आलेली शुद्ध व धार्मिक आचरणाची शिस्त त्याच्या अंगवळणीं पडली होती. ज्ञानप्राप्ति झाल्यावर गृहस्थानें नित्य नैमित्तिक कर्मे आचरलींच पाहिजेत असे त्याचे मत होते. त्याप्रमाणें तो नित्य ब्राह्ममुहूर्तावर उठून भीमास्नान करून स्नानसंध्यादि षट्कर्मे करीत असेल. तो स्वतः देवपूजा करीत असे. त्याच्या वेळेपासूनचा मोठा शिशवी देव्हारा, परातीएवढाली प्रशस्त ताम्हणे व उपकरणे आणि पंचायतनातील ताम्हणभर पुष्कळ देव आजही पहावयास मिळतात. सुमारे प्रहर दीड प्रहर हा नित्यविधि झाल्यावर मध्यान्हापर्यंत अध्ययन, अध्यापन वा ग्रंथलेखन चालत असावे, व भोजनोत्तर थोडी वामकुक्षी करून पुनः पुराण, विद्वद्गोष्टी, देवदर्शन व रात्रौ भजन व कीर्तन असा त्याचा दिनक्रम असावा. पहाटेची काकडआरती व रात्रीची शेजारती त्याच्याशिवाय अडून रहात असे असे सांगणारे

---

५ श्रीधराचा मुलगा दत्तात्रय म्हणतो ‘ मदन मनोहर सुंदर हा ’–पद

काहीं गृहस्थ अद्यापिहि पंढरपुरात भेटतात.[६] त्याचे उपास्यदैवत पढरीचा विठोबा हे होतें. तरी पण पूजेत त्याने सर्व देवदेवताचा स्वीकार केला होता. अनेकात एकत्व पाहण्याचे त्याचे धोरण होतें. त्यानें शिव, राम, कृष्ण, गणेश, सूर्य, अंबिका, महालक्ष्मी यावर स्तोत्रे केलीं आहेत, व त्याचें तो नित्य पठण करीत असे. त्याचप्रमाणे त्याची ग्रंथरचनाही याच अभेद दृष्टीने झाली आहे. हें हरिविजय, रामविजय, शिवलीलामृत, पाडुरगमाहात्म्य, व्यकटेशमाहात्म्य व मल्लारिमाहात्म्य–या त्याच्या ग्रथाच्या नुसत्या नावावरूनच समजण्यासारखे आहे. एवढेच नव्हे तर हरिहरभेद मानणाराची त्याने चागलीच कानउघाडणी केली आहे. " अवघा एक ब्रह्मानद " हें त्याचें तत्त्व होते.

५. त्याने आपला पिता जो ब्रह्मानद त्याच्याच सद्‌गुणाचा आदर्श आपल्यापुढे ठेविला होता. तो जसा शान्त, दान्त, परोपकाररत, सत्यवादी, प्रेमळ, सर्वांभूतीं आत्मभाव, आश्रमवर्तनात निर्लेप, देही असून विदेही असा श्रीधरही असावा गुरुजनाविषयीं आदर, मित्राविषयीं सौहार्द, पितराविषयीं प्रेम, अपत्याविषयीं वत्सलता व दीनाविषयीं दया हे त्याचे ठळक गुण होते. या सद्‌गुणाचे प्रतिबिंब त्याच्या ग्रथात आपणास जागोजाग पहावयास सापडतें. सुपुत्राची प्रशंसा, कुपुत्राची निदा, पतिव्रताची स्तुति, कुलटाचा तिरस्कार त्याच्या ग्रंथातून आढळतो. कुपुत्र म्हणजे केवळ जंत होय असा त्यानें त्याचा धिक्कार केला आहे. तो स्वतः सुपुत्र होता. त्याने आपल्या पित्यास व मातेस ' देवो देवी 'च्या पदवीस बसविल्याचें मागे सागितलेच आहे. तेंच वळण, तीच शिस्त, श्रीधराच्या हयातीपर्यंतच चालू राहिली असें दिसते. कारण त्याच्या मागें

६ रामचद्र रगोबा देशपाडे, क्षेत्रोपाध्ये–नाझेरकर–ही दतकथा सागतात.

त्याचे मुलगे लौकरच विभक्त झाले. आपल्या महाराष्ट्रात ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास हे पाच सुप्रसिद्ध संतकवि होऊन गेले. त्यापैकीं एकट्या एकनाथानेच नेटका प्रपच करून परमार्थ साधून दाखविला. त्यानतर श्रीधरासही तो मान दिला पाहिजे असें आम्हास वाटते.

मजमाजीं रगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती ।।
त्यासि गृहाश्रमीं माझी प्राप्ती । सुखसपत्ती निजबोधे ।।

असे नाथानीं आपल्या भागवतात म्हटले आहे.[७] भागवतातील—

मय्यर्पितात्मा गृह एव तिष्ठन्नातिप्रसक्तः समुपैति शांतिम् ।।

या श्लोकार्धात तरी हाच अर्थ भरलेला आहे.[८] हे वर्णन श्रीधराच्या जीवनक्रमाशीं ततोतत जुळणारे आहे. श्रीधराच्या मुलाचीं लग्ने यथाकाल झाली असतील. पण त्याचे शरीरसबध कोणाशीं झाले होते हे समजण्यास काहीं मार्ग नाहीं. पण याच्या तीन मुलापैकीं तिसरा जो रगनाथ हा शके १६५५च्या पूर्वीच मयत झाला असावा. कारण रा. श ५९ मध्ये (शके १६५५) शाहू महाराजानी दिलेल्या सनदेत दत्तात्रय व मनोहर अशा दोघाचाच उल्लेख आहे. त्याचप्रमाणे मागे उल्लेखिलेल्या शके १६५९ च्या वाटणीपत्रातहि उर्वरित मातृधन त्या दोघामध्येच वाटून घेण्याचे ठरले होते त्यावरूनही हे स्पष्ट होते या रगनाथाचा मृत्यु श्रीधराच्यानतर घडला असल्यास त्याजवर पुत्रशोकाचा दुःखद प्रसग ओढवला नसेल. पण त्याची पत्नी पार्वतीबाई हिजवर मात्र पतिपुत्राच्या विरहाचे दुहेरी दुःख कोसळले दोन्ही मुलगे वेगळे झाल्यावर ती कोणाजवळ राहिली असावी हे समजत नाही हे खरे. तरी पण तिचे शेवटचे दिवस मोठ्या कष्टातच गेले असाव

७ ए.भा.,अ.१७. ४३, ४३०,पृ.४९१ ८ भा.स्क ,११,अ. १७, ४३

असे वाटते. श्रीधराची मातृभक्ति त्याच्या मुलात कशी उतरली नाही याचें आश्चर्य वाटते !

' वळख तू तुज टाकुनि मीपणा ।। प्रियसुधा उपदेश गिराप्रती ।

करुनि वामन तीस म्हणे सुती ।। " इत्यादीत दिसून येणारे वामन-पंडिताचे किंवा ' आता सांप्रदाय प्रकाशन करणे वल्लभे तुजसाठीं ' हें निरंजन माधवाचें स्त्रीदाक्षिण्य श्रीधरात दिसून येत नाहीं. कदाचित् भिडस्त स्वभावामुळे त्याने ते प्रगट केले नसेल तरी पण त्याच्यासारख्या प्रेमळ भक्तपतीच्या सहवासात राहिलेल्या पार्वतीस आपल्या पतिव्रता-धर्मानेच सद्गति मिळाली असेल असे वाटते

श्रीधराच्या अगदी जवळच्या आप्तात रंगनाथस्वामीचा उल्लेख करणे अवश्य आहे. याच्या संबधीं श्रीधरास अत्यंत पूज्यभाव होता हा वास्तविक श्रीधराचा चुलत चुलता होता.[१] परंतु र भा गोडबोले यानी आपल्या 'भरत खंडाच्या अर्वाचीन मराठी कोशात' जी वंशावळ दिली आहे तिजवरून तो श्रीधराचा 'चुलता' ठरतो ती अशीः—गोपाळ यास यादव, रंगनाथ व विठ्ठल असे तीन पुत्र होते त्यापैकीं पहिला यादव हाच ब्रह्माजीपंत असे त्यात म्हटले आहे या ठिकाणी बोपाजीबद्दल 'गोपाळ' जसे चुकीच आहे तसेच 'यादवराव' हाच ब्रह्माजीपंत हे पण चुकीचें आहे. तेव्हा मागे सांगितल्या-प्रमाणे रंगनाथ हा चुलता नसून चुलत चुलता होता; आणि ही वंशावळ साफ चुकीची आहे हे सिद्ध होते. पण श्रीधरानेच आपल्या संतमाळेतः— " श्रीरंग आम्हा चुलता गुरु हो ।। ३० ।।" असे म्हटल्यामुळे वरील शंकास्थानास आधार मिळाल्यासारखे वाटते. पण या ठिकाणीं मागे

१. भावे. म सा प्र. ३३७, आजगावकर. क. च ,भा. १, पृ. २०९-२२६, आपटे. क च., ख २, भा २., पृ ६५, यात प्रतिपादिलें आहे.

सांगितल्याप्रमाणे श्रीरंग जसा श्रीधराचा गुरु म्हणजे विद्यागुरु नव्हता[10] तसाच त्याचा तो चुलता म्हणजे सख्खा चुलताही नव्हता. तर नामावलींत[11] ज्याप्रमाणे त्यानें गोरक्ष, ज्ञानेश्वर, सोपानदेव, भानुदास, एकनाथ, मुक्तेश्वर इत्यादिकास केवळ आदरार्थी गुरु म्हणजे 'श्रेष्ठ' म्हटले आहे तसेंच येथें श्रीरंगास 'आदरार्थी गुरु' म्हटले आहे, आणि त्याच औपचारिक पद्धतीनें चुलत चुलता असें न म्हणता नुसता 'चुलता' असें म्हटलें आहे. व्यवहारातही आपण नाते सांगताना अगदीं काटेकोरपणें चुलत चुलता न म्हणता नुसता चुलता असे म्हणतों. यावरून रंगनाथ सख्खा चुलताही नव्हता व गुरूही नव्हता व अशाच औपचारिक पद्धतीमुळे भावे यास दत्तानंदास ब्रह्माजीपंत व ज्ञानानंद असे दोन पुत्र होते की काय अशी शंका वाटली.[12] ती स्थळें :—

( १ ) ज्ञानानंद ब्रह्मानंद । उभय बंधु जगप्रसिद्ध ।
त्यांचे चरणाब्जीं मिलिंद । श्रीधर स्वानंद अभंग ॥[13]

(२) ज्ञानाब्धीचा चंद्र तो पूर्ण साजे । ब्रह्मानंदा ज्येष्ठ बंधू विराजे ।
ज्ञानानंदा वर्णू मी जाण काय। बोले ज्याच्या कल्पना शांत होय ॥[14]

या ठिकाणीं वरच्याप्रमाणेच बंधु म्हणजे चुलत बंधु व 'ज्ञानानंद' म्हणजेच रंगनाथ असे असल्यामुळें विरोध रहात नाहीं. आता 'रंगनाथ' हाच ज्ञानानंद व ज्येष्ठ बंधु कसा हे दाखविलें म्हणजे झाले. ते असे: —

---

१० श्रीधर. च. आणि का., भा. १, पृ. १७ (५)

११ श्रीधर. च. आणि का., भा २, प्र. ११ नामावलि, १.

१२. भावे म सा. पृ. ३३८.

१३ म. मा. २,१५४.

१४ श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ११, संतमाला श्लोक, २८.

( १ ) 'संतमालिका' पद्य अकरामध्ये श्रीधर आपली परपरा ब्रह्मानंदापर्यंत देऊन म्हणतोः—

दत्तात्रय ब्रह्मानद । श्रीरंगमूर्ति ज्ञानानंद ॥११॥

( २ ) पुनः 'नामावलींत' पुढील उल्लेख आहे[१५]:—

दत्तानंदा ब्रह्मानंदा । निजानदा, ज्ञानानंदा ।
श्रीरगमूर्ति श्रीजयरामा ॥

( ३ ) एकनाथ, मृत्युजय, श्रीरंगमूर्ति ज्ञानानद.[१६]

तेव्हा दत्तानदाला दोन मुलगे नव्हते. एकटा ब्रह्माजीपतच होता. आणि श्रीधरानें (ज्ञानानद) रगनाथाचा उल्लेख चुलत बधु असा न करता औपचारिक रीत्या बधु असा केला आहे. रगनाथाचा काल शके १५३४ ते १६०६ असा आहे, म्हणजे, तो मरण समयीं बहात्तर वर्षांचा होता. श्रीधराची हयातही सत्तर एकाहत्तर वर्षांची होती. तेव्हा ब्रह्मानंदाचीही हयात बहात्तर वर्षांची धरण्यास हरकत नाही. त्याचा समाधि शक १६१५ असा आहे. तेव्हा त्याचा जन्मशक १५४३ हा येतो. म्हणजेच शके १५३४मध्ये जन्मलेला रगनाथ हा त्याच्यापेक्षा नऊ वर्षांनीं वडील म्हणजे ज्येष्ठ बधु ( चुलत अर्थात् ) ठरतो. येणेप्रमाणें आजपर्यंत अनिर्णित राहिलेल्या वरील दोन्ही शकाचा निर्णय येथे आज साधार झालेला आहे, हे वाचकाच्या सहज ध्यानात येईल. श्रीधराने सतमालादिकात रंगनाथाचें स्मरण तीनचार वेळा केले आहे, परतु संतमाला श्लोकातील त्याच्याबद्दलचे उल्लेख फारच मार्मिक व उद्बोधक आहेतः-तो म्हणतो. " रगनाथ ज्ञानाब्धीचा चंद्र होता. त्या ज्ञानानदाचे वर्णन मी काय करावें! त्याच्या नुसत्या

---

१५ श्रीधर च. आणि का , भा. २, प्र. ११, नामावलि, १.

१६ श्रीधर. च. आणि का , भा. २, प्र, ११, सतमालिका, १०–११.

भाषणानेच मनाचे सकल्प-विकल्प शात होतात. तो जसा काहीं आकाशींच्या गजढालीसारखा होता. त्याची अगाध कीर्ति जगभर पसरली होती तो आत्मबोधयुक्त होत्साता स्वलीलेने सचार करी. अशा रगनाथाला, हे मना ! एकवार तरी स्मर. तो कीर्तनात मेरूसारखा अचल आणि आपल्या प्रतापाने सूर्यासारखा तळपणारा होता. ” मला वाटते यात रगनाथाचीं सर्व वैशिष्ट्ये समाविष्ट झालीं आहेत

“ श्रीधर द्वैती होता. कारण त्याने ‘रामविजयात’ नामदेव, तुकाराम यास नमन केले नाहीं कारण ते शूद्र होते. यावरून तो विप्र व शूद्र यात भेद मानीत असे ” असा आरोप द. अ. आपटे यानी श्रीधरावर केला आहे.[१७] श्रीधराने आपल्या मोठ्या ग्रथात फक्त ज्ञानदेव, एकनाथ व मुक्तेश्वर याचाच उल्लेख केल्याचे मागे आलेंच आहे, इतराचा केलेला नाहीं. पण एवढ्यावरून वरील आरोप सिद्ध होत नाहीं. उलट त्याने जातिधर्म-निर्विशेष सर्व साधुसंताचा उल्लेख स्वतत्र रीतीने आपल्या अनेक ‘मालातून’ केला आहे. पहा :—

नामावली—सोपानेश्वर नामदेव जय ।। ७ ।।

सतमालिका—खेचर विसो नामदेव ।। ५ ।।

सतमाला श्लोक—ज्यासी सदा श्रीहरी खेळतो तो नामदेव ।। १५ ।।

सतप्रताप—नामदेवाने गाय उठविली ।। १४ ।।

आता तुकारामाचे उल्लेख पहा.—तुकोबाच्या वह्या पाण्यात राखल्या ( सतप्रताप, १७ ).

१७ आपटे क. च., ख २, भा २, पृ. ७१–७२

जो भक्तिज्ञानी परिपूर्ण झाला । तुका असे बोलति लोक त्याला
तुकावया कोण दुजा तयासी । तुका स्मरे का तरि ज्ञान राशी ।।[१८]

या मालाचा शेवट फारच उद्‍बोधक आहे:—

जपा सदा हे निजसंतमाला । पाहुनिया चिन्मयनाम डोळा ।
हें श्रीधरे गुंफुनिया स्वभावे । घाली गळा ते स्वसुखानुभावे ।।[१९]

या पुराव्यावरून वरील आक्षेप अगदीं फोल व अज्ञानमूलक आहे हें निराळें सागण्याचे प्रयोजन नाहीं. पण श्रीधराने नामदेव तुकारामाचेंच आदरानें स्मरण केले आहे असे नाहीं तर जातपात, धर्मपथ, स्त्रीपुरुष या भेदाकडे लक्ष न देता सर्वच सतास त्याने नमन केले आहे. त्यात ज्ञानदेव, सोपानदेवाबरोबर चागदेव, चोखामेळा, रोहिदास, गोराकुभार, सावता माळी, सेना न्हावी, सतबा लतीफ, कबीर, नरहरि सोनार, धाना जाठ, नरसी मेहता, मिराबाई, सुरदास, गोपाळ चैतन्य, गोरक्षनाथ, वगैरे अनेकाचा उल्लेख श्रीधराने मोठ्या प्रेमादराने केला आहे. यावरून त्याची सर्वत्र अभेद दृष्टि होती हे आपोआप सिद्ध होते.

आता श्रीधराच्या तीर्थयात्राकडे वळूं. सामान्य माणसासही शिक्षणपूर्तिसाठीं देशाटन श्रेयस्कर आहे. त्यायोगे त्याच्या ज्ञानात भर पडून शीलासही योग्य वळण लागतें, तर कवींना ते किती आवश्यक आहे हें सागावयास नकोच. आपल्याकडील मराठी कवींत ज्ञानदेव व नामदेव यानीं तीर्थयात्रा केल्याचे तीर्थावळीच्या अभगावरून समजतें. एकनाथाना तर आपल्या गुरूबरोबर तीर्थ प्रवास घडला होता. मुक्तेश्वराचा काशीवास

---

१८ श्रीधर च. आणि का., भा. २, प्र. ११, सतमाला, श्लोक, २२.
१९ श्रीधर च. आणि का., भा. २, प्र. ११, संतमाला, श्लोक ३९.

तर सुप्रसिद्धच आहे. निरजनमाधवाने केलेल्या अनेक तीर्थयात्राचे वैशिष्ट्यपूर्ण वर्णन त्याच्या साप्रदाय परिमळात पहावयास मिळते. मोरोपंताची काशियात्रा तर त्याच्या पत्रव्यवहारानें व ' गगापदवकिली ' व ' विष्णुपदवकिली ' या प्रकरणानीं अत्यत आकर्षक झाली आहे. परतु श्रीधराच्या बाबतींत असा लेखी पुरावा मुळींच उपलब्ध नाहीं. त्यामुळे त्यानें तीर्थयात्रा केल्या कीं नाहीं याविषयींच संशय प्रगट केला जातो. का ना. साने एका ठिकाणीं म्हणतातः–[20] "रामविजयातील तीर्थाचीं नांवे क्रमाने नाहींत प्रत्यक्ष पाहिल्याने क्रम आला असता " तर दुसऱ्या ठिकाणीं त्यानीं असा तर्क केला[21] आहे कीं, " ग्रथरचना झाल्यावर श्रीधराला तीर्थयात्रेस अवसर मिळाला नसावा " तेव्हा या शकेचे निरसन करणे क्रमप्राप्त झाले आहे. श्रीधराने नृपातिमाला, ऋषिमाला वगैरे अनेक मालाबरोबर एक तीर्थमालाही गुफली आहे. ती पुढील भागात ( नबर अकरा ) साकल्याने पहावयास मिळेलच येथे फक्त काहीं महत्त्वाच्या स्थळाचा उल्लेख केला आहे. या मालेचा आरभ " हरिद्वार बद्रिकेदार " या तीर्थानीं झाला असून सर्व तीर्थवर्णनास ४० पद्ये लागली आहेत. यात अनेक तीर्थाचा उल्लेख झाल्यावर तो सागतो कीं रामेश्वरादि बारा ज्योतिर्लिंगे केल्यावर, बदरीमार्गी पचप्रयाग केले. कार्तिकमासीं कृष्णा त्रिवेणी, माघस्नान मुख्य त्रिवेणीत झाले. तिन्ही गयाचे दर्शन केलें, धर्मस्तभाचे स्पर्शन व ब्रह्मयोनीचे अवलोकन केले. संध्यावटीं गायत्री ध्यान केले, सप्तपुऱ्या पाहिल्या, प्रभास, सोमनाथ, गडदामोदर ( द्वारकेत ) वगैरे अनेक क्षेत्रे पाहिलीं. या वर्णनावरून हिंदुस्थानातील महत्त्वाच्या सर्व

२० वि. ज्ञा. वि. १९१४, जाने. पृ. ६.

२१ भा. इ. सं. म. अहवाल, १९११, लेख १३. पृ. ११४.

तीर्थयात्रा त्याने केल्या होत्या हे सिद्ध होते. दुसऱ्या एका बाडाच्या पानावर ( पान २३१ ) पुढील उल्लेख आहे.:—

( १ ) " तव तीर निवासी अक्षय करी " ही भागीरथीस प्रार्थना आहे.

( २ ) " ब्रह्मानंदे हो श्रीधर इच्छित गोदातीर " ही गोदेस प्रार्थना.

( ३ ) " तव आप लक्षिता कृष्णे गेले त्रिविध ताप " कृष्णास्तवन.

( ४ ) " स्पर्श होताच तुझ्या जीवने सकळ पाप हरिले ।
ब्रह्मानंदे वो श्रीधर करी का तव तीर निवासी"॥ भीमास्तवन. इ.

या उताऱ्यावरून श्रीधराने तीर्थयात्रा केल्याच्या पुराव्यास पुष्टि मिळते. रामविजयात हिंदुस्थानातील पवित्र नद्या, पर्वत व तीर्थांची नामावली आहे.[२२] मुळात त्यास आधार नाहीं. आता या त्याने केव्हा केल्या असाव्या हे पाहू. त्याची ग्रंथरचना शके १६१० मध्येच संपूर्ण झाली. तेव्हा त्याच्या समाधिकालापर्यंत अकरा वर्षे रहातात. नंतर त्यास तीर्थयात्रास अवसर सापडला नसावा हा तर्क अप्रतिष्ठित आहे. मला तर असे वाटते कीं, श्रीधराने या तीर्थयात्रा ब्रह्मानंदाच्या समाधिनंतर शके १६१५ ते १६२० पर्यंत चारपाच वर्षांत केल्या असाव्या.

एकदरींत श्रीधराचा गृहस्थाश्रम, स्नानसंध्या, देवपूजा, लेखनवाचन, पुराण, भजनकीर्तन, सदुपदेश, साधुसमागम, अतिथिसेवा, पतिव्रता स्त्री, आज्ञाधारक सुपुत्र, सुना, व नातवंडे यांचा परिवार, सर्वांठायीं समदृष्टि व विठ्ठलाची अनन्यभक्ति याप्रमाणे मोठा सुखाचा झाला असावा, आणि हें सर्व सुख प्रारंभीं दिलेल्या त्याच्या वचनाप्रमाणें तो अनासक्त होऊन

२२ रा. वि., ५. ७८–१०८.

अनुभवीत होता. या आमच्या विधानास मनोहर श्रीधराचाही दुजोरा आहे. तो म्हणतो :—

“ दया क्षमा शांति वसति ज्याच्या अंगीं ।
काम क्रोध न शिवति ज्याच्या अंगीं ॥
जो निजरूप सदा भोगी ” । इ.

यावरून त्यानें सर्व संसार सुखाचा करून आनंदाने लोक भारले. तेव्हा त्याच्या संबंधाने “ धन्यो गृहस्थाश्रमः ” असेच उद्गार निघतील !

* * *

## — ४ —

# श्रीधराचें भक्तमंडळ व समकालीन कवि

" मित्र प्रीतिरसायन नयनयोरानदन चेतसः" ॥

सुभाषितम्

( १ ) प्रास्ताविक, ( २ ) सामराज, एकनाथाच्या पुष्पाजुळ्या, ( ३ ) शिवराम, मानपुरी, मध्वमुनि, आनदराव, हिदुराव व सकोबाची पत्रे व त्यास उत्तरे, ( ४ ) पत्रव्यवहाराचें समालोचन, ( ५ ) इतर मित्र, ( ६ ) समकालीन कवि व त्याची काव्यें.

१. मोरोपताचें दप्तर व त्याचा पत्रव्यवहार वगैरे कागदपत्रें फार व्यवस्थितरीतीने ठेविलेली असल्यामुळें त्याचे मित्रमंडळ, त्याचे आप्तजन व त्याचे चहाते याजविषयीं इत्थभूत व विश्वसनीय माहिती मिळाली आहे श्रीधराचे दप्तरही फार विस्तृत होते. सन १९१८ सालीं मीं पंढरपुरास गेलो होतो तेव्हा मला अनेक रुमाल माजघरातील मोठमोठ्या कोनाड्यांत नीट रीतीनें ठेविलेले आढळले. सन १९३९ सालीं ते पुष्कळसे रोडावलेले दिसलें, आणि सन १९४१ मध्ये तर त्याचे पूर्ण स्थलान्तर होऊन घराच्या पोटमाळ्यात ते ठेवलेलें दिसले. ते आतां फारच सूक्ष्म झालें असून

त्याची व्यवस्थेशीर यादी वगैरे काहीं नाहीं रुमालावर आतील ग्रथाची नोंद नाहीं. बाडे, कागदपत्रें, इतराचे लिहून घेतलेले मस्कृत-प्राकृत ग्रंथ सरामिसळीनें रुमालात आहेत. त्यामुळें सशोधकाचा पुष्कळ वेळ फुकट जातो व त्या मडळीसही रुमालाची सोडबाध करण्याचा त्रास पडतो. या दप्तरात आता ग्रथाचीं मूळ हस्तालिखिते तर नाहीतच पण कित्येकाच्या नकलाही नाहींत. याचे कारण विचारता विद्यमान वशजाकडून असे समजलें कीं, अनेकानी हस्तालिखिते मागून नेलीं, पण नंतर तीं वा त्याच्या नकला किवा छापील प्रतिसुद्धा त्यानी मालकास दिल्या नाहींत. या अनुभवा-वरून शहाणे होऊन आता घराबाहेर कोणतेही हस्तलिखित ते देत नाहींत. असो. जो थोडाबहुत सग्रह आजपर्यंत त्यानीं रक्षिला आहे त्याबद्दल त्यांस कोणीही धन्यवाद देईल. तेव्हा या उर्वरित राहिलेल्या दप्तरातून त्याच्या भक्तमडळींची व इतर काय माहिती मिळते ते पाहू :—

२. एका जुनरी बाडाच्या पान २६८ ते २७२ पर्यंत ही माहिती लिहिलेली सापडते. त्यात प्रथम सामराज व एकनाथ या शिष्याच्या पुष्पाजुळ्या आहेत व नंतर पत्रे आहेत. त्यात सिवराम, मानपुरी गोसावी, मध्वमुनीश्वर, पुनः शिवराम, हिंदुराव, आनदराव, सकोबा व दत्तात्रय या अनुक्रमाने याचीं पत्रे आहेत व खालीं श्रीधराचे प्रत्येकास उत्तर अशी तीं लिहिलेलीं आहेत. हीं जीं पत्रे आहेत तीं मूळचीं नसून त्याच्या नकला मागून कोणीतरी करून सग्रहीं ठेविलेल्या आहेत. आता क्रमाने तीं पाहू. पाहिली पुष्पाजुळी सामराजाची आहे. ती सस्कृतात असून तिच्यात त्यानें श्रीधराच्या स्वरूपाचे शब्दचित्र फारच सुदर रीतीनें काढलेलें आहे. याचा उल्लेख मागील प्रकरणात आलाच आहे. ही पुष्पाजुळीहीं समग्र खालीं दिलेली आहेच. मात्र हा सामराज कोण असावा हें निश्चित होत नाहीं.

रुक्मिणीहरणकर्ता सुप्रसिद्ध कवि 'सामराज' हा वामन पंडिताचा समकालीन असून त्याच्या या ग्रंथाचा काल श. १५५० ते १६०५ व त्याचा स्वतःचा काल शके १५३५ ते १६२२ असा दिलेला आढळतो.[1] तेव्हा तो श्रीधरपूर्वकालीन ठरतो. वामन पंडिताच्या शिष्यवर्गात साम्राज-वामन म्हणून एक कवि होता. तो वामनाचा पट्टशिष्य होता.[2] त्यानें सुदामचरित्र, ब्रह्मोपदेश वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. त्याचा जन्मकाल शके १५७४ असून त्याने पंडिताचा गुरूपदेश श. १५९९ मध्यें घेतला होता. तेव्हा हा श्रीधराचा शिष्य असू शकत नाहीं हे उघड आहे. पण आणखी तिसरा " सामराज ' अजून तरी मराठी वाङ्मयात ज्ञात झालेला नाहीं. तेव्हा हा कोणी सामान्य संस्कृतज्ञ श्रीधरशिष्य असावा. त्यानें श्रीधरास श्रीधराचे ( विष्णूचे) पदवीस बसविले आहे

पुष्पांजुळी श्लोक. ( लेखन मुळाप्रमाणेच ठेवले आहे. )

सर्गस्थितिप्रलय हेतुमचिंत्यशक्तिं ।
विश्वेश्वर विदितविश्वमनंतमर्तिम् ॥
निर्मुक्तबंधनमपारसुखाबुराशीम् ।
श्री श्रीधर विमलबोधघन नमामि ॥ १ ॥
रम्य पादतल ध्वजांकुशयुत शर्व्येबुधे ( दुःखाबुधे ) मुक्तये ।
जानुद्वंद्वमथोरुयुग्ममम॒ल पीतादिवास वहन् ॥
श्रोण्या हाटकसूत्रवेष्टिततनु रोमावलीराजितम् ।
ब्रह्मानंदमय नमामि सतत ज्ञानार्णव श्रीधरम् ॥ २ ॥
लोकांना निलय सुखैकनिचय रम्योदर तुंदिलम् ।
वक्षः श्रीकरुणानिधेर्गुरुतम भक्तप्रभायत्रितम् ॥

१ तुळपुळे. रु. ह. प्रस्तावना. पृ ३ व ८, पगु. 'सामराज', पृ. ५९.
२ भावे. म. सा पृ २६९.

प्यायस्कंधसुबाहुयुग्ममलं पर्वांगुलीभिर्वृतम् ।
ब्रह्मानदमय नमामि सतत ज्ञानार्णव श्रीधरम् ।। ३ ।।
दीर्घग्रीवयुत सुहारपदकैर्जांबूनदैः शोभित ।
नानारत्नसुमौक्तिकादिसहित माल्यैस्तथाचापरैः ।।
वक्त्रं पद्मनिभ सुहासरुचिर बिंबाधरोद्भासितम् ।
ब्रह्मानंदमय नमामि सतत ज्ञानार्णवं श्रीधरम् ।। ४ ।।
रम्याभिर्द्विजराजपंक्तिभिश्चसहित दीर्घ सुनास शुभं ।
आकर्णांतविशालनेत्रमतुल श्रोत्रे सुभूषायतम् ।। ( ? )
कस्तूरीतिलक ललाटफलके रम्य शिरोवेष्टनम् ।
ब्रह्मानदमय नमामि सतत ज्ञानार्णव श्रीधरम् ।। ५ ।।
श्रीधरः श्रीधरः साक्षात् श्रीश्च यस्य मुखे स्थिता ।
तस्य सदर्शनेनैव सुखं प्राप्नोति मानवः ।। ६ ।।
इद स्तोत्र कृत सत्य सामराजेन निश्चितम् ।
पठनात् सुखमाप्नोति सत्य सत्य न संशयः ।।

दुसरा शिष्य ये (ए)कनाथ याने मराठींत अक्षरगणवृत्तात सहा पदरी पुष्पमाला आपल्या श्रीधर गुरूस वाहिली आहे. ती अशीः—

नमो श्रीधरा विश्वावतारा भवारे । अखडैकबोधाब्धिपूर्णावतारे ।
सुरतरुसम तूझी कीर्ति विख्यात गाजे । असुरि सकळ माया देखता सीघ्र लाजे ।। १ ।।
गुणनिधिगुणगुम्या श्रीधरा योगिराजा । निजपद सुख देई तूं सखा प्राण माझा ।। २ ।।
सखा श्रीधर पूर्णकैवल्य पाहीं । तया वेगळा देव आम्हास नाहीं ।
असा निश्चयो अंतरीं पूर्ण जाला । जगज्जीवना ध्यातसे श्रीधराला ।। ३ ।।

भवें तापलो मी आलों तूजपासीं। कृपाळूपणे सीस्य ते उद्धरीसी। (शिष्य)
नको तू करू आपणासी निराळे। घनानदमूर्ति अहो तु श्रेहाळे ॥ ४ ॥
न लागे मला आणखी गोड दूजें। तुझ्या शब्दरत्नें सुखानद माजे।
तुझ्या कीर्तने सत सूखे निवाले। धनानदमूर्ति अहो तु श्रेहाळे ॥ ५ ॥
पुष्पांजुळी मानस वाहुनिया। वोवाळुनी साडिन सर्व काया।
हे श्लोक हो वर्णुनि येकनाथे। पायावरी ठेवित मस्तकाते ॥ ६ ॥

हा एकनाथ शिष्यही सामान्य प्रतीचा खडबडीत व अशुद्ध रचना करणारा कवि दिसतो.[३] ही पुष्पमाला त्यानें पत्ररूपाने पाठविलेली दिसते. तींत त्याची आत्मोद्धारार्थ तळमळ व गुरुनिष्ठा चागली व्यक्त झालेली दिसत आहे.

३. इतर पत्रे देण्यापूर्वी हें नमूद करणे अवश्य आहे कीं, त्यापैकीं सिवरामाचें पहिले पत्र शिवायकरून बाकीचीं का. ना. साने यानीं १९१४ मध्यें प्रसिद्ध केलीं आहेत.[४] पहिलें पत्र व दोन पुष्पाजुळ्या हीं अगदीं प्रथमच प्रसिद्ध होत आहेत. शिवाय इतरात जो फरक आढळला तो त्या त्या जागीं दाखविला आहे.

## ( १ ) सिवरामाचें पत्र पहिलें

प्रेमे आर्त चकोर पूर्ण निववी चिद्रश्मिदाने सदा ॥ १ ॥
नेत्रीं श्रीधरचंद्र तो धणिवरी पाहीन मी येगदा ॥ २ ॥

---

३ अशुद्धता नकलकाराचीही असेल.

४ वि. ज्ञा. वि. १९१४, जाने. साने यानीं ही माहिती राजाराम विठ्ठल देशपाडे, असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर, रा. बाभुळगाव याजकडून मिळविली होती.

नाहींपणें श्री धरूनी स्ववैभवीं । अनाम हें श्रीधर नाम वागवी ।।
अरूपदावी नररूप मानवा । त्या श्रीधराते मज माजि भेटवा ।। ३ ।।

मुक्ति श्री धरिली करें सुखकरें देतो मुमुक्षूजना ।
ते कैसी दिधली जयां प्रगटवी जेथे जगज्जीवना ।। ४ ।।
स्वस्वामी जवळीच येउन मिळे त्यासी जसीची तसी ।
तोचि श्रीधर छंद घेउनि मती त्यालागीं झाली पिसी ।। ५ ।।
श्रीधरा झडकरी मजमाजी । भेट येउन दुजेविण आजि ।
भावचार बरवा तुजपासीं । धाडिला हृदय देउनि त्यासी ।। ६ ।।
तो काय कीं जवळि तूज नसोचि आला ।
कीं मध्य येउन पथीं विधि आड ठेला ।।
ऐसा विचार करिता तंव काय जालें । ?
दावीत अक्षर कृपामय पत्र आले ।। ७ ।।

वाचूं गेलों दिव्य पत्रासि जेव्हा । वाचा माझी पारुशे पूर्ण तेव्हा ।।
स्वानदाचा थोकला सिंधु पाहीं । त्या सौख्याते बोलता येत नाहीं ।। ८ ।।

त्या पत्रिकेत लिहिली निज आत्मचर्चा ।
केल्या नसेच पुरुषार्थ आगा सुवर्चा ।।
स्वात्मस्वरूप मथने विण आत्मरावो ।
तो श्रीधर प्रकट सापडतो कसा वो ।।९।।
ज्याचे दयेने निरुपाधिक देव जालो ।
त्या विस्मयें तरि कसा स्वपदास आलों ।
या लागुनी गुरु रमाधव (श्रीधर) तो भजावा ।
हे भक्ति मुक्ति वरिली मतिचा विसावा ।। १० ।।

डोलासवें श्रीधररूप झालों ।। तो श्रीधरें मी सिवराम केलों ।। ११ ।।

घरा इंदिरा वाटते सीघ्र यावी । परी ते हरीपादपद्मास शेवी ।
नये त्याविणें ग्रेकली विश्वमाता । म्हणोनि त्वरे श्रीधरा धाव आता ।। १२ ।।

## ( २ ) मानपुरीचें पत्र

श्रीधर साई दरसन दीज्यो ।। छ ।।
कीर्तनकी तेरी ढाल लगी है । श्रवन करत हम रीझो ।। १ ।।
रातदीह्या मोहे ध्यान तिह्यारो । रूप दिखावकर लीज्यो ।। २ ।।
चकोरकु जैसा मीठो चदा । यह रीत चीत हम कीजो ।। ३ ।।
मानपुरी मीन ते सुधासागर । हु आम्रीतरस पीओ ।। ४ ।।

## श्रीधराचें उत्तर

नमु नारायण मानपुरी साई ।। छ ।।
दस नामनको भूषण तुम है । सीरी भगवानकी मूरत बनाई । १ ।।
शातिक्षमाको सागर भरियो । सीहागर प्रभु जौ सुखदाई ।। २ ।।
तीहारे दरसन कारन श्रीधर । पच प्रानकी आरती भराई ।। ३ ।।

## (३) मध्वमुनीश्वराचें पत्र पाहिलें

येई येई तू श्रीधरा । माहाराजा योगींद्रा ।
निष्ठुर होऊ नको अतरीं, सताच्या माहेरा ।। छ ।।
भारत हरिवश भागवत, रामायण वेदात ।
पाचै टीका त्वा बहु रसिका, केल्या सागती सत ।। १ ।।
निशीदीन अंतरीं तव मूर्ती, ध्यातों अखंड चित्तीं ।।
परि मज मनी वाटे येगदा व्हावी भेट प्रीती ।। २ ।।

[५]पेणें शेवटीचे नरदेहे, क्षणीक शाश्वत नोहे ।
मध्वमुनीश्वरे म्हणवुनि घेतली आळी पाहे ॥ ३ ॥

## श्रीधराचें उत्तर

नीगमस्वरुपा गभीरा, मध्वमुनेश्वरा ।
कृपा करूनि मज पत्र लिहिले, परम पवित्रा ॥ छ ॥
ग्रंथकर्ता तो तूं देख, करीसी मम कौतुक ॥
परी मज भेटीची आवडी, आहे बहुत देख ॥ १ ॥
भेटीस जाहले बहुत दिवस, अखड तुझा दास ।
त्यावरी पाहता तव पत्रा, जाहला जीव उदास ॥ २ ॥
स्नेह असो द्या बहुत, वीनंती हे नीछीत ।
श्रीधर मुनेश्वरीं रगला, अक्षय न वीटे होत ॥ ३ ॥
[६]लिखित म्या लिहिले तुजला करे ।
उचित दर्शन दे मजला त्वरे ॥ ४ ॥

## (४) सिवरामाचें पत्र दुसरे

गाईन गुण तुझे दयाळा, श्रीधरस्वामी स्नेहाळा ॥ छ ॥
तव गुण कीर्ति हे ऐकोन, भेटीस उदित मन ॥
संप्रदाय जो आनद त्याचे तू भूषण ॥ १ ॥
बीसर चित्तासि न पडे, ध्यास तुजकडे ।
नरदेह क्षणिक म्हणउनि, वीयोग चित्तीं वाढे ॥ २ ॥

---

५ वि.ज्ञा.वि., १९१४, जाने., पाठातर "येणें." "पेणे"="मुक्काम" हें उत्तम.

६ वि. ज्ञा. वि., १९१४ जाने., हा चरण नाहीं

कृपा करूनी मजवरी, भेटी दे झडकरी
म्हणउन तुजला म्या प्रीतीनें, लिहिले पत्र करीं ।। ३ ।।
पूर्ण सीवराम तुझेनी ऐसे अंतरीं मानी ।।
सर्वव्यापक तू आहेसी, परी अधीक सुख दर्शनीं ।। ४ ।।

## श्रीधराचें उत्तर

जीवीच्या जीवना सुखधामा, सखया सीवरामा ।
पत्रदर्शनी तव भेटी, जाहाली वाटे पोटीं ।।
दुत नव्हे हा सीवराम रूपची भासे दृष्टी ।। १ ।।
तव गुण प्राणसख्या जनमुखे परिसोन हृदयीं हरिखे ।
कीं हा अमच्या मुळ मठीं कल्याणरूप देखे ।।२।।
पत्र लिहिले ये भेटी, तरी मुळींच नाही तुटी ।
श्रीधर सिवरामीं अभेद, परी लौकिकी या गोष्टी ।। ३ ।।
[ वि. ज्ञा. वि. पहिले पत्र मुळींच छापलेले नाहीं. ]

## ( ५ ) मध्वमुनीश्वराचें पत्र दुसरें

वीसर साडी नको करू श्रीधरा ।
वीसरसी झनी मध्वमुनीश्वरा ।।
लिखित म्या लिहिले आपल्या करीं ।
उचीत मानेल जें तुज ते करी ।। १ ।।

## श्रीधराचें उत्तर

वीसर टाकुनी मध्वमुनेश्वरा ।
हृदयपजरी तू धरी श्रीधरा ॥
लिखित म्या लिहिले तुजला करें ।
उचीत दर्शन दे मजला त्वरे ॥ १ ॥

## ( ६ ) आनंदरावाचें पत्र

आनदासी आनंद झाला श्रीधरस्वामी घरा आला ।
सुवर्णाचा दिवस गमला हो । महाराजा पाहाता ॥ १ ॥

करुणासागर मायबाप । हरिले त्रिविध ताप ॥
दर्शनें झालों निःपाप । महाराजा पाहाता ॥ २ ॥

राघवसुत म्हणे । सार्थक माझे जिणें ॥
जाहले डोळ्या पारणे । महाराजा पाहाता ॥ ३ ॥

## ( ७ ) हिंदुरावाचें पत्र

धन्य स्वामी हा श्रीधर । याच्या ज्ञानासी नाहीं पार ॥ छ ॥
तो आहे बहुतची थोर । त्याचें नाम जपा रे सार ॥ १ ॥
ज्याची कीर्ति हे अद्भुत । वर्णितातो साधुसंत ॥ २ ॥
त्याचे चरणीं धरा भाव । सागे सर्वा हिदुराव ॥ ३ ॥

## ( ८ ) संक्रोबाचें पत्र

आठवें अंतर्यामीं सर्वदा श्रीधरस्वामी ॥ छ ॥
जैसा पाद्मिणी प्रियकर पाहीं, महाराज तैसा जगतीवरी सतेजरुप देहीं॥
किंवा इदिरावर अवतरला, सत्सीस्य हृदयीं भरला ।
रमवी जो निजनामीं ॥ १ ॥

ब्रह्मानदावरीं शशी हा विलसे ।
निस्कळक शोभे पाहताची चकोर हा उल्हासे ॥

निववी विज्ञान शब्दें करोनी ।
तारीत जडजीव आवनीं, रमवी जो निजनामीं ॥ २ ॥
ज्याचें साहित्य हे सत्कविता ।
ऐकता सुमने निववी अक्षय साधुसता ।
ज्याच्या कीर्तने रंगसुरगें ।
श्रवणेच ताप भंगे, रमवी जो निजनामीं ॥ ३ ॥
ऐसा हा सुरगुरु हो अवतरला ॥
सर्वज्ञ मोठा अतर्क्य तर्केवेना लीला ।
भरला विद्याबुधी अगणित ।
सप्रेम लहरया उठत, रमवी जो निजनामीं ॥ ४ ॥
ऐसा श्रीधरानंद माझा ।
स्वानदपंजरीं क्रीडे निरहक्रुति कीरवोजा ।
साम्राज्ये ब्रह्म गर्जे घोशे, शंकरानंद तोशें ।
रमवी जो निजनामीं ॥ ५ ॥

या ठिकाणीं श्रीधरानंद, शकरानंद यातील आनंदपद सन्यासाश्रमाचे दर्शक नसून दोघे आनदसाप्रदायी म्हणून घातले आहे.

## ( ९ ) दत्तात्रयाचें पत्र

स्मर मानस–मोहन श्रीधर हा ॥ छ ॥
साधक सत महत जनाप्रतीं । भासत केवळ सुरगुरु हा ॥ १ ॥
गायक पडित वैदिक दीक्षित । नृपवरचीत–मनोहर हा ॥ २ ॥
रामायण हरिवंश श्रीभारत । भागवतादिक ग्रथ पहा ॥ ३ ॥
जे कविता पृथ्वीवरी पसरे । कीं दुसरा क्षीरसागर हा ॥ ४ ॥
दत्तात्रयवर श्रीधर ऐसा । मदनमनोहर सुदर हा ॥ ५ ॥

४. येणेंप्रमाणें दोन पुष्पाञ्जुळ्या, नऊ पत्रें व श्रीधराचीं चार उत्तरे अशी एकदर पधरा पत्रें आहेत. सामराजानें आपली पुष्पाञ्जुळी समक्ष वाहिलेली दिसते तर एकनाथानें ती पत्ररूपानें धाडलेली दिसते. हे दोघेहि श्रीधराचे शिष्य होते. आनंदराव, हिंदुराव व सकोजी हेही शिष्यच दिसतात. त्यात आनदरावाच्या घरीं श्रीधर गेला असता त्याच्या भेटीनें झालेल्या उत्कट आनदाचें अविष्करण श्रीधरासमक्षच तेथेच केल्याचे स्पष्ट दिसत आहे. दुसऱ्या दोघानीं पत्ररूपाने आपला भक्तिभाव श्रीधरास कळविलेला दिसतो. मध्वमुनि, सिवराम व मानपुरी गोसावी हे तिघे मात्र श्रीधराच्या बरोबरीचे सतकवि दिसतात. या तिघासच श्रीधरानें चार पत्रे उत्तरादाखल लिहिलीं आहेत. आता या मडळींची काय माहिती मिळते तें पाहूः—

( १ ) शिवराम[७]:—भावे यानीं याच्याविषयीं सविस्तर माहिती दिली आहे. सोळाव्या शतकाच्या शेवटीं जे ग्रथकार झाले त्या सर्वांत हा मोठा होय. त्याची ग्रथसपत्ति अतिशय प्रचंड आहे. बहुतेक सर्व रचना वेदातपर व भक्तिपर आहे. भागवताच्या एकादश स्कंधावर याची टीका आहे. हा पूर्णानदाचा मुलगा व शिष्य या पूर्णानदापासून दत्तानंद, बोपाजी ( निजानद ), व शिवराम ( सदानंद ) यानीं उपदेश घेतला होता, म्हणजे श्रीधराचा आजा दत्तानद याचा शिवराम हा गुरुबधु होय. श्रीधरास तो आजेगुरुच्या ठिकाणीं होता. याचा जन्म शके १५५४ मध्यें झाला, म्हणजे हा श्रीधराहून सुमारें सव्वीस वर्षांनीं वडील होता. असें असून त्यानें श्रीधराबद्दल प्रगट केलेला आदर उभयताच्या थोरपणाची साक्ष देतो. प्रेम, आदर, आत्मचर्चा, भेटीची

७ भावे. म. सा. पृ २९२–२९३.

उत्कठा, व शेवटीं श्रीधरावर केलेली कोटी, या सर्व गोष्टींमुळे हे पत्र अत्यत हृदयगम झालें आहे. दुसऱ्या पत्रातही "तूं आनंदसप्रदायाचे भूषण, तुझी कीर्ति ऐकून तुझ्या भेटीची उत्कठा मला लागली आहे. तुझेनी मी पूर्ण शिवराम. तू सर्वव्यापक आहेस हे खरे. पण प्रत्यक्ष दर्शनाने अधिक सुख होते. नरदेह काहीं झालें तरी क्षणिक आहे." हे जे उद्‌गार शिवरामासारख्या वडील व अधिकारी व्यक्तीने काढले आहेत त्यांवरून श्रीधराची थोरवी व आत्मस्थिति प्रत्ययास येते श्रीधराचे उत्तरही मोठे काव्यमय तसेच तत्त्वज्ञानमय आहे. "पत्र लिहिलें ये भेटी। तरी मुळींच नाहीं तुटी॥" या ओळी ज्ञानोबानी चागदेवास पासष्टींत दिलेल्या उत्तराची आठवण करून देतात.

(२) मध्वमुनीश्वरः—त्यानतर पत्रलेखकातील ही दुसरी व्यक्ति होय. याचा जन्मशक जरी उपलब्ध नाहीं तरी त्याचा समाधिशक शके १६५६ म्हणजे श्रीधरानतर पाच वर्षांचा आहे. यावरून तो श्रीधरकालीन होता. हा सुप्रसिद्ध साधु असून याचें चरित्र व योग्यता ही सर्वांस माहित आहेत. त्यानें श्रीधराच्या मुख्य ग्रथाचा उल्लेख करून त्याच्या भेटीची आळ घेतली आहे. कारण नरदेह हे शेवटचे पेणे (मुक्काम) व तेंही क्षणिक म्हणून ती पुरव अशी त्याने काकुळतीने विनति केली आहे. श्रीधराने, "खरा ग्रथकर्ता तू असून माझे तू केवळ कौतुक करीत आहेस, मलाही तुझे भेटीचा ध्यास लागला आहे" असें त्याच प्रेमळसुरात उत्तर दिले आहे.

(३) मानपुरी गोसावीः—हा तिसरा हिंदी साधुकवि. याच्या पत्रात श्रीधराच्या अमृतमधुर कीर्तनाचे काव्यमय वर्णन आहे तर श्रीधराचे उत्तरही त्याच तोलाचे असून त्यात उभयतास लागलेली भेटीची उत्कंठा

प्रतिबिंबित झाली आहे. एकदरींत या तीन साधूची निरपेक्ष साक्ष श्रीधराचा असामान्य थोरपणा व साधुत्व सिद्ध करीत आहे व ती प्रमाणार्ह आहे.

सक्रोबाच्या पत्रातील 'सत्कविता, अगणित विद्याबुधि, सुरंग-कीर्तन व सुरगुरू' हे उल्लेख श्रीधराच्या पांडित्याचे निदर्शक आहेत. दत्तात्रयाने तर 'गायक, वैदिक, पंडित, दीक्षित' या विशेषणांनीं त्याचा अष्टपैलूपणा दर्शवून त्याची कविता पृथ्वीवर इतकी पसरली आहे कीं, तो दुसरा क्षीरसागरच वाटतो असे विधान केले आहे तेही लक्षणीय आहे. "नृपवरचीत मनोहर हा" असेंही श्रीधरासंबधीं त्याने म्हटलें आहे. हा नृपवर श्रीधरास व त्याच्या मुलास इनाम जमिनी देणारा शाहूराजाच असला पाहिजे. परंतु साने यांनीं याचा संबंध शिवाजीमहाराजाशीं जोडला असून "खड्याचा श्रीधर कसा झाला" या दंतकथेस पुष्टि दिली आहे[८] ते बरोबर नाहीं कारण ती दंतकथा खरी नसल्याचे मागें सिद्ध केलेच आहे.[९] हा "दत्तात्रयवर श्रीधर" म्हणजे श्रीधराचा मुलगा दत्तात्रय हाच होय. हिंदुराव हा हिंदुराव घोरपडे असावा. आनंदराव, राघव व संक्रोबा याविषयीं माहिती मिळत नाहीं.

५. या पत्रव्यवहाराव्यातिरिक्त श्रीधराच्या भक्तमंडळात व मित्रमंडळात आणखी दोन नावें समाविष्ट केलीं पाहिजेत. तीं म्हणजे गिरिधरस्वामी व अमृतराय यांचीं होत. त्यांची थोडी माहिती देणे क्रमप्राप्त आहे.

गिरिधरमहंतः—हा रामदास शिष्य होय. याचा काल शके १५७५ ते १६५१ असा आहे. हा बीडचा रहाणारा. तेथे महंत सीतारामबुवाचा मठ अजून आहे. याने सुमारें चाळीस ग्रंथ लिहिले असून त्याची पद्यसंख्या

---

८ वि. ज्ञा. वि. १९१४, जाने. पृ. ८, टीप २.

९ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. २, पृ. १६–१८.

चोवीस हजार आहे. ' समर्थप्रताप' हा एक त्याचा फार महत्त्वाचा ग्रंथ आहे. त्याच्या सोळाव्या समासात त्यानें असा प्रसग काल्पिला आहे कीं, समर्थांच्या घरीं अनेक महापुरुष, साधुसत व कवि भोजनास बोलाविले आहेत. त्या प्रत्येकास रुचिपरत्वें ' ज्ञानामृतभोजन ' दिले आहे. असे करताना अनेक कवींचा व ग्रथाचा त्यांच्या वैशिष्ट्यासह उल्लेख केलेला आहे. भोजनाच्या दोन पंक्ति झाल्या. प्रत्येक पक्तींत संताचे सुमारें पन्नास पाट माडले होते. श्रीशंकराचार्यांच्या बरोबर ब्रह्मानंदरस सेवन करून पहिली पंगत उठली.

" मागा येक पगति जाली ब्रह्मभोजनीं ।
संत सज्जनीं अनुसंधानीं ।
आता दुसरी पगति समर्थसदनीं ।
सुखस्वानदें बैसली ॥[१०]

असा या सतराव्या समासाचा प्रारंभ केला आहे. पहिल्या पाटावर विश्वनाथ पुराणिकास बसवून पुढें रगनाथ, ब्रह्मनाळकर, जयराम, केशवस्वामी, तुकाराम वगैरे मडळी दिसते. पुढे वामनपडिताच्या पानांत उदड चुर्मा लाडू वाढले आहेत. नंतर पूर्णानंद, शिवराम, जनपंडित, विठ्ठल वगैरे दिसतात. नंतर त्रेचाळीसाव्या पाटावर श्रीधरास बसविलें आहे. त्याचे वर्णन असें: --

भीमातीरीं विशाळ पंगति बैसती ।
पाडुरग परमान्न सपूर्ण संत जेविती ॥
रामविजय कृष्णविजय ब्रह्मरस सेविती ।

---

१० गिरिधरमहंत. श्रीसमर्थप्रताप. स. १७, १.

ब्रह्मानद श्रीधर कुटुंबी[११] ॥
समर्थ सर्वज्ञ सर्व परामृश घेती ।
आत्माराम सर्वहि साभाळिती ॥
ऐक्यभावें पगति न्याहाळिती ।
भिन्नभावे कोण्ही असेचिना ॥
नाना गद्ये पद्ये उत्तम श्लोक ।
गर्जना करिती स्वानदे लोक[१२] ॥

अशा आनदात श्रीसमर्थांनीं सर्व सताना ब्रह्मरसाचा पाहुणेर दिला.

यात दोन गोष्टी ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत त्या या कीं, श्रीधराबद्दल गिरिधराने आदरभाव प्रगट करून त्यास सतसज्जनाच्या पक्तीस बसविलें आहे. त्याच्या ग्रथाचा त्याने उल्लेख करून.त्यास ' कुटुबी ' असे म्हटले आहे. या शेवटच्या गोष्टीवरून श्रीधराने चौदाव्या वर्षीं सन्यास घेतला नव्हता व तो कुटुबवत्सल होता हे स्वतत्ररीतीने सिद्ध होतें. गिरिधर हे शके १६५१ च्या वैशाख शुद्ध अष्टमीला म्हणजे श्रीधराच्या आधीं सुमारे नऊ महिने समाधिस्थ झाले. या दोघाचा स्नेहसबध चागलाच असला पाहिजे.

**अमृतरायः**—औरगाबादचे सुप्रसिद्ध कटावकार अमृतरायजी सर्वांच्या परिचयाचे आहेत. याचा काल शके १६२० ते १६७५ असा आहे,[१३] म्हणजे श्रीधरापेक्षा ते पुष्कळच लहान ते मोठे थट्टेखोर होते. पण

११ गिरिधरमहत. श्रीसमर्थप्रताप स. १७, ३१.

१२ गिरिधरमहत श्रीसमर्थप्रताप. स १७, ३९–४०.

१३ ओक, महा. कवि. अमृतरायकृत कविता. सं. प्रस्तावना, पृ १,३.

मध्वमुनींनीं त्यांना सुमार्गास लावल्यावर त्यानी आपली अमृतमधुरवाणी परमेश्वरसेवेस लाविली, व " प्राण्या बोलावे बहु गोड[१४]" असा उपदेश लोकास करण्यास सुरवात केली हे सर्वास माहीत आहेच. एका पदात 'श्रीगुरूमध्वनाथ' असे म्हणून त्याम गुरुचा मान दिला आहे.[१५]पण त्यानीं " माधवसरस्वती " " विठ्ठलसरस्वती " व " अंबिकासरस्वती " अशी आपली गुरुपरपरा दिली आहे.[१६] आणि आपल्या ध्रुवचरित्रात 'अंबिकासरस्वीतीचा' त्यानी गुरु म्हणून निर्देश केला आहे. त्यानीं एका पदात " अमृत म्हणे तुम्ही भजा निरतर । श्रीधर गुरूचे पाय ।। " असें श्रीधराविषयीं म्हटले आहे.[१७] पण या ठिकाणींही 'गुरु' म्हणजे 'मोक्षगुरु' असें न मानता श्रेष्ठ, थोर, पूज्य, गुरुतुल्य असा अर्थ मानला पाहिजे. असा बहुमान अमृतासारखी सुस्त्राविणि वाणी ज्याची होती, व ज्याच्यापुढे मराठी भाषा हात जोडून उभी होती, आणि ज्याच्या कीर्तनात त्याचे चटकदार कटाव ऐकून श्रोते डोलत असत त्या अमृतरायानीं द्यावा हे श्रीधराच्या खऱ्या मोठेपणाचें द्योतक नाहीं असे कोण म्हणेल ?

६. आता श्रीधराचे इतर समकालीन कवि व त्याचे ग्रथ याचे थोडेसें

१४ ओक. महा. कवि. अमृतरायकृत कविता. सं. पद, ७२. पृ. १३८.

१५ ओक. महा. कवि. अमृतरायकृत कविता. सं पद,१६२,३, पृ. १७०.

१६ ओक. महा. कवि. अमृतरायकृत कविता. सं. ' अविनाश-सदेहहरण, ८०–८१, पृ. १८८.

१७ ओक महा. कवि. अमृतरायकृत कविता. सं. पद, ८०, ३, पृ. १३९.

दिग्दर्शन करूं. शके १५५० ते १६५० हा शभर वर्षांचा काल मराठी काव्याच्या अत्यत उत्कर्षाचा दिसतो. या कालात जितके ग्रथ व ग्रथकार झाले तितके मराठी वाङ्मयाच्या इतिहासात दुसऱ्या कोणत्याही शतकात झालेले आढळणार नाहींत. सख्येने तसें गुणानेही ते चागले आहेत श्रीधराचे स्वतःचे घराणे व त्याची आनदपरपरा ही विद्वत्ता व ग्रथरचने-विषयीं प्रसिद्ध आहेच. समर्थ रामदास व रामदास पचायतनातील कवि, त्याच्याच परंपरेतील तजावरकडील कविपचक, वामनपडित व त्याचे शिष्यमडळ व इतर कवि या सर्वांची संख्या सहज पन्नासपाऊणशे भरेल. या सर्वांचा भर अर्थातच आपले जे आवडते ग्रथ भारत, भागवत, रामायण, गीता व इतर वेदात ग्रथ यावरच आहे. पण लोकरजन करून लोकशिक्षण देण्याचा जो पायडा मुक्तेश्वराने प्रथम पाडला त्याचेच अनुकरण पुष्कळांनी आपल्या रुचिनुरूप केलेलें दिसतें म्हणून या कवींचा व त्याच्या काहीं विशिष्ट ग्रंथांचा निर्देश करणें उचित वाटतें.

या सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ समर्थ रामदास होत.[१८] "खड्याचा श्रीधर कसा झाला" ही दतकथा मागे दाखविल्याप्रमाणें जरी खरी नसली तरी श्रीधरानें त्यास खास पाहिलें असावें. त्याचें साधुत्व, त्याचा प्रताप, व त्याचें सघटनेचे कार्य या गोष्टींनीं त्याचे चित्त आकर्षिले असावे. शके १५८१ मध्यें झालेला त्याचा ग्रथराज 'दासबोध' त्यानें वाचला असावा. कारण समर्थांच्या समाधीपर्यंत त्याचे वय आम्ही दाखविल्याप्रमाणे तेवीस वर्षांचें होतें. त्याने आपल्या संतमालेंत त्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. तो असा[१९]:—

१८ ही माहिती भावे. 'म. सा.' मधून सकलित केली आहे.

१९ श्रीधर. च आणि का., भा. २, प्र. ११, 'संतमाळा श्लोक,' ३३.

निःसीम भक्ति रघुनाथपायीं । वैराग्य योगें विचरे सदा ही ।।
त्या रामदासें ध्वज लावियेला । श्रीरामनामे जन जीववीला ।।

या एकाच श्लोकांत समर्थांचें सर्व वैशिष्ट्य श्रीधराने वर्णिलें आहे. यात शिवाजीमहाराजाचा भगवा ध्वज व निस्तेज व निष्प्राण झालेल्या जनतेचे जागोजाग मठस्थापना करून व रामोपासना शिकवून जें पुनरुज्जीवन केले त्याचा अस्फुट ध्वनि प्रतीत होत आहे. रंगनाथस्वामी व त्याचा धाकटा बंधु विठ्ठल (आत्यास्वामी) हीं तर त्याच्या अगदीं घरचीच मंडळी रंगनाथासंबंधाचा ( शके १५३४ ते १६०६ ) त्याचा पूज्यभाव मागेच निर्दिष्ट केला आहे, आणि आत्यास्वामीस "सौख्य सिंधु" म्हणून त्याने नमन केले आहे. रंगनाथाच्या अनेक ग्रंथापैकीं "योग-वासिष्ठ" हा त्याचा आवडता ग्रंथ दिसतो तो त्यानें मूळ संस्कृत ग्रंथाबरोबर वाचला असला पाहिजे. या ग्रंथाचा उल्लेख श्रीधरानें एकदा रामविजयात व एकदा हरिविजयात असा दोन वेळा केला आहे.[२०] दासपंचायतनापैकीं दुसरा महत्त्वाचा कवि म्हणजे जयरामस्वामी वडगावकर होय. याचा काल शके १५२१ ते १५९४ असा आहे. याची 'दशमावरील' टीका (१९५९), 'रुक्मिणीस्वयंवर', 'सीतास्वयंवर' व 'अपरोक्षानुभव' हे मुख्य

---

२० रा. वि. ६, ९ / ह. वि. १, १०० } मूळ 'योगवासिष्ठात' श्लोकसंख्या बत्तीस हजार आहे. पहाः—

" मोक्षोपायाभिनेय संहिता सारसामिता ।
त्रिशद्वे च सहस्राणि ज्ञाता निर्वाणदायिनी ॥
( मुमुक्षु प्र. सर्ग, १७, ६ )

श्रीधरानें दोन्ही ठिकाणीं 'योगवासिष्ठा'ची श्लोकसंख्या छत्तीस हजार अशी दिली आहे ती बरोबर दिसत नाहीं.

ग्रंथ होत. " निस्सीम शातीचा जयराम याला 'विठ्ठलाचे प्रत्यक्ष दर्शन घडत असे " असे श्रीधराने त्याजविषयीं गौरवोद्गार काढले आहेत. तेव्हा याच्या ग्रथाचा अवश्य तो उपयोग श्रीधराने खास करून घेतला असला पाहिजे. बाकी राहिलेले दोघे म्हणजे केशवस्वामी भागानगरकर व आनदमूर्ति ब्रह्मनाळकर याच्या अनेक पदाचा परिचय त्यास घडला असावा. श्रीधराची पद्यरचना ही फार मोठी आहे. समर्थाची शिष्यीण वेणाबाई हिचा 'सीतास्वयवर'ही उल्लेखनीय आहे. याचबरोबर रामदासाची तजावरा कडील शिष्य शाखा अशीच महत्त्वाची आहे. शिवाजीमहाराजाबरोबर समर्थशिष्य भीमस्वामी हे प्रथम तजावरास गेले. व्यकोजीनें त्यास मठ बाधून दिला. त्याची शिष्यपरपरा तेथे चालू झाली. तिकडील सर्व कवींत माधवस्वामींची रचना सर्वापेक्षा जास्त आहे त्यानीं 'श्लोकबद्ध रामायण','ओवीबद्ध रामायण','अश्वमेध' वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यानीं 'योगवासिष्ठ'हि लिहिले असून त्याची सख्या बारा हजारावर आहे. पण समग्र महाभारतावर प्रचड रचना करणारा म्हणून तो विशेष प्रसिद्ध आहे. त्यानीं या ग्रथाची सुरवात शके १६२५ मध्यें करून तो शके १६२९ मध्ये पूर्ण केला आहे. श्रीधराने 'पाडवप्रताप' चौसष्ट अध्यायात याच सुमारास (शके १६३४) लिहिला.[२१] श्रीधराचे महाभारत समग्र नसून त्यात 'स्वर्गारोहणपर्व' गाळले आहे. तर माधवस्वामीच्या महाभारताचे नऊशे चोवीस अध्याय आहेत व त्यानीं 'स्वर्गारोहणपर्व' शके १६२९ मध्ये पुरे केल्याचे सागितलें आहे. या प्रचड ग्रंथाची माहिती श्रीधरास खात्रीनें मिळाली असली पाहिजे, त्यावेळीं जरी छापण्याची कला नव्हती तरी नकलकाराकडून नवीन होणाऱ्या ग्रथाच्या नकला मुद्दाम करवून घेण्याचे अगत्य त्यावेळीं

---

२१ पा. प्र., ६४. १९६, १९९

पुष्कळ लोकात होते. मद्रास प्रातात अजूनही या ग्रथाच्या बऱ्याच प्रति सापडतात. याशिवाय अनंत, आनदतनय, रघुनाथपडित व गोसावीनदन ही चौकडी पण तिकडीलच होय. अनतानें 'सुलोचना-आख्यान' शके १६४५ त लिहिलें व 'अरणीचा शिपाई' आनंदतनय याचा चटकदार 'सीतास्वयवर' याच सुमाराचा आहे गोसावीनदनाचाही 'सीतास्वयवर' असून त्याची आरत्या व पदे विशेष प्रसिद्ध आहेत. या पचकापैकीं राहिलेला रघुनाथ-पंडित हा श्रेष्ठ प्रतीचा कवि तर सुप्रसिद्धच आहे याच्या 'नलदमयती-स्वयवराख्याना'च्या तोडीचे दुसरे सरस व सुदर काव्य मराठींत नाहीं. याशिवाय 'सतमालिका' व 'व्यकटेशस्तोत्र' रचणारा देवदास (श. १६०८); दुसरी 'सतमालिका' गुफणारा ताराबाईचा आश्रित मुकुद कवि, मुक्तेश्वराचें अनुकरण करणारा 'द्रौपदीस्वयवरा'चा कर्ता ( शके १६१८ ) अवचितसुत काशी, 'सुदामचरित्रकार' कचेश्वर (मृत्यु श १६५३ ), शातलिगाप्पाचा शिष्य बस्वालिंग याचा 'भामाविलास' ( शके १६०० ), शुकासारखा भागवतपुराण सागणारा विश्वनाथ पुराणिक, 'हरिवरदा' ची बेचाळीस हजार ओव्याची प्रचड रचना करणारा कृष्णदयार्णव, 'सीतास्वयवर,' 'रुक्मिणीस्वयवर,' व 'चद्रावळी' वगैरे सरस काव्ये रचणारा नागेश जोशी भिंगारकर, अलकारमडित अनेक वृत्तात्मक पण काहींशी नीरस चित्र-काव्ये रचणारा विठ्ठल बीडकर याची 'रुक्मिणीस्वयवर' ( श. १५९६ ) 'सीतास्वयवर' ( श. १५९९ ) व 'द्रौपदीवस्त्रहरण' ( श. १६०२ ) वगैरे आख्यानें, वामनपडितशिष्य साम्राज वामनाचा 'अनुभूतिलेश' 'सुदामचरित्र' व 'ब्रह्मोपदेश' ( श. १६१८ ) आणि शिवदिनकेसरीचे 'ज्ञानप्रदीप' व 'विवेकदर्पण' हे वेदात ग्रथ (शके १६२० ते १६९६) ही सर्व अफाट रचना वरील शतकात झाली.

मराठी वाङ्मयाचें केवढें मोठे हे महोदयपर्व ! या काली मराठी कवि व त्यांचे काव्य याच्या नामघोषाने सर्व महाराष्ट्र दुमदुमून गेला होता ! पण तो गजर आज शात झाला आहे. हे शेंकडो ग्रथ व ग्रथकार आज सामान्य जनास ' नामाऽपि न ज्ञायते ' असे झाले आहेत ! वाङ्मयेतिहासाचे लेखक व वाचक हेच त्याची प्रयत्नपूर्वक ओळख करून घेतात. पण कालाच्या तडाक्यातून ज्याची कीर्ति आज जिवत राहिली आहे अशा चार पाच कविश्रेष्ठात श्रीधर प्रामुख्याने झळकत आहे, ही गोष्ट केव्हाही विसरता कामा नये. आता श्रीधरकालीन महाराष्ट्राची राजकीय व सामाजिक स्थिति कशी होती हे पुढील प्रकरणीं पाहू.

* * *

# — ६ —

## श्रीधरकालीन महाराष्ट्र

कालो वा कारण राज्ञ· । राजा वा कालकारणम् ।।
इति ते सशयो मा भूत् । राजा कालस्य कारणम् ॥[१]

(१) राजकीय स्थिति. (२) मामाजिक स्थिति.

मराठी वाङ्मयाच्या उदयकालीं स्वराज्याचे छत्र होते. त्याच्या छायेखाली ते चागलेंच भरभराटीस आले. ज्ञानदेवादि चार भावडे व तत्कालीन सतकवि आणि भास्करनरेंद्रादि कांहीं महानुभाव कवि यास यादवाच्या राजवटींत काव्य करण्याची सुसंधी निर्वेधपणे लाभली. पण हें सुख फार दिवस टिकले नाहीं. कारण सन १३१८ मध्ये मलिक काफूरनें शकरदेवाचा जावई हरपाल यास ठार मारून यादवाचें राज्य बुडाविलें; आणि मराठी वाङ्मय आणि महाराष्ट्र ही अधःकारात व सकटात बुडालीं. या तीनशे वर्षांच्या महान् आपत्तींतही नामदेव, एकनाथ, दासोपत वगैरे सत-कवींनीं मोठ्या धैर्यांने व चिकाटीने स्वधर्म व स्वभाषा याचे परिश्रमपूर्वक

---

१ महाभारत. शातिपर्व, १२, ६९, ७९

रक्षण केले, पण चक्रनेमिन्यायाने मराठी वाङ्मयास शिवशाहींत पुनः उन्नत दशा प्राप्त झाली आणि मुक्तेश्वर, रामदास, वामन, तुकाराम, जयराम, रंगनाथ, आनदमूर्ति, केशवस्वामी ही कविमालिका वाङ्मय-प्रागणावर झळकली कृष्णदयार्णव, श्रीधर, मध्वमुनि, अमृतराय वगैरेस तर स्वराज्याचा अत्यत उत्कर्ष पहावयास मिळाला श्रीधराच्या सबधापुरता हा काळ म्हटला म्हणजे सन. १६५८ ते १७३० असा आहे. तेव्हा या काळात महाराष्ट्राची राजकीय व सामाजिक स्थिति अनुक्रमे कशी होती हे आपणास आता पहावयाचे आहे.

१ **राजकीय स्थितिः**—शिवबाने स्वराज्याचे तोरण ' तोरणा ' घेऊन १६४६ मध्ये बाधले तेव्हा त्याच्या उषःकालास प्रारंभ झाला. पण काहीं काळ जातो न जातो तोंच सन १६५९ मध्ये अफझलखानाच्या प्रचंड स्वारीचे अरिष्ट त्यावर कोसळले. ते इतकें भयकर होतें कीं, तुळजा-पुरच्या भवानीस व पढरपुरच्या विठोबास शनिमहात्म्यातील शकराप्रमाणे काहीं काळ पाण्यात बुडी मारून लपून बसावें लागले. पण शिवबाने अलौकिक चातुर्याने व पराक्रमानें अफझलखानाचा वध करून त्या अरिष्टाची शाति केली. या रोमहर्षक प्रसगाने शिवबाची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरली व शत्रूवर त्याचा जबरदस्त वचक बसला यानतर शिद्दीजोहार, शाएस्तेखान याचा पराभव, आग्र्याहून सुटका, व सिंह गडाची प्राप्ति वगैरे पराक्रमाच्या कृत्यानीं शिवबाची कीर्ति जिकडे तिकडे पसरत होती. पण १६७४ मधील अभूतपूर्व राज्याभिषेक महोत्सवाने त्याच्या यशोमदिरावर कळस चढविला. सर्व किल्ल्यावरून तोफाच्या दणदणाटाने घोषित केलेला हा अद्भुतरम्य व मगल महोत्सव ज्यास श्रुत झाला नसेल असा अभागी महाराष्ट्रीय त्यावेळीं एकही नसेल ! अर्थात्

पढरपूर, नाझरे, येथील विद्वान् ब्राह्मणानीं हा सुखसोहळा प्रत्यक्ष अनुभविलाही असेल. पण सन १६८० मधील शिवछत्रपतीच्या अकाली झालेल्या निधनाने स्वराज्यावर पुनः सकट आले. क्रू संभाजी याने. शिवशाहीतील थोर मुत्सद्यास क्रौर्याने यमसदनास पाठविलें पण लौकरच औरगजेबाच्या हातीं त्यास भयकर मृत्यु येऊन महाराष्ट्रावर पुनः अधःकार पसरला.

सभाजीच्या मृत्यूनतर औरगजेबाच्या फौजेने रायगड किल्ला घेतला आणि सभाजीचा पुत्र शाहू व बायको येसूबाई यास कैद करून मराठ्याचे बहुतेक सर्व किल्ले हस्तगत केले. औरगजेबाच्या स्वारीचे हें महाराष्ट्रावरील सकट फारच भयंकर होतें. तत्कालिन परिस्थितीचे चित्र मध्वमुनीश्वरानीं पुढील पद्यात चागले दिलें आहे [२]

तीर्थासि जाऊनि राहू मी निवात ।
तेथेहि आकात आरंभिला ।। ३ ।।
देऊळ मोडूनि मूर्तींचा उच्छेद ।
करिती गोवध चाडाळ ते ।। ४ ।।
माझिया डोळ्याचें बोडवले पाप ।
देव मायबाप बौध जाला ।। ५ ।।
राजिक दैविक येकवट जाले ।
स्वधर्मासी आले विघ्न मोठे ।। ६ ।।
मध्वनाथ म्हणे साग सीतापती ।
पुढील निश्चिती काय केली ।। ७ ।।

तथापि राजाराम, सताजी घोरपडे, धनाजी जाधव, रामचद्रपत अमात्य, इत्यादि वीर मुत्सद्यानी धैर्याने व अचाट प्रयत्नानीं औरग-

२ गुब्बी. मध्वमुनीश्वराची कविता. अभग,४८४,३–७. पृ.१४२

जेबाच्या आक्रमणास सतत तोंड दिले आणि मराठी राज्याचा गाडा सावरला

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहूची मोगलाच्या कैदेतून सुटका झाली, तेव्हा त्याच्याजवळ फक्त पाचपन्नास लोक होते. बाळाजी विश्वनाथाची माहिती त्यास कैदेत असतांनाच झाली होती. पुढें त्यास अनेक सरदार मिळाले. परंतु राजारामाची स्त्री ताराबाई हिनें रामचंद्रपंत अमात्य व परशुराम त्रिंबक यांच्या साहाय्याने कलह केला. इ. स. १७०८ मध्ये तिचें शाहूशी युद्ध झालें व त्यात पुण्याजवळ खेड मुक्कामीं तिचा पराभव झाला आणि नंतर शाहूचा साताऱ्यास राज्याभिषेक झाला. छत्रपति शाहू हा लोकप्रिय व परोपकारी असून त्याने १७४९ पर्यंत न्यायानें व धोरणाने राज्य केलें. हा काल मराठी राज्यास अत्यंत उत्कर्षाचा गेला. या कालात शिंदे, होळकर, पवार, जाधव, गायकवाड इ. मराठे घराणीं व प्रतिनिधि, घोरपडे ( इचलकरंजीकर ), नारायण विठ्ठल बर्वे, नेवरेकर, पेठे, जोशी चास्कर, पारसनीस इ. अनेक ब्राह्मण कुटुंबें उदयास आलीं. प्रतिनिधि, पेशवे, सचीव, फत्तेसींग व रघूजी भोंसले ही छत्रपति शाहूच्या विशेष लोभातील मंडळी होती. सावंतवाडीकर, बाजीराव, परसोजी भोंसले, शेखमिरे, विसाजी नारायण, आनंदराव सुमंत, बारामतीकर जोशी वगैरे साहाय्यकास त्यानें मोठ्या योग्यतेस चढविले.

इ. स १७१३ त बाळाजी विश्वनाथास पेशवाईची वस्त्रें मिळालीं. त्याच्या पराक्रमाने व मुत्सद्देगिरीनें छत्रपति शाहूच्या मातोश्रींची मोगलाच्या कैदेतून सुटका झाली. त्यांनीं इ. स १७१९ मध्ये सय्यद हुसेनला मदत करून दिल्लीवर चाल केली. यावेळीं दिल्लींत राज्यक्रांति होऊन फर्रुकशेअरचा खून झाला व महमदशहा तख्तावर बसला. बाळाजी विश्वनाथ पेशवे

चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्याच्या सनदा घेऊन दिल्लीहून परतले. या कामगिरीकरिता त्यास पचमहालाचे सरदेशमुखी वतन मिळाले आणि इतर प्रमुख सरदारास पोषाख व इनामें मिळालीं. या स्वारीनें मराठ्याचा दृष्टि-क्षेप विस्तृत झाला व महाराष्ट्रात उत्तरेकडील रीतिरिवाज व ऐषआराम याचा प्रसार होऊ लागला. बाळाजी विश्वनाथाच्या मृत्यूनतर इ. स. १७२० मध्ये त्याचा मुलगा बाजीराव यास पेशवाईचीं वस्त्रे मिळालीं. बाजीराव पेशव्याच्या मनात स्वराज्याचा विस्तार व स्वधर्माची वृद्धि हे हेतु सदैव असत. त्यानीं अत्यत धडाडीचे धोरण स्वीकारून सर्व हिंदुस्थानभर मराठ्याचा वचक बसविला. अवघ्या वीस वर्षांच्या अवधींत त्यानीं निजामावरील मोहीम, माळवा व बुदेलखडातील मोहीम आणि छत्रसालास मदत, दिल्ली-वरील मोहीम इ. अनेक स्वाऱ्या यशस्वीपणें पार पाडून स्वराज्याचा विस्तार चारही दिशास केला. बाजीराव सुशिक्षित व बहुश्रुत असून देशातील विद्वान् ब्राह्मणास पुण्यास बोलावून त्याची सभावना करण्याचा त्याचा प्रघात असे.

वर निर्देशिल्याप्रमाणे श्रीधरकालीन राजकीय स्थितींत शिवाजीचे पराक्रम व राज्याभिषेक, सभाजी व राजाराम याच्या वेळचे मराठेशाहीवरील संकट व शाहूच्या सुटकेपासून पहिल्या दोन पेशव्याचा भरभराटीचा काल याचा समावेश होतो. श्रीधराच्या ग्रथात तत्कालीन स्वराज्याच्या ध्येयाचे व विजिगीषु वृत्तीचे प्रतिबिंब पडलेले दिसतें. उदाहरणार्थः—

श्रीधर ‘ रामविजयात ’ सागतोः[३]

ग्रथनाम रामविजय । श्रवणे सदा पाविजे जय ।
चितित मनोरथ सिद्ध होय । एक आवर्तन करितांचि ॥

---

३ रा. वि. १, २०४

'हरिविजयात' श्रोते हरिविजयाच्या श्रवणाने कळिकाळावरही विजयी होतील असें म्हटलें आहे.[४] 'पाडवप्रतापात' क्षत्रियधर्म पुढीलप्रमाणे सागितला आहे[५].:—

क्षत्रियधर्म हा साचार । कीं दुर्जन सहारावे समग्र ।
दृष्टीं देखता मारक विखार । तोंड आधी ठेचावे ॥
कीं वृश्चिक दृष्टीं देखोन । पादरक्षेने करिजे चूर्ण ।
परपीडक संहारून । आधीं टाकावे धर्म हा ॥
पुरुष लक्षण हेचि परम । जों कुडींत आहे आत्माराम ।
तोंवरी पुरुषार्थाचा सभ्रम । ब्रह्माडभरी दाविजे ॥

रामविजयात गोब्राह्मण व सज्जनाचा यथान्याय प्रतिपाळ करून व सकळ दुष्टाचा परिहार करून स्वधर्म रक्षावा अशी राजनीति सागितली आहे.[६]

२. सामाजिक स्थिति:—श्रीधराच्या ग्रथात तत्कालीन चाली-रितींविषयी उल्लेख आढळतात. त्यासबधींची माहिती या ग्रथाच्या दुसऱ्या भागात प्रकरण अकरा, बारा व तेरामध्ये दिली आहे श्रीधर व त्याचे समकालीन कवि कृष्णदयार्णव आणि मध्वमुनीश्वर यानीं आपल्या काव्यात मोक्षप्राप्तीबरोबर व्यवहारासही महत्त्व दिले आहे. श्रीधराने आपल्या ग्रथाच्या फलश्रुतीत मोक्षप्राप्तीबरोबर विद्या, धनधान्यवृद्धि, पुत्रप्राप्ति,

४ ह. वि. ६, २२०
५ पा. प्र. ३६, ४२–४३, ४८
६ रा. वि. १२, १२५–१४२

गडातर, निवृत्ति वगैरे ऐहिक फलांचीहि जोड दिलेली आहे.[७]

त्याकाळीं शिक्षण खाजगींच गुरुजींपाशीं होई. त्यास राजाश्रय नसे. देवळात अथवा धर्मशाळेंत शाळा भरे. ब्राह्मणाचें उच्च शिक्षण धार्मिक असे. खाजगी शाळाना सुखवस्तु गृहस्थ व सरदार याजकडून आश्रय मिळे. थोर घराण्यातील स्त्रियाही बहुश्रुत असत. ब्राह्मणवर्ग जास्त सुशिक्षित असल्यामुळे राज्यकारभारातील वरिष्ठ जागा त्यास मिळत. विद्वानाचा पत्रव्यवहार पद्यात दूताकरवीं चाले. दिवस धामधुमीचे असल्या-मुळें आत्मसरक्षणाकरिता मल्लविद्येस व लाठी, बोथाटी, तलवार, भाला आणि बदुक चालविण्याच्या विद्येस फार महत्त्व होतें.[८]

विद्वान् कवि, पंडित व साधूसत याना उत्तेजन देण्याचा प्रघात शिवछत्रपतीपासून रूढ होता. 'भूषण' कवि शिवाजीमहाराजाच्या दरबारीं होता.[९] केशवपडित छत्रपति सभाजीस 'रामायण' सागत असे छत्रपति सभाजीने त्यास इ. स. १६८४ त राजापूर प्रातातील सगमेश्वर तालुक्यात "कोंड पाच व शेतें" याचे दान केले होते. हा राजारामाच्या आश्रयसही होता. राजारामानें त्यास मौजे फुणगाव (फुणगुस) व मौजे पुरीये (पुर्ये) तर्फ देवळें असे दोन गाव ता. ८ मे, १६९४ मध्ये इनाम दिले. ताराबाईने त्याचा मुलगा रामचद्र यास 'गृहिणीदानाबद्दल' स. १७२० त मौजे भोगाव तर्फ बोरगाव इनाम दिला. पुढे त्याचें वतन छत्रपति

७ पा. प्र. ६४, १६६–१७८

८ भाव. पे का. म. प्र. ६, पृ. ५८

९ काटे. सपूर्णभूषण. पृ १, केळूसकर. शिवाजी च. भा. २४, पृ ४१२–४१४.

शाहूनेही चालविले [१०] छत्रपति शाहूनें चिंचवडचे मोरयादेव, एकनाथ, तुकाराम, कल्याण गोसावी, नाशीक येथील पूर्णानदस्वामी, मानसाराम उदासी, नानकपंथी व मुसलमान सत याच्या समाधींच्या नेमणुका बाधून दिल्या. श्रीधराच्या उतारवयात छत्रपति शाहूने त्यास मौजे टाकळी परगणे माण हा गाव इनाम दिला होता.

श्रीधरकालीन समाज वर्णाश्रम धर्म पाळणारा होता. सोंवळ्या-ओवळ्याचे कडक नियम असत. [११] ब्राह्मणाच्या पोटजातींत वैमनस्य असे. ते कमी करण्याकरिता छत्रपति शाहूच्या प्रेरणेने पेशव्याचे आप्त बर्वे याच्या घराण्यातील अताजीस बहिरोपंत पिंगळ्याची पुतणी दिली होती फल ज्योतिषावर तत्कालीन लोकाचा पूर्ण विश्वास असे. [१२] प्रयाणास व भेटीस मुहूर्त लागत. शुभाशुभ शकून, स्वप्नें वगैरेंवर लोकाचा विश्वास असे. [१३] भूतपिशाच्ये व विभूति फुकून ती घालविणारे पचाक्षरी होते. [१४] खरेपणा सिद्ध करण्याकरता दिव्य करण्याची चाल होती. [१५] पंढरीसारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं राहूनही मूर्ख लोक शेदूर लावलेले दगड, म्हसोबा, जाखाई, जोखाई इ. क्षुद्र देवतास भजत असत. [१६] भोदू गुरूचा सुळसुळाट झाला होता. [१७]

---

१० बेंद्रे. छ. राजाराम-चरित्र ( जिजीचा प्रवास ), समालोचन–पुरवणी, पृ. २८, २८-अ, आ

११ ह वि. ९, २५५–२५६ १२ ह. वि ३०, १०५

१३ ह. वि. ४, ९७–९८ १४ ह. वि. ७, ५५–५६

१५ ह. वि. ३०, ८०–८७; पा. प्र. १७, ६५; रा वि. २६

१६ ह. वि. १३, ६५–६९

१७ ह. वि. २०, ७०

दुष्ट लोक स्मशानात जाऊन जारणमारणादि क्रिया करीत.[१८] यज्ञाची चाल होती त्यात होमकुंडामध्यें बोकडाचा बळी देत असत.[१९] स्मार्त व वैष्णव याच्यात विशेष वाद असावा असे वाटते. यासबंधीं 'पाडवप्रतापात' पुढील उल्लेख आहे.[२०]:—

शिवलिंग देखतां दृष्टीं । शिवद्वेषी जेवी होती कष्टी ॥
विष्णुप्रतिमा पाहता पोटीं । दु:ख वाटे जंगमा ॥

श्रीधराने अशा लोकाचा कडक निषेध केला आहे. उदारणार्थ[२१]:--

मी विष्णुभक्त मोठा । म्हणोनि निंदी जो नीलकठा ॥
तपस्वी देखोनि करी चेष्टा । त्यासि अधःपतन सुटेना ॥
शिवभक्त होऊनि निर्मल । जो विष्णुनिदा करी चाडाल ॥
नसते कुमार्ग स्थापी जो खल । त्यासि अधःपतन सुटेना ॥

शिंदी पिण्याची चाल त्याकाळीं होती.[२२] केरळ देशातील अनाचाराचा उल्लेख 'पाडवप्रतापात' पुढीलप्रमाणें आला आहे.[२३]:—

दक्षिणदिशे समुद्रतीर । केरल मल्याळ देश थोर ॥
जारकर्मरीति अपवित्र । तेथें चालत अद्यापि ॥

---

१८ पा. प्र. २४, १२
१९ पां. प्र. २२, ३७
२० पा. प्र. १९, ७
२१ पा. प्र. १६, ७९-८०
२२ ह.वि. ४, १६५; पा. प्र. ३१, १७.
२३ पा. प्र. १७, ४३.

बालविवाह रूढ होता. विधवाविवाह रूढ नसल्यामुळे, द्वितीय विवाह विषम असत. विधवावपनाची चाल होती.[२४] गरीबाच्या लग्नांस फार आडचणी येत. ते पैसे घेऊन मुलींची लग्नें करीत. सतीच्या सहगमनास फार मान होता.[२५]

'हरिविजय' अध्याय दहा व 'पाडवप्रताप' अध्याय एकेचाळीसमध्ये श्रीधरकालीन खेळाचे उल्लेख आहेत. त्यापैकीं चेंडूफळी, इटीदांडू, हुतुतु व बुद्धिबळे हे खेळ अद्यापि प्रचलित आहेत.

"रुक्मिणीसैवर" या "स्फुट प्रकरणात" आणि "हरिविजय," "पाडवप्रताप" व "शिवलीलामृत" या ग्रंथांत विवाहविषयक सोहळ्याची व. चालींची वर्णनें आलीं आहेत तीं श्रीधराच्या काळचीं आहेत. त्यात पुण्याहवाचन, देवकप्रतिष्ठा, जानवसा, वरमिरवणूक, वधूवरास हळद, मधुपर्क, लग्नघटिका, लाजाहोम, ॐ पुण्याह, पाणिग्रहण, मगळाष्टके, वाजत्री, आहेर इत्यादिकाचे उल्लेख आहेत.[२६] 'पाडवप्रतापात' गोंधळाचाही उल्लेख आहे.[२७]

नृत्यगायनकला,[२८] वाद्ये[२९] व शस्त्रास्त्रें[३०] याचे उल्लेख श्रीधराच्या

२४ जै. अ. ८

२५ भावे. पे. का. म, प्र. १८, पृ. २९१

२६ ह.वि., अ. २, १२४-१२५, पा.प्र., अ.३५; शि.ली., अ १३, श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ११, १२

२७ पां. प्र. ४८, १९१.

२८ ह.वि., १, १३; ११, १०१-१०५, २५, ११९, पा.प्र. ३२, १९७

२९ ह. वि. १०, १३४-१४१

३० पा.प्र., अ.४२ व अ.५०; श्रीधर च. आणि का., भा. २.प्र. १२

ग्रथात आले आहेत. शस्त्रामध्यें तोफेच्या गोळ्याचा उल्लेख पुढीलप्रमाणें आहे.[३१]

उल्हाट यत्राचे मार । दुर्गावरूनी होती अपार
परसैन्याचे यत्रगोळ समग्र । दुर्गपरिखामाजी पडती ॥

छत्रपति शाहूच्या कारकिर्दीत महाराष्ट्रास स्वास्थ्य व स्थैर्य याचा लाभ झाला. त्यामुळे लोकाचा दृष्टिकोन पालटला उदासीनता जाऊन सुखासीनता व रगेलपणा आला. छत्रपति शाहूमहाराजानी उत्तरेकडील अनेक गवई व नर्तिका आणविल्या. त्यामुळे लोकास त्या कलाची गोडी लागली.[३२] काव्याचे स्वरूपहीं पालटले. मध्वमुनीश्वरानीं त्यावर पुढीलप्रमाणें टीका केली, परतु ते स्वतःही नव्या प्रकारची काव्यरचना करीत.[३३]

वोव्या श्लोक पदें प्रबध रचना हे तो निघाली नवी ।
टप्पे ख्याल कितेक गाति यमके जाले फुकाचे कवी ॥

श्रीधराच्या ग्रथात वस्त्रे, अलकार व वेषभूषा याचीं वर्णनें आलीं आहेत त्यावरून त्या काळच्या समाजाची आर्थिक सुस्थिति प्रतीत होते[३४] श्रीधरानें भोजनवर्णनेंही मोठी थाटाचीं केलीं आहेत.[३५] त्यात फेण्या,

---

३१ ह. वि २२, ८९.

३२ भावे. पे. का. म. प्र. १०, पृ. १३९–१४६.

३३ गुब्बी. मध्वमुनीश्वरांची कविता, श्लोक, ४४६, पृ. १३१–१३२,४

३४ ह. वि., अ. ९ व अ. २६; पा. प्र., अ. २१.

३५ ह. वि., ३४, १–११, पां. प्र., १८, ७-११; २४, ६५-६८, ६३, ५०-५८,

माडे, अनरसे, शुभ्रपोळ्या, परिया, वडे, मोदक, पापड "दधिमधुदुग्धघृत-सरोवर। शाखासुवासें भरित अंबर।.. ऐसी पंचभक्षें परमान्ने" इत्यादींचें उल्लेख आहेत.

तत्कालीन रंगेलपणावर मध्वमुनीश्वर व त्याचा शिष्य अमृतराय यानीं कडक टीका केली आहे. मध्वमुनीश्वर म्हणतात.[३६]

शृंगारप्रिय सर्व लोक विषयी जाले विलासी महा।
राधामाधव नावडेच हृदयीं येकादशी नेम हा।
नाहीं भूतदया मनोजय कदा कोण्हा नको वेद हा।
ऐसें देखुनि मध्वनाथ म्हणतो वाटे मला खेद हा॥

अमृतराय आपल्या एका पदात म्हणतो[३७].—

किती रे! नटसी?। काय यमासी उत्तर देसी? ॥ धृ ॥
...... ....... .............

छादार छबिला गुलजार दिससी। पानें खावुनि मुख रंगविसी॥
दात विचकुनि उगाचि खदखद हससी.॥
...........................

समज धरी तूं व्यर्थ गाढवा! फिरसी.॥
...........................

अमृत म्हणे यमासमोर नेतिल तुजसी.॥

त्याकाळीं भोंदू हरिदास व बुवाबाजी करणारे भोंदू साधूही होते.

---

३६ गुब्बी. मध्वमुनीश्वराची कविता. श्लोक. ४४६, ५, पृ. १३१–१३२

३७ ओक. महा, कावि. अमृतरायकृत कविता स. पद, ७८, पृ. १३८–१३९

मध्वमुनीश्वर व अमृतराय यांनीं त्याच्यावर चागलेच कोरडे ओढले आहेत. भोदू हरिदाससंबंधीं मध्वमुनीश्वर म्हणतात.[३८]:—

आपण म्हणवितो हरिदास । करितो संतांचे उपहास ।
जिकडे तिकडे वरपग । कोठें नाहीं रसरग[३९] ॥

आणि भोदूसाधूचे वर्णन त्यानीं पुढीलप्रमाणे केलें आहे[४०]

माथा टोप गळ्यात येक कफनी रगीत काठी करी ।
डोळे झाकुनि भस्म लावुनि बसे शिष्यीण सेवा करी ॥

अमृतरायाने भोदू सन्याशाचे वर्णन पुढील पदात केले आहे.[४१]

या संन्यासा काय म्हणावे ? ॥ धृ. ॥
डोई मुडुनि भगवे गुंडुनि । पिशवींतील द्रव्यासि गणावे
.................... ..................
अमृतराय म्हणे या कपटपट्टूच्या । का न म्या तोडात हणावें ?॥

एकदरींत श्रीधरकालीन महाराष्ट्रास सुखदुःख, अस्वास्थ्य, स्थैर्य, परकीय आक्रमण, स्वराज्यसुख अशा विविध परिस्थितींतून जावे लागल्यामुळे तत्कालीन वाङ्मयास ससार आणि परमार्थ याचे सारख्याच प्रमाणात वर्णन केलेले आढळते.

---

३८ गुब्बी. मध्वमुनीश्वरांची कविता. घनाक्षरी, ४३९, ३, पृ १२९.

३९ गुब्बी. मध्वमुनीश्वराची कविता. घनाक्षरी. ४३४,३,पृ. १२८

४० गुब्बी. मध्वमुनीश्वरांची कविता. श्लोक. ४४६,२, पृ. १३१

४१ ओक. महा.कवि. अमृतरायकृत कविता स.,पद,१५४,पृ.१६७

* * *



# श्रीधराचें प्रयाण

प्रयाणकाले मनसाऽचलेन । भक्त्या युतो योगबलेन चैव ॥
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् । स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥[1]

( १ ) श्रीधराचीं शेवटचीं अकरा वर्षे, ( २ ) श्रीधराचा चतुर्थाश्रम, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष व भ्रमनिरसन, ( ३ ) श्रीधराच्या समाधिकालाचा निर्णय, (४) समाधिमंदिराचे छायाचित्र व शब्दचित्र

१. मागे चवथ्या प्रकरणात श्रीधराच्या गृहस्थाश्रमाचे व त्याच्या दिनचर्येचें वर्णन आलेच आहे. दत्तात्रय, ब्रह्माजीपंत, रंगनाथ, आत्यास्वामी वगैरे श्रीधराच्या कुळातील पुरुष दीर्घायुषी होते सत्तर बहात्तर वर्षांची त्यांची जीवनयात्रा होती. श्रीधराचे आयुर्मानही त्याच मर्यादेचे होते. ' शिवलीलामृत 'ही त्याची शेवटची ग्रंथरचना होय. हा ग्रंथ त्याने शके १६४० मध्ये लिहिला तदनंतर त्यानें कोणताही ग्रंथ लिहिल्याचे आढळत नाहीं पण या काळपर्यंत त्याने सुमारें पाऊणलाख कविता लिहून टाकली असल्यामुळे उत्तम 'आख्यानकार' व 'कवि' म्हणून त्याची

१ गीता. ८, १०

कीर्ति महाराष्ट्रभर दुमदुमून राहिली होती, यावेळीं तो साठीच्या घरात आला होता. तदनतरचीं दहा अकरा वर्षे त्यानें बहुधा पढरींतच कथा-कीर्तनात व भजनपूजनात घालविलीं असावीं. त्यानें सर्व तीर्थयात्रा पूर्व-वयातच केल्याचें मागें सागितलेंच आहे.[२] हा काल त्याला मोठ्या आनदाचा व सुखाचा गेला असावा. नित्य पंचमहायज्ञादि ब्रह्मकर्माचे यथासाग आचरण, अतिथि-अभ्यागताचे स्वागत, मृदुभाषिणी काता, प्रपचभर शिरीं घेणारे चंद्रसूर्यासारखे तेजस्वी व सच्चरित सूनुद्वय, सिवराम, मध्वमुनि, मानपुरी, गिरिधर या सन्मित्रांचा समागम, एकनाथ, सामराज, आनन्दराव, हिन्दुराव व सकोजी अशा सच्छिष्याची मादी, विठ्ठलमदिरात काकडआरती शेजारतीचा अग्रमान, रात्रौ भक्तजनाच्या व प्रचड श्रोतृ-वृंदाच्या तल्लीन गर्दींत होणारा कथाकीर्तनाचा रग, अखड नामस्मरण व देही असून विदेही स्थिति, अशा प्रकारें हीं वर्षे त्याचीं गेलीं असावीं. "अवघाचि ससार सुखाचा करीन, आनदे भरीन तिन्ही लोक" या तुकोबारायाच्या उक्तीचा अनुभव श्रीधराने वर वर्णिल्याप्रमाणें खास अनुभविला असावा. चाऱ्ही पुरुषार्थ सपादून व कृतकृत्य होऊन देवाज्ञा होताच या पंचभौतिक कलेवराचें विसर्जन करण्याच्या तो तयारींत होता. याच्या सत्किर्तीचा व साधुत्वाचा डंका श्रीमत शाहू छत्रपति महाराजापर्यंत पोंचला होता. त्यानीं मौजे टाकळी गाव श्रीधरास राज्याभिषेक शके ५५ मध्यें इनाम दिला. "हे भले थोर सत्पात्र, याचे चालविल्या स्वामीस श्रेयस्कर यैसे जाणून" श्रीधरास हें इनाम दिलें आहे. ही सनद श्रीधराच्या अलौकिक सद्गुणाची साक्ष देत आहे.[३]

---

२ श्रीधर. च. आणि का. भा. १, प्र. ३, पृ. ५१

३ श्रीधर. च. आणि का. भा. १, प्र. ८

२. श्रीधराच्या सन्यासग्रहणासबधीं अनेक वर्षे फारच गैरसमज पसरला होता. त्याचा इतिहास मोठ्या मौजेचा आहे, म्हणून तो पुढे सक्षेपाने देण्याचे योजिलें आहे. कारण थोरामोठ्याकडून एकदा एखादी चूक घडली कीं, तिचे अधानुकरण पुढे कसे एकसारखे होत जातें याचें हे उत्तम उदाहरण आहे. श्रीधराचा आजा 'दत्तानद' व पिता 'ब्रह्मानद' यानीं संन्यासदीक्षा घेतल्याचा लेखी पुरावा श्रीधराच्या ग्रथात सांपडतो तसा श्रीधराच्या सन्यासासबधीं मिळत नाहीं. असो. तो इतिहास असा.—

( १ ) इ. स. १८५४ मध्ये रसिकवर पडित परशुरामतात्या गोडबोले यानीं आपल्या 'नवनीता'च्या आवृत्तींत श्रीधराने चौदाव्या वर्षी संन्यास घेतला व त्याची समाधि पैठणास आहे, अशा दुहेरी चुकीचे विधान केले; त्यास त्यानीं कसलाही आधार दिला नव्हता. ते त्यानीं कसें केले हें एक त्याचें त्यासच ठाऊक! पण 'बाबा वाक्यं प्रमाण' या म्हणीप्रमाणें त्याची पुनरावृत्ति कशी होत गेली पहा.

( २ ) इ.स.१८६०मध्ये मुंबईचे रामचद्र जनार्दनजी यानीं 'कवि-चरित्र' या नावाचा ग्रथ प्रसिद्ध केला. त्यात श्रीधराच्या चरित्रात वरील दोन्ही चुका जशाच्या तशा त्यानीं छापल्या.

( ३ ) इ. स १८९६ मध्ये पुराण प्रकाशक मडळीने मुंबईस श्रीधराचा 'रामविजय' ग्रथ छापला. त्यातील प्रस्तावनेत श्रीधराचें चरित्र देताना 'त्यानें चौदाव्या वर्षी सन्यास घेतला' असे लिहिले. मात्र "याचें कारण समजत नाहीं" अशी शंका प्रदर्शित केली.

( ४ ) इ. स. १९०७ मध्ये द. अ. आपटे यानीं 'श्रीधराच्या चरित्रात' वरील दोन्ही गोष्टींचा पुनरुच्चार केला.[४]

---

४ आपटे. क. च., ख. २, भा. २

( ५ ) सन १८५४ते१९०९ पर्यंतच्या 'नवनीता'च्या ज्या आवृत्त्या निघाल्या त्यात त्या चुका तशाच पुन्हा येत गेल्या.

( ६ ) सन १९११ मध्यें का. ना. साने यानीं भा. इ. सं. म. शके १८३३ च्या अहवालात श्रीधर गृहस्थाश्रमी होता, त्यास मुलेबाळे होतीं हें शाहूमहाराजाच्या रा.श.५९ च्या सनदेवरून सिद्ध केले;[५] आणि श्रीधराने आपल्या परपरेस अनुसरून आतुरसन्यास घेतला असेल, असें सूचित केले; म्हणजे सन्यासग्रहणाचा समज कायमच होता.

( ७ ) सन १९१४ मध्ये साने यानी विविधज्ञान विस्ताराच्या जानेवारी अकात एक विस्तृत लेख लिहिला. त्यात त्यानीं सन्यासग्रहणाच्या समजाविरुद्ध पुढील गोष्टी दिल्याः—

( अ ) नाझरेकर लोक म्हणतात कीं श्रीधराने मुळींच सन्यास घेतला नव्हता.

( ब ) श्रीधराची 'गोसावी' पदवी पूज्यत्वदर्शक आहे, 'सन्यासदर्शक' नाहीं.

( क ) सन्यासानतर " श्रीधरानद " असे त्याचे नाव व्हावे, पण तसे ते नाही

( ड ) पढरपुरची समाधि पण पूज्यभावानें बाधलेली आहे. अग्निदग्ध कलेवरावर जातिपरत्वे, समाधि, छत्री, किवा वृदावन बाधण्याची चाल आहे.

( ८ ) इ. स. १९१८ मध्ये वरील लेखानुसार 'नवनीता'त दोन्ही चुका सुधारल्या गेल्या.

५ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ८

( ९ ) इ. स. १९१९ मध्ये भावे याचे 'महाराष्ट्र–सारस्वत' प्रथम अवतरलें. त्यात श्रीधराने सन्यास घेतल्याचा पुढील पुरावा त्यांनीं दाखल केला:[६]—

श्रीधरानें ' राधाविलास ' व ' तत्वगीता ' हे सस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. दुसऱ्याच्या शेवटीं असा श्लोक आहे:—

ब्रह्मानदप्रसादेन तत्त्वगीता प्रकाशिता ।
श्रीधरानदनाम्ना वै सर्वलोकहिताय च ॥

इति श्रीआनंदसाप्रदायभूषण श्रीब्रह्मानदपुत्रश्रीधरानदेन विरचिता तत्त्वगीता समाप्ता ॥ म्हणजे श्रीधरानें सन्यास घेतल्याचा हा बिनतोड पुरावाच त्यानीं पुढे माडला.

( १० ) इ. स. १९२३ मध्यें ' नवनीतातली ' चूक १९१८ त सुधारली गेली होती तरी रा. भि. जोशी यानीं आपल्या " मराठी भाषेची घटना " या पुस्तकांत चरित्र देताना "श्रीधरानें उतार वयात संन्यास घेतला, कारण त्यास 'श्रीधरस्वामी' म्हणत " असे प्रसिद्ध केलें.[७]

( ११ ) इ. स. १९२३ मध्यें सी. वा. पेंडसे यानीं आपल्या ' रस-तरागिणींत ' 'श्रीधराने अल्पवयात संन्यास घेतला व त्याची समाधि पैठणास आहे' असेंच निःशकपणे छापले.[८]

( १२ ) सन १९३५ त वा. कृ. भावेही श्रीधराने संन्यास घेतला असे म्हणतात.[९]

---

६ भावे. म. सा. पृ. ३३६ (तळटीप)

७ जोशी, (रा. भि.) म. भा. घ., पृ. २७२

८ पेंडसे. 'रसतरंगिणी', पृ. १७१

९ भावे. 'पे. का. म.', पृ. ११३

पूर्वपक्षाचा असा हा थोडक्यात इतिहास आहे. आता उत्तर-पक्षाकडे वळू विनायकराव भावे याच्याशिवाय इतर सर्वांच्या चुका नवनीतावर आधारलेल्या आहेत. आणि आता नवनीतातच त्या सुधारल्या गेल्या असल्यामुळे त्याचा विचार करण्याचे कारण नाहीं. भावे याचे आप्त-वाक्य म्हणून प्रमाणही असलें तरी त्याच्या विरुद्ध पुढील गोष्टी असल्या-मुळें ते स्वीकारता येत नाहीं. त्या गोष्टी अशा :—

( अ ) भावे याच्या विधानास प्रत्यतर पुरावा नाहीं. इतर सशो-धकास व मलाही श्रीधराच्या दप्तरात "तत्त्वगीता" आढळली नाहीं. तो ग्रथ प्रसिद्ध नाहीं व त्याची नक्कलही कोठे असल्याचें विदित नाहीं.

( ब ) तत्त्वगीतेबरोबर उल्लेखिलेला "राधाविलास" मला आढळला, पण तो सस्कृतात नाहीं. मराठींत आहे. स्फुट प्रकरणात तो दर्शविला आहे.[१०]

( क ) वरतीं कलम ७ मध्ये नाझरेकर म्हणतात त्याप्रमाणें श्रीधराचे पंढरपुराचे वशजही श्रीधराने सन्यासग्रहण केलें नव्हतें असेंच सागतात.

( ड ) 'स्वामी' किवा 'गोसावी' ही पदवी संन्यासाची निदर्शक नसून पूज्यत्वाची आहे. 'गोसावी' आडनावही प्रसिद्ध आहे.

( इ ) भावे याच्या उताऱ्यातील "आनंदपद" सन्यासत्वाचेंच निदर्शक आहे असे म्हणता येत नाहीं. कारण सिवरामानें ( सदानंद ) त्यास 'आनंद सप्रदायाचें भूषण' असें आपल्या पत्रात म्हटलें आहे;[११]

---

१० श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ११

११ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ४, पृ. ६०

आणि संक्रोबाने तर आपल्या पत्रात त्यास ' श्रीधरानद ' व आपल्यास 'शकरानंद' असें म्हटले आहे, व 'स्वानदपंजरीं क्रीडे निरहकृति कीरवोजा' असे त्याचें स्पष्टीकरण केले आहे.[१२] म्हणून तत्त्वगीतेच्या अखेरच्या श्लोकातील " श्रीधरानद " पद याच अर्थाचे समजलें पाहिजे.

( फ ) शिवाय " आनदसंप्रदायभूषण " अशी स्वतः प्रौढी मिरविणे श्रीधराच्या विनयशील स्वभावाविरुद्ध आहे. श्रीधराच्या कोणत्याही सस्कृत–प्राकृत ग्रथाच्या शेवटीं अशी प्रौढी मिरविलेली नाहीं. तेव्हा ती रुढीविरुद्धही आहे म्हणून निगमन हेच कीं " तत्त्वगीता " हा ग्रथ अस्तित्वात असल्यास निदान त्याच्या शेवटचा वर दिलेला मजकूर एखाद्या नकलाकाराने श्रीधराच्या गौरवार्थ घातला असेल. तो ग्रथच उपलब्ध नसल्यामुळे तो श्रीधराचा का दुसऱ्या कोणाचा हे ठरविण्यास काही साधन नाहीं. एवच भावे याचा संन्यासग्रहणासबधीचा पुरावा निर्णायक नाहीं अतएव तो ग्राह्य नाहीं. पण श्रीधराच्या दप्तरात मला आणखी एक विश्वसनीय पुरावा मिळाला आहे त्यावरून श्रीधराने सन्यास मुळींच घेतला नव्हता ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते. तो असाः—

श्रीधराचा पणतु मनोहर याने एका बाडात लिहिलेली " श्रीधर–समाधिकथा " मला आढळली. तिचा साराश पढे दिला आहे.

" श्रीधरसमाधिकथा "

प्रारभीं ' भूप्राणाग ' इत्यादि श्रीधराच्या समाधीचा कालदर्शक सस्कृत श्लोक दिलेला आहे :—

" श्रोतयानि केला प्रश्न । श्रीधर समाधी कथा सपूर्ण ।
ते आम्हा करवि श्रवण । तरी सावधान परिसीजे ॥ " इ.

---

१२ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ४, पृ. ६३

असा आरंभ करून त्याने आपली परंपरा दिली आहे. मग—"ब्रह्मानदाचा पुत्र श्रीधर। तो विष्णूचा अवतार।" असे सांगितलें आहे. यानंतर रंगनाथाच्या प्रसादानें श्रीधरास सरस्वती कशी प्रसन्न झाली ही दतकथा थोड्याशा फरकाने त्याने दिली आहे. तिची अग्राह्यता मागेच सिद्ध केली आहे.[१३] नंतर एका चाभारानें विठोबासाठीं केलेल्या जोड्याची व श्रीधराची अशी दुसरी दतकथा दिलेली आहे. ही फारशी प्रसिद्ध नाहीं म्हणून तिचें दिग्दर्शन करतो. पुत्रप्राप्तीसाठीं एका चाभारानें विठोबास जोडा अर्पण करण्याचा नवस केला. पुत्र झाला चाभार जोडा घेऊन नवस फेडण्यास गेला. बडव्यानी त्याचा निषेध केला. कष्टी झाला. रात्रीं स्वप्नांत विठोबा आला. 'तो जोडा श्रीधरास दे. मीच त्याच्या रूपाने अवतरलो आहे' असें त्याने त्यास सांगितले. दुसरे दिवशीं चाभार जोडा घेऊन श्रीधराकडे गेला. दृष्टांत झाल्याविना जोडा घेत नाहीं असें श्रीधर म्हणाला. पुढे त्यास दृष्टांत झाला व त्याने चाभाराचा जोडा स्वीकारला अशी ही कहाणी आहे. आजकालच्या चिकित्सक युगात या चमत्कारावर कोणीही विश्वास ठेवणार नाहीं हे खरे. पण श्रीधराची साधुवृत्ति व भूतदया पाहून चाभारानें श्रीधरास प्रेमभावाने तो जोडा नजर केला असेल. इतका सत्यांश या दतकथेत असण्याचा पुष्कळ संभव दिसतो. बाकीची कविकल्पनेची इमारत भोळ्या भाविकास रिझविण्यास ठीक आहे.

श्रीधराने पुढे काहीं दिवसानीं विठोबाजवळ देवाकडे जाण्याची आज्ञा मागितली. ती त्यानें दिली.

" तव दुर्जन म्हणती अपूर्व।
स्वामी हें नाव तुम्हांसी कैसें पै म्हणावें " ॥ ४० ॥

१३ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. २, पृ. १४–१८

या आक्षेपाच्या निराकरणात मनोहर म्हणतो:—

" देवाचे जे नाव घेती । ते पुर्विच सन्यासी असती ।
तयासी सन्यासवृत्ती । धरावी यैसी कोण मत ॥ ४१ ॥
सीखा उपटुन टाकिती । यज्ञोपवीत तोडिती ।
पाढरी ते भगवीं करिती । काम चित्तीं जळतसे ॥ ४२ ॥
कामक्रोधाचा विटाळ । तोच सन्यास धर्म केवळ ।
जयासी भेटे तमाळनीळ । तोचि धन्य तिहीं लोकीं ॥ ४३ ॥
( ' सन्यासी ' पाठातर )

विठोबाकडून आज्ञा झाल्यावर श्रीधरानें शके १६५१ मध्ये सोम वारीं माघ वद्य तृतीयेला ब्राह्ममुहूर्तावर प्रयाण केले. त्यानें प्रथम देवदर्शन घेऊन साधुसतांचा शेवटचा निरोप घेतला, रात्रीं दत्तात्रय, रमावर, उमावर, यम, वरुण, कश्यप, बृहस्पति, अग्नि, जमदग्नि, विश्वामित्र, गौतम वसिष्ठ, नारद, वगैरे समस्त देव व ऋषि भेटीस आले. हात जोडून त्यानीं श्रीधरास निजधामास चलण्याचे आमत्रण दिलें. नतर या प्रकरणाच्या प्रारंभीं जो गीतेचा श्लोक दिला आहे त्यात वर्णिल्याप्रमाणे त्यानें आपल्या पंचभौतिक कलेवराचा त्याग केला. पुढें त्याच्या महायात्रेचें वर्णन मोठ्या थाटानें केलेलें आहे. अरुणोदयाबरोबर संताची मादी मिळाली. टाळ मृदग व नाना वाद्याचा गजर सुरू झाला.

" वाजी वारण पालख्या बहुतुरे वाद्ये पुढें वाजती ।
देवा प्रार्थुनि बाहेरी आणियलें श्रीचद्रभागेप्रती ॥
तों दाहात धावली आडविते भेटीस भागीरथी ।
सर्वे पढरिनाथजीसह पहा सीताजलीं नाहती ॥ "

अशा थाटानें सर्व मंडळी आली. भागीरथीचें पाणी आवडीनें दहा

हात वर चढलें. सर्वांनीं स्नान केल्यानतर संतमंडळीनें श्रीधराच्या कले-वरास अग्नि दिला.

तो तीजे दिवशीं भरावया राख । मिळाले पुत्र सत सकळिक ।
तर तेथ येक कवतुक । सकळीं देखिले तें ऐका ॥ ५६ ॥
दड , कमडलु आणि छाटी । निघाली सर्वा देखत ।
दुर्जना आश्चर्य वाटे पोटीं । सज्जन मनीं आनद थोर ॥ ५७ ॥
असो छाटी आदिकरून । समाधि स्थापी नारायेण ।
वाळवंटीं अद्यापि जान । समाधिस्थान असे पै ॥ ५८ ॥

दत्तात्रयानें पहिल्या पुण्यतिथीला मोठा उत्सव केला. समाधींतून अश्वत्थ झाड निघालें. ते त्यानें समाधीपुढें लावले.

" मनोहराचा अच्युतानंद तयाचा सुत मनोहर मी " असें तो सागतो.

श्रीधरे हेंचि वर्णविले । तेणेच आपलें सिद्धी नेलें ।
तयासी हें पावो वहिले । मीपण सर्वथा नसेची ॥ ६४ ॥
इति श्रीधरसमाधि संपूर्ण । जाली सत कृपेकरून ।
मनोहर वदी श्रीधराचे चरण । वेळो वेळा ॥ ६५ ॥

पुढें त्यानें श्रीधराची आरती लिहिली आहे. तिचा थोडासा भाग असा:—

जयदेव जयदेव जय जय श्रीधरा । आरती ओवाळूं तुज गुरुराया ॥...
मनोहर स्वामी श्रीधरवरदा । शरण शरण शरण तुज गोविंदा ॥इ.

शके १७४४ चित्रभानुनाम सवत्सरे चैत्र मासे शुक्ल पक्षे नवमी ते दिवशीं श्रीधरस्वामी चरित्र समाप्त.

—९७

श्रीधराचे हे समाधिवर्णन त्याचा पणतु 'मनोहर' याने शके १७४४ मध्ये म्हणजे श्रीधराच्या मृत्यूनतर जवळ जवळ शभर वर्षांनीं केले आहे. श्रीधर हा विष्णूचा अवतार होता ही जी त्याच्या कुळात परपरेनें चालत आलेली भोळी भावना तीस अनुसरून हें वर्णन आहे., यात अंधश्रद्धा आहे व कविकल्पना सुलभ अशी अतिशयोक्ति पण आहे. आजच्या चिकित्सक व बुद्धिप्रधान युगात अशा वर्णनाकडे कोणी ढुकूनही पहाणार नाहीं. पण ती अगदींच टाकाऊ नाहीं. तिच्यात जो सत्याश आहे तो अवश्य ग्रहण केला पाहिजे कारण तो बुद्धिवाद्यासही पटेल असा आहे. तो हाः—

( १ ) श्रीधराने आपल्या कुलपरपरेस अनुसरून सन्यास घेतला नाहीं याबद्दल त्याच्या प्रयाणानतर जनापवाद सुरू झाला, व तो त्याच्या मागें सारखा शभर वर्षे वाढतच गेला ( खरोखरीं त्र्याण्णव वर्षे )

( २ ) सुमारें शभर वर्षांनतरही त्याच्या पणतवास त्याचें निराकरण करणें अवश्य वाटले. हे काम त्याने त्या काळानुरूप मोठ्या चतुराईने केले आहे. श्रीधर हा विष्णूचा अवतार होता, या दंतकथेचा आश्रय घेऊन त्यावर कविकल्पनेचें सुदर आवरण घालून राखेतून निघालेल्या छाटी–दड–कमडलूच्या चमत्कारवर्णनाने जनापवादाचे तोंड त्याने बद केले आहे.

( ३ ) श्रीधराचें कलेवर संन्याशाच्या कलेवराप्रमाणे मिठात पुरले गेलें नाहीं, तर ते संन्यास नं घेणाऱ्या सामान्य जनाच्या कलेवराप्रमाणे अग्निदग्ध केलें गेले. यावरून श्रीधराने सन्यास मुळींच घेतला नव्हता ही गोष्ट अगदीं निःसंशय सिद्ध होत आहे.

साराश का. ना. साने यानीं बरीच 'भवति न भवति' करून

श्रीधराने संन्यासग्रहण मुळींच केले नव्हतें असें जे अनुमान काढले होतें त्यास हा प्रत्यतर पुरावा मिळाला असल्यामुळे तें आज निर्विवाद सिद्ध झालें आहे; आणि त्यामुळें आज सुमारे शभर वर्षे चाललेला गैरसमज कायमचा दूर झाला आहे.

३. श्रीधराचा समाधिकालः—श्रीधराचा जन्मकाल जसा शके १६०० हा चुकीचा मानला गेला तसाच त्याचा समाधिकाल शके १६५० हाही चुकीचा प्रसृत होत गेला. मागे उल्लेखिलेल्या सर्व मडळींनीं व डॉ. केतकरानींही नवनीताचा कित्ता गिरविला[१४] का. ना. साने यास सन १९११ पर्यंत खऱ्या कालाचा निर्णय झाल्याचे त्याच्या विविधज्ञानविस्तारातील लेखावरून दिसत नाहीं. ते लिहितात ' नवनीतात श्रीधराचा जन्म शके १६०० व मृत्यु शके १६५० असे लिहिलें आहे. पण त्यास लेखी पुरावा नाहीं. ' त्याची सत्यान्वेषणाची चिकाटी माठी जबर ! त्याना अधिक माहिती मिळवून विविधज्ञान विस्तार १९१४ जानेवारीच्या अकात ' श्रीधरस्वामी पुनः एकदा ' हा लेख प्रसिद्ध केला. त्यात त्यानीं श्रीधराच्या समाधीवरील खडित लेख छापला तो असाः—

ओळ १ लीः—श्रीगणेशायनमः।। XXशुभ शके सौम्याख्य सौ XX
ओळ २ रीः—XXXX तिथौ ब्राह्मे मुहूर्ते X X X ।। भी-
ओळ ३ रीः—मातीरतटे सुपंढरपुरे श्रीविठ्ठलाधिष्ठिते ।। श्री.
ओळ ४ थीः— मत् श्रीधर सद्गुरू XX सच्चित् समाधौ स्थितः ।।

यावरून श्रीधराचा समाधिकाल शके १६५१ सौम्यनाम संवत्सरे

१४ केतकर. 'ज्ञानकोश', भा. २०, 'श्रीधर', पृ. (श) ९७

असा ठरतो असे त्यानी प्रतिपादन केले. यावर ग्वाल्हेरचे लक्ष्मण विसाजी वैद्य यांनीं विविधज्ञान विस्ताराच्या मे १९१५च्या अकात शिलालेख खंडित असल्यामुळे प्रमाणार्ह नाहीं असा आक्षेप घेतला. यानतर भा. इ. स. मंडळाच्या वा. इतिवृत्त शके १८३७ च्या १७६ व्या लेखात श्रीधरपुत्र दत्तात्रय याची आरती देऊन श्रीधर शके १६५१ सौम्यनाम संवत्सरी माघ वद्य तृतीयेला सोमवारीं समाधिस्थ झाला असें पा. न. पटवर्धन यानीं सिद्ध केले. त्या आरतींतला महत्त्वाचा उतारा पुढे दिला आहे:—

जयदेव जयदेव श्रीधर गुरुस्वामी ।
जडजीव पावन जाले तव गुणरुपनामीं ॥ ध्रु ॥
सुमाघ वद्य त्रितिया शशिवासर उदई ।
सुसौम्यवत्सरीं सौम्यायनि विठ्ठलपाई ।
सोळाशत एकावन अर्यमउडुसमई ।
पढरपुर सत्क्षेत्रीं समाधि ते ठाई ॥ १ ॥
दत्तात्रयवर श्रीधर नृपत्रिकुटाचळिचा ॥ ३ ॥ इ. इ.

हा उतारा इतिहासाच्या कसोटीस उतरतो व पुण्यतिथि ही याच दिवशीं पाळली जाते असे प्रतिपादन करून पटवर्धनानीं वरील आक्षेपास उत्तर दिले. पण शिलालेख खडित. तो लेख घटनेचा कशावरून नसेल ही वैद्याची शका शिल्लक राहिलीच. तिचे उत्तर असे :—

ता. २५ एप्रिल, सन१९४१ रोजीं पढरपुरात रा. कृष्णाजीपंताकडे श्रीधराचें दप्तर चाळीत असता एका बाडात " श्रीधरस्वामी प्रयाण-काळ " अशा ठळक मथळ्याखालीं पुढील श्लोक मला आढळला. त्याची पुनरावृत्तिही इतर बाडात जागोजागीं झालेली दिसली.

भूप्राणागमही मिते शुभ शके सौम्याब्द सौम्यायने ।
माघे मासि असिते द्विजे गुणतिथौ ब्राह्मे मुहूर्ते यमे ॥
भीमातीरगते सुपढरपुरे श्रीविठ्ठलाधिष्ठिते ।
श्रीमत् श्रीधर सद्गुरु सुखघनः सच्चित् समाधौ स्थितः ॥ १ ॥

[ भू=१; प्राण=५; अग=६; मही=१ 'अंकाना वामनो गतिः' या नियमानें शक १६५१ येतो. सौम्यायने=उत्तरायणे; असिते=वद्य; द्विजे=पक्षे; गुणतिथौ=३ तीया, ] वरील आरतीपेक्षां या ठिकाणीं श्रीधराचा निधनकाल शास्त्रोक्त पद्धतीनें दिलेला आहे. खंडित शिलालेखाची समस्यापूर्ति अगदीं बरोबर रीतीने या श्लोकाने होत आहे. नव्हे, समाधीवर कोरलेला श्लोक तो हाच, व तो प्रथमच प्रसिद्ध होत आहे. एवंच श्रीधराचा जन्मकाल शके १५८०, समाधिकाल शके १६५१, त्याच्या समाधीचे स्थान पढरपूर आणि त्याने सन्यासग्रहण मुळींच केलें नव्हतें या गोष्टी आता अगदीं निर्विवादपणें सिद्ध झाल्या आहेत.

४. इतक्या ऊहापोहानंतर श्रीधराच्या समाधिमंदिराचें दर्शन वाचकांस घडवून देणें अगदीं क्रमप्राप्तच आलें. म्हणून त्याचे छायाचित्र बाजूस देऊन शब्दचित्र खालीं दिले आहे.

" या समाधिमदिराचा चौथरा सुमारे चार फूट उच व आठ फूट रुद असा आहे. यावर एक लहानशी पण सुदर समाधि बांधली आहे. तिची उंची सुमारे पाच फुटाची आहे. समाधीस वरतीं घुमटासारखा आकार नसून चौकोनीच आहे. आत पादुका नसून शंकराची पिडी आहे. हिची नित्य पूजा होत असते. अनेक स्त्रीपुरुष सकाळ सध्याकाळ दर्शनार्थ येऊन प्रदक्षिणा घालतात. समाधीच्या देवळीबाहेर चार कोपऱ्यांवर गणपति, विष्णु वगैरे चार देवताचीं पाषाणमय चिन्हें आहेत. पुण्यतिथीच्या दिवशीं

दरवर्षी येथें मोठा उत्सव होत असून त्यांत भजन, कीर्तन व अन्नसतर्पण होत असते. या समाधीसमोरच सुमारे वीस फुटावर त्याच आवारात पण नदीकडील बाजूस ब्रह्मानदाची समाधि आहे. ती अगदीं लहान असून जीर्ण झाली आहे. आत एका मोठ्या पाषाणावर नृसिंहाची मूर्ति कोरलेली असून तिला शेंदूर लाविलेला आहे. तिच्याजवळ गणपतीची मूर्ति व पादुका आहेत. येथेही नित्य पूजा होत असते. या समाधींच्या दोन्ही बाजूंस आषाढी कार्तिकीस येणाऱ्या यात्रेकरूकरता पत्र्याच्या छपराच्या खोल्या बाधलेल्या आहेत. त्याच्या मागे एका मराठा कुटुंबास रहाण्याची सोय केली आहे. तेथील झाडलोट व देखरेख त्याच्यावर सोपविलेली आहे. त्यानीं सर्व जागा स्वच्छ व नीटनेटकी ठेविली आहे.

श्रीधराने आपल्या पित्याच्या समाधीचे वर्णन असे केले आहे:—

श्रीधर म्हणे पंढरीये भीमातटीं । स्वामी माझा वाळवंटीं ।
समाधिस्थ जगजेठी । ब्रह्मानद यतिराज ॥[१५]

पण आज तेथे वाळवट नाहीं. दोनअडीचशे वर्षांत चंद्रभागेच्या पात्राचा ओघ पुष्कळच पलीकडे सरकलेला आहे, व खोल झालेला आहे. समाधीजवळ उभे राहून समोर दृष्टिक्षेप केला तर खालीं चद्रभागेचें प्रशस्त पुलीन दुरवर पसरलेलें दिसते. आणि पलीकडील झुळझुळ वाहणारा सूक्ष्मतर जलप्रवाह चद्रभागेचा रुणझुणणारा कमरपट्टाच आहे कीं; काय असा भास होतो. त्यातून चिमुकलीं शिडें लावून चालणाऱ्या चिमुकल्या नावाचा देखावा नयनमनोहर दिसतो. हे दृश्य भर्तृहरीच्या "शरदि सरितः श्याम पुलिनाः । तनिम्ना शोभन्ते" इत्यदि श्लोकाची आठवण करून देतें. पैल तीरावरील गुजरांची विशाल धर्मशाळा व तिचा लतापल्लवानीं

१५ ज्ञा. च. २, २६१

सुशोभित झालेला परिसर वरील चित्राला अधिकच रम्यता देतो. एवंच बिंदुक्षेत्रीं[१६] असलेल्या या सत्‌शील पितापुत्राच्या समाधींनीं त्या स्थानाच्या शुचितेत व पवित्रतेत भरच पडली आहे. पंढरीस जाणाऱ्या यात्रेकरूनें या पवित्र स्थळाच्या दर्शनाची संधि अवश्य साधावी.

आता पुढील प्रकरणीं श्रीधरानतर त्याची कौटुबिक स्थिति कशी होती इकडे वळूं.

---

१६ पाडुरग मा. ९, ४८; पढरी. मा. १५, २३

* * *




## श्रीधरानंतर व आज

मरे एक त्याचा दुजा शोक वाहे ।
अकस्मात तोही पुढे जात आहे[1]॥

(१) श्रीधरानतरची कौटुबिक स्थिति व राजाश्रय, (२) दत्तात्रय व मनोहर याची विभक्तता, (३) अवधूताचा समाधिकाल, (४) श्रीधराचा विद्यमान वश, (५) श्रीधराचा अद्ययावत् वंशवृक्ष व छायाचित्र.

१. श्रीधरास दत्तात्रय, मनोहर व रगनाथ असे तीन पुत्र असल्याचें मागेंच सागितले आहे. पैकीं रगनाथ हा सन १७३३ च्या पूर्वीं केव्हा तरी मयत झाला असावा या गोष्टीचाही उल्लेख केला गेला आहे.[2] तेव्हा श्रीधराच्या मृत्यूनतर दत्तात्रय, मनोहर हे दोघे मुलगे व त्याचीं बायकामुलें आणि श्रीधराची पत्नी पार्वती अशी मडळी मागें राहिलीं. यात विशेष खेदाची गोष्ट ही कीं, श्रीधरासारख्या सत्पुरुषाच्या संगतींत

१ रामदास. मनाचे श्लोक. १६.

२ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ३, पृ. ४४

जन्म काढून त्याच्या पत्नीस त्याच्या मागें वैधव्यदुःख भोगावे लागले आहे व मरण नशिबीं नाहीं म्हणून त्या सद्गुणी स्त्रीला अपरपार दुःख झाले असावे हें सहाजिक आहे. पण त्याच्या सुजाण पुत्रासही श्रीधरासारख्या सच्चरित पित्याचा विरह चांगलाच जाणवला व तो त्यांनीं वेळोवेळीं व्यक्तही केलेला आहे. दत्तात्रय एका पदात म्हणतोः—

[ बाड पृष्ठ ३६२ ]

" तो आता श्रीधर भेटेना ॥ ध्रु ॥
सुखदुःख माझे मी कवणा सांगू वो ।
पुरवि जो मन कामना ॥ १ ॥
हितगुज सांगेल रुसल्या बुझाउनी ।
कवण करी समाधान मना ॥ २ ॥
दत्तात्रय गुरु श्रीधरु आणील ।
वाहीन त्या मन सुमना ॥ ३ ॥

यांत दत्तात्रयाची जशी पितृभक्ति तशीच श्रीधराची पुत्रवत्सलता स्पष्टपणे प्रतिबिंबित झालेली दिसते. मनोहरानेही अनेक पदान आपले पितृप्रेम व्यक्त केलेले आढळते. शके १६५१ पासून तो शके १६५९ पर्यंत आठ वर्षे हें सर्व कुटुंब एकत्रातच रहात होतें. त्या सालच्या वाटणीपत्रावरून दत्तात्रय व मनोहर विभक्त झाल्याचे दिसते. पार्वतीबाई कोणाजवळ राहिली व ती कधीं निवर्तली या गोष्टी समजण्यास मार्ग नाहीं. पण वडील मुलगा दत्तात्रय याजवळ ती राहिली असावी. दत्तात्रय व मनोहर हे दोघेही श्रीधरा-प्रमाणेच कथाकीर्तन, पुराण, भजन व काव्यरचना करण्यात आपली काल क्रमणा करीत. प्रपंच वाढता. ठराविक मिळकत कमी. मागे श्रीधरास त्याच्या मरणापूर्वी बरोबर एक वर्ष शाहूमहाराजांनीं टाकळी गावाची सनद

करून दिली होतीच. पण तेथील उत्पन्नावर चरितार्थ चालेना म्हणून उभय बधु साताऱ्यास जाऊन महाराजास भेटले. विनती केली कीं, 'आपण श्रीचें भजन करून स्वामींस व स्वामींचे राज्यास अभिष्ट चिंतून आहों. आपल्या कुटुंबाचे योगक्षेमास एक गाव इनाम करून देऊन वशपरंपरेने चालविलें पाहिजे.' तदनुसार शाहूमहाराजानीं कृपावत होऊन तडवळे गावाची सनद करून दिली. या सनदेप्रमाणे श्रीनिवासपडित प्रतिनिधि व बाजीराव बल्लाळ पेशवे यानीं बिनहरकत वसूल देण्याविषयीं तडवळें गावच्या मोकादमास सनदा दिल्या. हे गाव बार्शीकडे आहे. ही गोष्ट श्रीधराच्या मृत्यूनंतर सुमारें तीन वर्षांनीं म्हणजे स. १७३३ मध्ये घडली. ( सनदेत शि. रा. भि. शक ५९ आहे. )

२. अशा रीतीने हे कुटुंब आणखी चार वर्षें एकत्रात राहिले.पण सन १७३७ ( शके १६५९ ) मध्ये कालप्रभावानुसार दोघे बंधु वर सांगितल्याप्रमाणे विभक्त झाले. वाटणीपत्रातील पार्वतीबाईच्या स्त्रीधनाचा उल्लेख जरी "तोळा मासा"असा असला तरीं तो उपलक्षणात्मकच समजला पाहिजे. कारण श्रीधराची सांपत्तिक स्थिति बरी होती, म्हणून तिचे स्त्रीधन वाटणीपत्रात नमूद करण्याइतकें मोठें होतें असे सहज अनुमान निघते. दत्तात्रयाला 'रामचंद्र' या नावाचा एक पुत्र होता.

दत्तात्रय हा इ. स. १७३७ ते १७४३ च्या दरम्यान केव्हातरी निवर्तला असावा, कारण . स. १७४३–४४ मध्यें बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं मौजे पढरपूर येथे मळा करण्याकरिता वीस बिघे जमीन इनाम दिली.[३] त्या सनदेंत फक्त मनोहर व रामचद्र ( दत्तात्रयाचा

३ भा. इ. स. म., अहवाल, श. १८३३, लेख १३

मुलगा ) या दोघांचींच नावे आहेत. पुढें इ. स. १७५०-५१ मध्ये बाळाजी बाजीरावानें मौजे टाकळी येथील मोकासेबाबत जी सनद दिली त्यात एकट्यां मनोहराचेंच नांव असल्यामुळें 'रामचद्र' हा इ. स. १७४५–५० या दरम्यान केव्हातरी निवर्तला असावा. अशा रीतीने दत्तात्रयाची शाखा त्याचा मुलगा ' रामचंद्र ' याला सतान नसल्यामुळें येथेच खुटली. इग्रजी अमलात ही सनद चालू ठेवल्याचा स. १८६०–६१ मधला हुकूम सर जार्ज रसेल क्लार्क गव्हर्नर याच्या सहीचा आहे. त्यातही मनोहराचेंच नाव आहे वर मळ्यास दिलेल्या जमिनीची पुढील हकीकत अशी आहे कीं, ती सरकारने श्रीधराच्या वशजापासून पढरपुरच्या तलावाकरिता एक हजार रुपयास विकत घेतली. पण पुढें पढरपूर म्युनिसिपालिटीनें नळ आणून पाण्याची व्यवस्था केल्यामुळे तलाव बाधला गेला नाहीं. विद्यमान वशज रा. कृष्णाजीपत यानी ती परत मिळण्याबद्दल अर्ज विनत्या केल्या. पण त्यास यश आलें नाहीं. दत्तात्रयानें सन्यास घेतला नव्हता. एक तर तो अगदीं मध्यमवयाचा असतानाच वारला, आणि त्याचे मतही सन्यासाविरुद्ध होते असे दिसते. दत्तात्रयाचा वशविस्तार खुटल्यामुळे एकट्या मनोहराकडेच सर्व जिंदगीचा वारसा गेला. त्याला 'अवधूत' म्हणून एक मुलगा होता. मनोहराच्या बायकोविषयीं व त्याच्या निधनकालाविषयीं काहीं माहिती उपलब्ध नाहीं.

३. अवधूतानें पुढे सन्यास घेऊन 'अच्युतानन्द' असे नाव धारण केले.[४] याच्या बायकोचें नाव 'लक्ष्मी' होते. अच्युतानन्दास 'मनोहर'

---

४ "श्रीधरानें किवा त्याच्यापुढें त्याच्या वशातील पुरुषाने चतुर्थाश्रम स्वीकारला नाहीं." साने.वि. ज्ञा. वि. १९१४,जाने.पृ.३. हें साने याचे विधान बरोबर नाहीं.

नावाचा एक मुलगा होता. त्यानेच एका ठिकाणीं ही माहिती दिली आहेः—

सत सज्जना नमस्कारी । मनोहर भावे करूनी ॥
अच्युतानद माझा पिता । लक्षुमी नामे माझी माता ।
वदुनि तया उभयता । कथा पुढे चालली ॥५॥
[ बाड पृष्ठ २९ ].

बाडाच्या शेवटच्या पृष्ठावर ‘ अवधूतबाबाचा प्रयाणकाल ’ दिला आहे. पटवर्धन यानीं श्रीधरस्वामींवरील दत्तात्रयाची जी आरती दिल्याचे मागे उल्लेखिले आहे[५] ती आरतीहि त्याच पानावर लिहिलेली आहे.

श्लोक·—सत्रासे पन्नास जाण बरवे फाल्गुणमासी पाहा ।
शुक्लपक्ष त्रयोदसिस तिसरा प्रहरींज जाणा माहा ॥
भूवैकुठ श्रीपढरीनगर हें जाणोनि हें बरे ।
केले स्वर्गप्रयाण ते गुरुवरे अवधूतजीने त्वरे ॥१॥

या श्लोकाची रचना ओबडधोबड व वृत्तदृष्ट्या सदोष आहे हे सागण्याचें प्रयोजन नाहीं पण या श्लोकामुळे ‘अवधूत’ हा शके १७५० मध्ये फाल्गुन मासीं शुक्लपक्षीं त्रयोदशीस तिसऱ्या प्रहरीं इहलोक सोडून गेला हे मात्र निश्चित होत आहे.

४. हा श्रीधराचा पणतु जो ‘मनोहर’ याने आपल्याविषयीं अधिक माहिती दिली नाहीं. त्यास ‘अप्पाजी’ व‘रामचद्र’ असे दोन मुलगे होते. पैकीं ‘रामचद्र’ हा निपुत्रिक होता. ‘अप्पाजीस’ विठ्ठल व कृष्णा असे दोन पुत्र झाले, विठ्ठलास ‘दत्तात्रय’ व दत्तात्रयास ‘महादेव’ अशी ही शाखा

५ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ६, पृ. १००

चालू राहिलेली आहे. विठ्ठल व दत्तात्रय हे उभयता कधीं निधन पावले हे समजत नाही. पण कृष्णा अगदीं लहान असतानाच त्याचे वडील 'अप्पाजी' हे निवर्तले. त्यामुळे परंपरागत आलेली माहिती व दतकथा त्यास काहीएक ठाऊक नाहींत. साप्रत कृष्णाजीपत हेच श्रीधराच्या वशातील वडील असे वशज आहेत. हे सध्या साठीच्या घरात आहेत. महादेवाच्या लहानपणींच त्याचे वडील निवर्तल्यामुळे तो व त्याची आई हीं दोघेजण कृष्णाजीपताजवळच असतात. महादेवाचे वय सुमारे वीस वर्षांचे असावे. कृष्णाजीपतास त्याचे पहिले कुटुंब म्हणजे गगाबाई-पासून 'रामचंद्र' नावाचा मुलगा झाला होता. पण पुढे तो व गगाबाई अशीं दोघे निवर्तलीं. नतर कृष्णाजीपतानीं 'सोनुताई' नावाची दुसरी पत्नी केली आहे. हिच्यापासून कृष्णाजींस नारायण, तुकाराम व गोविद असे तीन मुलगे झाले आहेत. कृष्णाजीपताच्या अगावर लहानपणींच ससाराचें सर्व ओझे पडले त्यामुळे त्याचा विद्याभ्यास फारसा झाला नाहीं. पण त्याचा ज्येष्ठ मुलगा 'नारायण' हा चागला सुविद्य आहे. त्याने काशीस जाऊन वे. शा. स. वासुदेवशास्त्री पुराणिक याजपाशीं व्याकरण, साहित्य, न्याय, मीमासा व धर्म या शास्त्राचे अध्ययन केलें आहे. काशी येथील मीमासा–शास्त्राची साहित्य मध्यमा, बडोदा येथील पुराण मध्यमा व पुणे येथील वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या काव्य, वेदात, मीमासा व धर्मशास्त्र या विषयाच्या परीक्षा त्याने दिल्या आहेत. त्याचप्रमाणे बगाल सस्कृत ॲसो-सिएशनच्या 'काव्यतीर्थ' व 'मीमासातीर्थ' या पदव्या त्यानें मिळविल्या आहेत. म्हणजे श्रीधराच्या मागे सुमारे दोनशें वर्षांनतर त्याच्या वशात 'नारायणशास्त्री' हे जाडे पडित झाले आहेत, ही गोष्ट मोठी अभिनदनीय आहे यात सशय नाहीं. पण जुन्या काळच्या जाड्या सस्कृत शास्त्रीपडिता-

प्रमाणें त्यास मराठीची स्वाभाविक अरुचि आहे. कारण त्याचा ओढा सस्कृत वाङ्मयाकडेच अधिक आहे. तरी सुद्धा माझ्या या आगामी ग्रथाबद्दल त्यानीं १८ नोव्हेंबर १९४६ च्या आपल्या पत्रात विचारणा केली आहे. नारायणशास्त्री याची पत्नी 'सुभद्रा' ही सुशील व सुविद्य आहे. कृष्णाजी-पताचा दुसरा मुलगा 'तुकाराम' हा पचविशींतला आहे तो मराठी सातव्या इयत्तेची परीक्षा पास झाला आहे. त्यास इग्रजी व सस्कृत शिक्षणाचा लाभ झाला नसला तरी त्याला मराठीची आवड असून त्याने श्रीधराच्या दप्तराची चागली माहिती मिळविली आहे. यास 'लक्ष्मी' व 'इदिरा' अशा दोन बायका आहेत. पण यास ससारातील त्रासाने व मेंदूच्या हलकेपणामुळें झटके येत असत, त्यामुळें त्याची वृत्ति थोडीशी उदास झालेली दिसते. तिसरा मुलगा 'गोविंद' हा तर अजून लहा-नच आहे. कृष्णाजीपताचे द्वितीय कुटुब सौ. 'सोनूताई' या फार व्यवहारकुशल असून मायाळू आहेत. यानीं श्रीधराच्या दप्तराविषयीं चागली माहिती करून घेतली आहे. आणि जेव्हा तुकारामास आपल्या दुखण्यामुळे काहीं करवत नाहींसे होते तेव्हा सोनुताई मोठ्या आवडीनें पुढे होऊन पृच्छकापुढें भराभर दप्तरें आणून देतात. या कुटुं-बाचा चरितार्थ इनामी उत्पन्न व उपाध्येपण यावर चालतो. श्रीधराने शके १६३९ मध्यें खरीदलेल्या या छोट्याशा घरात आज दोनशे वर्षां-नतर त्याचे सत्शील वशज सुखासमाधानाने राहात असलेले पाहून मराठी वाङ्मयप्रेमी जनास अपूर्व आनंद व समाधान याचा लाभ खास होतो. मी ज्या ज्या वेळीं तेथें गेलों तेव्हा मला असाच आनद झाला. त्याचा लाभ घरबसल्या इतरास व्हावा या हेतूनें मी श्रीधराच्या घराचें व त्याच्या विद्यमान वंशजाचें छायाचित्र यासोबत दिलें आहे व त्याचा थोडासा परि-चय खालीं दिला आहे :—



श्रीधरस्वामींचे विद्यमान वंशज

घराच्यापुढे अगदीं छोटेसें अगण आहे. त्यांत सवत्स गाय बांधलेली आहे. गाईजवळच सौ. सोनूताई उभ्या आहेत. पलीकडे कृष्णाजीपत बसले आहेत त्याच्या मागें पडित नारायणशास्त्री शाल पांघरून बसले आहेत. ते परपरेने चालत आलेल्या अनेक देवदेवताची पूजा करीत आहेत. सोनू-ताईच्या मागे गोविद व महादेव उभे असून त्याच्या पलीकडे नारायणशास्त्री यांची पत्नी सुभद्रा उभी आहे.

५. खालीं श्रीधराची वशावळ अद्ययावत्‌ची दिली आहेः—

**राघोपंत ते श्रीधर : भाग १ ला**

राघोपत खडके-घोडके






आता पुढल्या प्रकरणीं आनदपरपरा व सनदा वगैरेची माहिती द्यावयाची आहे.

★ ★ ★



# श्रीधराची आनंदपरंपरा व सनदा

पुढें ऐका गुरुपरंपरा । ज्याचे नामश्रवणे ससारा । येरझारा तुटती[1] ॥

( १ ) मराठी वाङ्मयातील अनेक परपरा व त्याचें कार्य, ( २ ) आनदसप्रदाय, ( ३ ) आनदपरपरा व तिचा वृक्ष, ( ४ ) इनामाच्या सनदा, ( ५ ) पूर्वार्धाचा समारोप.

१. आतापर्यंतच्या सात प्रकरणात श्रीधराच्या लौकिक जीवनाच्या निरनिराळ्या अगाचा विचार केला. पण त्याच्या जीवनात प्रपचापेक्षा परमार्थाकडेच त्याचा विशेष ओढा असल्यामुळे त्याचे विवेचन स्वतंत्रतेनें होणेंच इष्ट आहे. एवढेंच नव्हे तर त्याशिवाय त्याचें चरित्रविवेचन अपूर्णच राहील. तेव्हा आता तिकडे वळलें पाहिजे.

आपल्या आर्यधर्मात धर्मालाच प्रमुख स्थान दिले गेले आहे. "वेदोऽखिलो धर्ममूलम्" वैदिक वाङ्मय प्राधान्यतः धार्मिक. नतरचे

१ आ. प्र., १३, ६८

मुख्य ग्रथ 'महाभारत', 'गीता', 'भागवत', व 'रामायण' हे होत. याची रचनाही धर्माचरण व तद्वारा मोक्षप्राप्ति या पायावर झालेली. मराठी वाङ्मयाचा जन्मच मुळीं या सस्कृत ग्रथभाडाराचे ज्ञान सामान्य जनास देशीभाषातून देण्यासाठीं झालेला. श्रीधर म्हणतोच कीं, " आबाळ जन तारावया ईश्वरे प्राकृत ग्रथ निर्मियले. " याच प्रेरणेनें अकराव्या शतकापासून तो अठराव्या शतकापर्यंत सुमारे सातशे वर्षे मराठींत ग्रथरचना चालू राहिली. ही सपत्ति बहुमोल, बहुविध व प्रचड आहे. या निर्मितीत अनेक परपरा व ग्रथ यानीं भाग घेतला आहे त्याचे सिंहावलोकन केले असता श्रीधराच्या 'आनदपरपरेची' कामगिरी सहज लक्षात येईल.

## १ महानुभाव पंथ

आजपर्यंत ' ज्ञानदेव ' हे मराठीचे आद्य ग्रथकार असें मानले जात असे पण महानुभावीय वाङ्मयाचें सशोधन झाल्यापासून हा मान त्या पथाकडे आपोआप गेला आहे. हे 'सरस्वतीमदिराचे एक अज्ञात दालन' खुले करण्याचे श्रेय विद्यार्णव विनायकरावजी भावे व डॉ. यशवत खुशाल देशपाडे यास आहे या वाङ्मयात धर्मग्रथच विशेष आहेत. महत दत्तलक्षराज याच्या माहत्म्याने या दोघानी महानुभावपथासबधीं रूढ झालेले सर्व गैरसमज दूर केले असल्यामुळे हा पथ अवैदिक नाहीं हे आता सिद्ध झाले आहे. याची स्थापना वऱ्हाडात श्रीचक्रधराने शके ११८५ मध्ये केली. पुढे तो खानदेश, मोगलाई, गुजराथ, इदूर, लाहोर व काबूल–पेशावरपर्यंत पसरून मराठ्याच्या भगव्या झेड्याप्रमाणें अटकेपार झाला. यवनाचे राजवटींत यानीं मोठ्या कुशलतेनें धर्मरक्षण केलें.[२] हे

---

२ डॉ. देशपाडे. महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. १००

पचकृष्ण मानतात. दत्त व श्रीकृष्ण यावर त्याची भक्ति विशेष होती. याची ग्रथरचना मुख्यत्वे भागवताचे दशम व एकादशस्कध व भगवद्गीता यावरच आहे. याचे ग्रथ व ग्रथकार वर उल्लेखिलेल्या भागात झाले. गद्य, पद्य, चरित्रे, व्याकरणे व कोश इत्यादि विविध रचनाप्रकारानीं मराठी भाषेला त्यानीं सर्वाआधीं स्थैर्य मिळवून दिले. भास्करभट्ट बोरीकराचा 'शिशुपालवध' व 'उद्धवगीता', नरेंद्राचा 'रुक्मिणीस्वयवर', दामोदराचे 'वत्सहरण' वगैरे सुदर काव्यग्रथही त्यानीं निर्माण केले आहेत. महानुभावीयाची ग्रथरचना अकराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत चालू राहिली होती. या सहाशे वर्षांच्या कालात त्यानीं पाच हजार ग्रथ निर्माण केले असे भावे सागतात.[३] यातील थोडीशी अतिशयोक्ति जरी सोडली तरी त्याची रचना पुष्कळच प्रचड आहे यात सशय नाही. श्री. नेने, श्री. भवाळकर, श्री. कोलते व श्री. देशपाडेद्वय या विद्वान् व व्यासगी मडळींकडून अलीकडे महानुभावीय वाङ्मयासबधीं जे ग्रथ प्रकाशित केले जात आहेत त्यावरून हे वाङ्मय जसे ग्रथसख्येने तसेच योग्यतेनेही थोर असल्याची खात्री पटत आहे. या पथास 'जयकृष्णीपथ' असेही म्हणतात. याची भाषासेवा फार अमोलिक आहे.

## २ नाथ परंपरा

दुसरी मोठी परपरा म्हणजे नाथपथाची परपरा होय. हिची गुरुपरपरा अशी आहे. आदिनाथ–मच्छेद्रनाथ–गोरखनाथ–गैनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञाननाथ उर्फ ( ज्ञानदेव )–सत्यामलनाथ–गैबीनाथ–गुप्तनाथ –उद्बोधनाथ–केसरीनाथ–शिवदिननाथ. यापैकीं पहिल्या तिघाचौघाची

३ भावे. श्रीमहानुभाव कविकाव्यमूची, प्रस्तावना, पृ. ३.

मराठी ग्रथरचना बहुतेक नाहींच असें म्हटले तरी चालेल. निवृत्तिनाथाचे काहीं अभग व स्फुटप्रकरणे असलीं तरी मराठीचा पहिला जयजयकार 'ज्ञानदेवी' पासूनच शके १२१२ मध्यें झाला. नतर सत्यामलनाथाचा बारा हजार अभगाचा 'सिद्धान्तरहस्य' ग्रथ प्रसिद्ध झाला. पुढील तिघाची रचना अभग, पदे वगैरे किरकोळ आहे. केसरीनाथाने 'सिद्धान्तसार' या नावाचा एक ग्रथ लिहिला आहे. पण शेवटचा जो शिवदिननाथ किंवा शिवदिन-केसरी याची रचना मात्र विपुल आहे. 'विवेकदर्पण', 'ज्ञानप्रदीप' पदे व अष्टकें याने केलीं आहेत. याचे शिष्य व प्रशिष्य नरहरिनाथ, महिपतीनाथ यानींही काहीं पदें व अभग केले आहेत. म्हणजे शके १२७० ते १७४४ पर्यंत—म्हणजे निवृत्ति—ज्ञानदेवापासून तों नरहरि—महिपतींपर्यंत—सुमारे पाचशें—साडेपाचशें वर्षे यातील "**ज्ञानेश्वरी**" हा अलौकिक ग्रंथ सोडल्यास बाकीची रचना अगदीं सामान्य वेदाती ग्रथात मोडते. सख्येच्या व योग्यतेच्या मानानेही या पंथाची कामगिरी वरील पथाच्या कामगिरीपुढें पुष्कळच फिकी पडते.

## ३ वारकरी संप्रदाय

यानंतर पण वरच्यास अगदीं समकालीन असा वारकरी सप्रदाय आपल्या दृष्टीपुढे येतो. 'ज्ञानेश्वरे रचला पाया...व तुका झालासे कळस' या सुप्रसिद्ध उक्तीप्रमाणे यातही ज्ञानेश्वराचेच नाव प्रथम येते. नामदेव, जनाबाई, एकनाथ, तुकाराम, निळोबा व महिपती ही या पंथातील संताची ठळक नामावलि होय. ही परपराही वरच्याप्रमाणें शके १२०० ते १७०० पर्यंत म्हणजे सहाशें वर्षें अव्याहत मराठी भाषेची सेवा करून 'पढरीक्षेत्राचे' माहात्म्य वृद्धिगत करीत होती. हीं नावे व त्याचे ग्रथ

इतके सुपरिचित आहेत कीं त्यांचें पृथकत्वाने वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं.

## ४ दत्त संप्रदाय

या सप्रदायाचे आद्यप्रवर्तक सुप्रसिद्ध सत **नृसिंहसरस्वती** हे होत. याची ग्रंथरचना हल्लीं उपलब्ध नाहीं. पण त्याचा शिष्य सरस्वती-गंगाधर याचें "**गुरुचरित्र**" हा महाराष्ट्रातील पूज्य ग्रथापैकी एक ग्रथ आहे. याचे सस्कृतमध्ये भाषातरही झालें आहे. नृसिहसरस्वतीचा काळ शके १३८० असा दिलेला आढळतो. दत्तसंप्रदायातील दुसरा थोर पुरुष म्हणजे जनार्दनस्वामी होय (समाधि शके १४९७). हे श्रेष्ठ दत्तोपासक असून त्यास दत्तसाक्षात्कार होत असे असें म्हणतात. एकनाथाचे गुरु म्हणून याची प्रसिद्धि विशेषच आहे. एकनाथाची मराठी भाषेची सेवा सर्व-विश्रुत आहे. मात्र येथें हे सागितले पाहिजे कीं नामदेव जसे 'नाथपंथ' व 'वारकरीपथ' असे उभयत्र प्रामुख्याने होते तसेच एकनाथही 'दत्त-सप्रदायात' असूनही 'वारकरी' पथातले होते. त्याचप्रमाणे तुकोबा चैतन्य-सप्रदायाचेही होते या पथाचा एकमेकाशीं विरोध नव्हता. या सर्व सप्रदायाचा समावेश भागवतधर्मात होतो. सर्वांचे रहस्य एकच धर्मप्रसार व लोकोद्धार.

## ५ समर्थ संप्रदाय

हा तर आपल्या वैशिष्ट्याने व कर्तृत्वाने सर्वत्र गाजलेला आहे. त्याच्या अकराशे मठांनीं केलेली लोकजागृति व संघटना अपूर्व अशीच होती. त्याचा 'दासबोध', 'रामायण' वगैरे विपुल रचना, त्याच्या तजावर, मोगलाई व महाराष्ट्र यातील शिष्य–प्रशिष्यांनीं केलेली अफाट

रचना ही त्याच्या वाङ्मयसेवेची साक्ष देते. आज अनेक वर्षे केवळ समर्थवाङ्मय प्रसिद्धीस वाहून घेतलेल्या धुळें येथील सत्कार्योत्तेजक मंडळीने अनेक ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहेत. व अजून अनंतभांडार प्रकाशनाची वाट पहात आहे. तेव्हा या संप्रदायाची वाङ्मयसेवा अप्रतिम आहे यात संशय नाहीं. रामदासाची एक राष्ट्रीय जागृतीची बाजू सोडल्यास संतवाङ्मयाहून समर्थवाङ्मय फारसे निराळे नाहीं.

## ६ आनंद संप्रदाय

२. या संप्रदायाची अगदीं प्रथमपासूनची परंपरा पुढे दिलेली आढळेलच. या ठिकाणीं सहजानंदापासूनच आरंभ करणें सोयीचे दिसते. या संप्रदायातील अनेक पुरुषानीं ग्रंथरचना केलेली आहे. सहजानंदाचा 'ज्ञानदीपिका' नावाचा एक संस्कृत ग्रंथ आहे. याचा शिष्य पूर्णानंद (नारायण) याने 'अवधूत–गीता–टीका,' 'शिवपार्वती–परिणय,' हे ग्रंथ लिहिले आहेत. त्याचा शिष्य निजानंद ( ओपाजी–रंगनाथाचा बाप ) याचीहि थोडीशी रचना आहे. याचा शिष्य व पुत्र रंगनाथस्वामी म्हणजे श्रीधराचा चुलत चुलता याचा उल्लेख मागे आलाच आहे.[४] त्याची ग्रंथरचना फार मोठी आहे. पूर्णानंदाचा दुसरा शिष्य दत्तानंद म्हणजे श्रीधराचा आजा त्याचीहि पुष्कळ पदे वगैरे रचना झाली आहे. त्याचा पुत्र व शिष्य ब्रह्मानंद याचा "आत्मप्रकाश" हा ग्रंथ असून अनेक पदें आहेत. त्याचा शिष्य व पुत्र व श्रीधर याची रचना अंदमासे पाऊण लाख आहे.[५]

---

४ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ३, पृ. ४५–४६.

५ भावे. 'म. सा.' पृ. ३४० मध्ये 'श्रीधराची कविता अर्ध्यालाखाहून जास्त आहे' असे सांगतात. श्रीधराचा पुत्र 'मनोहर' व पणतु 'मनोहर' ती सव्वा लाख आहे असे सांगतात.

श्रीधराने आपले दोन पुत्र 'दत्तात्रय' व 'मनोहर' यास गुरूपदेश दिला होता त्यांची कृतिही विपुल आहे. मनोहराचा पुत्र व शिष्य अवधूत ( अच्युतानंद ) याचीही काहीं रचना आहे. त्याचा पुत्र व शिष्य मनोहर यानेही बरीच रचना केली आहे. मनोहराचा अप्पा याचींही पदे बाडांत सांपडतात. येथे मात्र ही परंपरा खंडित झाल्यासारखी दिसते. कारण कृष्णा लहान असतानाच अप्पाजी निवर्तल्यामुळे त्याच्यापासून गुरूपदेश मिळाला नाही. वरील परंपरा पहाता या आनंदपरंपरेत विशेषतः नाझरे-कराच्या दोन्ही शाखेत पित्यानेच पुत्रास गुरूपदेश केल्याचे दिसून येते. त्याचप्रमाणे सर्वजण कीर्तनकार असून थोडीफार ग्रंथरचनाही करीत असत. पूर्णानंदाचा तिसरा शिष्य शिवराम-सदानंद याचा व याच्या ग्रंथ-रचनेचा उल्लेख मागे आलाच आहे. श्रीधराचे पूर्वज व वंशज याच्या ग्रंथाचा उल्लेख पुढील विभागात देण्याचे योजिले आहे भावे लिहितात,[६] " श्रीधराचे कुटुंब महाराष्ट्रातील एक अत्यंत भाग्यशाली व फार विद्वान् असें होतें ...हे सर्व कुटुंब फार विद्याचारसंपन्न व धर्मशील असून महाराष्ट्र सारस्वताचा आखाडा याच्या कुळांत पिढीजाद होता असे स्पष्ट दिसते. " यावरून आनंदसंप्रदायातील पुरुषांची रचना पुष्कळ तर आहेच पण त्यापैकीं श्रीधराच्या एकट्याच्या कुटुंबात एकसारखी दोनशे वर्षे ग्रंथ-रचना अव्याहत चालू होती हे विशेष आहे. असे दुसरे उदाहरण सर्व महाराष्ट्रवाङ्मयात क्वचितच सापडेल ! तेव्हा या कुटुंबास या प्रदीर्घ सेवे-बद्दल जेवढा धन्यवाद द्यावा तेवढा थोडाच आहे. एक महानुभाव पंथ सोडून बाकीच्या वरील सर्व संप्रदायाचें रहस्य एकच आहे. अद्वैत तत्त्वज्ञान, सगुणाकडून निर्गुणाकडे जाणे पण उपासनेवर अधिक भर देऊन ज्ञानयुक्त

६ भावे. म. सा पृ. ३३६–३३८.

भक्तीचा पुरस्कार करणें वगैरे गोष्टी त्या सर्वांस सारख्याच संमत आहेत हें विसरता कामा नये.

३. आनंद सप्रदायाची परंपरा ब्रह्मानदानें आपल्या "आत्मप्रकाश" या ग्रथात दिली आहे.--

पुढे ऐका गुरुपरपरा । ज्याचे नामश्रवणे ससारा । येरझारा तुटती ॥

अशी फलश्रुति दिलेली आहे. त्याने पहिल्या तिहींबद्दल 'आादिनाथ' आदिगुरु, असें म्हणून पुढे दत्तात्रेय—सदानद—अवधूत—रामानद—अमलानद—ब्रह्मानंद—सहजानद—पूर्णानद—दत्तानद अशी दिली आहे. यांत 'सहजानंद' चद्रभागेत समाधिस्थ झाले व 'पर्णानद' नाझरेस आले असें म्हटलें आहे. यावरूनच दत्तानदाच्या समाधीपुढील भुयारात पूर्णानदाची समाधि आहे असा समज अद्यापि जो नाझरेकराचा आहे तो झाला असावा. याचा उल्लेख मागे आलाच आहे, व तो बरोबर नसल्याचेही सागितले आहे.[७] दुसरी गोष्ट अशी कीं, सहजानदानें चद्रभागेत समाधि घेतल्याचे त्यानें लिहिले आहे. या दोन्ही गोष्टी चुकीच्या दिसतात.

श्रीधराला आपल्या परपरेविषयीं फार प्रेम व पूज्यभाव वाटत असे. तो म्हणतो[८]:—

हे श्रीधरे गुफुनि श्लोक साचे । निर्मूळ केले मुळ हें भवाचें ॥१८॥

त्याने आपल्या प्रत्येक मोठ्या ग्रथात ती मोठ्या आवडीने दिली आहे. एवढेच नव्हे तर त्यानें ही परपरा दोन वेळा—एकदा मराठींत व

७ श्रीधर. च. आणि का., भा. १. प्र. १, पृ. ४–५.
८ श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ११.

दुसऱ्यानदा सस्कृतमध्ये–श्लोकरूपाने दिली आहे. श्रीधरपुत्र दत्तात्रयकृत मराठी परंपरेत या सर्वांची समाधिस्थळें दिलीं आहेत तीं अशीं: -

| | |
|---|---|
| १ आदिनारायण–क्षीरसागरीं | ८ गभीरानद–रामेश्वरीं |
| २ विधि–कनकाद्रिशिखरी | ९ ब्रह्मानद–पढरपुरीं |
| ३ अत्रि–सह्याद्रिशिखरीं | १० सहजानद–कल्याणीं |
| ४ दत्त–मातापुरीं | ११ पूर्णानद–गोळवणीं |
| ५ सदानद–कृष्णातीरीं–निंबनगरी | १२ दत्तानद–नाझरें |
| ६ रामानद– शिवपुरी –महास्मशानीं ( काशीस ) | १३ ब्रह्मानद–पढरपूर |
| ७ अमलानद–पेवरीं | १४ श्रीधर–पढरपूर. |

श्रीधराचे अप्पाजीपर्यंतचे वशज पढरपुरासच निवर्तले. वरील यादी भावे याच्या यादीशी बरोबर जुळते.[१] मात्र तिच्यात पाहिल्या चाराचीं स्थळे दिलेलीं नाहींत यावरून ' आत्मप्रकाशातील ' वर सागितलेल्या दोन विरुद्ध गोष्टी चुकीच्या ठरतात.

परपरावृक्ष पुढे दिला आहे:—

---

१ भावे. म. सा. पृ ३४०

## आनंदपरंपरावृक्ष


विष्णु
विधि
अत्रि
दत्त
सदानंद
रामानंद
अमलानंद
गभीरानंद
ब्रह्मानंद
सहजानंद
पूर्णानंद (नारायण)
कैवल्यानंद
विलयानंद
सदानंद




श्रीधराच्या शिष्याचा उल्लेख मागें आलाच आहे.[१०] पण त्याची शिष्यपरंपरा अजून चालू आहे जिल्हा विजापुरातील बागलकोट येथे व गदग येथेही कांहीं शिष्य आहेत त्याचप्रमाणे सातारा जिल्ह्यात कडेपूरकडे व नांदगांव, तासगांव व निगडीजवळील कांहीं स्थळीं श्रीधराची शिष्यपरंपरा चालू आहे. ब्रह्मानंदाने आपला पिता जो दत्तात्रय यास 'दत्ताचा अवतार' असे म्हटले आहे.

श्रीधरास व त्याचे पुत्र 'दत्तात्रय' व 'मनोहर' यास श्री शाहू छत्रपतीं-

१० श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ४, पृ ५५–५६, ६४

कडन मिळालेल्या इनामांचा उल्लेख मागील प्रकरणीं केलेलाच आहे. आता त्याच्या नकला पुढे दिल्या आहेत.

## सनदा

४. श्रीधरास मौजे टाकळी, परगणे माण, हा गाव शाहूमहाराजानी राज्याभिषेक शके ५५, सुरूसन तिस्सा अशरीन मया व अलफ म्हणजे इ. स. १७२८।२९मध्ये इनाम करून दिल्याबद्दलचें राजपत्र व निदेशपत्राची नक्कल पुढे दिली आहे :––

## राजपत्र

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५५ कीलक संवछरे माघ श्रुध अष्टमी भानुवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणीं देशमुख व देशपांडे कर्यात कासेगाव प्रांत माण यासि आज्ञा केली यैसीजे .–

श्री राजा शाहु नरपती हर्षनिधन बाजीराव बल्लाळ प्रधान,

श्री आई आदीपुरुष श्री राजा शाहु छत्रपति स्वामी कृपानिधी तस्य श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि

हरिभग (क्ति) परायण राजश्री श्रीधर गोसावो बिन ब्रह्मानद गोसावी उपनाम घोडके नाझरेकर गोत्र वसिष्ठ सूत्र वाजसनी हाली

* मूळ सनदेत हे दोन शिक्के वर्तुळाकार आहेत.

वास्तव्य क्षत्र पढरपूर हे भले थोर सत्पात्र, याचे चालविल्या स्वामीस श्रेयस्कर ऐसे जाणुन स्वामी याजवरि कृपालु होऊन मौजे टाकळी कर्यात मजकूर हा गाव पेशजीच्या मुकासेयाकडून दूर करून हाली कुलबाब कुलकानु व इनाम तिजाई देखील हालीपट्टी व पेस्तरपट्टी जलतरुतृण काष्टपाषाण निधि निक्षप आदिकरून खेरीज हकदार व इनामदार यासि याचे पुत्रपौत्रादि वशपरपरेने नूतन इनाम करून दिला असे. तरी तुह्मी मौजे मजकूर चतुःसिमापूर्व मर्यादेप्रमाणे याचे दुमाला करून यासि व याचे वंशपरपरेने इनाम चालविणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटियास गोसावीयाजवळी परतोन देणे. जाणिजे लेखनालकार

मर्यादेयं राजंत

रुजु समत स ॥ स ॥

सुमत मत्री सरकार

बारसुद सुरुसुद    बार ४

## निदेशपत्र.

* श्री आई आणि पुरुष
श्री राजा शाहू छत्रपति
स्वामी कृपानिधि तस्य
श्रीनिवास परशुराम
प्रतिनिधि

घेमो अनाम देशमुख व देशपाडे कसबे कासेगाव यासि श्रीनिवास

* मळ सनदेंत हा शिक्का वर्तुळाकार आहे.

परशुराम प्रतिनिधि सुहुरसन तिसा अशरीन मया अल्फ हरिभक्तपरायण राजश्री श्रीधर गोसावी बिन ब्रह्मानद गोसावी गोत्र वशिष्ठ सूत्र वाजसनेई वास्तव्य श्रीक्षेत्र पढरपूर हे बहुत थोर, सत्पात्र, याचे चालविलिया राज्यास श्रेयस्कर असें जाणून मौजे टाकली ता॥ मजकूर पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून हालीं कुलबाब कुलकानू देखील हाली पट्टी व पेस्तर पट्टी सर्वस्व देखील इनाम तिजाई इनाम दिल्हा असे. तरि मौजे मजकूर चतु:सीमा-पूर्वक हदे प्रमाणे दुमाला करून पुत्रपौत्रादि वशपरपरेने इनाम चालवीत जाणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे. या पत्राच्या प्रती लेहून घेऊन अस्सल पत्र भोगवटियासि परतोन देणे छ २७ जमादिलावल. निदेश समक्ष

राजते
लेखनावधी

राज्याभिषेक शके ५५ मध्यें म्हणजे शालिवाहन शके १६५० माघ व॥ ८ स म्हणजे ता. २६ जानेवारी सन १७२९ रोजीं ही सनद श्रीधरास मिळाली, व तो त्यानतर बरोबर एक वर्षाने म्हणजे ता २६ जानेवारी सन १७३० रोजी समाधिस्थ झाला. शके १६५१ सौम्यवासर माघ व॥ ३ सोमवार म्हणजेच जत्रीवरून येणारा हा काळ होय.

रा. दत्तोबा गोसावी व मनोहर गोसावी यास श्रीमत शाहू छत्रपति यानीं मौजे तडवळे परगणे खटाव हा गाव इनाम दिला होता याची अस्सल सनद विद्यमान वशजाकडे आहे. तिची नक्कल प्रसिद्ध झाली आहे. तिच्यातील मुख्य गोष्टी पुढे दिल्या आहेत मागच्याप्रमाणे यावर दोन राजमुद्रा आहेत:—

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी सवत्सरे कार्तिक शु॥५ गुरुवासरे क्षत्रियकुलावतस श्रीराजा शाहू छत्रपति ह्यार्णी देशमुख व देशपाड्ये ता. हवेली, परगणे खटाव, यास आज्ञाकेली ऐसीजे. राजश्री दत्तोबा गोसावी व मनोहर गोसावी बिन श्रीधर गोसावी, उपनाम नाझरेकर, गोत्र वशिष्ठ, सूत्र वाजिसनी, वास्तव्य क्षेत्र श्रीपढरपूर यार्णी साताराचे मुक्कामीं स्वामीसनिध येऊन विनता केली कीं, आपण श्रीचे भजन करून स्वामीस व स्वामींच्या राज्यास अभिष्ट चितन आहो आपल्या कुटुबाचे योगक्षेमास एक गाव इनाम करून देऊन वशपरपरेने चालविले पाहिजे .. तो गाव इनाम दिला आहे. इ. जाणिजे. लेखनालकार.

मर्यादेय राजते

या सनदेप्रमाणे श्रीनिवासपडित प्रतिनिधि व बाजीराव बल्लाळ प्रधान यानीं बिनहरकत वसूल देण्याविषयीं तडवळें गावच्या मोकदमास सनदा दिल्या आहेत.[११] हे गाव बार्शीकडे आहे. पण आता हे विद्यमान वशजाकडे त्याच्या आठवणीपासून नाहीं असे त्यानीं सागितले.

इ. स १७४३।४४ मध्ये बाळाजी बाजीरावानें मोजे पढरपूर येथे मळा करण्यासाठीं वीस बीघे जमीन मनोहर बिन श्रीधर गोसावी व रामचद्र बिन दतोबा गोसावी यास इनाम दिली होती.[१२] ती एक हजार रुपये देऊन पढरपुरच्या तलावाकरिता सरकारने घेतली [१३] पण नळाची व्यवस्था झाल्यामुळे तलाव बाधला गेला नाहीं म्हणून विद्यमान वशज

११ भा इ स म, अहवाल, श १८३३, लेख १३, पृ १११
१२ भा. इ स म., अहवाल, श. १८३३, लेख १३, पृ १११
१३ भा. इ स. म, अहवाल, श १८३३, लेख १३, पृ १११

रा. कृष्णाजीपंत यांनी जमिनीची परत मागणी केली पण ती त्यांस मिळाली नाहीं असे ते म्हणाले.

त्याचप्रमाणें बाळाजी बाजीरावानें सन १७५०।५१ मध्ये मौजे टाकळी येथील मोकास-बाबेबद्दल सनद मनोहर यास दिली आहे. विद्यमान वंशजास त्या इनामाबाबत हल्लीं सालीना एकुणचाळीस रुपये येतात, असे त्यांनीं मला सांगितलें.[१४]

५. येथवर संकल्पिल्याप्रमाणे 'श्रीधराचे चरित्र व काव्यविवेचन' या ग्रंथाचा पूर्वार्ध म्हणजे श्रीधर-चरित्राचा भाग पूर्ण झाला. पूर्वगामी संशोधकाचे ऋण मान्य करून, त्यांनीं मिळविलेल्या माहितींत स्वतःच्या संशोधनाची भर घालून पूर्वार्धाची उभारणी केली आहे. सामुग्री मुळातच अगदीं तुटपुंजी व अपुरी असल्यामुळे हे चरित्र कदाचित् सर्वांगपरिपूर्ण व घोंसदार झाले नसले तरी पण श्रीधरचरित्रासंबंधीं आजपर्यंत दृढमूल झालेले अनेक गैरसमज त्यात दूर झालेले पाहून व प्रयत्नपूर्वक मिळविलेली त्यातील अभिनव माहिती पाहून ते सुज्ञ वाचकास प्रिय व्हावे अशी अपेक्षा आहे; म्हणून या अभिनव माहितीचें टिपण जाता जाता थोडक्यात देणे इष्ट वाटतें. श्रीधर नाझरेकराच्या नाझरे नगराचे आजचें व तत्कालचे नकाशासहित दिलेले वर्णन वाचून वाचकाचे कुतूहल पुरेल, तर स्वदेशाभिमानाने ओथंबलेले व कोट्यानीं फुललेलें ब्रह्मानंदाचे 'नाझरेपद' प्रथमच पाहून रसिकास आनंद होईल. दत्तानंदाच्या समाधिकालाचा निश्चय ( शके १५९० ), 'आत्मप्रकाश' ग्रंथाचा दुरुस्त केलेला शके १६०४ चा काल, ब्रह्मानंदाच्या समाधिकालाचा प्रत्यंतर पुरावा देणारा दुसरा संस्कृत

१४ भा. इ. सं. मं., अहवाल, श. १८३३, लेख १३, पृ. ११२ (५)

श्लोक, श्रीधराचा जन्मकाल-निर्णय (शके १५८०), 'खंडेराय' व 'श्रीधर' या दोन नावांचा उगम व तत्संबंधींच्या दंतकथेचा निरास, त्याची विद्वत्ता, बहुश्रुतता व कलानिपुणता, श्रीधराच्या दप्तरांतील इतर ग्रंथांची यादी, श्रीधराच्या घराचे खरेदीखत (शके १६३९) व त्याचें छायाचित्र; श्रीधरस्वरूपवर्णन, 'ब्रह्मानंद' व 'ज्ञानानंद' हे सख्खे बंधु नसून चुलत बंधु होते, श्रीधर द्वैती नसून समदृष्टि होता, त्याच्या तीर्थयात्रा, शिवरामाचे दुसरे पत्र, सामराज एकनाथ यांच्या पुष्पांजुळ्या, गिरिधराने 'समर्थप्रतापा'त केलेला श्रीधराचा उल्लेख, श्रीधराच्या संन्यासग्रहणाचा निरास व समाधिकथा, त्याचा समाधिकाल व समाधीवरील श्लोकाची समस्यापूर्ति, समाधिमंदिराचें छायाचित्र, अच्युतानंदाचा समाधिकाल (शके १७५०), व विद्यमान कुटुंबाचें छायाचित्र वगैरे अभिनव माहिती पाहून संशोधकास समाधान होईल अशी आशा आहे. शेवटीं—

न्यून ते पुरतें । करूनि घ्यावे सरतें ।

अशी विद्वज्जनांस विनंती करून हा पूर्वार्ध संपवितों.

* * *





१७

श्रीधरस्वामी महाराज ब्रह्ममूर्ती । सदा वाचेने गाऊ याची कीर्ती ।।
ज्याचे कवित्व रसिक फार । त्यासि पांडुरंगी साक्षात्कार ।।
सकल पुराणाचे माहेर । सर्व ठाउके ते शास्त्राधार ।।

मनोहर–श्रीधर–पुत्राची ' आरती. '

# श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन

— १ —

## श्रीधराची कवितासंपदा

ज्याप्रमाणे पूर्वार्धात श्रीधराच्या पूर्वजाची, श्रीधराच्या व त्याच्या विद्यमान वंशजाची उपलब्ध असलेली चारित्रविषयक माहिती दिली, त्याचप्रमाणे या भागात यथानुक्रम त्याच्या ग्रंथाचे विवेचन करण्याचे योजिले आहे. पण प्रथमतः आपला चरित्रनायक जो 'श्रीधर' त्याच्या काव्यसंपदेचा स्थूलमानानें आढावा घेणें इष्ट वाटते.

श्रीधराचा पुत्र 'मनोहर' व पणतु 'मनोहर' यानी 'श्रीधराने एकदर सव्वा लाख कविता केली' असे म्हटले आहे.[1] भावे यानीं ही

[1] हरिवंश भागवत रामायण । ग्रंथ केले अपूर्व गहन ।।
सव्वा लक्ष काव्य सम्पूर्ण । किर्ति झाली त्रैलोक्य भरून ।।
मनोहर–श्रीधर–पुत्राची ' आरती '

सव्वालक्ष काव्यास । श्रीधरे वर्णिलें कलियुगीं ।।
मनोहर–श्रीधराचा पणतु–' श्रीधर–समाधी–कथा

सख्या अर्धलक्षापेक्षा जास्त आहे असें म्हटले आहे.[२] पण श्रीधराची आजपर्यंत उपलब्ध असलेली कविता सव्वा लाख भरत नाहीं. त्याचीं पदें त्याच्या सर्व बाडात विखुरलेलीं असल्यामुळे व त्याचे संकलन व प्रकाशनही झालेलें नसल्यामुळे त्याच्या सख्येचा अदाज बाधता येत नाहीं. तीं सुमारे हजार बाराशे असावीं असें वाटतें. प्रत्येक पदात पाच–सहा कडवीं सामान्यतः असतात. तेव्हा त्यांची एकूण पद्यसख्या अगदीं जास्तींत जास्त सहा हजार फार तर होईल. त्याचप्रमाणे ‘ स्फुट प्रकरणे ’, ‘ माला ’ व ‘ संस्कृत स्तोत्रे’ जीं मला नव्यानेच सापडलीं आहेत त्या सर्वांची पद्यसख्या चार साडेचार हजाराहून थोडीशी अधिक भरते. हा अप्रकाशित कवितेचा आकडा सुमारे दहा साडेदहा हजार भरतो. प्रकाशित ग्रथांची पद्यसख्या तर अगदीं उघड आहे. ‘हरिविजय’ ८१३९, ‘रामविजय’ ९१४७, ‘वेदान्तसूर्य’ २४१४,‘पाडवप्रताप’ १३,३९७, ‘जैमिनीअश्वमेध’ ९८७६ व ‘शिवलीलामृत’ २४५० या मोठ्या ग्रथाची कवितासख्या ४५,४२३ भरते. छोट्या ग्रथापैकीं ‘पाडुरगमाहात्म्य’ ७४८, ‘व्यकटेशमाहात्म्य’ ६५०, ‘मल्लारिमाहात्म्य’ ३५५, ‘ ज्ञानेश्वरचरित्र ३००, याची कवितासख्या २,०५३ होते. यापैकीं शेवटचे ‘ज्ञानेश्वरचरित्र’ अप्रकाशित असून ते प्रथमच वाचकापुढे येत आहे. या सर्व ग्रथाच्या कवितेची बेरीज केली तर ती जवळ जवळ साठ हजार येते; म्हणजे ती सव्वा लाखाहून पुष्कळच कमी दिसते. तेव्हा श्रीधरपुत्र ‘मनोहराने’ व त्याच्या नातवानें ‘ सव्वालक्ष ’ हा आकडा कसा काय आणला हे समजण्यास मार्ग नाहीं. पित्याच्या गौरवार्थ कदाचित् मनोहराने तसे मोघमपणे म्हटले असावे किंवा श्रीधराने आणखी काहीं ग्रंथरचना केली असून ती पुढे काहीं अज्ञात कारणानें श्रीधराच्या

२ भावे. म सा. प्र. २४०

दप्तरातून गहाळ झाली असावी. पण मनोहरानें अशा ग्रथाचा इतर प्रसिद्ध ग्रथाबरोबर नुसता नामनिर्देशही केला नसल्यामुळे याबद्दलची खात्री होत नाहीं. भावे यानीं श्रीधराच्या कवितेची सख्या अर्धा लाख दिली आहे तीहि अनमानधबक्यानेच दिली असावी असे वाटतें. मोरोपताची कविता तीन लाख होती असे ' मालाकारा 'नींही केवळ अदाजानेच म्हटले होते पण पागारकरानीं तिची मोजदाद करून ती साठ हजार होती असे सागून आणखी आठ, दहा हजार नष्ट झाली असावी असा तर्क केला होता. तशी श्रीधराच्या कवितेची मोजदाद केली असता ती जवळ जवळ साठ हजार भरते. पण एवढीच कविता श्रीधराने केली असे गृहीत धरले तरी ही सख्या खरोखर प्रचंड आहे. तेव्हा पताप्रमाणेच श्रीधराची भाषाविषयक सेवाही पुष्कळ व बहुमोलाची आहे.

श्रीधराने जे थोर ग्रथ रचले त्याच्या स्थलकालाचा उल्लेख त्याने त्या त्या ग्रथातच करून ठेवला असल्यामुळे ती चाच अगदीं निश्चित झाली आहे. मात्र लघुग्रंथासबधाने त्याने ती काळजी घेतली नसल्यामुळे त्याच्या स्थलकालाचा निर्णय करता येत नाहीं. त्याचप्रमाणे त्याने जीं अनेक ' स्फुट प्रकरणे ' लिहिलीं आहेत त्यासबधीं पण हीच अडचण आहे. श्रीधराच्या काव्यसंपदेची मोजदाद खालीं सविस्तर दिली आहे:—

| अनुक्रम | ग्रथनाम | अध्याय | स्थल | काल | सख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | हरिविजय | ३६ | पढरपूर | शके १६२४ | ८१३९ |
| २ | रामविजय | ४० | पढरपूर | शके १६२५ | ९१४७ |
| ३ | वेदान्तसूर्य | १२ | सिद्धाश्रम | शके १६२५ | २८१४ |
| ४ | पाडवप्रताप | ६४ | पंढरपूर | शके १६३४ | १३,३९७ |
| ५ | जैमिनिअश्वमेध | ९६ | पाथरी | शके १६३७ | ९८७६ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | शिवलीलामृत | १४ | बारामती शके १६४० | २४५० |
| ७ | पांडुरंगमाहात्म्य | १० | | ७४८ |
| ८ | व्यंकटेशमाहात्म्य | १० | | ६५० |
| ९ | मल्लारिमाहात्म्य | २ | | ३५५ |
| १० | ज्ञानेश्वरचरित्र | २ | | ३०० |
| ११ | अंबिकाउदय | कोठेही उपलब्ध झाला नाहीं | | — |
| १२ | स्फुट प्रकरणें | | | ४०४२ |
| १३ | संस्कृत स्तोत्रे वगैरे | | | ३०० |
| १४ | पदें वगैरे अदमासे | | | ६००० |
| | | | | ५७,८१८ |

ब्रह्मानंदाने समाधि घेतल्यानंतर म्हणजे शके १६१५ नंतर श्रीधर तीर्थयात्रासाठीं चारपांच वर्षे हिंडत असावा असे मागे आम्ही सुचविलेंच आहे.[३] त्यानंतर स्फुट प्रकरणादि किरकोळ रचना करून पाहिल्यावर शके १६२४ मध्ये आपला ग्रंथराज ' हरिविजय ' त्याने रचिला. तेव्हापासून त्यानें शके १६४० पर्यंत ग्रंथरचना केली, म्हणजे सुमारे सोळासतरा वर्षे तो ग्रंथरचना करीत होता. या काळात त्याने अदमासे ही साठ हजार कविता केली असे दिसते. संख्येच्या व गुणाच्या मानाने पहाता ही कामगिरी खरोखरच प्रशंसनीय होय.शके १६४० ते १६५१पर्यंत म्हणजे त्याच्या समाधिकालापर्यंत जीं अकरा वर्षे गेलीं त्यात त्याने मनात आणले असतें तर किती तरी रचना त्यास करता आली असती पण 'भारत', 'भागवत',

३ श्रीधर. च. आणि का , भा. १, प्र. ३, पृ. ४९–५२

रामायण' व काहीं ठळक पुराणे यातील मनोवेधक कथा सांगून आबाल-जनास हसत खेळत सन्मार्गास लावण्याचे जे ध्येय त्याने ठरविले होते तें सिद्धीस गेले असे पाहून त्याने आपली लेखणी खाली ठेवली असावी. असो. आता प्रारंभीं योजिल्याप्रमाण ग्रंथविवेचनाकडे वळू.

* * *

— १० —

# ब्रह्मानंदाची ग्रंथरचना

## ‘आत्मप्रकाश’

या ग्रंथाची प्रत मला पंढरपुरच्या दप्तरात पहावयास मिळाली शेवटीं लेखकाच्या नावाचा अथवा लेखनकालाचा उल्लेख नाहीं या ग्रंथाची चौदा प्रकरणे असून त्यात एक हजार तेरा ओव्या आहेत हा ग्रंथ ब्रह्मानंदाने श्रीधराकरिता लिहिला असल्याचे त्यात त्यानेच सांगितले आहे. श्रीधराने विचारलेल्या प्रश्नाची त्यात उत्तरे आहेत, म्हणूनच तो गुरुशिष्य-संवादरूपाने लिहिलेला आहे:—

हा ग्रंथ व्हावयास कारण । श्रीधरें केले होते प्रश्न ॥[१]
मज जे केले निरोपण । तसाचि ग्रंथ पूर्ण लिहिजेजी ॥
पूर्वाश्रमिचा निजपुत्र । सत् शिष्य हि परमचतुर ॥
त्या श्रीधराचेन प्रश्न समग्र । आत्मप्रकाश प्रकाशिला ॥
आपुलिया काजा भगिरथें । घेउन आला जान्हवीते ॥
परी विश्व सुस्नात होतें । स्नानमात्रें करूनि ॥

१ आ. प्र., १३, ६१-६३, ६६

श्रीधर प्रश्न न करिता । तरी का आत्मप्रकाश प्रकाशता ॥
त्याचेन प्रश्ने या ग्रंथा । नामरूप प्रकटले ॥

ब्रह्मानंदानेच या ग्रंथाचा लेखनकाल दिला आहे तो असा:--

शके सोळासे तीन । दुंदुभी नाम संवत्सरि पूर्ण ॥ [२]
दुंदुभी वाजविला हा जाण । आत्मप्रकाश ग्रंथ पै ॥

का. ना. माने यांनी या ओवीवरून शके १६०३ हाच ग्रंथ-लेखनकाल दिला आहे.[३] तसेच 'ज्ञानकोशा'तही याचीच पुनरुक्ति केली आहे,[४] परंतु दुंदुभी संवत्सर शके १६०३ मध्ये येत नसून तो शके १६०४ मध्ये येत असल्यामुळे हाच काल मानणे योग्य ठरते. गतशकाचा शक अंक देण्याचा परिपाठ काहीं पोथ्यात आढळतो तसाच तो येथेही दिला असला पाहिजे.

आता ग्रंथातील विषयाचे दिग्दर्शन करूं:—

प्रारंभीं गणेश, सरस्वती व गुरु यास नमन केल्यानंतर---

जगदङ्कुरबीजाय सच्चिदानंदमूर्तये ।
गलिताखिलभेदाय नमः शांताय तेजसे [५] ॥ इत्यादि

तीन संस्कृत श्लोकात नमन करून कवीने ग्रंथास आरंभ केला आहे

ग्रंथा नाव आत्मप्रकाश विशद । श्रवणे तोडि भेदाभेद ॥
पाववील परम पद । ब्रह्मानंदयति म्हणे ॥ [६]

---

२ आ प्र., १४, १०५
३ भा. इ. स. मं., अहवाल, शके १८३३ लेख १३ वा
४ ज्ञानकोश, [ भाग २०, पृ. (ग) ९७ ]
५ आ. प्र. १, १
६ आ. प्र. १, ६२

असे ग्रथाचे नामकरणही केले आहे, यावरून येथील निरुपण अद्वैतावर आहे हे उघड आहे पहिले प्रकरण 'गुरुस्तवना'वर आहे. दुसऱ्यात तिसऱ्यात, चवथ्यात व पाचव्यात अनुक्रमे 'स्थूल' 'लिंग' 'कारण' व 'महाकारण' अशा पिडचतुष्टयाचे विवेचन करून येथून 'त्वपद' संपले असे सागितले आहे. सहाव्यापासून 'तत्पद' शोधनास सुरवात झाली असून त्यात विराटदेहाचे शोधन सागितल्यावर गुरु शिष्यास म्हणतो की, तू आता स्वसवेद्यत्वे स्थूलप्रपचा निराळा झालास, आता सूक्ष्म प्रपचविस्तार ऐक. सातव्यात 'हिरण्यगर्भ' व 'माया' याचे विवेचन आले आहे आठव्यात 'देहपच–प्रलयविवरण' केलेले आहे. नवव्यात 'महामाया'–'महाकारण शोधन' व 'सकळमत–उच्छेदन' करून—

आत्मप्रकाश दिव्य ग्रथ । ग्रथरूपे प्रयाग यथार्थ ॥[७]
भक्ति ज्ञान वैराग्ययुक्त । वाहे अद्वैत अभेद ॥
अनुताप माघ मास जाण । आत्मप्रकाश प्रयागि नित्य स्नान ॥
असख्य जन्मीचि पापे पूर्ण । जाति जळोनि श्रवणेचि ॥

अशी ग्रथस्तुति केली आहे. हेंच रूपक श्रीधराने आपल्या ग्रथात अनेकवार पुनरुक्त केले आहे, ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. दहाव्यात 'असि' पद कथन केलेले असून विराट–स्थूलाची ऐक्यता सिद्ध केलेली आहे येथेही 'मानस–सरोवर' 'क्षीराब्धि,' 'कमल' वगैरे रूपकोत्प्रेक्षा ग्रथावर केल्या आहेत तर सरकृत–प्राकृतावर 'इक्षुदड' व 'साखरे'चीं रूपके केलेली आहेत, आणि या सर्व अलकारानीं श्रीधराने आपल्या कवितामृतेस वारसाहक्काने वारवार भूषविले आहे. अकराव्यात 'हिरण्यगर्भ' व 'लिंगदेह' याच्या ऐक्यतेचे प्रतिपादन केलें आहे. आणि—

---

७ आ. प्र. ९, ६८, ६९.

ब्रह्मिंचे रूप निश्चित । यतोवाचो निवंतते सत्य ॥[८]
ऐसे वेद बोलें अद्‌भुत । निश्चयासि जाण पा ॥
जेथ वाचा निवर्तलिया । मन बुद्धि कैंचि पावावया ॥
आनंदो ब्रह्मणो विद्वान्न बोलोनिया । उगेच राहिले ॥

हे वर्णन फारच ठसठशीत झाले असून यातील संस्कृत वाक्यांश देऊन त्याचें प्राकृत स्पष्टीकरण देण्याची लकबही श्रीधराने उचलली आहे, हे येथे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. बाराव्यात 'अंमि' पदाचे निरसन केलेले आहे. तेराव्यात गुरू सांगतात कीं, आता त्रिपुटी बुडाली मी तू-पणाची वार्ता उरली नाहीं. बोलच खुंटला. सर्व निरसोन जे उरले ते 'तू' स्वरूप आहेस हें ऐकताच शिष्याने लोटांगण घातले व दोघेही ब्रह्मानंदी झाले. पुढे ग्रंथरचनेचें प्रयोजन आले ते वर सांगितलेच आहे. येथील 'ब्रह्मगिरि' व 'गोदावरी' हे ग्रंथस्तुतींतील रूपक श्रीधराच्या ग्रंथात अनेक-वार अवतरले आहे. चवदाव्यात ग्रंथाचा उतारा झाला. 'आता गुरुपरंपरा ऐका' असे गुरूने सांगितले आहे. परंपरा सांगताना लेखकाच्या हस्तदोषाने अमलानंदापुढें गंभीरानंदाच्या ऐवजी पुन्हा 'अमलानंदच' पडले आहे. शेवटीं आपला पिता व गुरू जो 'दत्तानंद' याच्या समाधीचा स्थलकाल-निर्देश केला आहे तो असा[९]:—

नाझरे नाम नगरि । माणगंगेचिये तिरि ॥
आनंद मठा अंतरि । समाधिस्थ दत्तात्रय ॥
माघ मास दशमीं वद्यि । संवत्सर किलक तांधि ॥
दत्तात्रेय समाधि । सुखी पूर्ण पहुडले ॥

---

८ आ. प्र. ११, ५६–५७.
९ आ प्र. १४, १०२–१०३.

माघ वद्य दशमी, सवत्सर किलक, हा योग शके १५३०, १५९० व १६५० मध्ये येतो. हा ग्रथ मागे सागितल्याप्रमाणें शके १६०४ मध्ये लिहिला गेला आहे, व ब्रह्मानद स्वतः शके १६१५ मध्ये समाधिस्थ झाला आहे. यावरून पहिला व तिसरा शक असभाव्य असल्यामुळे शके १५९० हाच दत्तानदाचा समाधिकाल ठरतो. ' आत्मप्रकाश ' ग्रथाचा काल नंतर सागितला त्याचा उल्लेख मागे आलाच आहे. **या कालाचा निर्णय यापूर्वी कोणीही केलेला नाहीं.**

हा ग्रथ सपल्यानतर श्रीधराने पुन्हा मगलाचरण करून बत्तीस ओव्यात त्याचा साराश व महत्व वर्णिले आहे श्रीधराचा जन्मकाल दत्त-कथानुरुप शके १६०० हा मानल्यामुळे का. ना. साने यावर हा गोड उपसहार श्रीधराने पुढें मोठेपणीं मागाहून केव्हातरी लिहिला असे म्हणण्याची आपत्ति आली. पण श्रीधराचा जन्मकाल मागे दाखविल्याप्रमाणे शके १५८० च्या सुमारास असल्यामुळे तसे मानण्याचे आता कारणच उरत नाहीं.[१०] तो त्यानें त्याच वेळीं लिहिला असला पाहिजे. तो म्हणतो :—

ॐ नमो मद्गुरु ब्रह्मानदा । तुझिया ज्ञानास नाहीं मर्यादा ।
पावावया आत्मपदा । पूर्ण निजबोधा प्रकटिलें ॥ १ ॥

नतर त्यानें त्याची ठराविक नऊ दहा रूपकें चौदा अध्यायावर ग्रथ-स्तुतिपर केली आहेत. त्यापैकीं पुढील विशेष लक्षणीय आहेत :—

श्रीधर म्हणे मजकारणें । चौदा कोहळीं निज ठेवणे ॥
पितयाच्या निजधनें । भाग्य दुणे पुत्राचें ॥ १३ ॥

मी यायोगें भाग्यवत झालो आहे, सकळ जगाचे मी दारिद्र्य हरीन हे पाहून साधक नर अपार मोठा बाधतील. आणि खरोखरीच यातील

१० श्रीधर. च. आणि का. भा. १, प्र. १, पृ ११

विवेचन शास्त्रीय पण अत्यंत सुबोध झाले आहे. या स्तवनाची समाप्ति पुढील ओवीने केलेली आहे:—

या बत्तीस वोवीया । पुष्पमाळा गुंफोनिया ।।
ब्रह्मानंद स्वामीच्या पाया । श्रीधरे वाहिल्या अभंग ।। ३२ ।।

या ग्रंथावर जागोजागीं ज्ञानेश्वरीची दाट छाया पडलेली दिसते उदाहरणार्थ .—

" ऐसे परियें देता । प्रेमाचा हल्लुरू गाता ।।"[११] व

" जान्हवीने विश्व सुस्नात होते"[१२] वगैरे उल्लेखावरून हे सहज ध्यानात येईल. यातील सुलभ वेदान्तप्रतिपादन नमुनेदार झाले आहे. दत्तानंदाचा समाधिकाल व श्रीधराचा जन्मकाल यांच्या निर्णयाचें साधन यात सापडते, आणि श्रीधराच्या अलंकारिक भाषाशैलीचें व वेदान्तज्ञानाचें हे उगमस्थान आहे. सारांश, हा ग्रंथ अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा आहे.

* * *

---

११ आ प्र. १४

१२ आ. प्र १३, ६३

— ११ —

## श्रीधराची स्फुट कविता

का. ना. माने यानीं श्रीधरासंबंधीं बरीच चर्चा केली आहे.[1] त्यानीं राजाराम विठ्ठल देशपांडे याच्याकडून खुद्द पंढरपूरच्या दप्तरातून माहिती मिळविली होती. त्याचप्रमाणे पा. ना पटवर्धन याच्या लेखातही श्रीधराच्या दप्तरातील बाडे पाहिल्याचा उल्लेख आढळतो,[2] परंतु या सर्व लेखात श्रीधराच्या 'स्फुट प्रकरणाचा' उल्लेख केलेला नाहीं. भावे यानीं मात्र आपल्या 'महाराष्ट्र सारस्वता'च्या दुसऱ्या आवृत्तींत 'कृष्णदयार्णव व श्रीधर' या प्रकरणात पृष्ठ तीनशे छत्तीसमध्ये पादटीपेत त्याची सुमारे पाऊणशे 'स्फुट प्रकरणें' पाहिल्याचे सांगितले आहे,[3] परंतु या 'स्फुट प्रकरणा'ची

१ भा. इ म. म., अहवाल, शके १८३३, लेख १३; भा इ. म. म., वा. इ. वृ., शके १८३७, लेख. १७७, वि. ज्ञा. वि जानेवारी १९१४.

२ भा. इ. स.म., वा. इ. वृ, शके १८३७, लेख १७६, पृ.३०५.

३ भावे म. सा. पृ. ३३६ (पादटीप) "'गोकुळलीला' तीन भाग व 'हरिश्चंद्राख्यान' तीन भाग हीं साधारण मोठीं असून बाकी लहान लहान आहेत," हें भावे याचें विधान चुकीचें आहे.

सविस्तर मादिती अद्यापि कोठेही प्रसिद्ध झाल्याचे पाहण्यात नाही. ती पुढें दिलेली आहे. ही माहिती श्रीधराच्या पढरपुरच्या पाच सहा बाडातून सकलित केलेली आहे. 'स्फुट प्रकरणे' बाडानुक्रमाने न देता विषयानुसार दिलेलीं आहेत:—

## १. 'गोकुळलीला'

या 'लीला' पाच ओहत प्रत्येकींत अनुक्रमे बावीस, सव्वीस, सतरा, सोळा व पधरा अशीं एकूण शहाण्णव पद्ये आहेत. हीं 'पदं' आहेत. नमुन्यादाखल पुढे थोडे उतारे दिले आहेत:—

लीला पहिली:—नवल येक वर्तले गोकुळामाजि ॥धृ॥

चोरि करितो चक्रपाणि म्हणउनी गवळणी
मायेपासि देति गाऱ्हाणीं ॥ १ ॥
श्रीधरस्वामी जगद्द्य (वद्य ?)। अवधा यक ब्रह्मानद।
गोकुळीं नादे गोविंद ॥ २२ ॥

लीला दुसरी:— यामध्यें गोरसाची चोरी व गोपाळास त्याची वाटणी याचें वर्णन आहे.

श्रीधरस्वामी महाशुद्ध। अवतरला ब्रह्मानद।
लावावया भक्तासि वेध ॥ २६ ॥

लीला तिसरी:—यात वेणी–दांडाच्या गाठीचे वर्णन आहे

परिपूर्ण ब्रह्मानद। कृष्णा तू श्रीधरवरद।
छेदिला त्वा आमुचा बध ॥ १७ ॥

लीला चौथी:—या 'लीले' मध्ये गोरस न देणाऱ्या गवळणींची खोड मोडली आहे 'श्रीधरवरद, ब्रह्मानद' वगैरे शेवटीं सोळाव्या पद्यात आहे.



१०

लीला पाचवी.—यशोदेकडे एका म्हाताऱ्या गवळणीची तक्रार कीं, कृष्ण माझ्या सुनेस भोगतो. ' त्यास धरून आण ' असे तिला सांगता ती त्यास घेऊन आली तो तीं तिचा मुलगा व सूनच निघाली

## २ ' राधाचंद्रोदय '

याच्या तीस ओव्या आहेत एकदा चद्रबिंबाचा कृष्णाने हट्ट घेतला. राधेने समजाविण्यासाठीं त्यास घरीं नेला तेथे तिच्या इच्छेनुरूप मोठा होऊन भोग दिला तोच तिचा नवरा आला इतक्यात कृष्ण पुनः लहान झाला. नतर कृष्णाने चेंडू लपविल्याची तक्रार केली व चेंडू कचुकीतून खालीं पडला अशा तक्रारी यशोदेकडे गेल्यावर ती म्हणाली.—

माता म्हणे नष्ट गौळणी व्यभिचारिणी ॥ ध्रु ॥
पूर्ण ब्रह्मानद माझा हृषिकेशि ॥

असे म्हणून त्याचे चुबन घेऊन कडेवर बसवून ती त्यास घेऊन गेली

## ३ ' राधागर्वविमोचन '

यात पधरा ' पदे ' आहेत. ' मी सुदर, मी कृष्णाला भुलविलं ' असा राधेस गर्व झाला कृष्णाने हे जाणले व तो गुप्त झाला. मग तिने पुष्कळ विलाप केल्यावर तो प्रगटला असे वर्णन यात आहे:—

कुजवनि सुखशयनि राधा । भोगीत नित्य मुकुदा ॥१॥
मजहुनि सुदर गोकुळी नाहीं । भुलविला हरि पाहि ॥२॥
मम मुख विधु तो पाहत साचे । नेत्र चकोर हरीचे ॥३॥

....................................

हासे ब्रम्हानदे राधादेवी श्रीधरस्वरूप द्वावि ॥१२॥

## ४ ‘ राधाविलास ’

यात एकतीस पदे आहेत.

हरिच्या वियोगे सतप्त जालि राधा । आठवित आपुल्या अपराधा ॥१॥

चैन पडेना म्हणून मनोविनोदार्थ ती कृष्णाचे चित्र काढी. मनासारखे आले नाहीं म्हणून ते पुसून टाकी. असे करता करता कटाळून शेवटीं तिने आपली दूती कृष्णाकडे पाठविली तो तिकडे कृष्ण पण तिला तसेच करताना दिसला. राधचे चित्र काढल्यावर कोकिळगानाने तिला त्रास होईल म्हणून त्याने तिला घालविण्यासाठीं कावळा काढला मग चंद्र तिला जाचील म्हणून चित्रात त्याने राहू काढला पण त्यास ( चद्रास ) टाकून निष्कलंक असे राधामुखच तो सर्वच गिळून टाकील म्हणून ते चित्र पुसले. मन्मथ जाचील म्हणून नागभूषण काढला पण त्याचे नाग राधेचे श्वास सेवितील म्हणून तो नाग पुसला. पण राहिलेला शंकरच तिचे मदनरूप पाहून तिला भस्म करील म्हणून तोही पुसला शेवटी राधेच्या चित्राजवळ त्याने आपलेच चित्र काढले. ते पाहून दूतीस आनंद झाला व तिने त्याला राधेकडे नेले. तेथ दीप व ज्योतीप्रमाणे दोघाचे ऐक्य झाले. असे हे गोड आख्यान पुढील पद्याने संपविले आहे—

ब्रह्मानंद अभग कृष्णमूर्ति । श्रीधरस्वामीची अक्षय गाजे कीर्ति ॥३१॥

यातील कल्पनातरग रसिकास हृद्यच असे वाटतील.

## ५ ‘ मथुरागमन ’

यात एकोणीस पद्ये आहेत यातील ‘ गोपीविलाप ’ अंतःकरण हलविणारा आहे. त्या अक्रूरास म्हणतात :—

अक्रूरा तू क्रुर होसी । हिंसक तु निश्चयेंसि ॥
प्राण अमुचा घेउनि जासि । करुणा न ये ॥ ५ ॥

पण अक्रूराचा रथ धडाडला. गोपींनीं आक्रान्त केला. शेवटीं नंदाच्या घरीं त्या गेल्या आणि कृष्णाचीं बाळलेणीं, वनमाळा वगैरे पाहून त्यास समाधान झाले.

ऐसा तो श्रीधरवरद । मथुरे गेला ब्रह्मानंद ॥
गोपींचि आवडि अभेद । सर्व हि जाणे ॥ १९ ॥

## ६ ' गोपी–उद्धव–संवाद '

यात सदतीस पद्ये आहेत उद्धव जेव्हा गोकुळात गोपींचे सांत्वन करू लागला तेव्हा त्या म्हणाल्या, " कृष्णाला मथुरेत ठेऊन तू इकडे कशाला आलास ? कृष्णाचा वियोग आम्हास जाळतो आहे. " त्यावर उद्धव म्हणाला :—" हरी सर्वत्र आहे तो मथुरेत आहे तसा तुमचे अंतरातही आहे.' असा विचार करा. व्यर्थ कष्टी का होता ? निर्गुण तेच सगुण आहे. दोन्हींस आवडीने भजा." तेव्हा हा एकच बोध ठसविला व त्याचे समाधान झाले.

## ७ ' रुक्मिणी–स्वैवर '

याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धात एकुण-चाळीस पद्ये आहेत व उत्तरार्धात चौऱ्याण्णव पद्ये आहेत. अशीं एकूण एकशे तेहतीस पद्ये आहेत.'स्फुट प्रकरणा'त हे बरेच मोठें असे आहे आरंभ असा झाला आहे:—

विदर्भ देसीचा राजेंद्र भीमक थोर । त्रिदशामाजि जसा तो निर्जरेंद्र ॥ १ ॥

रुक्मिणीचे सौंदर्य कसे होते तर " मनोजकोटि वोवाळावे मुखा-वरून." रुक्मिणी-पत्रिकेतील एक एक संस्कृत श्लोक देऊन त्या प्रत्येकाचा मराठी अनुवाद कवीनें केला आहे, पण त्यात वामन पंडिताची सफाई व गोडी दिसत नाहीं.

श्लोक पहिला:— " श्रुत्वा गुणान् भुवनसुदर "...इ.

टीका :— कमळभवाग सुदरा निर्विकारा ।
तुझि कीर्ति ऐकता गुणसमुद्रा ॥
नाश होय त्रिविधतापमात्रा ।
तुज मि वरिते निर्लज्ज यादवेंद्रा ॥ १४ ॥

श्लोक दुसरा :—का त्वा मुकुन्द महती कुलशीलरूप—
विद्यावयोद्रविणधामभिरात्मतुल्यम् । ...

टीका :— सर्व लक्षणि विचक्षण भाग्यसरिता ।
उदारधीरा तप करिति तुज करिता ॥
त्याहि न पावति तुजलागि कि अच्युता ।
मज झनि निर्लज्ज म्हणसि आता ॥ १५ ॥

याप्रमाणे सात श्लोकावर पृथक् टीका करून पुढे आठ दहा श्लोकावर एकदम टीका केली आहे. पूर्वार्धाच्या शेवटल्या म्हणजे एकुणचाळीसाव्या पद्यात रुक्मिणीने कृष्णास माळ घातली आहे.

उत्तरार्ध . यात लग्नविधि होऊन गोविंद द्वारकेस गेल्याचे वर्णन आहे. त्यातील पुढील गोष्टी ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत:—

१ युद्धवर्णनात मधून मधून मूळ सस्कृत श्लोक दिले आहेत श्रीकृष्ण जेव्हा रुक्मिणीच्या भावाचा शिरच्छेद करूं लागला तेव्हा तिंने विनवणी केली कीं, शिरच्छेद न करता त्याची देहबुद्धि छेदावी म्हणजे माझे सासर व माहेर हीं दोन्ही राहतील. या प्रसगीं बळरामाचा वेदान्तपर उपदेश अगदीं थोडक्यात दोन पद्यात केला आहे एकनाथासारखा पाल्हाळ नाहीं.

२ लग्नसोहळ्याचें वर्णन एकनाथानुसार कालमानानुरूप क्वचित् बदल करून सविस्तर केलेले आहे. त्यात उष्टी हळद, रुखवत, उच्छिष्ट पात्रीं मुद्रिका ठेवणें, वरासहित वऱ्हाडाचें आगमन, वराची घोड्यावर मिरवणूक, वराच्या पायांवर सासूनें पाणी व हातावर दहीं घालणें वगैरे-चालींचीं वर्णनें आलीं आहेत. हातावर दहीं घालताना मेहुण थट्टा करतात कीं, जामाताना दहीं चोरण्याची सवय आहेच मधुपर्क झाला वाद्याचा जोराने गजर झाला. अंतरपाट धरिला. प्रकृतिपुरुषाचें लग्न ॐ पुण्याह शब्दानीं घटका भरल्याबरोबर लागले. पुढें कडेवर घेऊन नवरीसह जोडपे बोहल्यावर गेल्यावर जावईबोवाना रासाचा अभ्यास आहेच अशी पुनः थट्टा करतात. नंतर सुनमुख पाहणे व चतुर्थहोम संपादन होतें मग हळदी–उटणे (शेज–उटणे) पाहावयास गोपाळ आले. रुक्मिणी कृष्णाचा पाय मागते. कंचुकीची गाठ सोडा म्हणून रेवती व सुभद्रा विनोद करतात. त्यास त्याची चांगली सवय आहे असें म्हणून मेहुणे त्यात भर घालतात. पण कृष्णाच्या दृष्टिमात्रेंच गाठ सुटली. मग 'नांव घेऊन नवरीस हळद लाव' असें सुभद्रा कृष्णास सांगते. असा एकंदर सोहळा चार दिवस झाला. घेडा नाचवला. कवि म्हणतो—

सांडे झाले यथासांग देख रे । शक्त नव्हे वर्णायास सहस्रमुख रे॥ ८८ ॥

नंतर सर्व मंडळींसह कृष्ण द्वारकेस गेला. असे हे मोठें चटकदार आख्यान आहे. यांतील जुन्या लोकांत अजून चालू असलेल्या पण शिक्षितात आता लुप्त होत असलेल्या आपल्या चाली–रीति पहावयास मिळतात याधर एकनाथाच्या 'रुक्मिणी–स्वयंवरा'ची छाया पडली असली तरी वेदान्ताच्या बाबतींत ती अगदीं सूक्ष्म आहे म्हणूनच या आख्यानास रुक्षता

न येता एक प्रकारची गोडी आली आहे आणि कवीचे अखेरचे उद्गार अगदी खरे आहेत: —

रुक्मिणी सेवर ऐकता अल्हाद रे। श्रीधरस्वामी केवळ ब्रह्मानंद रे ॥ ९८ ॥

## ८ 'रुक्मिणी–विनोद'

यात एकोणतीस पद्ये असून शिवाय मधून मधून पद्ये घातली आहेत. वामन पंडिताचे हे प्रकरण फारच सरस झाले आहे. त्याच्या पुढे हे अगदी फिक्के पडते. श्रीकृष्ण सहज विनोदाने रुक्मिणीस बोलले की, तू नेणतेपणे मला वरलेस, आता जो कोणी तुला आवडेल त्याला माळ घाल. आम्ही काय सदा निष्काम!

ऐसि वाक्ये ऐकोन उदासीन। हृदयामाजि खोचले शब्दबाण ॥
गजबजिले संपूर्ण तेव्हा मन जि। नयनि वाहाति अश्रुजळ पूर्ण ॥२८॥
आगावरि कोसळे कडा जैसा। रुक्मिणीसि वाटला समय तैसा ॥
वस्त्र उडवित। आलि तीस मुर्च्छा। तनु पडली निचेष्टित दशा ॥२९॥

मग ती मूर्छित होऊन पडली. तिला सावध करून पारिजातक पुष्प देऊन समजाविले. पण ही वार्ता भामेस समजताच ती रुसली. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, "रुक्मिणीला फूल देऊन उतराई झालो पण सगळा पारिजातक वृक्षच तुझ्या अंगणात लावतो. मग तर झाले?" त्याप्रमाणे करून तिचीही समजूत केली.

## 'दानव्रत'

यात वीस ओव्या आहेत सत्यभामेचे 'कृष्णदान' यात वर्णिले आहे.

## १० ' भामाविनोद '

यात पंचवीस पद्ये आहेत.

यातस्त्व किमुकालयेत्र मृगया शक्त्या विलंबः कृतो । .. इ. पाच श्लोकातील विनोद मराठी टीकेत केला आहे.

## ११ ' भामादूति–संवाद '

यात पचवीस पद्ये आहेत.

अंगुल्या कः कपाटं प्रहरति कुटिले माधवः किं वसन्तो । ... इ. तीन श्लोकावर मराठी टीका केली आहे.

## १२ ' भामा-कृष्ण–संवाद '

यात एकोणतीस पद्ये आहेत. वरीलप्रमाणेच विनोद केला आहे

## १३ ' भामा-आनंद '

यात सात पद्ये आहेत. कृष्ण भामेला भीमकी समजून तिच्याशीं प्रेम करतो. रुसवा व समजूत मोठी मजेदार आहे.

## १४ ' रुक्मिणीनिश्चय '

यात नऊ पद्ये आहेत. 'सर्वा घरीं तो कृष्ण एकच असतो हे जाणा,' हे याचे सार आहे.

सर्वा घरिं गे येकलाचि । तो जगजेठि ॥

ब्रह्मानंद व्यापला सर्वा घरिं । श्रीधरें हे सांगितलें मज गोष्टि ॥ ९ ॥

## १५ ' उखाहरण '

यात चौतीस पद्ये असून हे पूर्ण आहे. पार्वतीच्या वराने बाणासुर-कन्या ' उखा ' हिला स्वप्नात पतिदर्शन होते. चित्रकलाकोविद

चित्रलेखेच्या अनेक चित्रातून ती अनिरुद्धास तोच स्वप्नातील पति असे ओळखते त्यास आणते. चार महिने त्याचा गुप्त समागम होतो. ती वार्ता बाणासुरास श्रुत होते त्यात हरिहराचे युद्ध होते. शेवटी ऐक्य होऊन लग्न लागते अशी ही कथा आहे.

या प्रकरणाची त्रुटित प्रत म्हणजे पद्ये अकरा ते तीस पर्यन्त असलेली राजवाडे यांच्या कऱ्हाडच्या वाड्यात आहे कवनाचा छंद लागत नाही असे म्हटले आहे.[४] पण वरील प्रत समग्र व शुद्ध असून आख्यानावर 'छंद पंचचरणी' असे म्हटले आहे. यात पहिले चार चरण सयमक असतात, उदाहरणार्थ.—

बंदिवान घातला मदनसुत । इकडे द्वारकेसी काय जाहली मात ॥
रतिरुक्मिणी प्रद्युम्न शोक करीत । नारद जाऊनि तयासि करी श्रुत ॥
दलभारासहित धावा आला यादवराव ॥२८॥

## १६ 'सुदामचरित्र'

यात चौतीस पद्ये आहेत. छंद पंचचरणात्मक, उदाहरणार्थ.—

बाळपणिचा मैत्र भक्त । हरिचा आवडता अत्यंत ।
सुदामदेव तो विरक्त । पिडला दरिद्रे बहुत ॥ १ ॥
अंतरी हरिचे ध्यान । न विसरेचि रात्रिदिन ॥ छ ॥

.. ....... . . .... . ... . .. .......  ..

ऐकता लीला पाहि । दासा दरिद्र नाहीं ॥ छ ॥[५]

---

४ भा इ. स म, वा. इ वृ, श. १८३७, लेख १४३, पृ २७१

५ हीं प्रकरणे पुढील थोर ग्रंथ जो 'हरिविजय' यात आली आहेत



२

## १७ ‘ गोविंद विलास ’

यात सोळा पद्ये आहेत. पाडवाची निस्सीम कृष्णभक्ति व कौरवाचे गाठ्य प्रतिपादिले आहे

## १८ ‘ जांबूळकथा ’

यात सोळा पद्यें आहेत

स्वरुप त्याचें आनगाहुनि विशेष दिसे ।। छ ।।

मन्मथबाणे द्रौपदि भुल्लोन । म्हणे पाचहि भ्रतार माझे पूर्ण ॥

सहावा जरि आसता राजा कर्ण । बरें होतें भोगिते प्रीति करुन ।। २ ।।

द्रौपदीच्या मनात कर्णाविषयीं अभिलाष आल्याचे जाणून कृष्णाने एकदा वनभोजनाचा बेत केला वनात जांबळीखालीं एक ऋषी तप करताना भीमास आढळला. त्याने एक जांबूळ आणले. कृष्ण रागावला. सत्यनिष्ठेच्या कसोटीवर प्रत्येकाने तें जांबूळ झाडावर परत चढविण्याचा प्रयत्न केला, पण द्रौपदीच्या मनांत जी असत् भोगेच्छा आली त्या पापामुळे तें वर चढेना. कृष्णाने विचारताच तिनें कबुली दिली. मग पश्चात्तापानें ती पुनीत झाल्यावर ते जांबूळ झाडावर पूर्वस्थळीं चढले; अशी कथा आहे. त्यावरुन काढलेला निष्कर्ष असा:---

सुन्दर पुरुष दृष्ट्वा पितर भ्रातर सुतं । मनो द्रवति नारीणां आमभाण्ड-
निरा ( ? ) स्फुरम[६]

६ योनिर्द्रवति नारीणामामभाण्डमिवाम्बुतम् ।। अनुशासनपर्व

दृष्टैव पुरुषं हृद्यं योनिः प्रक्लिद्यते स्त्रियाः ।।

सुरूप पुरुष दृष्ट्वा भ्रातर यदि वा सुतम ।

योनिः क्लिद्यति नारीणामामपात्रमिवाम्भसा ॥ सु र.भा.पृ ३६४,४०

छेदि भक्ताचे अभिमान दोष बंध । लावि सर्वदा आपुला निजछंद ।। १६ ।।

## १९ ‘ हस्तगौरीव्रत ’

यात बत्तीस पद्ये आहेत. हें ‘ गजगौरीव्रत ’ या नावानें प्रसिद्ध आहे अर्जुनानें ऐरावत आणून कुन्तीचें व्रत पूर्ण केलें.

## २० ‘ चंद्रहासाख्यान ’

यात सेहेचाळीस पद्ये आहेत. हे आख्यान पुढें ‘ जैमिनिअश्वमेधा ’त आले आहे

## २१ ‘ मयूरध्वज-आख्यान ’

यात पचवीस पद्यें आहेत. हेंहि आख्यान पुढें ‘जैमिनिअश्वमेधा’त आलें आहे

## २२ ‘ पांडुरंगमाहात्म्य ’

यात साठ पद्ये असून पुढें स्वतत्र रचना झाली आहे.

जैसा उभा आहेस येथ आतां । ऐसा चिरकाळ राहे भगवंता ॥ ५७ ।।

.. . ... . ... .......... .. ..............

पंढरपूर ब्रह्मानंद..... । अक्षय तेथे राहिला श्रीधरस्वामी ।।६०।।

असा याचा शेवट आहे.

## २३ ‘ भारती-युद्ध ’

यात दहा पद्यें आहेत. युद्धाच्या धुमश्चक्रींत एका पक्षिणीचे अंडें पडलें. तें अठरा दिवस सांभाळून कृष्णाने वाढविलें. परमेश्वरी कृपा अशी आहे.

भारति युद्ध माडले उद्भट । प्रळय दळें भिनलीं अचाट ॥
होऊ पाहे ब्रह्माड शतकुट । वि I ‍ ्या हाका गाजल्या घनदाट ॥ १ ॥

..... ... ..... ... .. . . .. - ........

अद्‌भुत नवल जाहले ते ऐका ॥ छ ॥
पक्षिणी अडे धरूनि वदनि । आपुल्या निडा जाता वेगे करुनि ॥
युद्धात पडिले सुखिचे सुर्‍नि । वृक्षावरी येका शाकदे बैसोनि ॥४॥

............ .. . .. ....... ..... ...... .

गजघटा येकली तुटली विशाळ । झाकली वरी रक्षिले आत बाळ ॥ ८ ॥
अक्षय कवच जाहल . ..। अष्टादश दिन सुखरूप असे ॥ १० ॥

## २४ ‘ उपमन्य चरित्र ’

यात सतरा पद्यें आहेत
येक अकिंचन दुर्बळ ब्राह्मण । पुत्र जाहला उपमन्य ॥ १ ॥

.. .. ..... ..... .. . .. ........ . ......

अशी सुरवात करून क्षीरसागर बक्षिस दिल्याची कथा सागितली आहे

## २६ ‘ मंडुकोद्धार ’

यात आठ पद्ये आहेत पाण्याच्या कढईत बेडकी होती. खाली जाळ लावून पाणी उकळले गेले. पण पूर्व संस्काराने ‘ कृष्ण ’ नामोच्चार केल्यामुळे ती जिवत निघाली.

## २७ ‘ कपोतकथा ’

यात दोन पद्ये आहेत. नरमादी वृक्षावर होतीं खाली व्याध, वरतीं बहिरी ससाणा. नारायणाचा धांवा त्यानीं केला व्याधाला सर्पदंश झाला. बाण सुटला, ससाणा मेला. संकटमुक्ति झाली.

श्रीधरस्वामी तो भाविका वश्य होय निजांगे राखत पूर्ण रे ॥२॥
असा शेवट केला आहे.

## २७ ' देवभक्त-संवाद '

यात सेहेचाळीस पद्ये आहेत भक्तानें देवास जिंकले. उभयतांना अभेद दाखवला आहे

देवभक्त येक तेव्हा झाले अभेद ॥छ॥
श्रीधरस्वामी ब्रह्मानंद विश्वरुपे तो अभेद ॥४६॥
असा शेवट केला आहे.

## २८ ' रामकृष्णउपासक '

यात त्रेचाळीस पद्ये आहेत. दोन उपासकांचे भांडण ते द्वारकेला निर्णयार्थ गेले. तो: –

रामकृष्ण हा अभेद । अवघा येक ब्रह्मानंद ॥
श्रीधरस्वामी तो अगाध । अभंग अक्षय सांचे ॥४३॥

## २९ ' उमारमा-संवाद '

यात तेहतीस पद्ये आहेत
विष्णु शंकर ते अभिन्न । अवघा ब्रह्मानंद पुर्ण॥
श्रीधरस्वामी तो निर्गुण । निर्विकार अभंग ॥३३॥
दोघां भेद नाहिं कदा सर्वथा ॥छ॥

## ३० ' रामकृष्णलीला '

यात तेवीस पद्यें आहेत
नाह्नि नामरुप रे सदा जो अरुप रे।कौशल्या माय त्यास दशरथ बाप रे॥१।
पूर्ण ब्रह्म होय रे वर्णावे तें काय रे । ... . . ..... . ............

पूर्ण ब्रह्मानद रे जाहाला आनद रे । भीमातटीं वाळुवटि उभा तो आभेद रे ॥ २३ ॥

## ३१ ' दिव्य जानकीचें '

यात पदासह चाळीस पद्यें आहेत.

रावणें तुज नेले हा शद्ब । लौकिकिं अपवाद ।
वाटला बहु आम्हासि खेद । तुटला कंद ॥१७॥
वाटले मनासि बरवे । तिकडे जावे ॥
देखिले सेवरि स्वभावे । त्यासि वरावें ॥१८॥

वाटेल तिकडे जा. स्वयवर कर, इत्यादि रामकृत निषेध -- अग्निदिव्य--नंतर जानकीचा स्वीकार. हें कथानक यात वर्णिले आहे

## ३२ ' सीता--विलास '

याची पद्यसख्या बेचाळीस आहे. विलासात रामानें अलकाराची अदलाबदल करण्याची कल्पना काढली. परतु सीतेनें अशी शका प्रदर्शित केली कीं, माझे रत्नाचे पैंजण आपल्या पादस्पर्शानें स्त्रिया होतील. मला सवती नकोत. हें एकून रामास सतोष झाला व अदलाबदल राहिली

## ३३ ' कुंभकर्ण--मतिपालट '

यात पदासह पधरा पद्यें आहेत. 'रामाचे रूप घेऊन सीतेला वश कर' असा उपदेश कुभकर्णाने रावणास केला. पण तसे करता त्याच्यात रामप्रकृतित्व उत्पन्न झाली, म्हणजे रावण रामासारखा शुद्ध सत्त्ववृत्ति बनला व आपला प्रयत्न विफल झाला हे पाहून कुभकर्णाची मति पालटली.

## ३४ ' वशिष्ट--विश्वामित्र--संवाद '

यात सत्तावीस पद्ये आहेत. विश्वामित्राचे ब्रह्मर्षिपद वशिष्ठाने मान्य केलें

वशिष्ठ म्हणे धन्य धन्य तु ब्रह्मऋषि ॥ छ ॥......

देवि सुमनवृष्टि दोघावरि केली । सखे होऊन विचरुनि भुमडळीं २६ ॥

... .................... ....................

वशिष्ठ गोत्रिं उद्भवला ब्रह्मानद .....इ

## ३५ ' रेणुका-सैवर व परशुराम जन्म '

यात चव्वेचाळीस पद्ये आहेत कान्यकुब्ज देशाचा 'रेणुराज' याची ' रेणुका ' ही मुलगी. स्वयंवरात तिने जमदग्नीस वरिले

## ३६ ' रेणुका-चरित्र '

यात सत्तावीस पद्यें आहेत. एकदां रेणुका स्वर्धुनीस स्नानार्थ गेली असता तेथें कुबेराची जलक्रीडा पाहात राहिली काळातिक्रम झाला म्हणून जगदग्नीचा क्रोध. परशुरामाकडून त्याने तिचा वध करविला सुपुत्रास त्याने वर देऊन तिला जिवत केलं.

## ३७ ' सिव--गौरी लग्न '

यात पन्नावन्न पद्ये आहेत दक्षयज्ञ-शकरानिंदा-यज्ञांत दाक्षायिणी उडी टाकते पुढें हिमाद्रिकन्या होते व शेवटीं शंकराशीं विवाह होतो.

## ३८ ' भद्रसेन--चरित्र '

यात बत्तीस पद्ये आहेत. 'भद्रसेन' राजा व 'सुधर्मा' प्रधान या दोघाचे भक्तिप्रेम व महानंदा-आख्यान वर्णिले आहे. हे पुढे ' शिव-लीलामृतांत ' आलं आहे.

## ३९ ' सुधर्मा-तारक-चरित्र '

यात एकतीस पद्ये असन वरील आख्यान पुढे चालू केलें आहे.

## ४० ‘ भिल्लि-सिव-संवाद ’

‘ यात अठ्ठावीस पद्यें आहेत सारीपाटावरून भांडण यात वर्णिले आहे.

## ४१ ‘ श्रियाळ-चरित्र ’

यात वीस पद्यें आहेत हे व वरील तीन प्रकरणे ‘ शिव-लीलामृता ’ त पुढे आलेलीं आहेत.

करुणास्वरें बाहात ते वेल्हाळ । अकस्मात धांवोन आला बाळ ॥
गगनि वाद्यांचे धडकताति कल्लोळ । अतीत होता तो जाहाला जाळनीळ ॥ १९ ॥

## ४२ ‘ शुभ्रसिवध्यान ’

यात तेरा पद्ये असून शिवाय चार पदें आहेत. यात ‘कैलास’,‘नंदी’, ‘मंडप’ इत्यादिक सर्व शुभ्र असे वर्णन करून पुढील चार पदात ध्यान वर्णन केले आहे.

## ४३ ‘ भस्मासुर-मर्दन ’

यात एकवीस पदें आहेत भस्मासुरवधाचें वर्णन करून शिव-केशव अभेद वर्णिला आहे:—

सिव–केशव अभेद । अवघा येक ब्रह्मानद ॥
श्रीधरस्वामी तो अगाध । चरित्र अपार दावि ॥ २१ ॥

## ४४ ‘ सिव–गौरी–विनोद ’

यात तेरा पद्ये आहेत.

मौलौ किं नु महेश मानिनि जलं किं वक्त्रमम्भोरुहम् ।
किं नीलालक वेणिका मधुकराः किं भ्रूलता वीचिका ॥

इत्यादि सुप्रसिद्ध संस्कृत श्लोकाधारें हा विनोद चटकदार झाला आहे

## ४५ ' कुमार-गजानन-लीला '

यात अकरा पद्यें आहेत. या लीला पुढील संस्कृत श्लोकाधारे मराठींत वर्णिल्या आहेत:—

हे हेरंब किमंब रोदिषि पर कर्णौ लुठत्यग्निभूः ।
किं ते स्कंद विचेष्टितं मम पुरा संख्या कृता चक्षुषः ॥
इत्थ तेऽनुचित गणेशचरित नासा प्रणीतात्र मे ।
चैव तौ स्वसुतौ विलोक्य हसति पायादपायादुमा ॥२॥[७]

## ४६ ' गजानन-षडानन-संवाद '

यात अकरा पद्यें आहेत.

मातः किं करवाणि संप्रति शिशो जातः किमेतादृशम् ।(शिशुः) ?
स्तन्यं यद्यपि दत्तमन्यवदनैराक्रन्दते भूरिशः ॥
सात्वेव हसता शिवेन गदिता ' देवि प्रसूतासि किम् ' ।
लज्जानम्रमुखा जगाद गिरिजा स्वामिन्न मे दूषणम् ॥

याचा मथळा ' शिव-गौरी-संवाद ' पाहिजे होता. गजाननाचा यात संबंध नाहीं.

---

७ हे हेरम्ब किमम्ब रोदिषि कथ कर्णौ लुठत्यग्निभूः ।
किं ते स्कन्द विचेष्टितं मम पुरा संख्या कृता चक्षुषाम् ॥
नैतत्तेऽप्युचितं गजास्य चरितं नासा मिमीतेऽम्ब मे ।
तावेवं सहसा विलोक्य हसितव्यग्रा शिवा पातु वः ॥
सु. र. भा. १२।३०

## ४७ ' शिवरात्रि '

यात बत्तीस पद्ये आहेत. यात व्याधाची गोष्ट आहे. ही कथा लिंगपुराणातून' घेतली आहे असे सांगितलें आहे. ' शिवलीलामृतांत ' ही कथा आली आहे.

लिंगपुराणि बोलिला व्यासदेव कथा। धन्य धन्य सिवरात्रि महाव्रत॥
श्रवण करिता पातकें दग्ध होत। ब्रह्मानंद हृदयीं उच्चळना।
श्रीधरस्वामी अभंग विराजत ॥३२॥

## ४८ ' व्यापार '

यात त्रेचाळीस पद्ये व तीन श्लोक आहेत. वेदान्तपर आहे खालील श्लोक आले आहेत :—

बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुत:।
गुणस्य माया मूलत्वात् न मे मोक्षो न बन्धनम् ॥ १ ॥
' द्वा सुपर्णा सयुजा सखाया ' इत्यादि व ' विद्यामयोय स नु
नित्यमुक्त: ' इ

## ४९ ' शुकरंभा-चरित्र '

यात अडतीस पद्ये आहेत. ' तुझे सुवासिन शरीर आहे असे जर मला पूर्वी समजले असतें तर मातेच्या उदरीं बारा वर्षे न राहाता तुझ्याच पोटीं आलों असतो ' हे शुकाचें भाषण ऐकून रंभा गर्वहत झाली व शुकास साष्टांग नमस्कार करून निघून गेली :—

नरनारि मिथ्याच भास पाहिं जी ॥ छ ॥
ब्रह्मानंद सचरला सर्व ठायिं ॥

असा याचा समारोप केला आहे.

रंभारूपवर्णन: — यात तत्कालीन डागिणे वर्णिले आहेत ते असे:— जाळी, बिंदी, नथ, बुगड्या, ताटक, बाजूबंद, पीन कचुकी, इत्यादि यात मुक्तेश्वरी चारगटपणा नाहीं.

## ५० 'जडभरथाख्यान'[८]

यात त्रेचाळीस पद्यें आहेत. 'येथींचा अनुभव फक्त गुरुभक्तच जाणती; बहिर्मुखास हें सुख अप्राप्य आहे.' हे सार सागितलें आहे.

## ५१ 'भिक्षुगीत'

यात पन्नास पद्ये आहेत. हें श्रीकृष्णाने उद्धवास सांगितले आहे. ती गोष्ट अशी.—

अवतीनगरींत 'कदर्यु' नांवाचा विप्र होता. तो नावाप्रमाणें कवडीचुंबक होता. आकस्मिक सकटानीं त्याचे सर्व धन गेले. धावा केल्यावर गुरु भेटला. त्याने उपदेश केला. नतर त्याने संन्यास घेतला. दुर्जनाचा छळ झाला तरी त्याने आपली अगाध शाति सोडली नाहीं तात्पर्य कीं, शातीनें परमार्थ साधतो.

## ५२ 'यथा गंगायां प्रति घोषा वसन्ति'

यात अकरा पद्ये आहेत. कोणी एक अज्ञ मनुष्य मायासरिता आडवी आलेली देखता झाला. डोहात त्यास जलचर दिसले. गंगेत गऊळवाडे, झाडे, गुरे दिसलीं. तीं पाहून तो भुलला, आत जाऊ लागला; तोंच गुरुने दुरून खुणाविले. भक्ति वैराग्याची पेटी त्यास बाधून त्याने त्यास पैलतीरास नेले व 'जाणे येणे नाहीं विश्व हे ब्रह्म पाहीं' हे तत्त्व त्यास शिकविले.

---

८ जडभरताख्यान (!)

## ५३ ' मनोनुस्तंभकाकवत् '

यात नऊ पद्यें आहेत. साधूचे मन कसे तर स्तंभकाकवत् असते गोष्ट अशीः—एकदा एक कावळा जहाजाबरोबर समुद्रप्रवासास निघाला जहाज मोठ्या समुद्रात गेल्यावर सर्वत्र पाणीच पाणी. तेव्हा त्याला शिडाच्या स्तंभाशिवाय कसलाच आश्रय दिसेना. तेव्हा तो त्यावर बसून कर्णधारास शरण गेला व त्याच्या आश्रयाने निजद्वीपास गेला. तो दळणवळण टाकून निजमुखात राहिला. मग त्याचे अवलीला कागपण गेलें. कारण ' मानस ' सरोवरात स्नान केलेला काग हंसच झाला. ' हंसःसोऽहं ' असे निजपद पाऊन शुद्धबुद्ध झाला. तात्पर्य हे कीं, आद्यंत आपणच दुसरा नाहीं हा तत्त्वबोध होई तो मन अनावर असतें. पण.—

परे तत्त्वे विदित्वा तु मनोनुस्तंभकाकवत् ॥

## ५४ ' व्याघ्र-गुरुवर '

यात आठ पद्ये आहेत. एका व्याधानें एकदा एक व्याघ्र पिलू चोरून आणलें. मग तें सुणीचे कासेस लावलें. संगदोषाने कुत्रीच्या पिला बरोबर ते पण भुंकू लागले. पुढें त्यास सावध करण्यास निरंजनीचा वाघ आला व त्यास म्हणाला,– अरे ! तुझी व माझी जात एकच आहे. तूं असा मूर्ख कसा झालास ? सखया, आपले स्वरूप पहा. ' त्वंपद ' ' तत्पद ' देख 'असि' पदीं त्याचें ऐक्य कर, आणि मग स्वानंदसुख भोग. या उपदेशाने ते पिलू सावध झाले.

श्रीधरस्वामीचा बोध कोंदला ब्रह्मानंद । हरिला सर्व दंभ रे ॥ हे त्यातलें सार आहे.

## ५५ ' दिलिपराव '

यात सुमारें साठ पद्ये असून लहान अनेक तुकडे आहेत. दिलीपाने जनकाचे राज्य जिंकलें. पण जनकास खेद झाला नाहीं. याचें कारण काय असा दिलीपानें नारदास प्रश्न केला. नारदानें सांगितलें कीं, तो ज्ञानी आहे म्हणून. मग त्याची दैवी संपत्ति मला कशी मिळेल असा त्याने पुनः प्रश्न केला. त्याने जनकास शरण जाण्यास सांगितलें. तसें त्याने केलें व बोध घेऊन तो परत गेला. यापुढें सहा पद्यात 'ब्रह्मज्ञान' विवरण केलें आहे

## ५६ ' दीपक-चरित्र '

यात अठ्ठावीस पद्ये आहेत. दीपक'नावाचा एक ब्राह्मण बालक होता. तो अनन्य गुरुभक्त होता. वादविवाद, कुतर्क करणे तो जाणत नसे. तो गुरुच्या पुढेपुढे सात दिवस उपाशी राहिला. गुरु प्रसन्न झाले व त्याला उपदेश दिला

## ५७ ' चिन्मय मोतीं '

यात पांच सहा पद्यांचे तीन तुकडे आहेत.

श्रीधरस्वामीच्या योगें मोती सांपडले वेगें ॥

असा त्याचा शेवट आहे

## ५८ ' सासुरवास '

यात सुमारे पंधरा पद्ये असून हे अध्यात्मपर रूपक आहे.

सासरवर्णनः—सासू=अविद्या ही दुष्ट व खाष्ट आहे, सासरा=म्हातारडें मन हा काहीं चालूं देत नाहीं. भ्रतार=नष्ट अहंकार. कामक्रोध=भावे; मदमत्सरदंभ=दीर लोभ-मोह=पतीचे मित्र; सवत=देहबुद्धि; नणदा=आशानिंदा, जावा=ममता व भ्रांति-मोठ्या कुटील; दासी=दुर्वासना; हीं सर्व

मंडळी जन्ममरणाचे दुःख भोगवितात. नेसण्यास अमंगळ वस्त्र, भक्ति अन्नाचा नकार; शांति पांघरुणाचा अभाव, नाकीं निजमुक्त मोतीं नाहीं, निजकल्याणाचे कुंकू देत नाहींत, म्हणून औटहात शरीर रोडावलें आहे. माहेरच्या स्मरणासही बंदी !

माहेरचें वर्णनः—पिता=निजबोध, माय=उन्मनी, बंधु–निजभाव, चुलता–सद्विवेक.

अशा दुःखात सासरीं दिवस कंठीत असता अकस्मात् सद्गुरु मूळ घेऊन आले. मला ब्रह्मानंद झाला. कारण—

माझी सर्व आटाआटी निरसली । मग श्रीधरस्वामी परिपूर्ण येक सृष्टि वो । ब्रह्मानंदें माहेरीं सौख्यवृष्टि वो ॥ ९ ॥

## ५९ ‘ बोधचौसष्टी ’

यात चौसष्ट ओंव्या आहेत.

चौसष्टि पद बोधाचें । केवळ अंतर शोधाचें ॥
श्रीधरस्वामी गुण वाचे । गाता हर्षे मन नाचें ॥ ६४ ॥

## ६० ‘ उपदेशसासष्टी ’

यात सहासष्ट ओंव्या आहेत.

तू कोण कोठील वगैरे आत्मज्ञान यात वर्णिलें आहे.

पाहे चिन्मय दृष्टि रे । श्रीधरस्वामी सृष्टि रे ।
सरली आटाआटी रे ॥ ६६ ॥

## ६१ ‘ स्त्रियांनीं गुरु करावा ’

यात चोवीस पद्ये असून सहा पदें आहेत. स्त्रियानीं गुरु करूं नये. पतिरेको गुरुः स्त्रीणाम् ’ असें म्हणतात, पण त्यानीं गुरु करावा असा मी

शास्त्रार्थ दाखविते. पतिव्रतांनीं इतरांस संग देऊं नये इतकेच त्याचे व्रत. आपल्या प्रजेप्रमाणें जो शिष्यास पाहतो त्यासच 'गुरु' करावे. यास अनेक उदाहरणे आहेत. पहा.—

| | स्त्रिया | गुरु | | स्त्रिया | गुरु |
|---|---|---|---|---|---|
| १ | वज्रबाहुपत्नी | शिवयोगी | ८ | कुटिला | दुर्वास |
| २ | दाशार्हपत्नी | दुर्वास | ९ | गोपी | उद्धव |
| ३ | उमा | कर्मदी | १० | चुडाला | शिखिध्वज |
| ४ | शारदा | नैधृव | ११ | देवाहुती | कपिल |
| ५ | मदालसा | अश्वमेधि | १२ | मदोदरी–तारा–शबरी | राम |
| ६ | कयाधू | नारद | १३ | मैनावती | जालधर |
| ७ | ध्रुवमाता | नारद | १४ | मुक्तेश्वरी | ज्ञानदेव |

या सर्व तरल्या. यास मिति नाहीं.

याच विषयावर नाथानींही चर्चा केली आहे.[९] त्यात काहीं उदाहरणे आलीं आहेत. त्याचे म्हणणे असे कीं, स्वस्त्रीस उपदेश करण्याचा अधिकारच आहे. परस्त्रीस उपदेश करावयाचा तर दोन्ही जितेंद्रिय व अधिकारी असतील तरच करावा. अधिकारी कोण ?

स्त्रीपुरुष अवलोकन । जयाचे दृष्टीं समसमान ॥
ऐसे अनुभवीं जो परिपूर्ण । तोचि स्त्रियासि जाण उपदेशी ॥[१०]

ही व्याख्या श्रीधराच्या वरील गुरूच्या वर्णनाशीं जुळतीच आहे. रामी-रामदासाचे 'सुगमोपायां'त हेच मत आढळतें. क्वचित् विधवेस राम-

९ ए.भा.,अ., २९, ५६३ ५९०. १० ए.भा.,अ ,२९, ५८०

भजनास लावणें क्षम्य आहे. पतिव्यतिरिक्त गुरु करणाऱ्या स्त्रियेस मुक्तेश्वर " सौरी " म्हणतात.

## ६२ ' कपोत–कपोती–संवाद '

यात ऐकेचाळीस ओंव्या आहेत तात्पर्य, संसारात नलनीजलवत् निर्लेप रहावे.

## ६३ ' कृष्णलीला '

यांत सेहेचाळीस पद्यें आहेत.

## ६४ ' हरिलीला '

यात अठ्ठेचाळीस पद्ये आहेत.

## ६५ ' कृष्णलीला '

यात तीस पद्यें आहेत.

## ६६ ' गोरक्षण '

यांत सुमारें सोळा पद्यें आहेत. 'गो' म्हणजे इंद्रियें व 'गाई' यास हरिपदिं गुतवावें.

## ६७ ' कृष्णनिंदा '

यात तेरा पद्यें आहेत. पर्यवसान स्तुतींत केले आहे.

निंदे माजि स्तवनाची रुचि । अगाध महिमा श्रीधरस्वामीची ॥

## ६८ ' चतुर्भुज सावज '

यांत एकुणचाळीस पद्यें आहेत. यांत पारधी व पर्णभक्षी तपस्वी याच्या संवाद दिला आहे. पारध्यानें सावज आणले ते चतुर्भुज कृष्णरूपें प्रगटलें व दोघांचाही उद्धार झाला.

## ६९ ' प्रल्हाद-चरित्र '

यात शंभर ओव्या आहेत. कथा सुप्रसिद्ध आहे.

## ७० ' एकादशी-आख्यान '

यात एकशे सदतीस पद्ये आहेत. रुक्मांगद-कथा 'नारद' पुराणातून घेतली आहे.

## ७१ ' हरिश्चंद्रोपाख्यान '

यात तीन प्रसंग आहेत. पहिल्या प्रसंगात एकशे बावीस पद्ये, दुसऱ्या प्रसंगात एकशे सोळा पद्ये व तिसऱ्या प्रसंगात एकशे बारा पद्ये अशी एकूण तीनशे पन्नास पद्यसंख्या आहे.

## ७२ ' समुद्र-मंथन '

यात चौसष्ट पद्ये आहेत. ' भारतमहिमा ' शेवटीं दिला आहे.

## ७३ ' लाक्षासदन '[११]

यात एकशे चार पद्ये आहेत.

आदीपर्वीची रसभरित कथा । पुढे कथा रसभरित ॥
सुधारसाहूनि गोड बहुत । श्रीधरमुखे पदरीनाथ ।
अतिसुरस वदवील हो ।। १०२ ।।

## ७४ ' बकमर्दन-प्रसंग '

यात सदुसष्ट ओव्या आहेत.

---

११ ' पाण्डवप्रतापात ' ही कथा आली आहे.

मग बोले वेद व्यास । यावरी शत्रु पावतील नाश ॥
कल्याण आहे तुम्हास । भाग्य विशेष प्रगटलें पैं ॥
ब्रह्मानंद श्रीधरवरद । ठेविलें नाम सांभाळी ब्रीद ॥
पांडवप्रताप ग्रंथ विशद । शेवटास पाववीजें ॥ ६७ ॥

## ७५ ' द्रौपदी–स्वयंवर '

यात एकशें एकसष्ट ओंव्या आहेत.

कृष्णकृपेचें बळ अद्‌भुत । दुःख कदा न पावती भक्त ॥
लाक्षागृहापासुन मुक्त । पाडव जहाले पूर्वींच ॥

## ७६ ' सुभद्रा–हरण '

यात एकुणसत्तर ओंव्या आहेत.

सुभद्रा श्रीकृष्णाची भगिनी । देऊ केली होती अर्जुना लागुनी ॥
त्यावरी पार्थ तीर्थे करावया मेदिनी गेला पैं ॥
कथा सुरस चालवी पुढें ॥ ६७ ॥
असा शेवट आहे.

## ७७ ' थालीपाक '

यांत एकुणऐंशी पद्यें आहेत.

## ७८ ' नळोपाख्यान '

यात एकशें सहा पद्यें आहेत 'बृहदश्वा म्हणे धर्म राजा' इ असा आरभ केला आहे.

पाडवप्रताप ग्रथ विशेष । त्यात नळोपाख्यान सुरस इ.

..........................................

पडितां विनवी श्रीधर । श्रवण करा आदरें ॥ १०६ ॥

## ७९ 'द्रौपदी-हरण'

यात सत्याहत्तर ओंव्या आहेत. 'भवपंकजोद्भवपाकशासन' इ.

ब्रह्मानदा रुक्मिणीवरा। श्रीधरहृदयकल्हारभ्रमरा॥

तव वरदें जगदाधारा। ग्रंथ पुढें चालों का॥ ७७॥

## ८० 'भीश्म (ष्म)- प्रतिज्ञा'

यात चोपन्न ओंव्या आहेत

श्रीरंग म्हणे अर्जुना। भीष्में आटिली सकळ सेना॥

तुझी कोठें राहिली प्रतिज्ञा। लाज तुज का न वाटे?॥ इ.

## ८१ 'चक्रवीह (व्यूह)—प्रसंग'

यात दोनशे पचेचाळीस ओंव्या आहेत.

धन्य धन्य ग्रथ भारत। श्रीधरहृदयाब्जभृग॥

उभा अभंग इटेवरी। इ.

ओळी तुटक आहेत.

## ८२ 'परिक्षिति-प्रसंग'

यांत एकशें एकुणचाळीस ओंव्या आहेत.

उद्धरला राजा परिक्षिति। श्रीधर म्हणे सत श्रोती॥

सावधान परिसिजें॥ १३९॥

## ८३ 'कळी--आख्यान'

यांत छपन्न ओंव्या आहेत. कलियुग लागलें; त्यास राहाणें बरें नाहीं म्हणून कृष्णाने सर्व धन दान केलें.

## ८४ ' निजधाम-गमन '

यात सत्तेचाळीस पद्ये आहेत.

हरि म्हणे उतरिला पृथ्वीचा भार । परि यादवकुळ अनिवार ॥
याचा करून संहार । मग जावे निजधामा ॥ १ ॥

. ...... ....... .. .......... . . .

ताडी माडीचे रस काढुनि । यादव उन्मत्त जहाले पेउनी । ...
येकमेका संहरती ॥ १६ ॥
पुढले प्रसंगीं निरोपण । अर्जुन आपला शोक मावरून ।
आपले आपण समाधान करून । हस्तनापुरा जाईल ॥ ४६ ॥

......... .. ... . ... . .. .. ...... ..

पुढें कथार्थ परिसा जी ॥ ४७ ॥

## ८५ ' स्वर्गारोहण '

यात अठ्ठ्याण्णव पद्ये आहेत व दोन प्रसंग आहेत

प्रसंग पहिला :— अर्जुनाचा कृष्णाबद्दल शोक, इतराचा शोक ' कलियुग लागणार, तुम्ही क्षणभर राहू नका ' हा अर्जुनाने धर्मास आणलेला संदेश, तदनुसार परिक्षितीस राज्यारोहण करवून धर्माचे बंधुपत्नीसह बहिर्गमन. उत्तरेकडील दीर्घ प्रवास, तहान-भुकेने थकवा, बागेतील फळे, द्रौपदीचा मणि ठेवून घेणे, कलिप्रभावाने त्याचे बालमुंडात रूपांतर, राजदूताकडून त्याचे बंधन, शूलाची शिक्षा, कृष्ण प्रार्थनेने त्यातून सुटका इत्यादि कथाभाग यात आला आहे.

प्रसंग दुसरा :— पुष्कळ साहसानंतर अरण्यपुरप्रवेश, भगवंतानी धाडलेल्या विमानांतून दुर्योधनासह सर्व गेली. मध्यंतरी सत्यनिष्ठेच्या परिक्षेत एकेकाचे पतन, वगैरे सर्व वैकुंठास गेली

तें पाहतां वेकुंठपद । अवघा वोतला ब्रह्मानंद ।
श्रीधरस्वामीची अगाध । लीला विशद कोण वर्णी ॥ ६८ ॥

## ८६ ‘ ध्रुवाख्यान ’

यात चाळीस श्लोक आहेत.

सतोशला श्रीगुरुदेव रावो । प्रसन्नरूपे मज दे वरा वो ॥
अगाध ज्याची निजनाम कीर्ति । चिंता मनीं श्रीगुरुराजमूर्ति ॥ १ ॥

.. . . . .,....... .. .. . .. . .... ...... . .......... ..

दत्तात्रया श्रीगुरुदेवदेवा । श्री ब्रह्ममूर्ति तव पादसेवा ॥
अभंग होचि मज लागि देई । ठेवो तुझ्या श्रीधरराज पाई ॥ ४० ॥

सत्ताविसाव्या श्लोकापासून ‘ विष्णु ’ वर्णन फारच थाटाचे असून अक्षरगणवृत्तेंहीं त्यास सफाईने रचता येत असत असे यावरून दिसते

## ८७ ‘ वनमाला–चरित्र ’

यात वीस पद्ये आहेत. यात ‘ वनमाला ’ पाहून इंदिरेस वाटलेला मत्सर काव्यकल्पनेने सुंदर रंगविला आहे. ती आपल्याशीं विचार करते –

वनमाळा रानट हे रानींची । प्रेमळानीं घातली गळा कैंची ॥ १ ॥

तिला कृष्णाचा नित्य सहवास, तो सर्वांगीं तिचा नित्य सुवास घेतो हे पाहून तिला क्रोध आला, व मनात म्हणते, कृष्ण हिला भुलला माझा महिमा तो जाणतच नाहीं. वनमालेने माझे प्रेम हिरावून घेतलें. पण हिला काहीं विपरीत बोलावे तर मलाच तो टाकून देईल कीं काय अशी भीति वाटते. माझ्या नशीबीं नेहमीं चरणसंवाहन अन् ती तर त्याच्या सदा गळा पडलेली ! पण पुढें रमेनें ही झालेली देहबुद्धि व मत्सर टाकून देऊन तिला वंदन केले. मग—

ऐसे देखोनिया कमळा नाहो । इंदिरेसी हृदयीं धरिले पहा हो ॥ १९॥

तात्पर्य काय कीं;—

मछर सर्वही साडिता ब्रह्मानंद । श्रीधरस्वामी न उरेची
काहीं खेद ॥ २० ॥

## ८८ ‘ नारदनामामृत ’

यात पचवीस पद्यें आहेत. नारदानें नाममहिमा वर्णिला आहे.

## ८९ ‘ सिखीध्वज-चरित्र ’

यात सतरा पद्यें आहेत. चुडालिकेचा पतीस उपदेश.

तिनें त्यास आत्महत्येपासून पराङ्मुख करून ‘ विवेक ’ नगरास पोहोंचविलें. मग तेथें त्यास ‘ आनंद ’ प्रजा भेटली.

## ९० ‘ मदालसा ’

यात एकवीस पद्यें आहेत.

मदालसा गुरुराणा । पूर्णानंद बाळ तान्हा ।
उपदेश देऊनीया । घालीं ज्ञानपाळण्या ॥ २१ ॥

असा याचा शेवट आहे.

## ९१ ‘ दुर्वास-भोजन ’

यात पंचेचाळीस पद्यें आहेत. साठ हजार शिष्य घेऊन दुर्वासानें भोजन मागितलें. कृष्णानें तें दिलें वगैरे कथा आहे.

द्वारावतीये असतां मनमोहन ।येक अद्भुत वर्तलें चरित्र जाण ॥
रुक्मिणीस बोले यादवराय । अगाध भाग्य ते साधुदर्शन होय ॥
गोमतीचे तीरीं पाहे । अत्रिपुत्र दुर्वास आला आहे ॥ ३ ॥ इ.

## ९२ ' कीर्तनमाहात्म्य

यात सुमारें तीस पद्ये आहेत. यात श्रीधरानें कीर्तनसंस्थेसंबधीं आपले विचार प्रगट केले आहेत. तो स्वतः उत्तम कीर्तनकार होता यामुळें ते विशेष मननीय आहेतः —

कथा-गगा तीर्थाहून विशेष आहे. श्रोते व वक्ते हीं तिचीं दोन तीरे होत हरि-लीला हें पाणी; प्रेमाचा पूर त्याला येतो व नामाघोषाची तें गर्जना करतें. मनोवृत्ति हीं जलचरे तिच्यात सावकाश क्रीडतात. गंगेचे पाणी डहुळतें पण कथा-गगा सदा निर्मळ.

गंगेमाजि बुडतां मरताति । कथाजीवनीं तरताती ॥

पतिविण जशी वनिता तशी श्रोत्याविण कथा आहे. तो श्रोता) सावधान नसेल तर निरुपण व्यर्थ आहे ! पातकीच कथेंत झोंपतात. कथत इतर गोष्टी करणें किंवा लेकरे खेळवणें म्हणजे व्यर्थ जागरण करणें आहे.

श्रोता चतुरभाविक । वक्ता गर्विष्ठ तो मूर्ख ।

तेथें कैचा रे वनमाळी । मुखें वनिताची न्याहाळी ॥

बिदागीच्या आशेने चहुंकडे पाहाणारा वक्ता फुकट आहे. कोणी कथेच्या मिषानें निंदा करतात. श्रोत्याना विषयाची आवड आणि हाही तशीच बडबड करतो. श्रोत्याना पुराणकीर्तन आवडत नाहीं, पण वेश्येचें गाणें मात्र आवडतें. तिला पैसे देतात. असे श्रीधरानें तत्कालीन समाजावर कोरडे ओढले आहेत.

## ९३ ' श्रीदत्तात्रयमाहात्म्य '

यात सव्वीस ओव्या आहेत. कथानक प्रसिद्धच आहे.

देवत्रयाचा गर्व हराया । अवतरालि अनसूया आदिमाया ॥
आदिपुरुष अत्रि तो प्रकटोनिया । सिंह्य पर्वती करी तपश्चर्या ॥ १ ॥

..........................................

आदिपुरुष दत्तात्रय स्वामी माहिं । ब्रह्मानंद तो अभंग भेद नाहीं ॥
श्रीधरवरद अविनाश कालत्रयीं । वर्णिती ज्या अष्टादशच्यारि
साही ॥ २६ ॥

## ९४ ' अनुभवसार '

यांत पंचवीस श्लोक आहेत. ' गुरुब्रह्मानंदायनमः । ' अशा आरंभाचे पाच सिद्धान्ताचें हें प्रकरण आहे. पहिल्याच्या शेवटीं —इति श्री वेदान्तगर्भसुगमसार गुरुशिष्यसंवादे ज्ञानाब्धितरंगे प्रथपीठिका गुरुशिष्य-लक्षणकथनं नाम प्रथमः सिद्धान्तः ॥ इ.

पांचव्या सिद्धान्ताच्या शेवटीं त्वंपद—जीव—तनुचतुष्टय विवरण नाम पञ्चमः सिद्धान्तः ॥

आता ज्या निरनिराळ्या अनेक ' नामावली ' श्रीधराने लिहिल्या आहेत त्या क्रमानें पुढें दिल्या आहेत.

## ९५ ' नामावली '

१ मंदर गिरिधर मकर कुंडल मणिमयहारा......

सनकवंद्या—षड्गुणमंडित......श्रीधरवरदा ब्रह्मानंदा भो ।

इत्यादि चार पद्यांनन्तर पुढील नावें यात आलीं आहेत:—

जयगुरुदेव आचार्य शंकर श्रीधरस्वामी । हस्तामलका । गुरुगोरक्षा । गयनीनाथा । निवृत्ति राजा । ज्ञानेश्वर गुरु । सोपानेश्वर नामदेव जय चांगदेवजय । श्री जयदेवा श्री हरिनाथा । भानुदासगुरु । जनार्दन जय ।

येकनाथ गुरु । महामुद्गला । कृष्णदासा । मुक्तेश्वर गुरु जनजसवता । अच्युताश्रमा सदानंदयति । रामानंदा ।

पुढें स्वत:ची परंपरा दिली आहे :—

.............. ........................... ....... .

दत्तानंदा—ब्रह्मानंदा—निजानंदा—ज्ञानानंदा—श्रीरंगमूर्ति श्रीजयरामा ।
केशवराजा वामनस्वामी । आनंदमूर्ति ब्रह्मानंदा । श्रीधरवरदा । ५

२ **शिवनामावळी :**— यात पाच पद्ये आहेत. भाललोचना—शिवशंकर जय विरूपाक्षा...इत्यादि

३ **हरिहरनामावळी :** --

४ **पार्वतीनामें :**—

५ **नृपतिमाला :**— यात पंचवीस पद्ये आहेत यात भारतीय पुराण प्रसिद्ध राजांचीं नावे आलीं आहेत, परंतु यात मराठेशाहींतलि राजांपैकीं एकाही राजाचे नाव नाहीं याचें आश्चर्य वाटते !

सूर्य सोम यादव मागध चैद्यकुल । वैराट नैषध विदर्भ निर्मल ।
मृग सोम किरात पांडव मधु केवल । हरि वसु कुरुध्वज ॥ १ ॥

..... . .... .......... .. ..... ........

सुबाहु शत्रुमर्दन मद्रपती । यज्ञजीत अमरशतक चोलचक्रवर्ती ॥ इ
ब्रह्मानंदें श्रीधर नृपतिमाला वर्णित आदरें ॥ २५ ॥

६ **ऋषिमाला :**— यात एकोणीस पद्ये आहेत पुराणप्रसिद्ध ऋषींचीं नावे यात आलीं आहेत.

विश्वामित्र असित कण्व । दुर्वास भृगु अंगिरा वामदेव ।
कस्यप अत्रि वसिष्ट महानुभाव । नारद आणि जमदग्नि ॥ १ ॥
श्रीधर ब्रह्मानंदें करून ऋषिमाला गुफी हे ॥ १९ ॥

७ **सतमालिका**—यात काहीं पद्ये असून अठरा ओंव्या आहेत. वरील नामावळीतील काहीं यात असून काहीं निराळीं नावेंहीं आलीं आहेत. आरभ खालील प्रमाणे आहे: —

शकराचार्य गुरुवर । हस्तामलक आणि श्रीधर ।
आनन्दगिरी पृथ्वीधर । पद्मत्रोटक पुष्पदत ॥ १ ॥
गौडपादाचार्य आदिगुरु । गोविंदपादाचार्य महामेरु ।
विद्यारण्य आणि नगेन्द्र । मधुसूदन महामुद्गल ॥ २ ॥
जयदव महारामेश्वर । कृष्णारण्य शान्ताश्रम अच्युताश्रम थोर ।
सन्तोषाश्रम परब्रह्मयतीश्वर । नारायणाश्रम भद्राचल ॥ ३ ॥
हरिनाथ रामचद्र मुकुंदराज । मछेन्द्र गोरक्ष जालन्धर सतेज ।
कानिफा तृटिचर्पट चौरगी महाराज । चपक रावल नागार्जुन ॥ ४ ॥
गोपीचद जगन्नाथ गयनीनाथ । निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान अद्‌भुत ।
मुक्तेश्वरी चागदेव विख्यात । खेचर विसो नामदेव ॥ ५ ॥
गोरा मुधेश रोहिदास । चोका गुह्येश्वर कनकदास ।
विठ्ठल पुरंदर कटिजीत उदास । धाना जाठ भक्त शेन्त (?) ॥ ६ ॥
सनतीदास सतीदास मैराल । मानदास रामदास निर्मल ।
मृत्युजय मुधया एकनाथ । सदानद रामानंद अद्‌भुत ।
अमल गभीर परब्रह्म कल्याणी राहात । सहजानद पूर्णानद ॥
दत्तात्रय ब्रह्मानद श्रीरगमूर्ति ज्ञानानद । माधवदास सोमदास
प्रसिद्ध ॥ कवि जाल्हण जगतारक ......(११)
वडवानल सिद्ध नागेश । अज्ञानसिद्ध महापुरुष । नृसिंह—
सरस्वति केशवदास । जातवेद एकलिंग पैं ॥ १२ ॥

चिन्हाडसिद्ध भोजलिंग । कृष्णदाम मुद्गल मुक्तेश्वर अभग ।
लीला विश्वभर दासोपत अनुराग । वैजोदत समुदास कान्हा ॥ १३ ॥

..................... .................. ..

ज्ञातलिंग कृष्णज्ञान । जयराम रमावल्लभ तुकाभक्त ।
सतवा लतिफ अद्भुत । आत्मबोध विश्रांतिराज ॥ १६ ॥
·· मालो नरहरि पतंगराय । ...वामनस्वामि कृष्णदास ॥ १७ ॥
गोपाल चैतन्य गंगाधर । अद्वयानद गदाधर ।
ब्रह्मानदे श्रीधर । सतमाला गुफी हे ॥ १८ ॥

## ८ संतमाला श्लोकः--

पिता ब्रह्मानद विलसत जगीं एक जानिता ।
तयाची सावित्री विमल निजशाती सुवनिता ॥
तया पायीं प्रेमें श्रीधर निजभावे करूनिया ।
सुखे तेणें रगे अखिल निजभक्ति करुनिया ॥ १ ॥

पुढील श्लोकात ब्रह्मानंद पंढरीस समाधिस्थ हें वर्णन आहे. तिसऱ्या श्लोकात मतातराचा नाश करून टाकणारे शकराचार्य याचे वर्णन आहे चौथ्यात गीता-भागवतादिकावर सुदर टीका करणारा श्रीधर याचे वर्णन आहे. पाचव्या व सहाव्या श्लोकात हस्तामलक व हरीनाथ याचे वर्णन आले आहे.

चातुर्य चूडामणि ज्ञानवक्ता । वाराणसीमाजि निवास कर्ता ॥
मुकुंदराजे ध्वज लावियेला । विवेकसिधू प्रगटार्थ केला ॥ ७ ॥

नतर, आठव्या व नवव्या श्लोकात 'निवृत्ति व गुरु गोरक्ष यास स्मर' असे सागितलें आहे.

गीतार्थ केला परिपूर्ण वोजा । .......... ..... . . .....
ज्ञानेश्वराचे निजनाम वाचे । स्मरा स्मरा तो यमकाळकाचे ॥१०॥
योगी सोपानदेवाचे वर्णन अकराव्या श्लोकात आहे
वटेश्वरा लागुनि ज्ञानदाती । मुक्तेश्वरी ते स्मर एक चित्तीं ॥१२॥

पुढे तेराव्या श्लोकात ' पद्मावतीला प्रेमबलानें सजीव करणारा देव स्मर ' असें सांगितले आहे चौदाव्या श्लोकात 'श्रीराम' आर्या वदणारा मुद्गल ' याचे वर्णन आहे. पधराव्यात ' ज्यासी सदा श्रीहरि खेळतो तो नामदेव' असे सांगितले आहे सोळाव्या व सतराव्या श्लोकात 'कबीर,' 'मृत्युंजय' व 'भानुदास' याची वर्णने आलीं आहेत अठराव्या श्लोकात जनार्दनाचे प्रियपात्र, व ' एकादशा ' वर टीका करणारा एकनाथ याचीं वर्णनें आहेत एकोणीसाव्या श्लोकात ' पाठक ' याचे वर्णन आलें आहे.

चातुर्यभक्तीसह बोल बोले । मुक्तेश्वरा त्या स्मर ये सुबेळ ॥२०॥

पुढें एकविसाव्या श्लोकात ' वाचस्पतीसमान कृष्णदास मुद्गल यास एकचित्ताने स्मर 'असे सांगितले आहे.

जा भक्तिज्ञानी परिपूर्ण झाला । तुका असे बोलती लोक त्याला ॥
तुकावया कोण दुजा तयासी । तुका स्मर का तरि ज्ञानराशी ॥ २२ ॥

पुढे तवीसाव्या श्लोकात शुकासारखा वक्ता, पुराणकर्ता विश्वनाथ याचे वर्णन आहे. चोवीसाव्या श्लोकात प्रेमामृताचा परिपूर्ण भोक्ता भगवतपत याचे वर्णन आहे. पचवीसाव्या श्लोकात यथार्थ ज्ञानाने विचरणाऱ्या 'केशवाचे' वर्णन आहे. सव्वीसाव्या श्लोकात नि:सीम शांतीचा जयराम याचे वर्णन आहे सत्तावीसाव्या श्लोकात निजानंदाचें वर्णन आहे.

ज्ञानाब्धिचा चद्र तो पूर्ण साजे । ब्रह्मानदा ज्येष्ठ बधू विराजे ।।
ज्ञानानंदा वर्णु मी जाण काय । चाले ज्याच्या कल्पना शात होय।।२८॥
आकाशिची ते गजटाल जैशी । अगाध विश्वीं निज कीर्ति तैशी ॥
निजात्मबोधे विचरे स्वलीले । श्रीरगनाथा स्मर एक वेळे ॥ २९ ॥

.... . .. . . .. . . .............. .. ...

नामे तयाच्या भव सद्गुरू हो । श्रीरग आम्हा चुलता गुरू हा।।३०।।
ज्या रगनाथा प्रियपात्र बधु । त्या विठ्ठलाते स्मर सौख्य सिंधू ।।३१॥

पुढें बत्तिसाव्या श्लोकात 'अनतमूर्तिचें' वर्णन केले आहे.

निःसीम भक्ति रघुनाथ पायीं । वैराग्य योगे विचरे सदा ही ।।
त्या रामदासें ध्वज नाचियला । श्रीरामनामे जन जीववीला।।३३।।

चोतीसाव्या श्लोकात 'रमावल्लभा'चे वर्णन केले आहे.

श्लोकार्थ ज्याचा बहु गोड लागे । जे ऐकता आन मना न लागे ।।
स्मरे सदा तू तरि वामनासी । विचार सारा शिकवी मनासी ।।३५॥

छत्तासाव्या श्लोकात गुणवान् ' शिवराम ' याचे वर्णन आहे
सदतीसाव्या श्लोकात ' निरजना ' चे वर्णन आले आहे.

सर्वरूपें तो हरि एक जाला । नानावतारे हरिची स्वलीला ॥
ते ब्रह्म तू केवळ संत पाहीं । अभग हो श्रीधर भेद नाहीं ॥३८॥

जपा सदा हे निजसतमाळा । पाहूनिया चिन्मयनाम डोळा ।
हे श्रीधरें गुंफुनिया स्वभावे । घाली गळा ते स्वसुखानुभावे ।। ३९ ॥

विहाय चापं सशर कराग्रात् । गृहाण पाणौ मणिचारुवेणुम् ॥
मयूरपिच्छानि कुरु त्वमंगैः । सीतापते त्वा प्रणमामि पश्चात् ।।४०॥

पहिली पचपद्यात्मक नाममाला सर्वसामान्य साधुत्वदर्शक असून केवळ नामस्मरणोपयोगी म्हणून रचलेली आहे व म्हणून ती अगदीं पाच-पदरी आहे. दुसऱ्या संतमालेचें वैशिष्ट्य हें कीं, तींत पुष्कळ संतांच्या गुरुशिष्यपरंपरेचा उल्लेख केलेला आहे; व तींत नाथपथी, चैतन्यपथी, आनंदसांप्रदायी व संस्कृत, हिंदी व मराठी रचना करणारे व सर्व जातींच्या संतांचा उल्लेख आला आहे. ही अठरा ओव्यांची विस्तृत अशी आहे तिसरीचें महत्त्व अनेक तऱ्हेनें ध्यानात ठेवण्याजोगें आहे. प्रथमतः तिची रचना श्लोकात्मक असून काहीं स्थळें सोडल्यास निर्दोष, सफाईची व गोड आहे. काहीं स्थळांतील दोष लेखकाच्या अनवधानानेंही घडले असतील दुसरी गोष्ट ही कीं, ती फार विस्तृत म्हणजे एकुणचाळीस श्लोकांची आहे पण तिचें खरें वैशिष्ट्य हे कीं, हिच्यात प्रत्येक संतकवीचें वैशिष्ट्य मोजक्या शब्दांत मोठ्या मार्मिकतेनें वर्णिले आहे. ही शब्दचित्रें इतकीं यथार्थ झालीं आहेत कीं, त्या त्या व्यक्ति आपल्या पुढें मूर्तिमंत उभ्या रहातात. हे गोड श्लोक वाचीत असतां मोरोपंतांच्या 'सन्मणिमाले'ची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

## ९ संतप्रताप:—

यांत एकंदर अडतीस पद्यें आहेत. याचा विशेष हा कीं, यांत प्रत्येक संतांचा प्रताप म्हणजे अद्भुत सामर्थ्य किंवा चमत्कार वर्णिले आहेत आरंभ खालीलप्रमाणें आहे:—

अपार महिमा संतांचा वर्णवे कोणा । आचार्य शंकरा जाण ।
१ देवी देत स्तनपान. सर्व मतांचा उच्छेदक.
२ हस्तामलक सज्ञान।अष्ट वरुषे मोहन।बोले आचार्यांस देखोन।

३ हरिनाथ-रमावतार । माडीवर 'श्रीपद' चिन्ह होते.
४ मुकुद राजाने -जैतपाळानें कोंडलेले ब्राह्मण सोडवले.
५ ज्ञानेश्वरे पशुमुखें वेद म्हणविला.
६ गोरक्षनाथ–राजास उठविलें. (?)
७ गोपीचंद मातृवचनानें विरागी झाला.
८ महामुद्गलः—यानें कृष्णस्वरूप मूर्तीचे रामरूप केले.
९ बिल्वमगलानें वरच्या उलट चमत्कार केला.
१० मिराबाईचें विष जगन्नाथ आपण प्यायला.
११ नृसिह मेहत्याची हुंडी द्वारकेंत देवानें भरली.
१२ भानुदासाच्या गळ्यात देवाने आपल्या माळा घातल्या.
१३ महारामेश्वर रामसुत झाला.
१४ नामदेवाने मेलेली गाय उठविली.
१५ जयदेवाने पद्मावतीस पुनः प्राणदान दिले.
१६ धानाजाटाचें शेत देवाने पेरले.
१७ तुकोबाच्या वह्या पाण्यात राखल्या.
१८ जसवतास नवज्वरात जानकीने पाणी दिलें.
१९ आच्युताश्रमानें 'राम'नामाचा पुरस्कार केला.
२० विठ्ठल पुरदरास बद झालेले दार उघडें झाले.
२१ सूरदासास पुनः नेत्र मिळाले.
२२ सेडसीतम (?) महाभक्ताने दुष्काळांत अन्नदान केले.
२३ कबीराच्या प्रेताचीं फुले व तुळशी झाल्या.
२४ सेनान्हाव्यासाठीं न्हाव्याचें रूप विठोबाने घेतले.
२५ रोहिदासास विठ्ठल दर्शनानें हातपाय आले.

२६ कूर्मदासास शाळिग्रामाची पुन. प्राप्ति.
२७ सावत्यामाळ्याचे पोटातून देव निघाला
२८ सतीदास भैराळासाठीं रुक्मिणी धावून गेली.
२९ जगमित्र नागोबास व्याघ्ररूपे शंकर–दर्शन घडलें
३० चांगदेवानें आपली मोट दृढ बांधली
३१ नरहरि सोनाराचा कटदोरा चार अंगुळे कमी दर्शनाने पुरा
३२ अनामिक चोकामेळा । ब्राम्हणिं दवाडिला ।
विठोबा त्यालागीं फिरला.
३३ समाधिस्थ झाल्यावरही रंगनाथाने दर्शन दिलें.[१२]
३४ रामदास निरिच्छ होते.
३५ आनंदमूर्ति गुरुभक्त होते.
३६ जयरामस्वामीस विठ्ठलदर्शन घडले.
३७ ब्रह्मानंद समाधिस्थ झाल्यावर एका भक्ताने हाक मारली तो आतुन ध्वनि उठला:—

भक्त वर्णिता अंत नाहीं । समस्त ब्रह्मानंदरूप आहे ॥
श्रीधरें प्रेमगुणीं । संतमाळा गुफुनी । गळा घातली दिवस रजनी ॥

संताचा महिमा अपार. तो कोणास वर्णवेल असे म्हणून हे प्रकरण कवीनें संपविलें आहे.

या चार 'माला'वरून श्रीधराची संतभक्ति, त्याची बहुश्रुतता व त्याची मार्मिकता आपणास सहज दिसून येते यात सर्व हिंदुस्थानातील ख्यातनाम संतसाधूंची गणती झाली असल्यामुळे ही एक 'संतस्मरणी'च झाली आहे.

---

१२ श्रीधराच्या जिव्हेवर 'श्री' लिहिल्याचा उल्लेख नाहीं

आता इतर 'माला' कडे वळू:—

१.० ग्रंथमाला: —

सारस्वत रघुवंश किरात । नैषध माघ कुमार अमरकोश अद्भुत ॥
सिद्धान्त-कौमुदी अष्टा व्याकर्ण प्रक्रिया मुखोद्गत । अष्टकोश निघंट एकाक्षर ॥१॥
शारीरभाष्य तर्कभाषा सूत्रभाष्य परिकर । रागरत्नाकर संगीतरत्नाकर ॥
छदोरत्नाकर कविसमुद्र । कादबरी ज्योतिष ग्रथ पैं ॥ २ ॥
पवनविजय हठप्रदीपिका । कालज्ञान योगसिद्धान्त निका ।
सिद्धान्तशिरोमणिस्मृतिकौस्तुभ[१३]देखा । भूगोलवर्णन स्वर्गरचना ॥३॥
महापाराशर लघुपाराशर । कालमाधष विज्ञानेश्वर ।
निर्णयसिंधु ब्रह्मोत्तर । बृहन्नारदी गीतार्णव ॥ ४ ॥
भर्तृहरि चाणाख्य (चाणक्य) कोकचिंतामणि । लीलावती वैद्यशास्त्र रसखाणी।
याज्ञिक शोडष (शोडश) कर्मविधानी । देशभाषा ग्रंथ सर्व ॥ ५ ॥
सामुद्रिक स्त्रीपुरुष लक्षण । आयुर्वेद धनुर्वेद लेखन पठन ज्ञान ।
जारण मारणादि मोहन । शैव शाक्त ग्रथ बहु ॥ ६ ॥
शिल्पशास्त्र रतिशास्त्र । सूपशास्त्र आणि महेंद्र ।
संहिता अरण्य ब्राह्मण परिकर ॥ ७ ॥
ऋग् यजुः साम अथर्वण । न्यायमीमासा सांख्यज्ञान ।
पातंजलि वेदान्त व्याकर्ण । षट्शास्त्रे मुखोद्गत ॥ ८ ॥
मच्छ मार्कंड भविष्य पुराण । भविष्योत्तर ब्रह्मब्रह्मांड जाण ।
ब्रह्म वैवर्त वराह विष्णु पुराण । वसिष्ठ वामन अग्नि लिंग ॥ ९ ॥

---

१३ 'स्मृतिकौस्तुभ' हा ग्रथ इ. स. १६६० ते १६७५ पर्यन्त झाला.



२४

पद्मपुराण शिवपुराण । कूर्म गरुड स्कंद अष्टादश जाण ।
भागवत भारत रामायण । शिवरामायण हनुमत नाटक ॥ १० ॥
अध्यात्म रामायण जैमिनी भारत ।काशीखंड नाम महात्म्य अद्भुत ।
कल्पतरु अगास्तिकृत ग्रंथ । योगवासिष्ठ पंचदशी ॥ ११ ॥
वेदान्तसार आचार्यभाष्य । कठवल्ली भृगुवल्ली विशेष ।
विवर्ण वाचस्पती क्रमोपदेश । पचकोश उपदेशसहस्री ॥ १२ ॥
आत्मबोध अपरोक्षानुभव । महावाक्य विवेकसंग्रह सर्व ।
विवेकसागर आत्मप्रकाश भाव । सर्व महात्म्यरचना निगमसार पैं
॥ १३ ॥
संहिता अरण्य ब्राह्मण । छंद निघंट शिक्षा जाण ।
ज्योतिष कल्प व्याकरण । निरुक्त जाण दशग्रंथ हे ॥ १४ ॥
श्रुति कल्पलता सुबोधिनी । श्रीधर ब्रह्मानंदें करूनि ।
ग्रंथमाला गुंफी हे ॥ १५ ॥

## ११. तीर्थमाला: --

हरिद्वार बदरी केदार । कामाक्षी कांति दवाल वैश्वानर ।
माहुर मथन कालेश्वर । गंगासागर कुशतर्पण ॥ १ ॥
हिंगलजा आशापुरी नेपाल । वड्या ( ओढ्या ) जगन्नाथ त्रिमल्ल ।
पंढरी पूर्व काबेरी जुगुल । नागर गौर ॥ २ ॥
कर्णमूलत्रिकोण । मातुलिंग धुलखंट कुंभकोण ।
द्राविड मजरथ विकर्ण । प्रभाकर पैं ॥ ३ ॥
ज्योतिर्लिंग मथुरा रामेश्वर । अनंतशयन विमल जंबूकेश्वर ।
शुक्लपाणि ( शूलपाणि ? ) तीर्थ हरिहर । कृष्णासागर जाणिजे॥४॥

गोकर्ण महापुरी । कालचंद्रिकात्रिमथ ब्रह्मगिरी । ( त्रिपथ ? .
अर्धउदयतीर्थ उज्जनी गोदावरी । गंगासमुद्र तो ॥ ५ ॥

प्रयाग काशीपुर काउर । अलु अयोध्या मानससरोवर ।
लोणार रेणुका पपासरोवर । चित्रकूट पै ॥ ६ ॥

वेदावती वेत्रावती तुंगा । हंपी विरुपाक्ष सुवर्णगंगा ।
स्वामी कार्तिकी सप्त उरगा । मल्लप्रहरा घटपा पैं ॥ ७ ॥

किष्किंदा मातंग पर्वत । उडपी कृष्णशेषशायी अनंत ।
पंचामृताची गोमंत । कोल्हासुरमर्दन स्नान ॥ ८ ॥

गया नर्मदा विष्णु-शिव-कांची । कोटेश्वर महाबळेश्वर ।
कृष्णा वेण्या संगम कृष्णातीर । दक्षिण प्रयाग ॥

सोमनाथ, मल्लिकार्जुन, ओंकार, ममलेश्वर, उज्जनीमहाकाळ, तापभंजन, वैद्यनाथ, नागेश, नागभूषण, महापुण्य क्षेत्रे । रामेश्वर, भीमाशंकर विश्वेश्वर, त्र्यंबकेश्वर, केदार, सेवालय, घृष्णेश्वर हीं बारा ज्योतिर्लिंगें

बदरी मार्गी पंच प्रयाग । कार्तिक मासीं कृष्णा त्रिवेणी ॥
मुख्य त्रिवेणी माघ स्नान । देव, शिव, कर्ण, ब्रह्म, गुप्त प्रयाग ॥

केलें तिहीं गयाचें दर्शन । धर्मस्तंभाचे स्पर्शन ।
ब्रह्मयोनीचे अवलोकन । गायत्रीध्यान संध्यावटीं ॥

सप्तपुऱ्या तीर्थ मार्गे । केली बाराही ज्योतिर्लिंगें ।
प्रभा साप्राप्त सोमनाथ योगें । पंचकृष्णप्रयोगें गडदामोदर ॥ ३० ॥
( द्वारकेत )

दर्शनमुक्ति चिंदबरीं पाहीं । जन्मे मुक्ति कमलालयीं ।
मरणे मुक्ति वाराणसीचे ठाईं । स्मरणे देई अरुणाचल ॥ ३१ ॥

तत्रैव गंगा यमुना च तत्र । गोदावरी सिंधु सरस्वती च ॥
सर्वाणि तीर्थाणि वसति तत्र । यत्राच्युतोदार कथाप्रसंगः ॥ ४० ॥

दुसऱ्या एका बाडाच्या दोनशे एकतीस पृष्ठावर खालील तीर्थाचा उल्लेख आहे :—

१ " तव तीर निवासी अक्षय करी " अशी भागीरथीस प्रार्थना
( स्तोत्र )

२ " ब्रह्मानंदें हो श्रीधर इच्छित गोदातीर " अशी गोदेस प्रार्थना
( स्तोत्र )

३ " तव आप लक्षिता कृष्णे गेल त्रिविध ताप "– कृष्णास्तवन

४ " स्पर्श होताच तुझ्या जीवनें सकळ पाप हरलें ।
ब्रह्मानंदें वो श्रीधर करि कां तव तीर–निवासी " ॥
——भीमास्तवन

या उताऱ्यावरून श्रीधरानें सर्व तीर्थयात्रा केल्याचे स्पष्ट सिद्ध होत आहे.

' रामविजयात ' वरील सर्व असून पुष्कळच अधिक आहेत.[१४] बारा ज्योतिर्लिंगें, सातपुऱ्या, मुख्य तीर्थराज प्रयागादि; हिंदुस्थानातील बहुतेक सर्व पवित्र नद्या, नंतर पवित्र पर्वत, पुढे अनेक तीर्थांची क्षेत्रांची लांब नामावळी आहे. रामायणात हें नाहीं.

## १२ रागमालाः –

यात पचवीस ओंव्या आहेत. यात अनेक रागांचे व त्यांच्या छत्तीस भार्यांचे वर्णन केलें आहे. मागील ग्रंथमालेंत 'रागरत्नाकर'

---

१४ रा. वि. ५, ७८-१०८

'संगीतरत्नाकर',या ग्रंथांचा उल्लेख आलेलाच आहे. यावरून सगीताचा शास्त्रोक्त अभ्यास श्रीधरानें केला होता असें दिसते.

## १३ परंपरा —

यात अठरा श्लोक आहेत.

श्रीधरानें आपली सांप्रदाय परंपरा आपल्या सर्व मोठ्या ग्रथांतून व काहीं लहान ग्रथातून सविस्तर दिलेलीच आहे ती मराठींत व संस्कृतमध्यें दिलेली आढळते. पुढें मराठी परंपरेतील काहीं विशेष उतारे दिले आहेत:-

### मराठी परंपरेचे श्लोक.

नमू त्या श्रीदत्ता तदुपरि सदानदचरणा ।
नमू रामानदा अमल गुरु गभीर सगुणा ॥
नमूं त्या सद्भावें सहज गुरु पूर्णा अवधुता ।
नमूं ब्रह्मानदा निजगुरु यती पूर्ण भरिता ॥१॥

................................ ......

जें नाझरें माणनदी विराजे ।
आनद हें नाम मठासि साजे ॥
समाधि तेथें सुखरूप भोजें ।
दत्तात्रायची निजवर्ति गाजे ॥१२॥

श्रीमूख सवत्सर नाम ज्याचें ।
मार्गेश्वरी शुद्ध बिजेसि साचें ॥
श्रीपंढरी क्षेत्र अबाध कीर्ति ।
निवास आला यतिराज मूर्ति ॥१३॥

..................................

ससार सगे न सिणे कदा ही ।
विरक्त ज्ञानी विचरे त्रिदेही ॥
यतीश्वरा मडण स्वामि माझा ।
श्रीब्रह्ममूर्ती गुरू देव राजा ॥१५॥
सच्छिष्य जे का असतील कोणी ।
परपरा हे वदती स्ववाणी ॥
हे श्रीधरें गुफुनि श्लोक साचे ।
निर्मूळ केलें मुळ हे भवाचे ॥१६॥

हे श्लोक रचनेंत व भक्तिभावात साचे आहेत असेंच कोणीही वाचक म्हणेल. मागील चौऱ्याण्णव ‘ स्फुट प्रकरणा’त या तेरा ‘ माला’ मिळविल्या असता त्याची एकूण बेरीज एकशेंसात होते यापैकीं पहिल्या चौऱ्याण्णव मधील विषयाचें निरीक्षण केलें असता असे दिसून येतें कीं, ही बहुतेक सर्व प्रकरणें श्रीधराच्या मोठ्या ग्रथांत म्हणजे ‘ हरिविजय ’, ‘ रामविजय ’, ‘ पाडवप्रताप ’, ‘ जैमिनिअश्वमेध ’, व ‘ शिवलीलामृत ’, यात योग्य स्थळीं समाविष्ट झालेलीं आहेत. मात्र तीं जशींच्या तशींच उद्धृत केलेलीं नसून कथारुपाने आलेलीं आहेत. याच्या लेखनकालाचा उल्लेख जरी केलेला नसला तरी असें अनुमान करता येते कीं, वरील थोर ग्रथ हातीं घेण्यापूर्वीं श्रीधराने पूर्वाभ्यास म्हणून हीं रचलीं. या अनुभवाने आत्मविश्वास उत्पन्न झाल्यावर त्यानें आपले थोर ग्रथ लिहिण्यास सुरवात केली असावी; म्हणजे ही सर्व रचना त्याचा प्रथम ग्रथ जो ‘हरिविजय’ शके १६२४ मध्यें झाला त्याच्यापूर्वीं दोनचार वर्षें झालीं असावीं. ‘निजधामगमन ’ व ‘ स्वर्गारोहण ’ हीं जीं प्रकरणे पढरीनाथाच्या आज्ञेवरून पहिल्या तिन्ही ग्रंथात श्रीधरानें गाळलीं आहत, त्यावरच त्यानें

या 'स्फुट प्रकरणात' रचना केली आहे.[१५] या गोष्टीनें वरील अनुमानाची सत्यता सिद्ध होते दुसरे असें कीं, अक्षरगणवृत्तापेक्षां 'ओवी' छदच आपल्या पद्यरचनेस सुलभ व सोईचा होईल, याचाही निश्चय त्यानें स्वानुभवानें याच वेळीं केला असावा.

## संस्कृत 'स्तोत्रकलाप' व इतर रचना.

द. अ. आपटे यानीं असा आक्षेप घेतला होता कीं, वामनपडित व मोरोपंत यानी काहीं संस्कृत ग्रथ केले, परन्तु श्रीधरानें संस्कृताची एक ओळही लिहिली नाहीं [१६] हें विधान किती भ्रामक व निर्मूल आहे हे पुढील संस्कृत स्तोत्रांवरून सहज स्पष्ट होणार आहे.

श्रीधराने अनेक देवतावर, गुरूवर, पवित्र नद्यावर व काहीं वेदान्त-सिद्धान्तावर संस्कृत रचना केली आहे. ती अशी:—

१ स्तोत्रे:— शिव, राम, कृष्ण, अम्बिका, गणेश, सूर्य व महालक्ष्मी याच्या ध्यानावर स्तोत्रें राचिलीं आहेत. थोडे नमुने खालीं दिले आहेत:—

**( अ ) रामचंद्रध्यानम्:—** चूर्णिका—

स्वस्ति श्रीजलजोद्भवपुरंदरादिसर्वविबुधवंद्य श्रीजलाब्धिशायिन्नसुरवर-बधछेदनाय प्रकटीकृत रघुवीरवेष रविकुलमुकुटावतस । ........ .. ..

अयोध्यानगरविहारिन् सकदनमनोरथपूरक कैवल्यसुखदायक पूर्णब्रह्मानन्दस्वरूप सकलश्रियाविराजित श्रीधरहृदयपंजरकीर जय जय रामचद्र भगवन्नमोस्तुते ॥

---

१५ श्रीधर च. आणि का. भा., २, प्र. ११, पृ. १७२

१६ आपटे. क. च , खड २, भाग १, पृ. ६८

### ( आ ) अंबिकाध्यानम्:--

श्रीधरगुरुवरहृदयपंचायतनजननि प्रपचपचाननभयचकितचित्तापहारके जय जय जगदंबिके तव पदं नमोस्तुते ॥

### ( इ ) शंकरस्तोत्रम्:—

विरूपाक्ष दक्षमखविध्वंसन गजास्यजनक .....धूर्जटे ।
अज्ञानदर्यांतवरश्रीधरविश्रामधाम...वृषभध्वजभगवन्नमोस्तुते ॥

याशिवाय 'गणेशपचक', 'अंबिकापचक', 'सूर्यपचक', 'शिवपंचक', 'विष्णुपंचक', वगैरे स्तोत्रे पुष्कळ आहेत.

**२ प्रश्नोत्तरमालिका:**—या चोवीस आहेत.

क: खलु नालंक्रियतेसिद्धासिद्धार्थसाधनपटीयान्[१७] ।
अनया कण्ठस्थितया प्रश्नोत्तरमालिकया ॥ १ ॥
भगवन् किमुपादेय गुरुवचन हेयमपिच किमकार्यम् ।
को गुरुरधिगततत्त्व: शिष्यहितायोद्यत: सततम् ॥ २ ॥
त्वरित किं कर्तव्य विदुषा संसारसततिच्छेद:
किं मोक्षतरोर्बीजं सम्यग्ज्ञान क्रियासहितम् ॥ ३ ॥
क: शूरो यो ललनालोचनबाणैर्न तु व्यथित: ।
.........................................
चिंतामणिरिव दुर्लभमिह किं कथयामि चतुर्भद्रम् ॥ ७ ॥
.........................................
इति कंठगता विमला प्रश्नोत्तरमालिका येषाम् ।

१७ सिद्धासिद्धार्थ ( ! )

ते मुक्ताभरणा इव भाति सुविद्वत्समाजेषु ॥ २४ ॥

३ **गुरुमहिमा:**---यात अकरा आर्या आहेत.

अज्ञानांधविहता विरचितविज्ञानपंकजोल्लास: ।
मानसगगनतल मे भासयति श्रीनिवासगुरुभानु: ॥ १ ॥
श्रीगुरुचरणद्वद्व वंदेऽहं मथितदु:सहद्वद्वम् ।
भ्रातिग्रहोपशाति पाश्रुमथं यस्य भासितमातनुते ॥ २ ॥

४ **महावाक्यपंचीकरणम्:**--( १० )

ॐ जगदंकुरकदाय सच्चिदानदमूर्तये ।
गलिताखिलभेदाय नम:स्नाताय विष्णवे ॥ १ ॥
धियो योन. प्रचोदयात् ॥ धिय: बुध्दे: यो प्रेरक: स एव आत्मा प्रज्ञाप्रतिष्ठितप्रज्ञान ब्रह्म ॥ इति वेदवेदान्तसार महावाक्यउपनिषत् पचीकरण सपूर्णमस्तु ॥

५ **अथातो महावाक्य विवरणम्:**--( १० )

अथ आनन्दशद्वनिर्णय: कथ्यते । आनन्दो ब्रह्मेतिव्यजानत् [१८] । आनन्दाद्[१९]एव खल्विमानि भूतानि जायते । आनन्देन जातानि जीवन्ति ।
आनन्दं प्रय ( । ) ति । अभिसाविशति इति श्रुते: ।
स्वस्वरूप उपाधिरहित आनन्द करोति.. ....... ..।
अत:पर ब्रह्मशब्द निर्णय: कथ्यते..... .. ॥

६ **राघवाष्टकम्:**--( ९ )

रामरामनमोऽस्तुते जयरामचद्रं नमोऽस्तुते ।

---

१८ व्यजामात् ( ! ) १९ आनन्दाद्धिएव ( ! )

रामभद्रं नमोऽस्तुते जयरा ाय नमो ऽ तुते ॥ १ ॥

..... ..... ..... .. ........ .....

रसगुणान्वितं राघवाष्टक । प्रतिदिन पठेत् भक्तिपूर्वकम् ।
कल्मषापह चोरनाशनं । विरहने लभेद्रामभक्तिन ॥ ९ ॥ ६.

याचप्रमाणें ' गोविंदाष्टक ' आहे.

७ परंपरा:--( संस्कृतमध्ये ) ( १३ )

निगुर्ण निर्विकल्पच्च निर्विकार निरामयम् ।
अव्ययं पुरुषं साक्षात् ईश्वर प्रणमाम्यहम् ॥ १ ॥

ईश्वरात् संप्रदायस्य ( ? ) दत्तात्रयमहामुनेः ।
नमस्त्रीमूर्तिरूपाय दिगंबरवरायच ॥ २ ॥

...... ....... ..............

दत्तात्रयसमुत्पन्नो ब्रह्मानदमहायतिः ।
कैवल्यपददातारं महाराज नमाम्यहम् ॥ ८ ॥

................. ..............

यतः स्तोत्र कृत श्लोका ( कैः ) श्रीधरेण यदृच्छया ।
एकभाव पठेद्धीमान् मुक्तः स्यात् सर्वबन्धनैः ॥ १३ ॥

८ गुरुमहिमाः--यांत अकरा आर्या आहेत मागील आर्याहून या भिन्न आहेत.

संसारदावपावकसंतप्त सकलसाधनोपेतः ।
स्वात्मनिरूपण निपुणैर्वाक्यैः शिष्यः प्रबोध्यते गुरुणाम् ॥ १ ॥

९ **महावाक्यः** —( १० ) वरीलप्रमाणेंच पण निराळें आहेः —

......... . . ......................

यस्य बोधादिद भ ति यद्बोधाद्विनिवर्तते ।

नमस्तमै परानद वपुषे परमात्मने ।। २ ।।

खल्विदं ब्रह्मेति ज्ञाननिष्ठा । भेदाभेदौ न स्तः ।

इति ऋग्वेदब्रह्मशब्दनिर्णयः तृतीयः सिद्धान्तः ।।

शेवटीं वैदिक आशीर्वाद खालीलप्रमाणें आहेः—

सर्वे नः सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरानयाः ॥

भावे यानीं श्रीधरानें ' राधाविलास ' व ' तत्त्वगीता ' असे दोन ग्रंथ संस्कृतमध्यें लिहिल्याचें सांगितलें आहे.[२०]

या 'तत्त्वगीते' चा शेवट पुढीलप्रमाणे झाला आहे असें ते म्हणतात .—

ब्रह्मानन्दप्रसादेन तत्त्वगीता प्रकाशिता ।

श्रीधरानन्दनाम्ना वै सर्व लोकहिताय च ।।

इति श्रीआनन्दसाम्प्रदायभूषण श्रीब्रम्हानन्दपुत्रश्रीधरानन्देन विरचिता तत्त्वगीता समाप्ता ।।

पण हा ग्रंथ श्रीधराच्या दप्तरात वा वाडात मला अगर दुसऱ्या कोणास आढळलेला नाहीं. मराठी 'राधाविलासा' चा उल्लेख मागें केलाच आहे.[२१]

* * *

२० भावे. म. सा. पृ. ३३६, पादटीप

२१ श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ११, पृ. १४७

— १२ —

## हरिविजय

हरिविजय ग्रंथातें आधीं मग श्रीधरास वंदीन ।
शिववंदनकामाहीं नदावा प्रथम देवनदी न ॥ [1]

### १ ग्रंथलेखनकाल

अनेक स्फुट प्रकरणे लिहून कवित्वाचा चांगला सराव झाल्यावर श्रीधराने जो पहिला मोठा ग्रंथ लिहिला तो 'हरिविजय' हा होय. हा ग्रंथ त्यानें शके १६२४ मध्ये चित्रभानु संवत्सरीं मार्गशीर्ष शु.॥२येस पंढरपुरीं पुरा केल्याचे याच ग्रंथाच्या शेवटीं सांगितले

१ मोरोपंत. सन्म. माला ३१. याच आर्येचा दुसरा पाठ खालील-प्रमाणे आहेः—

हरिविजय ग्रंथाते मग आधीं श्रीधरास वंदीन ।
शिववंदनकामाहीं लंघावा प्रथम देवनदी न ॥

पांगारकर. मोरो. वेचें पृ. ४३,४

आहे.[२] या ग्रथामुळे श्रीधराची सर्वत्र ख्याति[३] होऊन त्याच्या ग्रथाच्या प्रति[४] होऊं लागल्या.

## २. ग्रंथनामाभिधान

हरीने अनेक दैत्यावर विजय मिळवून भूभार हरण केला. म्हणून त्याचे पराक्रम ज्यात वर्णिले आहेत त्या ग्रंथास कवीने जें 'हरिविजय' नाव दिले आहे तें अगदीं यथार्थच आहे. पण या ग्रथाचे वाचक–श्रोतेही सर्वकाळ विजयी होतात, एवढेंच नव्हे तर त्याचा पापक्षय होऊन ते काळि-

२ शालिवाहन शके सोळाशे चोवीस । चित्रभानुनाम संवत्सरास ।
शुद्ध द्वितीया मार्गशीर्ष मास । ते दिवसीं ग्रथ सपला ।।
ह. वि. ३६,२०६

श्रीपांडुरगवरदे करून । पढरीस ग्रथ जाहला निर्माण ।।
ह. वि. ३६,२०७

३ जे कविता पृथ्वीवरी पसरे । कीं दुसरा क्षीरसागर हा ।।
श्रीधरपुत्र दत्तात्रयाचें पद.

"हें किती खरे आहे बरें! ज्या गावात 'रामविजय' 'हरिविजया'दि ग्रथापैकीं एकाचेहीं उभ्या वर्षात पारायण होत नाहीं, असा गाव महाराष्ट्रात खाचित नसेल–इतके हे ग्रथ भक्तिप्रचुर असून प्रासादिक आणि रसाळ आहेत." सानं. वि. ज्ञा. वि. १९१४ जाने. पृ. ८

४. एका हस्तलिखित प्रतींत :– " स्वस्ति श्रीशालिवाहन शके १६२५ सुभानुनाम संवत्सरे श्रावणमासे शुक्लपक्षे पंचमी भृगुवासरे तद्दिनीं हे 'हरिविजय' ग्रथलेखन सपूर्णम् श्रुतं भवतु "।। अर्थात् हा काळ नकलेचा आहे.

काळावरही विजय मिळवितात असें सुचवून कवीनें या नामाभिधानाची अन्वर्थकता सिद्ध केली आहे.[५]

## ३ ग्रंथसंक्षेप

या ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धात कंसवधापर्यन्त कथाभाग आला असून त्यात एकोणीस अध्याय व चार हजार दोनशें छतीस ओंव्या आहेत. उत्तरार्धात पुढील कथाभाग असून त्यात सतरा अध्याय व तीन हजार नऊशें तीन ओव्या आहेत. म्हणजे समग्र ग्रंथाचे छतीस अध्याय असून एकूण ओंवीसंख्या आठ हजार एकशे एकूणचाळीस आहे. पूर्वार्धात 'कृष्णलीला' आल्या असल्यामुळें त्यांत तीनशें तेहेतीस ओंव्या अधिक आहेत. सरासरीनें प्रत्येक अध्यायाची ओंवी-संख्या दोनशें सव्वीस पडते. त्यात पाहिला अध्याय सर्वांत लहान म्हणजे दोनशे एकूणऐंशी ओंव्याचा आहे. यावरून 'आटोपशीरपणा हा या ग्रंथाचा एक विशेष आहे हें सहज ध्यानात येईल. पण हें संक्षेपाचे धोरण त्यानें आपल्या सर्व ग्रंथातच संभाळलें आहे, आणि यातच त्याच्या लोकप्रियतेचें बीज आहे. या ग्रंथांत त्याने एकंदर पांच ठिकाणीं आपली विस्तारभीरुता दर्शविली आहे. आरंभींच तो म्हणतो: — "वसिष्ठाचे सूर्याशीं भांडण सांगावें तर ग्रंथ विशेष वाढेल;[६] पुढे राधेचें चरित्र समूळ सांगावें[७] वा कंसवधानन्तर कृष्ण व वसुदेव-देवकीच्या भेटीचा सोहळा वर्णावा तर ग्रंथ वाढेल,[८] सुदाम्यास मेजवानी दिली तिचे वर्णन करून उगीच ग्रंथ का वाढवू ?[९] शेवटीं द्रौपदीस्वयंवरासंबधीं तो म्हणतो कीं,

---

५ ह. वि. ६, २२०

६ ह. वि. १, ९८-९९ ७ ह. वि. १७, २१०

८ ह. वि. १९, १९६ ९ ह. वि. २९, १३१

तो जर सांगू लागलों तर—

पसरेल असंभाव्य ग्रंथ। यालागीं ध्वनितार्थ बोलिलों।[१०]

अशा रीतीनें त्याने संयम राखल्यामुळे त्याचे ग्रंथ कंटाळवाणे झाले नाहींत.

## ४ ग्रंथाधार

नेहमींच्या रिवाजाप्रमाणे श्रीधराने हा ग्रंथ कोणत्याही एकाच ग्रंथाच्या आधारानें लिहिलेला नाहीं; तर निरनिराळ्या पुराणांतून सुरस 'कृष्ण'कथा निवडून तो चटकदार व वैचित्र्ययुक्त केला आहे. पण मुख्यतः 'भागवत' दशम व 'हरिवंश' या ग्रंथावरच त्याने आपली भिस्त ठेविली आहे.[११] जेथे जेथें त्यानें अन्य कथा घेतल्या आहेत तेथें तेथें त्याने आधार दिले आहेत त्या कथा अशाः—

१ ब्रह्मादि देव विष्णूस अवतार घेण्याची प्रार्थना करण्याकरिता 'क्षीराब्धि' तीरावर गेले असे वर्णन येताच त्यास 'ब्रह्माण्ड' पुराणातील 'क्षीराब्धि' वर्णन आठवले व ते त्यानें लगेच मोठ्या बहारीनें वर्णिलें व आधारही सांगून टाकला.[१२] श्रोत्याची खात्री पटावी म्हणून मूळ संस्कृत श्लोक देऊन त्यावर 'वामनी' थाटाची मराठी टीकाही त्यानें दिली आहे.

२ चवथ्या अध्यायातील 'महाबळ' विप्राची कथा 'नारद' पुराणांतून घेतली आहे. तो म्हणतो[१३]:—

श्रोतीं न धरावा अनुमान। मुळावेगळी कथा पूर्ण। सहसाही वाढेना॥

यावरून अवांतर कथांचे आधार श्रीधराने बिनचूक देण्याची

१० ह. वि. ३२, १३६ ११ ह. वि. १, ११०–११४

१२ ह. वि. २, ३३ १३ ह. वि ४, १२१

खबरदारी घेतली होती असे म्हणावयास हरकत नाहीं. पण या बाबतींत कांहीं अलीकडील टीकाकारांनीं त्याचे एक दोन प्रमाद दाखवून त्याच्या अगीं टापटीप नव्हती व तो निश्वासार्ह नाहीं असे सरसहा त्यास दूषण दिले आहे[१४] ते थोडेसें कडक वाटते ज्यानें शेकडों ग्रथ वाचले व ज्यानें अनेक ग्रथ लिहिले त्याच्या हातून अनवधानानें एखाद दुसरी चूक झाल्यास तिच्याकडे ढळत्या नजरेने पहाणेच उचित नाहीं का होणार ?

३ (अ) शचीने राधावतार घेऊन भगवनसमागमाची आपली लालसा पुरविली. ही कथा 'पद्मपुराणा'तून घेतली आहे[१५] व 'जयदेव' व 'बिल्वमगल' यांनींही ती कथा सागितल्याचा हवाला दिला आहे. हिची पुनरुक्ति याच ग्रथात अध्याय छत्तीस मध्ये व स्वतत्र रीतीने 'पाडुरग-माहात्म्य' अध्याय एक ते दहा या लघु ग्रथात त्याने केली आहे.

(ब) अक्रूरागमनप्रसगीं:—

जैसें उदकीं मिळे लवण । तैसी राधा गेली अदृश्य होउन ॥
हरिरूपीं झाली लीन । दुसरेपण हारपलें ॥[१६]

असे वर्णून ही कथा 'पद्मपुराणा'तून घेतल्याचे श्रीधर सागतो, परतु त्यांत ती सापडत नाहीं असा प्रा. कोल्ते याचा अक्षेप आहे.

'पाडुरंगमाहात्म्या'त श्रीधर सागतो[१७]:—

बाळपणी भोगिला कृष्ण । मग मथुरेसी गेला मनमोहन ॥
वियोग न साहवे म्हणून । गुप्त झाली राधिका ॥

---

१४ वनहट्टी मयूर. का. वि, पृ. ३०, कोल्ते. नरेंद्राचा रु. स्व प्रस्ता.
१५ ह. वि. १८, ११२; १६ ह. वि. १८, ११४
१७ पाडुरग. मा. १, १३–१५

वेष पालटूनि मागुती । तेचि प्रगटली द्वारकेप्रती ।।
देखोनिया रुक्मिणीपती । हास्यमुख करी राधिका ।।
संतोषोन जगज्जीवन । राधिकेसी आलिंगून ।।
अंकीं घेतली बैसवून । परम लावण्य रूप तिचें ।। ह.

वरील दोन कथांत राधेचें ' हरीरूपीं लीन होणें ' व ' गुप्त होऊन पुनः प्रगट होणें ' असा स्पष्ट विरोध दिसत आहे. पण ' लीन ' चा एक अर्थ ' hidden ' असा आहे, तो ' गुप्त ' याशीं जुळता आहे. म्हणजे ' लीन ' या शद्बाचें स्पष्टीकरण दुसऱ्या उताऱ्यात झालेलें दिसतें.

( क ) अध्याय छत्तीसमध्यें 'पद्म' पुराणातील ' पाडुरंगमाहात्म्य' श्रीधरानें साराशाने सागितलें आहे. याच नावाचा त्याचा एक लघु ग्रंथ आहे. त्याचा उल्लेख मागें आलाच आहे.

अध्याय तेहतीसमध्यें ' राजसूय 'यज्ञप्रसगीं कृष्णानें एका ब्राह्मणाचें प्रेत उठविलें. नन्तर यज्ञवेदीवर एक जबूक जाऊन त्यानें असें भविष्य कथिलें कीं, पुढें एकाचा वध होईल. तेरा वर्षांनीं वसुन्धरा निर्वीर होईल व आलेले सर्व राजे आटतील.यासंबंधीं श्रीधर म्हणतो:–[१८]

हें जैमिनी भारतींचें संमत । श्रोतीं पाहिजे ऐसें यथार्थ ।।
श्रीकृष्णें उठविलें प्रेत । हें कथानक तेथेंचि ।।
कथा हे गोड ऐकिली । म्हणऊनी हरिविजयीं योजिली ।।

हीच कथा श्रीधरानें पुनः ' पाडवप्रतापा ' त सागितली आहे.[१९] तेव्हा ' अनेक पुराणींच्या कथा विशेष ' असें जरी श्रीधरानें म्हटलें असलें तरी त्यानें ' ब्रह्माण्ड 'पुराण, ' नारद 'पुराण व ' जैमिनीभारत ' यांतून एक एक व ' पद्म 'पुराणातून तीन मिळून सहाच कथा

१८ ह. वि. ३३,२३८–२३९. १९ पां. प्र. १७,२२५–२२७

बाहेरच्या घेतल्या आहेत. बाकीच्या कथा ' दशम ' व ' हरिवंश ' याच्या आधाराने रचिल्या आहेत. त्याचें दिग्दर्शन अध्यायक्रमानुसार पुढें केलें आहे :- —

प्रथम ' गणेश ' व ' सरस्वती 'यास नमन करून व संत गुरु-महिमा सागून मंगलाचरण केलें आहे. दैत्यपीडानिवारणार्थ देवांनीं विष्णूस अवतारार्थ प्रार्थना केली. तदनुसार वसुदेव-देवकीच्या पोटीं देव अवतरले. गोकुळात पुतनाशोषण केलें. पुढें ' तृणावर्तास ' मारलें. मग बालक्रीडा व गोपींचीं गान्हाणीं वर्णिलीं आहेत. सातव्या अध्यायात गोपींस दशावतारलीला सागून आठव्यात राधा-कृष्ण प्रेम वर्णिले आहे. पुढें नवव्या व दहाव्या अध्यायात 'उखळ-बंधन','यमलार्जुनोद्धार', 'वनक्रीडा','वत्सहरण' आलें आहे. पुढें अकरा, बारा, तेरा, चौदा, पधरा, सोळा व सतराव्यात अनुक्रमें ' कालीया मर्दन ','गोवर्धनोद्धरण', ' कस-दूत-मर्दन ',' अघासुर-मर्दन ' ' द्रेवकीच्या वाणाचे ग्रहण ' ' यज्ञपत्न्याख्यान ' व 'रासक्रीडा' या कथा आल्या आहेत. पुढे ' अक्रूरागमन ', ' कंसवध ', 'सादीपनी-गृहवास ', ' उद्धवाचा गोपींस उपदेश ' ' जरासन्ध-पराभव ' व ' काळयवननाश ' या कथा बावीस अध्यायापर्यंन्त आल्या आहेत ' रुक्मिणी–स्वयंवर'–अध्याय तेवीस व चोवीस; ' जाबुवंती–विवाह ' अध्याय पचवीस; ' षोडशसहस्र गोपी '–अध्याय सव्वीस, ' रुक्मिणी-विनोद", ' उखा–हरण',' सुदाम–भेट ',' सत्यभामा–विनोद', ' गरुडगर्व-परिहार ', ' सुभद्रा–हरण ', ' राजसूययज्ञ ', ' द्रौपदीला वाढतांना कृष्णानें चतुर्भुज केलें, ' मयसभावर्णन ', ' शिशुपाळ–वक्रदंत वध ', ' ग्रहणयात्रा ,' ' गोकुळजन भेट', ' पांडुरगमाहात्म ' अशा कथा अनुक्रमें आल्या आहेत. या कथा सर्वश्रुत आहेत. यांपैकीं सुमारें पंधरा-

सोळा कथांवर स्वतंत्र व संक्षिप्त रचना 'स्फुट प्रकरणा'त आली आहे. यावरून 'स्फुट प्रकरणा' वर आपली लेखणी चालवून मग मोठे ग्रंथ श्रीधरानें लिहिले असावे या आमच्या मागील अनुमानास चागली पुष्टी येते.[२०]

## ५ श्रीधराचा विनय व आत्मविश्वास

श्रीधराची विनयवृत्ति त्याच्या सर्व ग्रंथात व्यक्त झालेली आढळते या ग्रथात मंगलाचरणानन्तर त्यानें आपला पिता व गुरू जो 'ब्रह्मानद' याची अत्यंत गौरवपूर्वक प्रार्थना करून ग्रथपूर्णतेचे वरदान मागितलें आहे. तो म्हणतो :—

"श्रीगुरुराया तू समर्थ आहेस. हा आरंभिलेला 'हरिविजय ग्रथ तुझ्या वरें करून शेवटास जावो.[२१] वाजविणारा असल्या शिवाय पांवा वाजत नाहीं. सूत्रधाराशिवाय काष्ठपुतळा नाचत नाहीं. त्याप्रमाणें तुझ्या कृपेवीण मला बोल बोलवत नाहीं नन्तर त्यानें संताची स्तुति करून व्यास वाल्मीकि या आदिकवींस नमन केलें आहे. पुढें सतराव्या अध्यायाच्या शेवटीं तो म्हणतोः— "वरदायक रुक्मिणीकातानें हा ग्रथ लिहिला. येऱ्हवीं मी दीन पामर आहे. त्यानेंच माझें 'श्रीधर' हें नाव ठेविलें. माझ्यासारख्या मूर्खाहातीं हा ग्रथ त्यानें का करविला हे त्याचें तोच जाणे."[२२] पुनः तो म्हणतोः— "मी मतिमंद आहे हे सर्व लोक जाणतात. मी नाहीं वाचलें संस्कृत, मला नाहीं कळत विभक्तिज्ञान; तेव्हां हा ग्रथ पढरिनाथानेंच करविला."

---

२० श्रीधर. च. आणि का., भा. २., प्र. ११, पृ. १९०

२१ ह. वि. १, ६२

२२ ह. वि. १७, २१२–२१४

श्रीधराचा विद्याभ्यास, त्याचें संस्कृताध्ययन व त्याची बहुश्रुतता यांचा सविस्तर उल्लेख मागे आलाच आहे.[२३] त्यावरून पाहता ही परा-कोटीची विनयवृत्ति अगदींच अनुचित वाटते. पण वरील प्रमाणें त्यानें एकीकडे असा ग्रथगर्वपरिहार केला आहे, तर दुसरीकडे इतर मराठी श्रेष्ठ श्रेष्ठ कवींप्रमाणें अतिरिक्त ग्रथस्तुति करून आत्मप्रशंसाही केली आहे. ती कशी हें पुढें थोडक्यात दर्शविलें आहे —

या प्रशंसेंत श्रीधरानें पारमार्थिक हितावरच विशेष भर दिला आहे आणि त्याचे बहुतेक अलकार त्या दृष्टीनेच केलेले आहेत हे ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. तो म्हणतो: —" हरिविजय अवलोकिता जन्मोजन्मींचें पाप जातें. सर्वकाळ जय प्राप्त होतो. कळिकाळाचे भय नष्ट होतें. ग्रथ रूपानें निरन्तर वाहाणारी ही गोदावरीच आहे. भवरूपी सिंहस्थास येणारी यात्रा येथें पावन होते किंवा ही कृष्णावेणीच आहे. भक्तिकन्यागतीं भाविक येथें धावत येतात. कलियुगातील दुस्तर भवनदी तरण्यासही एक नौकाच आहे. भाविकहो ! लवकर धावा आणि इच्यांत बसून पैलतीरास जा. हा ग्रंथ दिव्य रसराज आहे. त्याने भवरोगियांस परीक्षितीप्रमाणे सात दिवसात मुक्ति ( आरोग्य ) मिळते. अथवा हा ग्रथ दक्षिण सागर आहे. प्रेमरूप जान्हवी नीराच्या कावडी जो या परमेश्वरावर टाकतो तो ससारसागर तरतो. हरिविजय ग्रंथ हा कल्पद्रुमच आहे. तो भक्ताचें काम पुरवतो एवढेंच नव्हे तर हें केवळ वैकुण्ठपीठच आहे ही नुसती कविता नसून येथें इंदिरानाथ स्वतः प्रगटतो व वैकुण्ठाची देणगी देतो. पण या पारमार्थिक दृष्टीबरोबर साहित्य

---

२३ श्रीधर च आणि का., भा. १, प्र २, पृ. १९-३५

दृष्टिही त्यानें ठेविली आहे. किंबहुना हिच्या आकर्षणानें वाचकांस आपोआप पहिलीचें फल प्राप्त व्हावें अशीच कवीची योजना दिसते.'' कवि म्हणतो:—'' हरिविजय ग्रंथ हा समुद्र आहे. त्यात अत्यंत पवित्र अशीं साहित्यरत्ने आहेत. त्याचे शोधक नर सानदे त्यात बुड्या घेतील. हा साधा समुद्र नसून ' क्षीरसागर ' आहे म्हणून शेषशायीच्या दर्शनाबरोबरच वाचकांस साहित्य–दृष्टान्तरूपी उज्वल रत्नाचाही लाभ होईल. हा ग्रंथ म्हणजे एक ' वैरागार ' आहे त्यात विसावा अध्याय हा थोर हिरा आहे. निर्विकार जो हरी तो हृदयपदकीं जडवतील चोविसाव्या अध्यायातील रुक्मिणीस्वयंवर हें तर त्यातील दिव्य रत्न आहे. हा ग्रंथ ' मलयपर्वत ' किंवा ' कस्तुरी 'च आहे. रसिक भक्त त्याचा सुगंध घेतात. पण:—

निंदक सदा वटवटती पामर । जे परम अपवित्र दर्दुर ।
परदोषकर्दमीं लोळणार । कस्तुरी साचार नावडे त्या [२४] ॥

अथवा हा ग्रंथ शोभायमान ' कनकाद्रि 'च आहे; व तो नाना दृष्टान्तरत्नाच्या लेण्यानीं मंडित आहे. नव्हे, हे केवळ आनंदमय 'नंदनवन' असून त्यातील नाना इतिहासरूपी घनवृक्ष सदा प्रेमरसानें रसरसतात.'' यावरून हा ग्रंथ लिहिण्यात श्रीधराची भूमिका पुढीलप्रमाणें दिसते:—

( १ ) ' भागवत ' दशम ' हरिवंश ' व कांहीं ' पुराणें ' या संस्कृत ग्रंथांतील हरिलीला मराठींत वर्णन करून भाविक भक्तास नीतिमान व परमार्थप्रवण करणें.

( २ ) व वरील हेतूच्या सिध्यर्थ मनोरंजक काव्यनिर्मिति करणें. यात पहिला हेतु प्रमुख असून दुसरा गौण आहे हें

---

२४ ह. वि. २७, २४३

सांगावयास नकोच. म्हणजेच श्रीधरानें कलेसाठीं कलानिर्मिति केली नसून जीवनासाठीं कलेचा उपयोग केला आहे. 'फलश्रुतींत पुत्रलाभ, शत्रुनाश, ऋणमुक्तता, रोगनिवारण, इत्यादि ऐहिक फुलांचा जोड परमार्थास दिल्यामुळें कवीचा प्रधान हेतु पूर्णपणें सिद्धीस गेला आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. कारण याचें प्रत्यंतर या ग्रंथाच्या अपूर्व लोकप्रियतेंत दिसून येतें. आठरा पगड जातीचे महाराष्ट्रीय स्त्री–पुरुष (सुशिक्षित वा अल्पशिक्षित) श्रीधराचे ग्रंथ मोठ्या आवडीनें वाचतात. तर साक्षर–निरक्षर श्रवणसुखाचा लाभ घेतात. आता सरस काव्यनिर्मितीचा जो गौण हेतु तो कितपत साधला आहे हे पाहूं. श्रीधरानें एकदां मोघम साहित्य मुक्ताचा व दोनदा नाना दृष्टान्तरत्नाचा व चतुरालापाचा उल्लेख केला आहे. दृष्टान्त शब्दानें उपमारूपकादि अर्थालंकार व अनुप्रासादि शब्दालंकार श्रीधरास सूचित करावयाचे आहेत हें उघड दिसतें. पण दृष्टान्तात त्याचा हातखंडा असल्यामुळें व त्यानें त्याचाच मुक्तहस्तानें नव्हे तर, कोठें कोठें कटाळवाण्या पाल्हाळानेंही उपयोग केला असल्यामुळें ' प्राधान्येन व्यपदेशः 'या तत्त्वानुसार दृष्टान्ताचाच नामनिर्देश त्यानें केलेला आहे. पण प्रथमतः श्रीधराची काव्यासंबंधींची कल्पना आपण समजून घेणे अवश्य आहे. याच ग्रंथात तो म्हणतो :—

(१) हरिगुणलीला न वर्णिता । व्यर्थ काय ते अलवण कविता ।
जैसा वाळूचा घाणा गाळिता । तेल न पडे काहींच ॥

नळी फुंकिली सोनारें । इकडुनि तिकडे जाय वारें ।
तैसीं तीं व्यर्थ शास्त्रें । हरिलीला न वर्णिता ॥

न वर्णितां हरिचरित्र । व्यर्थ वटवट कायसे ग्रंथ ।

जैसीं अर्कफळें क्षुधार्त । रुचि उडे भक्षिता [२५]॥

( २ ) हरिप्राप्तीविण गायनकळा दावित । जैसा गोवारी आरडे अरण्यांत ।
हरिप्राप्तिविण प्रवृत्तिक ग्रंथ । काय कविता अलवण ते [२६]॥

संतकवींनीं हा सिद्धात श्रीमद्भागवतांतूनच घेतला आहे.[२७] आणि रामदास[२८], तुकाराम[२९], वामनपंडित[३०], वगैरे कवींनीं याच कल्पनेस पुष्टि दिली आहे, व तदनुसारच ही श्रीधरची काव्यकल्पना आहे. म्हणजे परमार्थ व तत् प्राप्त्यर्थ 'हरिलीलागान' हा एकच विषय यानीं आपल्या काव्यास आखून घेतला आहे. अर्थात् ही कल्पना अगदीं सकुचित आहे. म्हणून या कवींस हरिलीलावर्णनातच जे काहीं अलकार व रस आणिता

---

२५ ह. वि. ९, ३-५ २६ ह. वि. २१, २४

२७ बिले बतोरुक्रमविक्रमान्ये । न शृण्वतः कर्णपुटे नरस्य ।
जिव्हाऽसती दार्दुरिकेव सूत । न चोपगायत्युरुगाय गाथाः॥
भा. स्क. २, अ. ३, २०

२८ नसता कवींचा व्यापार । तरी कैचा असता जगदुद्धार ।
म्हणोनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी ॥
दा. बो. द. १, स, ७, २१ ॥ धीट पाठ. धीट पाठ कवि इ.

२९ चातुर्याचे योगें कवित्व करिती । प्रासादिक रंग आणितां नये ॥
नवनीत. तुकाराम अ. ७९, पृ. ६३
कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशल ते भांड बहु झाले ॥
घरोघरीं झाले कवि । नेणे प्रसादाची चवी ॥ तुकाराम

३० वितीं व्यर्थ काव्यें अलवण हरीवीण कविता ॥
नवनीत. 'वामनपडित' नृसिंहावतार, २१

येतील त्यावरच तुष्ट होऊन राहणे भाग पडलें आहे. वस्तुतः काव्याचा विषय कोणताही का असेना त्यात निर्मळ आनंदप्रतीति झाली म्हणजे झालें. पण हे व्यापक तत्त्व तत्कालानुसार त्यास सांडावे लागलें म्हणूनच भक्तिरसास स्वतंत्र मान्यता द्यावी कीं न द्यावी या विषयीं जरी संस्कृत साहित्यिकात मतभेद आहेत तरी मराठी संतकवींच्या काव्यात त्यास अग्रस्थान देणें अवश्य झाले आहे. असो आता श्रीधराच्या ' हरिविजया 'त रसपरिपोष कसा काय झाला आहे तें पाहूं.

## ६ रसपरिपोष

( अ ) भक्तिरसः—हरिविजयाचें सहज वरवर जरी अवलोकन केलें तरी वाचकास अथपासून इतिपर्यंत भक्तिमय वातावरण दिसून येतें. थोडेसें बारकाईनें निरीक्षण केले तर भक्तीचीच पार्श्वभूमी कवीनें प्रथमतः साधली आहे असें आढळतें. मग या पार्श्वभूमीवर त्यानें प्रसंगानुरूप निरनिराळे रस चित्रित केले आहेत. कवीने प्रथमतः परब्रह्मरूप गुरूचा महिमा वर्णून ' भक्तीची ओल बहु होय ' अशा दयामेघाच्या वर्षावाची याचना केलेली आहे. नन्तर ब्रह्मादिकाची अवतारार्थ विष्णुस्तुति येते, व कवि म्हणतोः—

ब्रह्मानंद कृपेच्या बळें । हें ग्रंथजहाज चालें ।
भक्तीचे शीड वरी लाविलें । दयावातें फडकतसे[३१] ॥

यावरून या ग्रंथात मागें म्हटल्याप्रमाणे भक्तीला महत्त्व किती दिलेलें आहे हें सहज समजेल.

तिसऱ्यात–चौघाशींही नव्हे अवाका । तुझें स्वरूप वर्णावया[३२] ॥१॥

---

३१ ह. वि. २, २०५ ३२ ह. वि. ३, १

असा आरंभ करून संख्यावाचक अनेक श्लिष्ट शब्दांनी कवीने ईशस्तुति केली आहे. पुढें देवांची 'गर्भस्तुति' भक्तिपरच आहे. वास्तविक प्रत्येक अध्यायाचे आदि अंत भक्तिपूर्ण व रसाळ झाले आहेत. या सामान्य भक्तिस्तोत्रानन्तर राधेची व्यक्तिगत अनन्य कृष्णभक्ति आपणास आठव्या अध्यायात पहाण्यास सांपडते तिच्या सर्व चित्तवृत्ति कृष्णाचे ठायीं मुरून गेल्यामुळे ती आत्मप्रकाशात समरस झालेली आपणास दिसते. पुढे नवव्यात व पंधराव्यात नौका बुडत असताना व वस्त्रहरणात गोपींची एकनिष्ठा बहारीची वर्णिली आहे. 'यज्ञपत्न्याख्यानात' ऋषिपत्न्यानीं आपल्या कर्मठ व शब्दपंडित पतींस न जुमानता अत्यंतपणाने जी कृष्णसेवा केली ती अत्यंत रसाळ व उद्बोधक झाली आहे.[३३] अक्रूराची कृष्णभक्ति कुब्जेची कृष्णप्रीति, व कंसाचीही विरोधभक्ति व द्रौपदीचा धावा यानीं पुढील अध्याय मोठे गोड व आकर्षक झाले आहेत. पण कृष्ण मथुरेस गेल्यानन्तर गोपींची तन्मयवृत्ति कवीने फारच गोड व मोहक रीतीने वर्णिली आहे. नव्हे, हा सर्वच एकवीसावा अध्याय आमच्यामते भक्ति रसाचा सागर झाला आहे. गोरस विकून परतताना गोपी कृष्णलीला मुखीं गात घरीं आल्यावर त्या प्रपंचकृत्य करीत पण त्यांचें चित्त मात्र कृष्णरूप झालें होतें. घुसळिता हात चळत पण त्या मात्र समाधिस्थ असत पुढे कवि सांगतो :—

एवं गोपिका दळिता कांडिता । येता जाता दुग्ध तापविता ।
घुसळिता उदक आणिता । कृष्णनाथा न विसराती ॥[३४]

अशा रीतीनें श्रीधरानें भक्तीचीं नवविध अंगे मोठ्या आवडीने रंगविलीं आहेत.

---

३३ ह. वि. अ. १६ ३४ ह. वि. २१, ६०

( आ ) अद्भुतरस :— त्यानन्तर दुसरा सर्वव्यापी रस म्हणजे 'अद्भुत' होय. कृष्ण हा ईश्वराचा पूर्णावतार असल्यामुळे त्याच्या चरित्रात पदोपदीं तो उत्कटत्वाने दिसावा हें सहाजिकच होय. जन्मतःच कृष्णागुप्तहरणानें यमुनेचे दुभंगणें, पूतनाशोषण, तृणावर्त वध, उखळ-बंधन, यमलार्जुनोध्दार, वत्सहरण, कालियामर्दन, गोवर्धनोद्धरण, कंस-दूतनाश, अघासुर-चक्रासुरवध वगैरेस चतर्भुज होऊन दर्शन देणें, सांदीपनीचा पुत्र परत आणणे व देवकीस तिच्या मृत अपत्याची भेट करवणे वगैरे अनेक गोष्टी 'अद्भुत' रसातच मोडतात. या अद्भुत वर्णनांनीं कृष्ण चरित्रास पुष्कळसें दैवी स्वरूप आलें आहे

( इ ) वत्सलरस :— यानन्तर 'वत्सल' रसाचा क्रम लागतो. कृष्ण-जन्म समयींची व कंसवधानन्तरची देवकीचा वत्सलता मोठी हृद्य झाली आहे. पण त्याची खरीं गोडी यशोदेच्या भावमधुर कृतींत चाखावयास मिळते. शकटासुराच्या वधानन्तर कृष्ण चिखलातून रांगत येतो व बलिरामा-बरोबर धूलिधूसर होऊन मातजवळ येतो तेव्हांचें चित्र किती हृदयंगम झालें आहे. पहा:—

धुळीनें भरलें अंगवदन । हासती येकाकडे येक पाहोन ।
झळकती लघुलघु दशन । आकर्णनयन दोघांचे[३५] ॥
मातेचे जानुयुगळ । तेथें मिठी घालून घननीळ
वरी करूनि मुखकमळ । गदगदा हांसतसे[३६] ॥
धुळीनें भरलें निजांग । मातेनें उचलिला सवेग ।
पूर्ण ब्रह्मानंद श्रीरंग । हृदयीं दृढ धरियेला ॥

३५ ह. वि. ५, ५०
३६ ह. वि. ५, ५३–५५

पदरें पुसिली अंगींची धुळी । मातेचे वदन विलोकी वनमाळी ॥
धन्य ते यशोदा वेल्हाळी । चुंबन देत हरीतें ॥

हे गोड वर्णन वाचताना कालिदास[३७] व पंत[३८]यांच्या सदृश विचारांची आठवण रसिकास झाल्याशिवाय कशी राहील ? पुढें कृष्णाचें चालणे, चालताना मधून पडणें, व 'नाच नाच रे चक्रपाणी' असें म्हणून त्यास करतालावर नाचण्यास शिकविणे, पालखींत निजवून गोड गीते गाणे, त्याचे विचित्र हट्ट; गौळणींची गाऱ्हाणीं ऐकून केव्हा त्यास दटावणे, केव्हा त्याचें चुंबन घेऊन गौळणींवरच रागावणें, खोड्या टाकाव्या म्हणून सकष्टिव्रत करणें व सर्वांच्या सर्व नैवेद्य मोदकाचे भक्षण करणे, तिचें रागावणें व ब्रह्मांडदर्शनानंतर त्यास लडिवाळपणाने कडेवर घेणे वगैरे अनेक स्थळीं या रसाची मोठी बहार उडाली आहे. पुढे पाचव्या अध्यायांत अठराव्या ओंवींत नंद कृष्णास मथुरेस ठेवून परत जातो त्यावेळींही नंदाचें पुत्रप्रेम आपल्या नजरेस पडते यात कृष्णचरित्राचा मानवी भाग पुष्कळच असल्यामुळें तें आपणास अधिक जवळचे व प्रिय असे वाटतें.

---

३७ आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीयवचः प्रवृत्तीन् ।
अंकाश्रयप्रणयिनस्तनयान्वहन्तो ।
धन्यास्तदंगरजसा मलिनीभवन्ति ॥
शाकुन्तल ७, १७.

३८ तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ।
जरी मळविशी रजामलिनकाय तूं अंबरें ॥
नवनीत. मोरो. केका. २३ (८५)

(२) करुणरसः—वत्सलरसाच्या खालोखाल 'करुण'रसवर्णन येते. वरातेच्या वेळीं जेव्हां कंस देवकीस मारूं लागला तेव्हा तिने त्याची केलेली विनवणी हृदयद्रावक आहे. कवि म्हणतो:—

देखोनि देवकीची करुणा । अश्रु आले जनाच्या नयना[३९] ॥

कृष्ण मथुरेस जाताना गोपींनी केलेला आक्रोश फारच भेदक आहे:—

सकळ गोपी यशोदेचे कंठी । घालिती तेव्हा दृढ मिठी ।
शोक केला तो न माय सृष्टीं । न वर्णवेचि कोणातें[४०] ॥
शुकें वर्णिता हे कथा । सद्गद कंठ जाहला तत्त्वता ।
शुकासि जाहली जे अवस्था । ते वर्णिता मज न ये ॥

आणि सद्गद जाहला परिक्षिती । ढळढळां नयनीं अश्रु वाहती ॥

राधेचा शोक तर इतका अनावर झाला कीं, ती तेथेच कृष्णरूपीं विलीन झाली. कंसस्त्रियांचा कंसवधी शोक; रुक्मिणीचा पुत्र हरवला तत् समयींचा तिचा शोक, वगैरे ठिकाणीं या रसाचा परिपोष चांगला झाला आहे.

(३) वीररसः—यानन्तर 'वीर'रसाचा क्रम लागतो परन्तु श्रीकृष्ण हा अवतारी पुरुष असल्यामुळे त्याच्या पराक्रमाचे अधिष्ठान 'अद्भुत'च आहेसे वाटते. तरी पण कुवलयहस्तीचा नाश, चाणूर, मुष्टिक यांशीं झालेलें मल्लयुद्ध, जरासंधाचा सतरा वेळां पराभव, रुक्मिणीहरण-प्रसंगींचे युद्ध, अग्रपूजेनन्तर शिशुपाल, वक्रदन्त यांशीं झालेले युद्ध, बाणासुराशीं युद्ध वगैरे प्रसंगीं 'वीर'रसाचा परिपोष चांगला झाला आहे. सामान्यतः उभयपक्षाचे वीर एकमेकांचीं उणीं काढून क्रोधाविष्ट होऊन मग

---

३९ ह. वि. २, १४१

४० ह. वि १८, १२९–१३०

युद्धास प्रवृत्त होतात अशा प्रकारचें वर्णन श्रीधर नेहमीं करतो. तसेंच येथें आहे.

(ऊ) शृंगाररसः—या ग्रंथात 'शृंगारा'स फार अल्प स्थान मिळालें आहे. ते देण्याचे कारण कवि म्हणतोः—

जे का विषयपर जन । न ऐकती हरीचे गुण ।
त्यास शृंगाररस दाऊन । वेधी मन आपणाकडे[41]॥

प्रथमतः बालक्रीडेंत गोपींशी केलेल्या चेष्टा बालपणातल्या असल्या-मुळें फार तर वात्रटपणा किंवा चावटपणात मोडतील. त्या 'शृंगार'रस पदवीस चढू शकत नाहींत. राधेशीं झालेला शृंगार व गोपींशीं केलेली रासक्रीडा यात संभोगशृंगारापर्यन्त मजल गेली आहे खरी. पण तो पर स्त्रियांच्या संबंधीं असल्यामुळे खरा रस नसून रसाभास आहे. शिवाय कवीनें येथेही वरील ओवीची पुनरावृत्ति करून कृष्णाची मूर्ति अष्टवर्षाची होती, तो पूर्ण ब्रह्मचारी व उर्ध्वरेता होता, त्याने गोपींना कामभोगानें उद्धरिल्या म्हणून 'न देवचरित चरेत्' अशी धोक्याची सूचनाही त्यानें देऊन ठेवली असल्यामुळें त्यास 'लौकिक' शृंगार असें म्हणता येत नाहीं. रासक्रीडावर्णन वाचताना मौज वाटते व चमत्कारही वाटतो पण वाचकात कामुक भावना उद्भूत होत नाहींत. म्हणजेच येथें शृंगाराचें श्रेष्ठ पतीचें उदात्तीकरण झालें आहे या कल्पनेचें दृढीकरण पुनः रासक्रीडेच्या शेवटीं कवीने केलें आहे. तो म्हणतोः-- रासक्रीडेला आलेल्या गोपी वस्तुतः गोपी नव्हत्या. त्या तर पतिसह आपापल्या शयनमंदिरात होत्या. वेदश्रुतींना निर्गुणरूप वर्णिता येईना म्हणून ये वेळीं त्या सगुणरूपी

[41] हं वि ७, १८

जडल्या.[४२] असे जरी आहे तरी श्रीकृष्ण जेव्हा एकाएकीं गुप्त झाला त्यावेळचा 'विप्रलंभ' शृंगार गोपींचे गोपीगीत व त्याची तन्मयवृत्ति याचीं वर्णनें मुळाप्रमाणें अत्यंत मधुर व रसाळ झालीं आहेत. कुब्जा कृष्ण-प्रेमंही वरील सदरातच पडेल. असें जरी आहे तरी त्यात शृंगार नाहीं असें नाहीं. पारिजातकाच्या पुष्पाबद्दलचा भामेचा रुसवा व कृष्णाने केलेली तिची समजाविशी याचीं वर्णनें इतकीं हुबेहूब व चटकदार झालीं आहेत कीं, त्यात आपणास कलहान्तरिता नायिकेचे प्रतिबिंब स्पष्ट दिसते. त्यानन्तर कृष्णरुक्मिणी विनोदात मात्र शृंगार आपणास पहावयास मिळतो. पुढें 'उषा' व 'अनिरुद्ध' याच्या प्रेमाचे वर्णन आले आहे. पण तें कवीने अगदीं संक्षेपानें सांगितलें असल्यामुळें तेथेंही शृंगाराचा पूर्ण परिपोष झालेला नाहीं.

(ए)हास्यरसः—या ग्रंथात शृंगारापेक्षा हास्य-विनोदास बरेंच स्थानें मिळालें आहे. सोंगाड्या 'महाबळ' ज्योतिषी जेव्हा आपलें पंचाग उघडून कृष्णासंबधीं अशुभ सागू लागला तेव्हा त्याच्या 'डोक्यावर पडलेलें मडकें, तोंडात शिरलेलें लाटणें व पदार्थ मात्र त्याच्या पाठीस लागून त्याला मारहाण करून त्यास पिटाळून लावतात, घोनर सुटतें इ.वर्णन फार विनोदी आहे.[४३] कृष्णाच्या बालपणच्या नानातऱ्हेच्या खोड्या व गोपींची गाऱ्हाणी, मथुरेस गेलेल्या गौळणींच्या गोरस डेऱ्यात दहींदुधाऐवजीं सर्प विंचू सापडणें व तिला पळता भुई थोडी होणे वगैरेत पुष्कळ हास्यरस आहे. पण एका निद्रिस्त दांपत्यात सोडलेला मुंगस व त्यानें उडविलेली त्याची त्रेधा व दुसऱ्या एका जोडप्याच्या दाढींवेणींत पडलेली निर्गांठ व तिनें

४२ ह. वि. १७, २०४–२०७; ४३ ह. वि. ४,१०४–१४३

उडविलेली त्याची दुर्दशा पाहून पोट हंसता हंसता दुखूं लागतें. रुक्मिणी विवाहात कृष्ण तिला कडेवर घेताना, हळदी–उटण्याचे वेळीं ' भीमकी ' नाव घेऊन पाय मागताना, कचुकीची गाठ सोडताना वऱ्हाडणी सुभद्रा, रेवती व मेहुणे यांनीं केलेली कृष्णाची थट्टा मोठी गमतीची झाली आहे.[४४] पुढे अध्याय पचवीसमध्यें जाबुवन्तीच्या विवाहाची मौज तर कांहीं औरच आहे. लग्नातील भेसूर वदनाचे व विशाळ पोटाचे वनेचर वऱ्हाडी व केसाळ अस्वली वऱ्हाडणी, त्याचे नवरानवरीस हळदी लावणें व अतरपट धरून ॐ पुण्याहच्या जयजयकाराने लग्न लावणे, नन्तरच्या हळदी-उटण्याचा समारंभ, व ते पाहण्यास आलेल्या नारदानें केलेली थट्टा, उलट चिमण्या अस्वलाने अप्रतीम गायन करून केलेला नारदगर्वपरिहार वगैरेचीं वर्णने फारच चटकदार झालीं आहेत. पुढे अध्याय तीसमध्ये कृष्णरुक्मिणीचा नर्मविनोद सात्विक झाला आहे. पुढे अध्याय एकोणतीस मध्यें सुदामभेटींत बराच विनोद आला आहे. सुदामा येताच हा माझा मित्र म्हणून कृष्णाने आपल्या स्त्रियास सांगितलें. तोच रुक्मिणी उत्तरते:– " खरेंच हा गोरक्षकासारखा दिसतो खरा ! आपला बाळ-सोबती वाटते ! आजपर्यंत हें रत्न कोठें झाकून ठेविले होतेंत ?" त्यावर कृष्ण म्हणाला:– " अग याची पूजा करा." ती म्हणते:–"द्वारपाळांनीं ती अगोदरच केली असेल की !" कृष्णाला हसे आले खरें पण ' विनोद सर्वथा न कीजे '[४५] असा हळूंच त्यानें एक इषारा दिला. पाहुण्याचे स्नानवीन झाल्यावर सोळासहस्र बायकाचा ताडा नमस्कारार्थ आला. एक म्हणते:–"आशीर्वाद देता देता थकला बिचारा !" दुसरी म्हणते:– " भाऊजी, आम्हाला चोळया आणा. " तर तिसरी काय प्रतिपादिते कीं, फुकाचा आशीर्वाद

४४ ह. वि. २४; ४५ ह. वि. २९, ११९

येइना तोंडातून तर ते चोव्ह्या काय देणार ! भोजनोत्तर रुक्मिणीने सुदाम्याच्या जीर्ण वस्त्राचे गाठोडें आणलें व म्हणाली:- "आपल्या बंधूंची संपत्ति पहा. या लवकर." आतील पोह्याची पुरचुडी पाहून भामा टोमणा मारते कीं, एक एक दाणा मोडून तोडून वाटला तरी तो सग ळ्याच्या वाटणीस येणार नाहीं ! भटजी बोवा ! घरीं जाऊन पुनः मोठी पुरचुंडी घेऊन या. पोहे न दिले तर तुमचे गाठोडें देणार नाहीं बरं का. इतक्यात जांबुवती कडकडते "अग त्याची एक एक चिंधीसुद्धा आपल्या वाटणीस येणार नाहीं." रेवती सर्वेच बजावते:-"देवा, गाठोड्यावर खूण ठेवा. नाहीतर चोरीबिरी व्हायची !" मुद्रा करून भामा म्हणते:- "पण अगोदर सर्व तंतू मोजल्येत का ?" असा सर्व बाजूंनी भडीमार झाल्यावर:--

'लज्जित खालीं पाहे विप्र । कोणास नेदी प्रत्युत्तर ।
सत्यभामेसी म्हणे दामोदर । किती विनोद कराल गे ! ४६

बालमित्र सुदाम्यासारखा सत्त्वस्थ, दरिद्री, निरागस ब्राह्मण खर्ची घालून थोर, उदार व शालीन कृष्णस्त्रियाकरवीं हा जो कठोर विनोद कवीनें केला आहे,त्यानें घटकाभर मौज वाटली तरी त्यात सहानुभूति नसल्यामुळें तो अगदीं अप्रासंगिक व औचित्यहीन झाला आहे असें आम्हांस वाटतें. यापुढील 'अंगुल्याः कः कपाटं, इत्यादि सुप्रसिद्ध वक्रोक्तीने केलेला 'कृष्णभामा-विनोद' चटकदार झाला आहे. नन्तर कृष्णविरहित स्त्री वर्णून गृहस्थाश्रमी होऊ पाहाणारा 'नारद' सोळा सहस्त्र कृष्णमंदिरीं पायपिटी करून फजित कसा झाला व त्याची नारदी होऊन तिला साठ पुत्र कसे झाले ही कथा फारच हास्यकारक झाली आहे. त्याचप्रमाणे सुभद्रेसह

४६ ह. वि. २९, १४८

द्रौपदीस भेटणाऱ्या अर्जुनाशीं तिने केलेला नर्मविनोद जसा भेदक तसा हृद्यही आहे. त्यानन्तर राजसूययज्ञांत भोजनप्रसंगीं वाढणाऱ्या द्रौपदीची कौरवांनीं केलेली थिल्लर थट्टा कोणासही अशिष्टच वाटेल शेवटीं सूर्यग्रहणानिमित्त आलेल्या मंडळींपैकीं गोपींची जेव्हां कृष्णाशीं भेट झाली तेव्हा त्यानें त्यास वस्त्रालंकार दिले. तें पाहून रुक्मिणी हळूच म्हणते:—

श्रीकृष्णास म्हणे ते वेळा । बरव्या गौरवाजी गोपी बाळा ॥
आपली पूर्व ओळखी संभाळा । केला सोहळा जो बाळपणीं [४७] ॥
ऐकता रुक्मिणीच्या वचना । हासो आलें जगन्मोहना ।।
सत्यभामादि सोळासहस्र ललना । हांसती तेव्हा आनंदे [४८] ॥

अर्थात् या सर्व मंडळींबरोबर वाचकही आनंदानें का हसणार नाहीं !

(८) इतर रस:—वर सांगितलेल्या ठळक रसाशिवाय 'भयानक' 'रौद्र' 'बीभत्स' व 'शान्त' या रसासही क्वचित् स्थान मिळाले आहे. अकराव्या अध्यायामध्यें कालियामर्दनात सळसळा कढणारे यमुनातीर, वनें भस्मसात् करणारा त्याचा नेत्राग्नि व त्याच्या धुधुः-कारासरशा उठणाऱ्या ज्वाळा वगैरे वर्णन भयानक रसाचा उत्तम नमुना आहे. अध्याय 'बारा' मधील प्रलयपर्जन्याचें वर्णनही असेच भयकर आहे. अध्याय 'बावीस' मध्यें कंसवध ऐकून मागधक्रोध व सुभद्राहरणप्रसंगीं बळरामाचा क्रोध हीं रौद्र रसाचीं उदाहरणे होत. अध्याय 'एकोणीस'मध्यें प्रारंभींच (दोन ते आठ) अमंगल कायावर्णन हें बीभत्सरसाचे उदाहरण होय. याचें पर्यवसान शान्तात झाले आहे जागोजागीं सांगितलेल्या तत्त्वज्ञानातही तो आला आहे. [४९]

येणेंप्रमाणें सर्व रसाचा परामर्श श्रीधराने आपल्या या ग्रंथात प्रसंगानुरूप घेतला असल्यामुळें तो आबालवृद्धांस प्रिय झाला आहे.

---

४७; ह. वि. ३६, ८७, ४८ ह. वि. ३६, ८८
४९ ह. वि ४, १५३; ६, ६०-६६; अ. १३ व २०

## ७ अलंकार

आता अलंकारानीं रसांची शोभा वाढत असल्यामुळे त्याचा उपयोग श्रीधराने कसा केला आहे तो पाहू.[५०] दृष्टान्तासंबधाने मागे उल्लेख आलाच आहे.[५१] ते तर पानोपानीं वैपुल्यानें किंवा दाटीवाटीने आढळतात. त्यानन्तर उपमा,[५२] रूपक,[५३] उत्प्रेक्षा [५४] हे अलंकार प्रामुख्याने दिसतात तर श्लेष,[५५] विरोधाभास,[५६] अपन्हुति,[५७] एकावलि,[५८] परिसंख्या [५९] लोकोक्ति,[६०] उल्लेख,[६१] वक्रोक्ति,[६२] स्वभावोक्ति [६३] व्यतिरेक, [६४] व कर्णमधुर अनुप्रास [६५] इत्यादि अनेक सुन्दर शब्दार्थालंकारानीं श्रीधराची कवितासुता नटलेली आहे

## ८ साहित्य भाषणें

श्रीधराने दृष्टान्ताबरोबर 'साहित्य भाषणे दिव्य रत्ने झळकती'[६६] असे म्हटलें आहे त्यावरून त्याच्या ग्रंथभर विखुरलेले 'संवाद', 'चतुरालाप'

५० काव्यशोभाकरान् धर्मानलंकारान् प्रचक्षते॥ काव्यादर्श परि २,१

५१ श्रीधर च., का. भा. २, प्र: १२, पृ २०६, ह. वि. १,५६-६३

५२ ह. वि. १, २०; २,७ — ५३ ह. वि. ७, २६१-६२

५४ ह वि ७, ७५ — ५५ ह. वि. २०, २३३

५६ ह. वि. २१, १४ — ५७ ह. वि. २५, १७७

५८ ह. वि. २९ ७८-७९ — ५९ ह. वि १, ९२

६० ह. वि. १, २३ — ६१ ह. वि. १९, १३१-१३५

६२ ह. वि. ३०, ६१-७० — ६३ ह. वि. ११, ८८-९२

६४ ह. वि ३, १५६ — ६५ ह. वि ३,९४;५,१५२

६६ ह. वि १६, १९८

सुभाषितें' व 'म्हणी' वगैरे साहित्याची अगे त्याच्या दृष्टीपुढें असावी असें वाटतें. तरी त्यांचें थोडेसे दिग्दर्शन आता करूं:--

उद्धवाची गोपींशीं भेट झाली तेव्हा तेथे अकस्मात् एक भ्रमर आला. त्याची सुन्दर रुजी पाहून गोपिका अन्योक्तीने त्यास म्हणतात:— "हे भ्रमरा, तू कृष्णवर्ण आहेस. तेव्हा तू कृष्णापासून आलास तू हेरा सारखी पाळती घेतो आहेस. तू शठाचा मित्र शठ खरा ! कशाला येथें उगीच रुणझुणतोस बाबा !तुझ्यासारखाच तो कृष्ण चचल.त्यानें म्हणे आता आम्हाहून सुन्दर अशी कुब्जा निवडली आहे. काय पण जोडा ! अगदीं काच आणि पाच ! तिनें खास काहीं तरी जादूटोणा करून कृष्णास भुलविलें. हे भ्रमरा ! आता तू जाऊन त्याला साग कीं, तुझ्या विरहाने सर्व गोपी मेल्या. त्याचीं प्रेतें तरी एकदा पाहून जा !" पुढें या अन्योक्तीचें आत्मार्पण भक्तींत पर्यवसान झालें आहे. [६७] जाबुवन्त-रामसंवाद बरा आहे, पण त्यापेक्षा नरकासुरवधास जाताना जो कृष्णभामा-संवाद झाला आहे तो अधिक मनोरम आहे [६८] नारदानें कृष्णस्त्रियात अधिक सुज्ञ कोण याची परीक्षा घेतली. ती प्रश्नो-त्तरें मोठीं मजेदार आहेत . [६९] विलाससभेत कृष्णास्त्रियापैकीं प्रत्येक जण आपणच कृष्णाची आवडती कशी हे सोदाहरण सिद्ध करण्याचा प्रयत्न करते त्यावेळचीं त्याचीं सभाषणें स्त्रीस्वभावानुरूप अशीं झालीं आहेत परन्तु अखेरीस त्यात 'षड्दर्शनें' व 'वेदान्त' यातील दाखले आल्यामुळे दुधात मिठाचा खडा टाकावा तसें झालें आहे. पण आधी

६७ ह. वि. २१,१५३-१८५

६८ ह. वि. २६, १३६-१४१; ६९ ह वि. २७, ५१-६५

जिला मुलगा होईल तिने दुसरीस वेणी द्यावी ही भामेनें रुक्मिणीशीं मारलेली पैज मात्र अगदीं स्त्रीमनाची पुरी पुरी ओळख पटविणारी आहे.[७०] कृष्णाकडे धाडलेली दूती त्यास भाळून रतिसुख भोगून आली या संशयाने भामेनें तिच्याशीं केलेला संवाद व भामेला चुकून मित्रविंदा म्हणून हांक मारणाऱ्या कृष्णाशीं झालेला तिचा संवाद हे सवतीमत्सराचे अगदीं आदर्श आहेत. पण कृष्णदानानन्तर इतर कृष्णस्त्रियांनीं तिचे जे वाभाडे काढले ते अगदीं जशास तसेच आहेत. आणि त्यावेळीं—

" सत्यभामा अधोवदन । कोणास नेदी प्रतिवचन ।
जैसें तस्करासि होता वृश्चिक दंशन। तो कळ सोसूनि उगाचि राहे[७१]॥

ही येथील उपमा अगदीं अप्रतीम आहे. पुढें 'तुला' झाल्यावर जेव्हा जी ती स्त्री आपआपलें सोनें भाडभाडून नेऊं लागली व त्यात जेव्हा देवकीही येऊन मिसळली त्या वेळच्या सास्वा-सुनाच्या भाषणात स्त्रियांच्या लोभी स्वभावाचे चागले प्रतिबिंब उठलें आहे. देवकी जेव्हां म्हणते कीं, माझे अलकार मजपुढे टाका तेव्हा सर्व सुना गदगदा हासून बोलतातः —

म्हणती म्हातारपणीं सोस । का हो सुटला तुम्हास ।।
आता हे अलकार सुनास । वाटा आम्हास मामिसें ॥ [७२]

या सर्वच प्रकरणात कृष्णचरित्राचें अतिमानुष किंवा दिव्य स्वरूप जाऊन त्यास जें खरे लौकिक व मानवी स्वरूप आलें आहे तें अत्यंत [illegible] व मनोरंजक झालें आहे.

ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास यांच्याप्रमाणें श्रीधरानेंही

७० ह. वि. २७, १६४, ७१ ह. वि. ३०,१३७
७२ ह. वि. ३०, १९२

आपल्या ग्रंथात अनेक ‘ सुभाषिते ’ ‘ वाक्संप्रदाय ’ व ‘ म्हणी ’ याची पेरणी मोठ्या सफाईने केली आहे. त्यामुळें त्याच्या भाषाशैलींत एक प्रकारचे ओज व प्रौढता आली आहे. त्यात प्रपञ्च व परमार्थ अशा दोन्ही अंगाचा अनुभव साठवलेला आहे. पुढे नमुन्यादाखल काहीं उदाहरणें दिलीं आहेत:--

१ ) आकाशा गवसणी न घालवे । वायु बांधोनि पालवा कोणा आणवे ॥ ह. वि. १, २३-२४

२ ) पाळती घेतो गोकुळीं ॥ ह वि. ४, ११० (हेरगिरी करणें)

३ ) कीं व्याधी जों उद्भव न धरी । तों निर्मूळ करावी लौकरी ॥ अग्नि आणि वैरी । धाकुटा म्हणों नये कीं ॥ ह. वि.४, १५५

४ ) आधींच शंख करावयाची हौस । त्यावरी पातला फाल्गुन मास ॥ ह. वि. ४, १६२

५ ) भगवंत जालिया पाठमोरा । नसतींच विघ्ने येती घरा ॥ ह. वि. ६, २०१

६ ) पाठीं असता भगवंत । कृतांतही करूं न शके घात॥ह.वि.१५,४८

७ ) सबळ काष्ठे भ्रमर कोरी । पिष्ठ करीं क्षणाभीतरीं ।
परी कमळास निर्धारीं । धका न लावी सर्वथा ॥ ह.वि.७,२०

८ ) कीं आधळे हातरूं माजले । कीं सिंहानें प्रतिबिंब देखिलें ।
कूपामाजी व्यर्थ मेलें । जीवा झालें तैसेंचि ॥ ह. वि. ७,२३४

९ ) चोर तरी सणगावरी धरूनि आणावे ॥ ह. वि. ८, १६१ ( मुद्देमालासह )

१० ) येवढा अन्याय कमलानायका । घाली पोटांत आतांची ॥ ह. वि. ११,१३८

११ ) घेनी डोहामाजी भांडोळा ॥ ह. वि १३, १४९ ( शोध )

१२ ) चिंता आणि चिता । दान्ही समानाचि पाहतां ॥ ह. वि. १४, २४१

१३ ) मग बोले बाळिभद्र । पडत्या आकाशा देऊं धीर ॥ ह वि १४, २४४

१४ ) मजसी लावूं नको तनाना ( चेष्टा ) । ह. वि १५, ६०
येऱ्हवीं याचे कान ये समयीं । पिळून देते हातींच ॥ ह वि. १५, ८१ ० ० ।

१५ ) जे अंतकाळीं मति निश्चिती । तैशीच होय पुढे गती ॥ ह. वि. १६, १४७

१६ ) कीं अबळा कन्या परदेशीं दुरी । परि तिचें मन सदा माहेरीं ॥ ह. वि. १७, १०

१७ ) नख लागता जे पडणार । त्यास कामया पाहिजे कुठार॥ ह. वि. १७, १६१

१८ ) माता बाळकासीं पायें लोटी । परी ते चरणींच घाली मिठी ह. वि. १७, १६८
सख्यानीं घर लागेंत गे पाठी ॥ ( घर खायला येतें· )

१९ ) मागें बोलावें अतिन्यून । समोर देखता पळती उठोन ॥
हे ग्रामसिंहाचें लक्षण । तैसे दुर्जन मथुरेचे ॥ ह. वि १८, २१०

२० ) सर्पाच्या माथा मणि दिसत । परी घेऊं जाता बहुत अनर्थ ॥ ह. वि. २०, ७९

२१ ) प्रत्यक्ष हातींचें देऊन । पळत्या पाठीं लागावें ॥ ह. वि. २१, २१८

२२ ) जैसें यजमानाग्नि मर्कट ओढवलें । आश्रित पळती दशदिशा ॥ २२, १२१

२३ ) वीरास कदीं दिटवूं नये ॥ ह. वि. २४, ९०

२४ ) जेथ वसे थोर वरत । तेथें न प्रार्थितां येती अनर्थ॥ह.वि.२४

२५ ) मननावीण श्रवण करी । जैसी का पालथी घागरी ।
पर्जन्यात ठेविली जन्मवरी । परि अतरीं बिंदु न जाये॥ ह.वि. २५, १८७

२६ ) संग्रामाच्या गोष्टी ऐकिंज कानीं ॥ ह. वि. २६, १३७
( युद्धस्य वार्ता रम्या )

२७ ) कामधेनु आलि मंदिरीं । ते मूर्खें पिटून घातली बाहेरी ॥ ह. वि. ३०, २०

२८ ) त्या दुग्ध रक्षावया माजर । पाठविले शाहणीनें ॥ ह. वि. ३०, ४०

२९ ) दर्दुर कमळाजवळी बैसोन । सुवास नेणोनि चिखली लोळे ॥ ह. वि. ३०,९३

३० ) पायावरी घालूनी पाषाण । मोडिले जैसे आपुले चरण ।
कीं आपुलें छेदूनिया घ्राण । वैरियांसि केला अपशकून ॥ ह. वि. ३०, १२०–१२१

३१ ) शाहाणपण वाहावले ॥ ह. वि. ३०, १२७

३२ ) जैसें देवाचें शिखर पाडून । पोवळीं भोंवतीं रचियेलीं ॥ ह. वि. ३०,१३०

३३ ) वसतें मोडूनिया सदन । माडव पुढें घातला॥ह.वि.३०,१३१

३४ ) मशक गगनाची उंची मोजील का ?

३५ ) गुळावरी बैसती मक्षिका ॥ ह. वि. ३०, १८५

३६ ) जैसा विदेशाहून गावा आला । वेशींत नागविला तस्करीं ॥ ह. वि. ३३, २१७

३७ ) मेटाखुटी येऊनिया ॥ ह. वि. १०, ९५

३८ ) सर्वांच्या मुखास खरसी ( फेंस ) आली । ह. वि. १०, ९७

## ९ वर्णनें

येथवर कवीने प्रत्यक्ष उल्लेखिलेल्या काव्याच्या काहीं अगांचा विचार केला. आता राहिलेल्या काहीं अगांचा विचार करू. यांत वर्णनास अग्रस्थान दिलें पाहिजे. कारण निरनिराळीं वर्णनें करण्यातच कवीच्या प्रतिभेस खरा अवसर मिळत असतो. इतकेच नव्हे, तर वर्णनचातुर्यच कवीच्या कल्पनाविलासाचा निकष ठरत असतो.

'हरिविजया'त अनेक प्रकारचीं सुन्दर व चित्ताकर्षक वर्णनें जागांजागीं आलीं आहेत. त्याचा विशेष हा कीं, तीं बहुशः लाबलचक कटाळवाणी नसून थोडक्यात पण उठावदार झालीं आहेत काहींचा नामनिर्देश येथें करून उत्तम वर्णनाची थोडीशीं उदाहरणें 'शेवटीं' दिलीं आहेत.

१सृष्टिवर्णनें:–[७३] अरुणोदयाचें वर्णन " कीं पूर्व दिशेने मुख धुतलें । निढळीं कुंकुम रेखिलें ।।" व सूर्यास्ताचें[७४]वर्णन फारच रम्य झाले

---

७३ ह. वि. ७,७४-७५;७६ ते ७९;अ.११, २१० ते २१२

७४ अस्ताचळां जाता वासरमाणि । द्विज बैसती स्थळीं येउनी ।। मिलिंद वारिजकोशीं प्रवेशूनी । आमोदाते सेविती ॥ ह. वि. ११,१८८

आहे.पण नन्तरचें रात्रीचें व द्वादश गावें जाळणाऱ्या अग्नीचे वर्णन तितकेच भयानक झालें आहे.त्याच्या पुढील गोवर्धनोद्धरणातील प्रळय-पर्जन्याचे वर्णनही असेंच भयंकर पण फार जोरदार झालें आहे.[७५] दह्याव्यांत वनविहार, सवगड्यांच्या क्रीडा व वनवर्णन हीं सर्व फार झोकदार झालीं आहेत. तीं सविस्तर व चारकाव्याचीं असल्यामुळे वामनपंडिताच्या 'वनसुधा' व 'वेणुसुधे'हूनही अधिक गोड वाटतात.

(२) युद्धवर्णनें — हीं वर्णनें तर अनेक आहेत.वीररसवर्णनांत त्याचा उल्लेख आलाच आहे तीं 'मुक्तेश्वरी'थाटाचीं असून त्यात रथाचा खडखडाट, शस्त्राचा खणखणाट, अस्त्राचा चमचमाट, तोफाचे दणदणाट व धनुष्याचा झणझणाट आपल्या समक्ष होत आहेत कीं काय असें वाटतें त्याचप्रमाणें हातोफळी भिडणारे कृष्ण—चाणूर, भुजावर भुजा आदळणारे, करचरण-ग्रीवा पिळणारे व मुष्टिप्रहाराने सप्तपाताळे दणाणून टाकणारे बळराम-मुष्टिक मल्लयुद्धात मिसळलेले पाहून वाचक भयचकित होतो व त्यास पक्वफणसासारखे किंवा तुंबीफळासारखे आपटून छिन्नभिन्न केल्याचे जेव्हा तो वाचतो तेव्हा रणांगण टाकून नगरदुर्गावरून उड्या घेऊन जीव वांचविण्यासाठीं पळून जाणाऱ्या इतर मल्लाबरोबर आपणही ग्रंथ टाकून जावें कीं काय असें क्षणभर त्यास वाटतें.

(३) रूपस्वभाववर्णनें:— गणपति, श्रीकृष्ण, बलराम नारद, अर्जुन अशा पुरुषाच्या वर्णनांबरोबर सरस्वती, राधा, रुक्मिणी, सत्यभामा द्रौपदी, पूतना, कुब्जा व जांबुवन्ती वगैरेचीं वर्णनें सविस्तर व फार मार्मिक आहेत.प्रथमतः गणपतीचे वर्णन अत्यन्त कल्पनारम्य झालें आहे.ज्ञानेश्वरींतील

---

७५ ह. वि. १२, ४३-४९

'गणपती' सहा भुजांचा तर येथील अष्टभुजांचा. रूपाप्रमाणे दोन्ही वर्णनेही अगदीं भिन्न आहेत. येथील वर्णनांत गूढ रूपक नसल्यामुळें तें अधिक सोज्वळ, सुबोध व सुन्दर झाले आहे त्याचे शुभ्र वस्त्र व नृत्य कसें आहे पहा. —

दुग्धसमुद्रीं ओपिलें । कीं निर्दोष यश आकारलें ।
तैसें शुभ्र वस्त्र परिधान केलें । ध्यानीं मिरविलें भक्तांच्या ॥[७६]
धिमकिटी धिमकिटी कथा विचित्र । राग गौलता संगीतशास्त्र ।
नृत्यकळा देखोनि देवाचे नेत्र । पातीं हालवूं विसरले[७७] ॥

असे अपूर्व नृत्यकौतुक पाहून सुरासुरही तन्मय झाले तर त्याने वाचकही मोहून जावे यात नवल काय ? त्यानन्तरचे श्रीकृष्णाच्या जन्मकाळच्या अष्टवर्षाच्या मूर्तींचे वर्णनही असेच आकर्षक झालें आहे. पण हीं सर्व दैवी आहेत. पाचव्या अध्यायातील चिखलात रांगणाऱ्या, बाळलेण्यानीं शोभणाऱ्या, मंद मंद चालणाऱ्या व हळूं हळू नाचणाऱ्या बाळकृष्णाचें, व गाई राखायला जाणाऱ्या चिमण्या कृष्णाचें, त्याच्या चिमण्या वेषभूषेचें व त्याच्या चिमण्या सवंगड्याचे अध्याय नऊ मधलें वर्णन व पुढे भीमकीला मोहून टाकणारें तरुण कृष्णाचे सुदेवकृत वर्णन ( अध्याय तेवीस ) हीं सर्व नितान्त मधुर झालीं आहेत. स्त्रियांचीं रूपवर्णनेहीं अशींच आकर्षक झालीं आहेत.त्यात विशेष हा कीं,तीं तीं वर्णनें त्या त्या स्त्रियांच्या स्वभावानुरूप झालीं आहेत. रुक्मिणी, द्रौपदीच्या वर्णनात सत्त्वगुण, भामेच्यात राजस, राधेच्यांत अनन्यभक्ति तर पूतनेच्यांत तामस अशा गुणाचें प्रतिबिंब त्यांत आपणास पहावयास सापडतें. उलट कुब्जेचे

---

७६ ह. वि. १,८ ; ७७ ह. वि. १,१३

कुरूपवर्णनही तिच्या भाबड्या प्रेमामुळे वाचावेसे वाटतें. हीं वर्णनें किती मरैस उतरलीं आहेत हें शेवटीं दिलेल्या उताऱ्यावरून समजेल.

स्वभाववर्णनेंही श्रीधराने ठिकठिकाणीं मोठ्या मार्मिकतेनें केलीं आहेत उदाहरणार्थ, कळलाव्या नारदाचे वर्णन पहा[७८]:-

जैसा मंदिरा लाऊन अग्न । आपणचि विझवी धाऊन ।
कीं पुरी दिधलें लोटून । तें आपणचि काढिलें ॥
जेणें विष पाजिलें दुर्धर । तोचि करूं धावे उतार ।
आपणचि पाठविले तस्कर । धावणें काढिलें आपणाचि ॥
तैसी नारदें लाऊनि कळी । सर्वेचि दोघे सोडविली ।
कंस सभेसि तात्काळीं । येऊनिया बैसला ॥

त्याचप्रमाणें कंसाचा संशयी,स्वार्थी,क्रूर व रागीट स्वभाव,बलरामाचा सरळ पण उतावीळ आणि क्रोधी स्वभाव,कृष्णाचा शान्त युक्तिबाज व शूर स्वभाव, मागधाचा रागीट, अविचारी पण सत्यनिष्ठ स्वभाव, वगैरे अनेक व्यक्तिचित्रे श्रीधराने स्पष्टपणे रेखाटलीं आहेत. त्याचप्रमाणे यशोदा, देवकी, सत्यभामा, रुक्मिणी, राधा, द्रौपदी आणि सुभद्रा यांच्या स्वभावातील भिन्न छटाही त्यानें चांगल्या तऱ्हेने रंगविल्या आहेत.

( ४ ) सामान्यवर्णनें:—स्थलवर्णनात क्षीराब्धिवर्णन,[७९] गोकुळ,

---

७८ ह. वि. १४, १६१–१६३, ७९ ह. वि. २, १३–३१
अनंत ब्रह्मांडाच्या स्थिती गती । रेखिल्या अनंत मूर्ति अनंत शक्ती ॥
त्या मंडपाची पाहतां स्थिती । चंद्रसूर्य खद्योतवत ॥ह.वि. २, २५

मथुरा, द्वारका,[८०] मयसभा[८१] इत्यादि वर्णने येतात यांत क्षीरसागरातील सभामंडपाचें वर्णन व मयसभावर्णन हीं मुळाप्रमाणें अद्भुत कल्पनाविलासाची उत्तम उदाहरणें होत. मयसभावर्णन हें पहिल्याची सुधारून केलेली विस्तृत आवृत्ति होय द्वारकेच्या वर्णनातील थाट जवळ जवळ वरच्या सारखाच असला तरी अद्‌भुततेंत वास्तवतेचें मिश्रणही योग्य प्रकारे झालें असल्यामुळे ते अधिक जवळचे वाटतें. अर्थात् त्यातही अतिशयोक्ति पुष्कळ आहेच. पण या सर्वांपेक्षा उद्धव गोकुळास गेला त्यावेळचें गोकुळवर्णन अत्यन्त सरस व गोड झाले आहे.[८२] विशेषतः वाटेंत परतताना भेटलेले कृष्णाचे गुराखी सवगडी, तदनन्तर प्रातःकाळीं त्यास दिसलेलें गोकूळ व तेथील दिनचर्या याचीं वर्णनें फारच हृदयंगम झालेली आहेत मथुरेच्या बाजारात गौळणी गोरस विक्रीला जात त्यावेळचे वर्णन फारच चागलें झालें आहे.

मथुरेत श्रीकृष्ण गेला त्यावेळचे दर्शनोत्सुक पौरस्त्रियांचें वर्णन फारच बहारीचें झालें आहे.[८३] एकजण हातातला घास तोंडात न घालताच कृष्णदर्शनास धावली; तर दुसरी चोखणी लावून न्हात असता नग्नच बाहेर आली; तिसरीनें अनवट, जोडवीं व पोल्हारें कानीं बाधली आणि

---

८० ह. वि. २९, ६२–९० ; ८१ ह वि. ३४, ११३–१६०
एसें ते द्वारकानगर । सर्व लक्षणयुक्त सुदर ॥
श्रीकृष्ण सभेचे मणिमय द्वार । पावला विप्र तेथवरी ॥ह वि.२९,९०
त्रिभुवन सौंदर्य एकवटले । तें मयसभेवरी ओतिले ॥
तें सभास्थळ जेणें विलोकिलें । तेणें देखिलें ब्रह्मांड॥ह वि ३४-१५१
स्वर्ग मृत्यु पाताळ शोधिता । ऐसी सभा नाहीं तत्त्वता ॥
धन्य तो मयासुर निर्मिता । विरिंचि अंश सत्य पैं ॥ह वि ३४,१५६
८२ ह. वि. २१,१३३–१४६ ८३ ह. वि. १९, ६१–७९

कर्णाटकें पायीं व कटीं नेपुरे घातलीं, चौथीनें काजळ मुखास व कुंकुम डोळ्यात घातलें; पाचवीने आपले बालक ठेवले शिंक्यावर व घागर घेतली कडेवर, मदनमनोहर मेघश्याम पाहून असा गोपींस भ्रम झाला. हें वर्णन बरेच पाल्हाळाचें व गमतीचें आहे खरें; परन्तु शेवटीं षट्चक्रें, भक्तीचा चौवारा, ध्यानाचें गवाक्ष, लयलक्षाचे जालंधर व प्रेमशिडी वगैरे यौगिक साधनाचा अवलंब कृष्णदर्शनार्थ काहीं स्त्रियानीं केल्याचे सागितल्यामुळें कवीच्या हातून या सर्व मजेवर पाणी पडलें असे वाटते. यात 'अज'राजाच्या मिरवणुकीच्या वर्णनाचें पुसट पण अतिशयोक्तिपणें प्रतिबिंब दिसतें तरी त्यात 'नागेशा'चा अचरटपणा नाहीं. यानन्तरचे जरासन्धाच्या सैन्याचें व त्यास मुकाबला देणाऱ्या कृष्णसैन्याचे वर्णन फारच गंभीर व थाटाचे झालें आहे.[८४]

जैसा शक्रावरी वृत्रासुर । निघाला सहित दळभार ।
तैसा जरासंध प्रचंडवीर । मथुरेसमीप पातला[८५]॥
तर दुसरीकडे:-"उघडिलें मथुरेचे महाद्वार। सिंहनादें गर्जती अपार॥
यादव निघाले बाहेर । रामकृष्णासमवेत पै"[८६] ॥

असे वर्णन कवीने केलेलें आहे यापुढे श्रीकृष्ण सहकुटुंब सहपरिवारेंशीं यागार्थ इंद्रप्रस्थास आले त्या स्वारीचे वर्णन बादशाही थाटाचें झालें आहे.[८७] हे वर्णन–प्रकरण अन्नवर्णनाच्या शेवटच्या गोड घासानें पुरे करू[८८]:—

८४ ह. वि. २२, ९४–१००; ८५ ह. वि. २२, ६६
८६ ह वि. २२, ९०, ८७ ह. वि. ३३, १०७-१२०
८८ ह. वि ३४, ७-११

जेथें पुरविता भगवान । तें मी काय वर्णूं दिव्य अन्न ।
त्या अन्नाच्या सुवासें करून । सुरगण लाळ घोंटिती ॥
त्या अन्नसुवासा वेधोन । वसत करी भोंवतीं प्रदक्षिण ।
नित्य जेविती ऋषिगण । परी वीट न ये सर्वथा ॥
जैसा सोमकांताचा अचळ । तैसा भात शुभ्र निर्मळ ।
जैसा सुवर्णभाग पीत निखिळ । तैसें वरान्न पाडियेलें ॥
अमृतास आणिती उणें । ऐसीं पंचभक्ष्यें परमान्नें ।
विप्र जेविती नामस्मरणे । वारवार गर्जती ॥
दधि–मधु–दुग्ध–घृत–सरोवर । शाखासुवासें भरित अंबर ।
जेथें पुरविता इंदिरावर । तेथींची गोडी काय वर्णूं ॥

## १० विद्वत्ता व तत्त्वज्ञान

कोणत्याही ग्रंथाची अक्षर वाङ्मयात गणना होण्यास त्या ग्रंथात कवीला आपल्या काव्यविलासाला आपल्या विद्वत्तेची व बहुश्रुततेची जोड द्यावी लागते. त्याचप्रमाणें आपल्या तत्त्वप्रतिपादनानें जीवनाचें ध्येयही वाचकापुढे मांडावें लागतें. श्रीधराच्या विद्वत्तेची व बहुश्रुततेची ओळख मागील प्रकरणांतील दिलेल्या त्याच्या ग्रंथमालेवरून झालीच असेल. आता 'हरिविजया'त त्यापैकीं कोणकोणत्या ग्रंथाचा उपयोग त्यानें केलेला आढळतो हें पाहू:—

पहिल्या अध्यायात वसिष्ठमुनीनें रामास उपदेशिलेलें छत्तीस हजार श्लोकाचें 'बृहद्वासिष्ठ' म्हणजेच 'योगवासिष्ठ' या ग्रंथाचा उल्लेख आला आहे.[८९] पुढें कृष्णाचें सर्वव्यापकत्व सांगताना अनेक दृष्टान्त देऊन[९०]:—

नाना घटाचे आकार । परि मृत्तिका येकाचि ॥

८९ ह. वि. १, १००    ९० ह. वि. ४, १३६

हा औपनिषदिक सुप्रसिद्ध दृष्टान्त दिला आहे. रासक्रीडेंत गोपीगर्वहरणार्थ कृष्ण गुप्त झाला व तो त्याना सापडेना याचें कारण सागताना कवीनें साकेतिक सख्याशब्दांनीं प्रकृति--पुरुष, त्रिगुण, पञ्चमहाभूतें, पंचवसि तत्त्वे, चार वेद, षट्शास्त्रे, अठरा पुराणें, अठरा उपपुराणें, चौदा विद्या, चौसष्ट कला, हठयोगाचे निरनिराळे प्रकार, अष्टाग योग वगैरेनीही परमात्मा सापडत नाहीं तर त्याना काय मापडणार असें सागितले आहे.[११] पुढें अध्याय एकवीसमध्यें नमनांत ब्रह्मस्वरूप वर्णिताना ' सच्चिदानन्द ' शब्द व ' अस्ति ' ' भाति ' ' प्रियरूप ' ही त्रिपुटीही अलीकडे राहते, खरें ब्रह्म त्यापलीकडे आहे असें म्हटलें आहे त्यानन्तर त्याच अध्यायात उद्धवाने गोपींस जो उपदेश केला त्यात वेदान्ततत्त्वज्ञानाचें सार आले आहे. पुढे अध्याय सत्तावीसमध्यें कृष्णास्त्रियापैकीं प्रत्येक जण आपणच पतीची लाडकी कशी आहो हे सिद्ध करण्यास दुसरीस कशी उडवीत होती हें नानाशास्त्राच्या उदाहरणानें दाखविलें आहे उदाहरणार्थ, मीमासक कर्म स्थापितात तर दुसरे उपासना. एक योग तर दुसरे योग. एक न्यायास प्रामुख्य देतात तर दुसरे पातजलाशिवाय साधन नाहीं असे प्रतिपादितात. शेवटीं नानाशास्त्रात जसा वेदान्त मान्य तसे रुक्मिणीचे बोलणें सर्वास मान्य झालें, कारण तिनें अद्वैत ज्ञान सागितले. निरनिराळ्या विषयाच्या प्रतिपादनात पुष्टिकरणार्थ त्यानें अनेक न्यायांचा उल्लेख केला आहे.पुढे काहीं दिले आहेतः-

अध्याय बारा :— १–३ दारुकायत्रन्याय; कनककटकन्याय; लोहखड्गन्याय.

---

११ ह. वि. १७, ११७–१२९

अध्याय एकवीसः — चकोरचंद्रन्याय, चातकजलदन्याय, धेनुवत्सन्याय, बिंबप्रतिबिंबन्याय.

अध्याय एकोणीसः — भृंगकीटकन्याय.

अशा रीतीने काहीं अध्यायाच्या प्रारंभीं व काहींच्या मध्यभागीं श्रीधराने जरी वेदान्तज्ञानाचें तुरळक वर्णन केलें असलें तरी त्याचें पूर्ण स्वरूप सांदीपनीनें कृष्णास जो उपदेश केला त्यांत आपणास पहावयास मिळतें. परमार्थसाधनात पहिली पायरी गुरूस शरण जाणे ही आहे असे म्हणून सांदीपनीनें सद्गुरु व सद्शिष्याचीं तशींच भोंदू गुरु व असत् शिष्य यांचीं लक्षणें विस्तारशः सांगितलीं आहेत. पुढे ज्ञान सांगितलें आहे त्याचा सारांश असाः—

परम पुरुष सुखी असतां 'अहं ब्रह्मास्मि' असा ध्वनि उठला. हेंच स्फुरण. या ध्वनीलाच 'प्रकृति' म्हणतात. तिच्या पोटीं गुणक्षोभिणी इच्छा-शक्ति झाली. तिनें सृष्टि करावी असा अहंकार धरल्यामुळें पुरुषसत्तेने तिच्यापासून त्रिविध अहंकार झाला. सात्विक अहंकारापासून ज्ञानशक्ति, राजसापासून क्रियाशक्ति, व तमसापासून द्रव्यशक्ति झाली. या शेवटली पासून पंचविषयाच्या तन्मात्रा झाल्या. रजोगुणापासून ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये व प्राणपंचक झालें. ज्ञानशक्तिपासून अंतःकरणपंचक झाले अशीं हीं पांच पंचकें परस्परानुप्रवेशें मिसळलीं. परमपुरुषाने त्यांचे दोन भाग केले. उत्तम भाग हिरण्यगर्भ (सूत्रात्मा) व असार भागापासून पिंडब्रह्मांडरचना त्यानें केली. ती असंख्य झाली. या प्रपंचवृक्षावर जीव व शिव हे दोन पक्षी बसले. शिव पूर्णज्ञानी सर्वसाक्षी, जीवाचें लक्ष विषयाकडे तेणें तो भ्रमला व चौऱ्यांयशी लक्ष योनी हिंडतां हिंडतां श्रमला. त्याची त्यांतून सुटका ईशभक्तीनें होते.

यानन्तर सान्दीपनींनी हे सगुणावतारी श्रीकृष्णा ! सर्वांतात व सर्वश्रेष्ठ कसा आहेस हें वेदान्तातील परिभाषेच्या द्वारे त्यास सांगितलें आहे. त्यांत श्रीधराचें अध्यात्मशास्त्राचें गाढ व परिपूर्ण ज्ञान स्पष्टपणे दिसून येते, व वदान्तशास्त्रातील गहन तत्त्वाचे प्रतिपादन तो किती सुबोधपणें व सहजरीतीने करतो याची आपणास खात्री पटते. या प्रतिपादनाचा सारांश असा:—

हे हरि तू ' स्थूल, ' ' लिंग ' ' कारण, ' ' महाकारण,' 'विराट, ' ' हिरण्यगर्भ ' याचा चालक असून ' महत्तत्त्व ' व ' माया ' याहून तुझें स्वरूप भिन्न आहे चार अवस्था व सर्गस्थितिप्रलयसाक्षिणी माया याहून तू निराळा. विश्व, तैजस, प्राज्ञ व प्रत्यगात्मा याहून तू वेगळा. ओंकाराहूनही तू निर्विकार. त्रिगुण व शुद्ध सत्त्वगुण यापलीकडला तू सच्चिदानन्द आहेस तू चहू वाचातीत. चार खाणीहून वेगळा. चार निद्राहून वेगळा. स्थूल प्रविविक्त,स्वरूपभान,स्वरूपानन्दादि भोगाहून वेगळा,चार मुक्तींहून वेगळा. भेदत्रयातीत जहल्लक्षण. अजहल्लक्षण, जहदजहल्लक्षण, त्याहून तू निर्वाण स्वरूप, द्वैत, अद्वैत, महाद्वैत, पंचमहाभूते. याच्या पलीकडला तू पूर्णब्रह्म, तू पंचविषयाहून वेगळा; प्राण, अपान, व्यान, समान व उदान हा प्राणमय कोश, वाचा, पाणि, पाद, शिश्न, गुद, मनसहित मनोमय कोश, श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा,घ्राण, बुद्धिसहित विज्ञानमयकोश; सर्वांचें जे का कारण अविद्या हा आनन्दमयकोश, यांहून तू भिन्न आहेस; त्याग, अत्याग, त्यागात्याग याहून परता तू सारभाग; साकार, साभास, आभास, निराभास याहून तू परता, नित्य ( निद्रा ), नैमित्तिक, महाप्रलय (मरण),आणि आत्यन्तिक प्रलय व पांचवा ज्ञानमय याहून वेगळा, जायते अस्ति इत्यादि षड्विकाररहित, मग सृष्टिसंहार वर्णून तूं त्यापरता असें म्हटलें

आहे सहार [ पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश ] नभास तमोगुण ग्रासील, तें रजात, तें सत्त्वीं मिळेल; सत्त्व महत्‌तत्त्वात, महत् मूळ मायेत. मूळ माया पुरुषात, माया तो ध्वनि. तो स्वरूपीं लीन होता जे निर्विकार स्वरूप तेंच तू.

यावरून श्रीधर गाढा पंडित होता हे सहज ध्यानीं येईल. परमेश्वर-प्राप्तीचे अनेकविध मार्ग व त्यातील वैगुण्यें सागून नवविधाभक्तीचा व त्यातल्यात्यात नाममहात्म्याचा त्याने पुरस्कार केला आहे सगुणाकडून निर्गुणाकडे जाणे हें तो इष्ट समजतो. पण सगुण-भक्तींत शैव, वैष्णव, सौर, गाणपत्य, शाक्त अशा पथाभिमान्याच्या आहारीं न जातां परमात्म्यास एकत्त्वानें भजावें असे तो सागतो. क्षुद्र देवदेवताच्या भजनीं लागण तर तो निंद्य समजतो. पण एकनिष्ठ भक्ती झाली तरी शेवटीं 'ज्ञानादेव तु कैवल्य' हाच सिद्धान्त त्यास अभिप्रेत आहे.

आता श्रीधराच्या इतर कलाशास्त्रविषयक उल्लेखाकडे वळू.

१ ) फलज्योतिषः— (अ) बारशाचे समयीं गर्गमुनींनीं कृष्णाचे डोळे, तोंड व हात पाहून जातक केलें; व पुढील कृष्णचरित्राचे सर्व भविष्य वर्तविलें.[१२]

(ब) महाबळ ब्राह्मण नावाच्या सोंगाड्या ज्योतिषानें पंचाग उकलून कृष्णाचे भविष्य वर्तविलें मूळ नक्षत्रीं जन्मलेले हे मूल सर्वांना नाश करील त्यास टाकून द्या असे तो सागतो.[१३]

---

१२ ह. वि. ४, ४३-६३ ; १३ ह. वि. ४,१२४-१४१

(क) षष्ठी, नवमी, भद्रा, व्यतीपात, वैधृती कल्याणी हे कुयोग आहेत.[१४]

( ड ) कृष्णदानास मुहूर्तः – पुष्यार्क योग उत्तम बहूत[१५]

२ ) सामुद्रिकः—कृष्णाच्या पायावर पुढील सामुद्रिक चिन्हे होतीं त्याची फलें-चिन्हें:–वज्र, ध्वज, पद्म, अंकुश, उर्ध्वरेखा, चक्र हीं सामुद्रिक चिन्हे कृष्णाच्या पायावर होतीं. त्याचा अर्थ.—

१ ) साधकास उर्ध्वरेखा उर्ध्व मार्ग दाखविते.

२ ) विद्या मदोन्मत्तास आकर्षावयास अंकुश.

३ ) पद्मा वसते म्हणून पायीं पद्म धरिलें.

४ ) अहंकार पर्वत फोडण्यास वज्रधारण.

५ ) जडजीवाचे पापच्छेदनार्थ चक्रधारण.

६ ) भक्त तारावया भक्तिध्वज.[१६]

याचीच पुनरुक्ति पुढें अध्याय तेवीस, अडतीस व चेचाळीसमध्ये आली आहे.

३ ) वास्तु व शिल्पकला —क्षीरसमुद्रातील सभामंडपवर्णनात व मयसभावर्णनात याचें ज्ञान दिसतें तोळंबे, त्यावर खांब; उथाळीं; तुळवटे; सरळ दांडे वर किळच्या; कळाकुसरीने जोडलेल्या; चुन्यानें बसविलेल्या, शिखरावरचा कळस,मदलसावर मुक्तांचे राजहंस; रत्नपुतळ्या फिरत्या गात्या, अष्टकोनावर ध्वज, चतुष्कोण; सोपाने चार बाजूस.[१७]

---

१४ ह. वि. १८ १-३ , १५ ह. वि. ३०,१०५

१६ ह. वि. ३,१३०-१३७ , १७ ह. वि. २, १७–२६

मयसभा:–[९८] तळीं आठ आय साधले होते पायात अष्टदिक्पाळ मूर्ति टांगिलेल्या होत्या. मरगजी पाषाणावर हत्ती, पक्षी जडवले, वर मंडप रचला होता त्याकी वरील प्रसंग सुंदर, चौकटी अंगण मरगज पाषाणाच्याबरती पक्षांचित्रे, मदलसावर मोत्याचे मराळ त्यांचे तोंडात विद्रुम घोंस, नीळ रत्नाचे मयूर, त्याचे तोंडी जांबुळे, बोलत शुक, मयूर नाचणारे, पुतळ्या बोलणाऱ्या, एकावर एक शतखण होते, भिंतीवर रत्नजडित पुतळे.

शतखणी दामोदर विशाळें । वाटे आकाशासी टेकण दिधले ॥
कीं मित्ररथ अडखळे । निराळ पंथ क्रमिता हो॥[९९]

४) वैद्यक —नवज्वरिता दुग्ध साधी । मरण आणी तात्काळ[१००] ॥

उद्धव वैद्य परम सत्यज । अर्धमात्रा दिधली रसराज ।
संशयरोग निरसोन तेज पुंज । सर्व गोपिका त्या केल्या[१०१]॥

कीं बचनाग मुखीं घालिता । जिव्हेसी गोड लागे खाता ।
मग सर्वेचि मृत्यु व्यथा । प्राप्त करी तात्काळ[१०२]

५) नृत्यगायनकला:—प्रथारंभींच गणपतीचें नृत्य, ताल धरणारे देव वर्णिले आहेत:—

धिमकिटी धिमकिटी कथा विचित्र । राग गौलता संगीतशास्त्र ॥
नृत्यकळा देखोनि दवाचे नेत्र । पातीं हालवू विसरले [१०३] ॥

---

९८ ह. वि. ३४, १४२–१५८ ; ९९ ह. वि. २९, ७२
१०० ह. वि. ९, ७; १०१ ह वि २१, २६७
१०२ ह. वि १८, ३०; १०३ ह. वि. १, १३

जाम्बुवन्ती विवाहानन्तर अस्वलाकडून नारदाचा गायनगर्व कृष्णानें हरविला. त्रिमण्या अस्वलानें वीणा हातीं घेऊन स्वराचा थाट बसविला. मग त्यानें साही राग, छत्तीस भार्या, चौसष्ठ मूर्च्छना दाखवून अनेक उपरागाच्या क्रिया गाइल्या. गीतप्रबन्धाबरोबर नृत्यकलाही दाखवली. नन्तर साबडें सप्रेम गायन केलें. तें ऐकून कृष्ण-नारद तोषले गायनानें शिळाही विरल्या नारद गायला पण त्या विरल्या नाहींत तो हतगर्व झाला.[१०४] नाटक, नाटकी, स्त्रीवेषधारीनट, तमाशा इत्यादींचेही उल्लेख आहेत. कल्याण, गौडी, श्रीराग, वसन्त पावक, पद्मसुरग, नीलांबर, हे राग कृष्णानें मुरलींत वाजविले.[१०५] श्रीधरानें संगीतशास्त्राचा उत्तम अभ्यास केला होता. मागें 'प्रथमालें'त त्याचा उल्लेख आहेच.[१०६]. —

६) शालिहोत्र (अश्वपरीक्षा)[१०७]

श्यामकर्ण— क्षीरसमुद्रजलवत् शुभ्र, डोळे आरक्त, पुच्छें सुन्दर, खूर विद्रुमवर्ण, तिन्हीलोकीं गमन करणारे हे त्याचें लक्षण. काहीं धवळवर्ण, नीळवर्ण, पिंवळे, चपळ, आरबी, माणीक रंगी, कुंकुम केशर-वर्ण, चन्दनवर्ण, चंद्रवर्ण, जंबुद्वीपींचे जांभळे, श्वेतद्वीपींचे श्वेत, क्रौंचद्वीपींचे पिंवळे, चितळे, चित्रांगे, शाल्मलीद्वीपींचे बदीर, प्लक्षद्वीपींचें वर्णवकोर, कुशद्वीपींचें सुन्दर, पुष्करींचे श्यामकर्ण, रागीट कुमाइत, स्थिर चालणारे बदकश्याम, उदकावरून पळणारे आरबी, चित्रविचित्र रंगाचे अश्व नऊ खर्डे, छप्पन्न देशांतून आणले होते.

१०४ ह. वि. २५, ११६–१२७; १०५ ह. वि. १०, ११७
१०६ श्रीधर.च.आणि का., भा. २ अ. ११, पृ. १८५-१८६
१०७ ह. वि. २२, ३६–४६

असो. यावरून कवीची बहुश्रुतता व चतुरस्रता सहज दिसून येते.

नीतिबोध करणें हा काव्याचा प्रत्यक्ष हेतु नसावा पण तो अप्रत्यक्ष येण्यास प्रत्यवाय नाहीं हें सर्वमान्य आहे प्रसंगानुरूप मराठी जुने कवि अशी संधि दवडीत नाहींत. श्रीधरानें आपल्या 'हरिविजया'त या गोष्टीकडे चांगलें लक्ष पुरविलें आहे. कारण हरिगुणलीलावर्णनानें वाचकास परमार्थप्रवण करावयाचे तर त्याला नीतीचा पाया अवश्य आहे या ग्रंथात सुपुत्र, कुपुत्र, पतिव्रता व वाईट स्त्रिया यासंबधीं कवीने चर्चा केली असून सदाचरणाचे ध्येय वाचकापुढें ठेविलें आहे. तें कसे तें पाहूं.

अध्याय सत्तावीसमध्यें रुक्मिणी कृष्णास म्हणते कीं पुत्रविरहित गृह शून्य दिसतें निपुत्रिकाचा संसार व्यर्थ त्यांस परत्रही नाहीं तेव्हा शूर, धर्मशील, पितराची आज्ञा मानून त्याची सेवा करणारा व कीर्तिमान् अशा पुत्राची जननी धन्य होय. इतरा सूकरा, खरी, शुनीसारख्या होत. मातापितरास घालवून देऊन श्वशुरवर्गाचा भर करणारा, स्त्रीलंपट, दुराचारी पुत्र काय कामाचा ! ते पुत्र नसून जन्त होत काहीं माता पितरास अनमान करून मरू देतात. आणि मग मात्र वरवर शोक, गया, वर्जन, पितृतर्पण व श्राद्धीं शतभोजन घालतात असे पुत्र भुईला भार होत. अध्याय तेहतीसमध्ये पुनः कुपुत्रनिंदा वरील प्रमाणेच करून पुढे सामान्य नीति वर्णिली आहे. आणि ती न पाळणारास अधःपतन होते असें सांगितलें आहे त्यात पुढील लोकाची गणना केली आहे:—

साधुनिंदक, ब्राह्मणास अवमानणारा, विद्याभिमानी, वावदूक, भूतद्रोही, जारणमारणक्रियारत, सद्ग्रंथनिंदक, विष्णुनिंदक, शिवनिंदक, सर्वज्ञतेचा टेंभा मिरविणारा, वगैरे, वगैरे.

सुदाम्याच्या पतिव्रता शिरोमणि स्त्रीचें गुणवर्णन करून वाईट स्त्रियाचे दुर्गुण कवीने दाखविले आहेत. व त्याचा त्याग अवश्य करण्याची शिफारस त्याने केली आहे. त्या ह्या:— पतिभाग्यकाली वरवर प्रीति दाखविणाऱ्या, ओढाळ, तोंडाळ, खस्याळ, क्रोधमुखी, दुर्भगा, दुःशीला, पतिनिंदक. कुस्त्रियांची संगती धरणाऱ्या, एकट्याच प्रवासाला जाणाऱ्या, शृंगार करून आरशात सदा रूप पहाणाऱ्या, परपुरुषाशीं एकान्त करणाऱ्या, अंग उघडे टाकणाऱ्या, वगैरे, वगैरे. [१०८] त्याचप्रमाणे गुरुस व ब्राह्मणास मान द्यावा, दान सत्पात्रीं करावें, स्नानसंध्यादि नित्य कर्मे वेळच्यावेळीं करावीं, कुशब्द बोलूं नये वगैरे सदाचरणाचे नियमही वाचकाच्या मनावर ठसतील असा प्रयत्न त्यानें प्रसंगानुरूप केला आहे. यामुळें लोकशिक्षणाचे कार्यही त्यानें साधलें आहे.

## १९ समाजस्थिति

आता या ग्रंथात श्रीधरकालीन समाजस्थितीविषयीं आपणास काय माहिती मिळते ती पाहू. वास्तविक पाहातां नाटककार व कादंबरीकार याप्रमाणे कवीनेंही वर्ण्यविषयाशीं व त्या काळाशीं समरस झालें पाहिजे. आणि जितक्या कमी अधिक प्रमाणात या कामात त्याला यश येते त्या मानानं त्याच्या ग्रंथाची योग्यता कमी अधिक ठरते म्हणूनच कालविपर्यास हा दोष मानला जातो पण वर्तमानकालाचे संस्कार लेखकावर इतके दृढ झालेले असतात कीं, त्यातून पूर्णपणे सुटून जाणें त्यास अशक्य होतें, आणि वर्णनाच्या भरात अजाणपणेच त्याच्याकडून काहीं वर्तमान गोष्टींचा उल्लेख होऊन जातो शेक्सपीअर, कालीदास, एकनाथ, मुक्तेश्वर वगैरे थोर कवींच्या

१०८ ह. वि २९, १६-२५

ग्रंथातूनही असे दोष आढळतात. अनेक वेळा हा दोष गुणरूपही होतो कारण त्यायोगें काहीं अप्रकट गोष्टींवर प्रकाश पडतो. श्रीधराच्या ग्रंथातही अशा काहीं गोष्टी आपणास पहावयास मिळतात.

( अ ) संस्कारः — प्रथमतः गोकुळात कृष्णजन्मसमयी जातकर्म किंवा पुत्रावणाचा विधि आपणास पहावयास सापडतो. रोहिणीने व गवळणींनीं यशोदेचें आनन्दानें अभिनन्दन केलें. मांडव घातले. ब्राम्हण, उपाध्याय व इतर इष्टमित्र जमले. वाद्याचा गजर सुरू झाला. नंद मंगलस्नान करून पुत्र वदन पहाण्यास गेला. गर्गाचार्यादि ब्राम्हणानीं पुण्याहवाचन केलें व नंदानें कृष्णाचें तोंडात मधुबिंदु घातला. नन्तर नंदानें पुष्कळ दानधर्म केला. गोपगोपींनींही नंदयशोदेस आहेर केले, हळदीकुंकू दिलें. मग तेराव्या दिवशीं पाळण्यात घालण्याचाही असाच मोठा समारंभ झाला. गोपींनी यशोदेची ओटी भरली. आहेर दिले. नंदानेही गर्गमुनीस वस्त्राभरणीं गौरविलें. कंसवध कृष्णानें अठराव्या वर्षी केला. कंसवधानन्तर कृष्णाचें मौंजीबन्धन झालें.[१०९] व तो बलराम, सुदामा यासह गुरु सांदीपनीकडे विद्याभ्यासास गेला तेथे त्यानें चौसष्ट दिवसात सर्व शास्त्र व विद्या यांचे अध्ययन केलें. विशेषतः ' अध्यात्मविद्या विद्यानाम् ' ही तो गुरुमुखाने पढला. जाताना गुरुदक्षिणा म्हणून मृतपुत्र गुरूस पुनः जिवन्त करून आणून दिला. यातील अद्‌भुत

१०९ ' गर्भादेकादशे राज्ञः ' या वचनाच्या विरुद्ध हे दिसतें. याज्ञवल्क्यस्मृतिप्रमाणें:—

आषोडशादाद्वाविंशाच्चतुर्विंशाच्च वत्सरात्
ब्रह्मक्षत्रविशां काल औपनायनिकः परः ॥ ३७ ॥
अत ऊर्ध्वं पतन्त्येते सर्वधर्मबहिष्कृताः ।
सावित्रीपतिता व्रात्या व्रात्यस्तोमादृते क्रतोः ॥ ३८ ॥

गोष्टी सोडल्या तरी गुरुगृहीं राहून विद्याभ्यास करणें व यथाशक्ति त्यास दक्षिणा देणें ही पद्धति श्रीधराच्या काळींही सुरू असावी. पण ' स्नान-संध्यादि भोजन सारून राम आणि चक्रपाणी अक्रूराबरोबर जाण्यास सिद्ध झाले' असें वर्णन श्रीधरानें केलें आहे.[110] तेव्हा मौंजीबन्धनापूर्वी[111] संध्या कशी केली याचे आश्चर्य वाटते ! आणि नदगौळ्याला त्रैवर्णिकाचे नित्य कर्मांचे अधिकार कसे याचें आश्चर्य वाटतें. मागें ' रुक्मिणी–स्वैंवर ' स्फुट प्रकरण ' यात लग्नसोहळ्यातील बहुतेक चाली आल्या आहेत.[112] येथें ज्या अधिक वाटल्या तेवढ्याचाच निर्देश केला आहे. यांत व मागेंही सीमान्तपूजनाचा उल्लेख नाहीं, पण त्याचा उल्लेख वसुदेवाच्या लग्नात आला आहे. रुखवत झाल्यावर वरास आणण्याचा प्रघात कोंकणस्थांत आहे. पण येथे श्रीधराने देवकस्थापना, उष्टी हळद, रुखवत, तेलफळ, वधूपूजन आणि नन्तर वरास आणणें असा क्रम दिला आहे. तेव्हा वाङ्-निश्चयापूर्वी ओलें रुखवत नेण्याची जी चाल अजून देशस्थात आहे तिचा निर्देश येथें श्रीधरानें केला असावा असे वाटते. उच्छिष्ट पात्रात अगठी टाकण्याची व ती सासूनें घेऊन नवरीस देण्याची चालही आढळत नाहीं. त्या ऐवजीं रुखवताच्या वेळीं नवरा पानाखालीं रुपाया ( किंवा अधिक ) ठेवतो व तो सासू घेते. हातपाण्याची अगठी वधुवरें वरातीच्या समयीं

११० ह. वि. १८, ८४

१११ "ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य याच्या उपनयनाचा अधिकाधिक काल अनुक्रमें सोळा, बावीस व चोवीस वर्षें सागितला आहे. नन्तर ते पतित होतात, व्रात्य होतात. त्याचें व्रात्यस्तोमानें व्रात्यत्व जाते".'ज्ञानेश्वरदर्शन' भाग १,पृ.३५

११२ श्रीधर च. आणि का. भा. २ प्र. ११ पृ.१४८–१५१

गौरीहरपूजन करतात तेव्हा देण्याची चाल अजून कोंकणस्थांत आहे.

कंकणबन्धनाच्या वेळीं वधूवराच्या पदरास गाठ मारण्याची व बहुल्यावर होणाऱ्या हळदीउटण्याचे वेळीं जे त्याचे अनेक खेळ होतात त्यांत वरानें वधूच्या चोळीची गाठ डाव्या हाताने सोडण्याची अशा या दोन चालींचा उल्लेख मागे आला नाहीं. पहिली चाल सुप्रसिद्ध असून अजूनही प्रचारात आहे. पण दुसरी ऐकिवात नाहीं. वरास जर ती गाठ सुटली नाहीं तर त्यास वधूच्या पाया पडावें लागते. हा या चालींतला विशेष कोणासही चमत्कारजनक वाटेल. एकनाथानेही या चालीचा उल्लेख केला आहे.

**प्रेतसंस्कारः**--पूतनेच्या व कंसाच्या प्रेतास अग्नि दिल्याचें व कंसाचे उत्तरकर्म संपादल्याचें लिहिलेले आहे. शिशुपालाच्या प्रेतास अग्निसंस्कार दिला, पण उत्तरक्रियेचा उल्लेख नाहीं.

(आ) **लोकभ्रमः**--शुभाशुभशकुन, स्वप्ने, भूतपिशाच्चे व विभूति फुंकून तीं घालविणारे पंचाक्षरी होते.[११३] गणेशचतुर्थीच्या चंद्राचे दर्शन घडल्यास चोरीचा आळ येतो वगैरे समजुती रूढ होत्या.[११४] मुलांना दृष्ट पडू नये म्हणून पायाची माती त्याच्या कपाळास लावणें व मालदोरींत (मंतरलेला) रिठे बांधून तो त्याच्या गळयात बांधणे या चाली होत्या. यांतीं पहिली मात्र अजून चालू आहे. सोंवळ्याओंवळ्याचेही बरेच कडक नियम होते असें दिसते. एकदा यशोदा कृष्णाला दहींभात जेऊं घालीत असतां त्यानें लोणच्याचा हट्ट घेतला, तेव्हा तें सोंवळयात आहे त्याला कसे शिवायचें? असें म्हणून तिनें त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें लोळण घेतलेली पाहून त्या पुत्रवत्सल आईनें सोंवळें विटाळून

११३ ह. वि. ७, ५६ ; ११४ ह. वि २५, १३७–१४८

त्यातील आलें-लिंबू त्यास देऊन त्याचा हट्ट पुरविला. लोणचें सोंवळ्यात ठेवण्याची व त्यास हवें तेव्हा न शिवण्याची चाल जुन्या पिढींतल्या ग्रामवासी स्त्रियात अजून आढळून येते. ग्रहणात तें विटाळू नये म्हणून त्याजवर तुळशीपत्रे घालून त्याचें सुमगलत्व राखण्यास त्या कधीं विसरत नाहींत. आदितवारीं व कोणत्याही दिवशीं रात्रीं माळ्याच्या मोठ्या बरणीं-तून लोणचें न काढण्याची चालही अद्यापि आहे. व तसें केलें असता लोणचें नासतें असा समज आहे. या चालीच्या मुळाशीं स्वच्छता व सुर क्षितपणा ही तत्त्वे आहेत हे उघड आहे. पण ब्राह्मण जातींतच असलेली आपल्या वेळची ही चाल श्रीधरानें गवळ्यात असल्याचें सागितलें आहे याचें आश्चर्य वाटते ! कारण सोंवळे ब्राह्मण गवळ्याशीं भाषणसुद्धा करीत नसत.तसा प्रसगच आल्यास ते सचैल स्नान करीत असे त्यानेच पुढें सागितलें आहे.[११५] त्याचप्रमाणे ते कोऱ्या कागदास खरकटा मानीत. पण त्यावर शाईनें काहीं लेखन झाले असल्यास त्यास विटाळ नसे असा त्यांचा समज असे.[११६] अतिशूद्राचा विटाळ मानला जाई व त्यास ब्राह्मण-गृहात प्रवेश नसे.

( इ ) दिव्यें :— 'भामाकृष्ण–विनोदा'त भामा कृष्णानें मंदिरीं येण्यास उशीर का लावला याबद्दल शंका घेते व कृष्णाच्या सत्यनिष्ठेबद्दल प्रमाण करण्यास सागते. त्यात कृष्ण पुढील दिव्ये करण्यास तयार होतो:—

(१) समुद्रांत मला टाक, सत्य असेन तर मी तरेन.

(२) सर्प कुंभातून काढतो, मी खरा असेन तर तो दंश करणार नाहीं.

(३) अग्निदिव्य करतों. ( ४ ) खडतर देवळात मला घाल.

११५ ह. वि.१६,८३ ; ११६ ह. वि. १९,३

(५) तुळायत्रात तोल. पापी असेन तर पारडे खाली बसेल.

यावरून श्रीधराच्या वेळीं दिव्यें करून निरपराधित्व सिद्ध करण्याची चाल असावी असें वाटते.[११७]

( ई ) क्षुद्रदेवता व भोदूगुरु: –अज्ञान जन क्षुद्रदेवताच्या भजनीं लागत. शेंदरी दैवतें (दगडाला शेंदूर फासून त्याला देव मानणारे लोक), आखायी, जोखायी, मायराणी. मारको, मेसको, यक्षिणी, अग्या झाटिंग, जखणी, यास भजोन लोक बुडाले. कर्णपिशाच, भगलानी, उच्छिष्ट चांडाळी, रानसटवी, जखणी, वेताळ, मुंज्या, यास लोक अतिप्रीतीने भजत. खऱ्या देवास ते विसरले होते. भोंदूगुरूचा, जबरीने शिष्य करणाराचा, सुळसुळाट झाला होता असे गुरु इंद्रियाधीन, कर्मभ्रष्ट व अभिमानी असत अर्थात् गोकुळाच्या वर्णनात श्रीधरकालीन समाजाचेच प्रतिबिंब अधिक पडलेलें दिसते.

'हरिविजया'त अध्याय छत्तीसच्या शेवटीं द्वारकेतील ब्राह्मणांची आठ-नऊ बाळें सटावून गेलीं तीं कृष्णानें परत आणलीं असा उल्लेख आहे.[११८]

नाटक, नट व तमाशे यांचाही उल्लेख आढळतो

मद्यपान जरी पुरातन असले तरी शिंदीचा उल्लेख श्रीधरकालीन आहे.[११९]

( उ ) अलंकार व वेशभूषा: –कृष्णाच्या वेषात नेसण्यास पीतांबर व दुसरा मुक्तलग पदराचा पांघरण्यास होता, कटीं क्षुद्रघंटायुक्त मेखळा,

११७ ह वि. ३०,८०–८७ , ११८ ह.वि.३६, १२५-१५२
११९ ह. वि ४. १६५

कंठीं कौस्तुभ, कर्णी कुडलें, हस्तकटकें, यत्राकार मुद्रिका दडात, दहा अगुलात अगुलीयके, पण शेषशायी विष्णूच्या वर्णनात, चरणीं तोडर, वांकीं व नेपुरे अधिक आहेत. अर्थात् हीं वर्णने सामान्य व्यक्तीचीं नसून अलौकिक आहेत. कृष्णाच्या बाळलेण्यात, पिंपळपान, डूल, वाघनखें, वाकीं, चिंदलीं, पैजण, वाळे, मासोळी, धागऱ्या (कमरेस), आगठ्या व मनगट्या इ. सांगितलेले अलकार नेहमींच्या प्रचारातले आहेत.

श्रीमंत स्त्रिया मंगलप्रसगीं कनकांबरें, क्षीरोदकें नेसत. नेहमी साधें चोळी–लुगडें नेसत, व स्नानार्थ पडदणी घेत, बाहेर जातांना बुथीही घेत. नाकात सुपाणी मोतीं, गळ्यात गळसरी असे. श्रीधर म्हणतो, 'गळसरीवीण इतर अलकार फुकट आहेत'' [१२०] पण आता तो नाममात्र उरला आहे अनवट, जोडवीं, पोल्हारें, ही पायाच्या बोटातील भूषणें, जोडवीं, विरवल्या, वेढीं, मासोळ्या या रूपात फक्त मागली मंगलाचार म्हणून फक्त लग्नाच्या दिवशीं घटकाभर घातलीं जातात. शीसफूल, चन्द्र, बिंजवरा, मोत्याची जाळी मूद व राखडी हीं डोक्यातील भूषणे होतीं. कानात ताटक, तानिवडे, घोसबाळ्या यांच्या जागीं सध्या कुडा आलीं आहेत. स्त्रिया पायात पैजण घालीत, डोळ्यात सोगयाचें काजळ व कपाळाला कुंकुम लावीत. क्वचित् प्रसगीं गोंडे मोराची वेणी घालण्याचाही प्रघात असावा [१२१] अर्थात् हीं सर्व वर्णने श्रीधराने आपल्या कालानुरूप वर्णिलीं आहेत. त्यावरून स्वराज्यसुख भोगणाऱ्या तत्कालीन समाजाची सुस्थिती प्रतीत होते, पण आज हीं सर्व भूषणे घालून येणारी स्त्री अगदीं हास्यास्पद होईल आता त्यावेळच्या मुलांच्या खेळाकडे वळूं:—

१२० ह. वि. ९, ५६ , १२१ ह. वि. २६, १२४

( ऊ ) मुलांचे खेळ :-

दहाव्या अध्यायात ते आपणास दिसतात. त्यात चेंडूफळी, वावडी, लपडाई, भोंवरा, इटीदांडू, चक्रें, हमामा, हुतूतू, हुमली, झोंबा, सूर व वाघमेंढी यांची नावें प्रामुख्यानें आढळतात. नाथांनींही अशा खेळांचें वर्णन केलें आहे.[१२२] पण तें अध्यात्मिक दृष्ट्या केलें आहे, त्यात पटपट सावली, एकीबेकी, उमान ( उखाणे ) व काला या अधिक खेळाचा उल्लेख केला आहे. त्यावरून हे खेळ श्रीधराच्या वेळीं मागें पडले असावे असें दिसते;व आज तर हे व त्यांची नावेंही कोणास ठाऊक नाहींतशीं झालीं आहेत. तरी पण सामान्यतः महाराष्ट्राचे सामाजिक स्वरूप आज तीनचारशे वर्षे कसें एकरूप आहे हें यावरून सहज समजतें.

( ए ) वाद्यें व शस्त्रें :— भेरी, मृदंग, सनया, झल्लरी, टाळ, घोळ, पणव, ढोल, तन्तुवाद्ये, घुमऱ्या, मोहऱ्या, पावे, डफडीं शृंगें, तुरगें काहळ, गोमुखी, चळका, चौंडकीं, व दुटाळ इत्यादि वाद्यांचा उल्लेख या ग्रंथात आला आहे.गृहोपयोगीं उपकरणातील पहार, अगेळा,घण,कुदळी सबळा, वगैरे आलीं आहेत. तर युद्धोपयोगी शस्त्रात पुढील शस्त्रें उल्लेखिलीं आहेत.

यमदंष्ट्रा ( मांडींत खोचण्याचे शस्त्र ), कुन्त, असि, खेटकें ( मस्तकावरील टोपी ), सडका, पाश, भिंडीमाळा ( पायदळाचीं आयुधें ), बडगे, चक्रें, शिळा, डांगा, धनुष्यबाण, सुरया ( उरगा आकृती ऐशा सतेज ) लघु उल्हाट यत्रें ( खांद्यावर घेत ), मुसळ, गदा, मुद्गर, परिघ, शूळ, शक्ति, लोहकदुक, पट्टीश, बाण, लोहवृश्चिक, उरग, दशघ्न्या,

१२२ पांगारकर. मराठी वाङ्मयाचा इतिहास, एकनाथ, खं २, पृ. ३३९

गतध्न्या, लोहार्गळा, त्रिशूळ, कांयते, कातिया, परशु, तोमर, कठार, वगैरे यापैकीं पुष्कळांचा उल्लेख मुक्तेश्वरानें केला आहे.

## १२ भाषा व व्याकरण विशेष

सामान्यतः श्रीधराची भाषाशैली अत्यन्त सुबोध, सरळ, रसाळ, मार्गी पण प्रसगविशेषीं शब्दार्थालंकारानीं नटलेली, ओघवती, कर्णमधुर अशी आहे. तिच्यात रसानुसार माधुर्य, ओज व कोमलता हे गुण ठळकपणें असून प्रसाद तर ओतप्रोत भरलेला आहे, म्हणूनच वाचक कथेच्या जोरदार ओघाबरोबर अथपासून इतिपर्यन्त कोठेही न अडखळता एकसारखा आकर्षिला जातो यातच त्याच्या लोकप्रियतेचें इंगित आहे. तरी पण त्याच्या भाषेत जुने शब्द, अप्रसिद्ध संस्कृत शब्द मोठमोठे लांब समास, संस्कृत भाषेचें वळण; एका शब्दास अनेक तिशब्द योजण्याचा हव्यास, व कांहीं व्याकरणविशेष वगैरे जीं वैशिष्ट्ये इतस्ततः विखुरलेलीं आढळतात त्याचा आता क्रमाने विचार करू: –

(अ) **जुने शब्द:—** ओहरें (वधूवरें), अरुवार (नाजूक), बिदी (रस्ता); आया (सापडणे); साचोळ (चाहूल), विंदान (कपट); कोट भरणी (कंशाकेशी), रळी (थट्टा); वोसाण (ओहटी); बीक (रत्नाचे तेज), इटाळी–किटाळी; (आळ), गोरिया (पारधी); निमासुर; (तरुण); थोव (ढोंग), थाया (हट्ट); आहळणे (करपणे, भाजणें), खडाणगाई (लाथाळ, कमी दुधाच्या गाई); गदारोळ (मोठा गजर); हडपी (विडे देणारे), मुगा (घोड्याच्या नाकाचा शेंडा); मावकर (मायावी); पागोरा (शेतातील पाखरे उडविण्याचे खटखटें), चौबारा (गच्ची); होड (पैज); पाखरा (झुली-घोड्याच्या); मोहाळी (लगाम);

तवकें ( जोरानें ), ओडण ( ढाल ); हुबली ( गावढळ नाच ), अरळ ( पुष्पहार ), तोळंबे ( चहुतरे, खाबाखालची बेठक ).

( ब ) अप्रसिद्ध संस्कृत शब्द:—निकेतनपति ( यजमान, मालक, यशोदेच्या तोंडीं ); शातकुंभ, जांबुनद ( सोनें ), आखण्डल( इन्द्र ),घटश्रोत्र ( कुंभकर्ण ), चक्षुःश्रवा ( शेष ); तमारिकन्या ( यमुना ); रसनायक ( वरुण ), जातवेद ( अग्नि ); अंगिरासुत ( बृहस्पति ); जाश्वनीळ ( शंकर ), खट्वांग ( शंकर ); दाशरथ ( श्रावणारिसुत )· चन्द्रपुत्रवार ( बुधवार ); अत्रिनन्दन ( चन्द्र )

( क ) लांब समास: —गोपीनयनसरोजविकाशा, निजजनमानसचकोरचन्द्रा, यशःश्रीकीर्तिऔदार्यविज्ञाना,विद्वज्जनमानसमादुसरत्न: चराचरबीजसफलद्रुम, नीलग्रीवभूषणारिरोहणा; दशशतमुखागशयन, निरालोद्भवसुतमित्र-कुमर ( वायुसुत मारुती त्याचा मित्र सुग्रीव त्याचा सुत )

( ड )संस्कृत वळण: —ईषद्धास्य मेघश्याम, जन्मादारभ्य. अस्ति-, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते हे दामोदर यादवपते ।

माागुती ब्रह्मा जागा होत । यथापूर्वमकल्पयत ।।
यथाभूमितथाकुर। साधकासी ऊर्ध्वरेखा (कृष्णाचें पदचिन्ह) तत्त्वता ।।
उर्ध्वं गच्छति म्हणे सत्त्वस्था ।।

( इ ) पुढें एकच उदाहरण दिलें आहे. अशीं अनेक आहेत: -

गरुड:—माधववाहन, सुपर्ण; विनायक, खगपति, अरुणानुज; विहङ्गोत्तम, अण्डजप्रभु; पक्षिवर्य, उरगरिपु, खगेन्द्र; विष्णुवाहन; द्विजेन्द्र, विनितासुत; पन्नागाशन.

फ) व्याकरणविशेष:—

१ 'ध्वनी उठली' असा स्त्रीलिंगी प्रयोग केला आहे. 'अनमान न धरावा' ( नपुसककलिंगी ).

( २ ) 'हिंगुरडे वाढलीं'.'हिंगुरडे' याचे अनेकवचन 'हिंगुरडीं' होते

( ३ ) 'ढोंळिया' (खोपटात) 'ठेवणा चित्त ठऊनिया' (धनावर) अशी सप्तमीचीं रूपे

(४) गोफाणिला (गोफणीनें फेकला) पान्हाइली (पान्हा फुटला), भ्रष्टला, बहिष्कारला, चाकाटले (चकित झाले), सुखावली, खाखाइली. सटावले, पराभविले, असे नामधातु पुष्कळ आढळतात सांळिजे, पळिजे, अशीं भावेरूपें.

(५) लाहेलाहे (जलद), घोरादर (भयकर), कडोविकडी, (झपाट्यानें) मेटाखुटी, वगैरे क्रियाविशेषणेंही येतात.

(६) 'आम्ही सभेसी न यों' (येणार नाहीं),'हरिलागून विसरूं नका' मागुती ब्रह्मा जागा होत' (होत असतो), ' ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम करून.... त्रिविध आश्रम त्यागिले' (कर्ता नाहीं) असे प्रयोग क्वचित् आढळतात.

७) गजगामिनी, पद्मनेत्री, खजरीटनयनी, खजनाक्षी, खजरीट नयना, मृगनयनी, अशीं स्त्रीलिंगी रूपे येतात.

(८) मनरजन, स्त्रअधरी, महाउरग, महाऋषि, वदनइंदु; (अश्रु) जीवनझरे, भक्तिशीड, माया-अटक; अशा प्रकारचे समास आढळतात.

## ५.३ दोषदर्शन

यानन्तर या काव्यातील दोषदर्शनाचा विचार करणे क्रमप्राप्तच आलें, तें आता करूं:—

(१) क्लिष्टता.—श्रीधराची भाषा अतिशय सुबोध व साधी असते हा समज जसा विद्वान टीकाकारात तसाच सामान्य वाचकात दृढमूल झाला आहे. त्याचा अर्थ एवढाच की, ज्ञानेश्वर, एकनाथ व मुक्तेश्वर यापेक्षा तो अर्वाचीन असल्यामुळे स्वाभाविकपणेच त्याचे ग्रंथ समजण्यास सुलभ झाले आहेत. तरी पण वर दर्शविलेले जुने शब्द, अप्रसिद्ध संस्कृत शब्द, व प्रदीर्घ समास, संस्कृतावळण इत्यादिकेकरून त्याच्या काव्यास मधून मधून क्लिष्टता आली आहे, हे नाकबूल करता येत नाही. मात्र एवढे खरे की, अशी स्थळे फार क्वचित आढळणारी असल्यामुळे वाचकाला एकन्दर अर्थप्रतीति होण्यास व कथानुसंधान अनुसरण्यास कसलीही अडचण पडत नाही.

(२) दृष्टान्ताचा पाल्हाळ:—एखादा विचार विशद करण्यास व तो वाचणाऱ्या मनावर पूर्णपणे बिंबविण्यास दृष्टान्ताचा उपयोग फार चांगला होतो हे अगदी खरे आहे. तरी वारवार केलेली त्याची लांबलचक मालिका कंटाळवाणी होते आणि वाचकास ती कादंबरीतील पाल्हाळिक वर्णनाप्रमाणे टाळावीशी वाटते

(३) पुनरुक्ति: – स्त्रीस्वरूप–वर्णने, निसर्ग–वर्णने, युद्ध–वर्णने, मल्लयुद्ध–वर्णने, यात वैचित्र्य तर नाहीच पण ती सर्व ठराविक ठशाची दिसतात यमुनातीराच्या वनाचे वर्णन असो वा द्वारकाबाह्यप्रदेश वनवर्णन असो[१२३]:—

अशोक, उनोतिया, रायआवळे, निंबुवट, पिंपळ, डाळिंब, सुपारी, सायन, मदार, चंदन, अंजीर, चंपक, जाई, बकुळी, मोगरे, शेवन्ती।

१२३ ह. वि २२, ९७–१०९

जपावृक्ष, कुठमी, करवीर, द्राक्षामंडप, नागवेली, पारिजातक, शिरस, फणस, मातुलिंग, जायफळ, लवंगी, ताड, माड, इक्षुदंड सर्वनामातली एकच इतर वर्णनात तेच तेच दृष्टान्त, त्याच त्याच उपमा व तीच तीच रूपके पाहून कवीची कल्पनाशक्ति अत्यन्त मर्यादित आहे असे वाटते स्त्रीरूपवर्णनात

कोटि कंदर्प साडणी । दंततेज झळकत
पाषाण ते पद्मराग होत [१२४] ॥

पुनः हेंच वर्णन आलें आहे [१२५] तेच प्रारंभी सरस्वतीवर्णनात [१२६] तसेच वर्णन क्षीरशायी विष्णूचे. [१२७] गणपति, कृष्ण, विष्णु यांचे अलकार तेच, त्याचप्रमाणें सरस्वती, रुक्मिणी, द्रौपदी, भामा यांचीही वेषभूषा एकच.

कथा—कथांचीही तो पुनरुक्ति करतो. शचीच्या राधावताराची कथा 'हरिविजया त व 'पांडुरंगमाहात्म्यात' सांगितली आहे. [१२८]

( ४ ) असंभाव्यता:—कृष्ण जन्मतःच व यशोदेकडे नेताक्षणींच:—

( अ ) चरणांगुष्ठ धरिला हातीं । वदनीं घालूनी रमापती ॥ [१२९]
हे अशक्य आहे.

( ब ) जांबवन्तीविवाहात, उष्टीहळद, अंतःपट, मंगळाष्टके हे अशक्य वाटतें.

( क ) देवकीला कंसवधानन्तर अठरा वर्षांचा कृष्ण भेटला; यशोदेस कालियामर्दनानन्तर सात--आठ वर्षांचा कृष्ण भेटला; [१३०]

१२४ ह. वि. २३, १८-२० ; १२५ ह. वि २७, ७४
१२६ ह. वि. १, ३१ , १२७ ह. वि. ४, ५४
१२८ ह. वि, ८,९०-९१;३६, १५६-१७०, पांडुरंग मा. अ.१
१२९ ह.वि ४,१७५ ; १३० ह.वि.अ ११ व अ.३६, १००

ग्रहणयात्रेसमयीं नातू–पणतू झालेला कृष्ण कुरुक्षेत्रीं भेटला. त्याचप्रमाणे, रुक्मिणीस प्रद्युम्न बारा वर्षांनीं भेटला तरी त्याना या सर्व प्रसंगीं दरदरून पान्हा फुटला हे वर्णन असंभाव्य होय

(ड) यमुनापुलिनावर, द्वारकोद्यानात, मलयमारुत येतोच आहे ! त्याचप्रमाणे जायफळे, लवंगा, महाळुगें, द्राक्षामंडप, अंजीर, नागवेली शेवन्ती, मोगरा, जाई, जुई, क्रम वगैरे उद्यानात व विशिष्ट स्थळींच होणारी फळें–झाडे यमुनानीरवनात व द्वारकेच्या बाह्यप्रदेशात होतात. हे अशक्य आहे.

(५) अनौचित्य.–दापत्याच्या दाढीवेणीच्या गाठीच्या कथेत–[१३१]

(१) नवरा–'उशीर झाला, ऊठ' असें बायकोस सागत असता वेदान्तपांडित्याचे दृष्टान्त देतो हें अनुचित आहे.

(२) गौळणी म्हणती:–' पुरुषार्थ करुनी गोरस रक्षू सर्वदा"[१३२] व यशोदेच्या तोंडी " आता निकेतनपति येतील " हे शब्द घातले आहेत. रुक्मिणीच्या तोंडीं जाडे समास·—'दशशतवदनतनुशयन','स्कंदतात-हृदयींचे ध्यान' इ. घातले आहेत.

(३) अध्याय वीसमध्ये 'पंचकोशविवरणा'त." तू पूर्णानंद गोपी-कुचकुंकुमागमर्दना " हे विशेषण अयुक्त आहे. उलट, कृष्णास अंबालयात उतरण्यास जागा दिली त्यावर, कृष्णाला पहाणाऱ्या लोकावर, रुक्मिणीच्या अंबास्तुतींत, व रुक्मीच्या शिरच्छेदसमयीं रुक्मिणीच्या विनन्तींत वेदान्त भरला आहे.

(४) सुदाम्याची कृष्णस्त्रियानीं केलेली निर्दय थट्टा.

---

१३१ ह. वि. ७, ७४–१०२ , १३२ ह. वि. ९, १३५

( ६ ) भाषा व्याकरणविषयक दोष :— हे वर सांगितलेच आहेत.

( ७ ) अतिशयोक्तिः —काव्यात अतिशयोक्ति असणें अवश्यच आहे. पण ती अमर्याद झाली कीं वैरस्य उत्पन्न होतें. कृष्णाच्या खोड्या लिहिण्यास पृथ्वी अपुरी होईल.[१३३]

( १ ) काय काय आठऊं वा रे तव गुण ।
ऊर्वी न पुरे करिता लेखन ॥[१३४]
अद्भुत न कळे तुझी करणी । लिहिता न पुरे मेदिनी ॥[१३५]

( २ ) कृष्णदर्शनाच्या वेळची गोपींची धादल.

( ३ ) जरासन्धावर कृष्णाची सेना मुकाबल्यास आली तेव्हाचे वर्णन:—

डळमळीत उर्वी मंडळ । दिग्गज त्रास पावले ॥[१३६]
शोणिताचे पुरात गजकलेवरें वाहत गेली[१३७]
अशुद्ध नदीचे पुरात घायाळ पोंहत होते.[१३८]

( ८ ) उत्तान शृंगारः— ( १ ) " माझे डोळे दुखत आहेत, अंगावरचे दूध घाल" असे एका गौळणीस सांगतांना कृष्ण म्हणतो:—

मी आपुल्या करयुगें करून । पिळीन स्तन तुझे वो ॥[१३९]

---

१३३ ह. वि. ९, १९१
१३४ ह. वि. ११, ७९
१३५ ह. वि. १२, ७६
१३६ ह. वि. २२, ९१
१३७ ह. वि. २२, ९८
१३८ ह. वि. २२, ११०
१३९ ह. वि ७, ११३

( २ ) कृष्ण आपल्या मातेस सांगतो : - बहुतजणी नग्न होऊन मला मधे बसवतात आणि म्हणतात की, मोठा असतास तर बरे झाले असते[१४०]

( ३ ) नंपुसकाचें लिंग थोर.[१४१]

( ४ ) गोपीकुच हेचि तारक ( सागड ) घेउन ।
मीनकेतन पोहतसे ॥[१४२]
चंदनें चर्चित हस्त । गोपींच्या कुचयुगीं ठेवित ।
क्षणक्षणा चुंबन देत । नाचन नाचत तयानें[१४३]
हरिकंठीं मिठी घालोनी ।
सुरतयुद्धा लागोनी । सुखशयनीं प्रवर्तल्या[१४४]

अध्याय सतरा ओव्या सत्तेचाळीस ते सहासष्ट—सर्वच संभोग शृंगारपर आहे.

( ५ ) एक म्हणे पयोधरें करोनी । हरिचरण अवघे रजनी ॥
त्या निववीले साजणी ।[१४५]

( ६ ) भामा म्हणे तुझे पयोधर । तेथे नखें रुतली परम तीव्र[१४६]

कृष्णानें एका पाणी घेऊन जाणाऱ्या गोपीचें वस्त्र सोडलें—हातात कळशी घेऊन ती नग्नपणें राजरस्यातून जाता पोरें पाठीस लागलीं.[१४७]

---

१४० ह. वि. ७, १५६-१५७ १४१ ह. वि. १६, २९
१४२ ह. वि. १७, ५३ १४३ ह. वि. १७, ५९
१४४ ह. वि. १७, ६० १४५ ह. वि २७, २८
१४६ ह. वि. ३०, ४० १४७ ह वि. ७, १३१-१३५

( ७ ) राजसूययज्ञसमाप्तीनन्तर भोजनप्रसंगीं द्रौपदी वाढीत असताना तिची कौरवानीं केलेली अचरट आणि अशिष्ट थट्टा कोणासही निषेधार्हच वाटेल.[१४८] मुक्तेश्वराच्या अनुकरणाचा हा परिणाम! मात्र श्रीधरानें आपले चित्र थोडेसे सौम्य व कमी भडक रंगविलें आहे एवढेंच फार तर त्याच्या वतीने बोलता येईल.

( ८ ) ग्राम्यता.— ' अक्रूरें थांबिलें रथातें '

( ९ ) कालविपर्यास :— श्रीधरानें आपल्या कालच्या चालीरीति व लोकभ्रम याचा समावेश ' रामायण ' काळात केला आहे.

येथवर श्रीधराच्या ' हरिविजया ' चे गुणदोषदर्शन केलें.

यापैकीं उत्तान शृंगार, अनौचित्य, असंभाव्यता, पुनरुक्ति व पाल्हाळ, हे दोष त्यास प्रयत्नानें टाळता आले असते असें वाटते; पण इतर दोष परिस्थितिजन्य आहेत. मराठी काव्य संस्कृताच्या तोलाचें व्हावें, तें संस्कृताभिमान्यासही मान्य व्हावें म्हणून तत्कालीन सुशिक्षित कवींना संस्कृती वळण, संस्कृत शब्द, दीर्घ समास, वगैरे साधनाचा अवलंब करावा लागे. पण त्याने एक प्रकारे श्रीधराच्या काव्यास प्रौढता व भारदस्तपणा आला आहे, यात संशय नाहीं. भाषा–व्याकरण दोषासंबंधीं तर याला बोल लावणे अनुचित ठरेल. कारण त्याकालीं कोशव्याकरणादि ग्रंथांनीं मराठी भाषेच्या स्वरूपात स्थैर्य आलेले नव्हतें. अतिशयोक्ति व उत्तान शृंगार यास मुक्तेश्वरासारख्या कविश्रेष्ठानेंही अवास्तव महत्त्व दिल्यामुळें तदनन्तरच्या श्रीधरासारख्या कवीस रसिकरंजनाची ती एक टूमच आहे असे वाटावे हें सहाजिकच आहे, व तसें त्याने म्हटलेंही आहे. पण यातही श्रीधराने पुष्कळ संयम राखला आहे हें तुलनात्मक दृष्टीनें

१४८ ह. वि ३४, ४१–५२

पाहाणारास सहज समजेल. शिवाय श्रीधराच्या काव्याचे गुणबाहुल्य, त्याची मनोरंजक निवेदनपद्धति, अनुपम रसाळपणा व सर्वाहून श्रेष्ठ असा जो गोष्टीवेल्हाळपणा यामुळें चोखदळ वाचक सोडून बाकीच्या सामान्य वाचकांच्या दृष्टिपथातही वरील दोष येत नाहींत आणि म्हणूनच तो आबालवृद्धांस अद्यापि प्रिय आहे. आता कांहीं उत्कृष्ट उतारे देऊन हे प्रकरण संपवू.

## १४ हरिविजयांतील कांहीं उत्कृष्ट उतारे

### १ 'बालकृष्णरूपवर्णन'[१४९]

जय जय सच्चिदानन्दसगुण । अतसीकुसुमभास तू पूर्ण ॥
वाटे त्याच रगें करून । नीलोत्पलें रोविलीं ॥ १ ॥
नभासि चढला तोचि रग । त्याचे प्रभे रगले मेघ ॥
इंद्रनीळ हरिरग । त्याच प्रकाशें जाहले ॥ २ ॥
तेथींचें सौंदर्य अद्भुत । गरुड पाचू सतेज चळत ॥
मर्गजासि बिक दिसत । तनु सांवळी देखोनिया ॥ ३ ॥
लावण्यामृत सागराद्भुत । कीं कोटिमकरध्वजाचा तात ॥
तो पुष्पधन्वा उदरीं जन्मत । अंकीं खेळत जयाच्या ॥ ४ ॥
श्यामलांगी अति निर्मळ । वरी डोले वैजयंती माळ ॥
पुष्करीं शक्रचाप सुढाळ । सुरग जैसें मिरवे ॥ ५ ॥
कीं मेघीं स्थिरावली क्षणप्रभा । तैसी वैजयतीची शोभा ॥ (वीज)
सहस्रमुखाचिया जिभा । गुण वर्णितां शीणल्या ॥ ६ ॥

१४९ ह. वि. ७, १–१२

इद्रनीळाचा मेरू प्रभाघन । वेष्टिला शातकुंभ तगटे करून ॥
तैसें झळकत वसन । हरिजघनीं सर्वदा ॥ ७ ॥
कीं सकळ चपळा गाळून । रगविले हे पीतवसन ।
वाटे द्वादश भानू येउन । कटीं मेखळेवरी जडियेले ॥ ८ ॥
पाघरावयाचा क्षीरोदक । कीं शुभ्रयशा चढले त्रिक ॥
कीं शुभ्रश्वेत मृडानीनायक । कर्पूरें करूनी ऊटिला ॥ ९ ॥
कीं शुद्धरजत तगटा घडिलें । कीं पारिजें कलाम डवारिले ॥
कीं जान्हवीतीरीं वोपिले । दिनकरनाथे स्वहस्ते ॥ १० ॥
आगीं उटी दिसे सुढाळ । कीं इदुबिंब उकलले निर्मळ ॥
कीं मुक्ताफळाचा गाळून ढाळ । इद्रनीळ चर्चिला ॥ ११ ॥
त्रिभुवनसौंदर्य येकवटलें । तें हरिमुखीं येवोनि ओतिलें ॥
आनदाचें स्वरूप उजाळिले । रूपा आले हरिमुखी ॥ १२ ॥

---

## २ 'रात्रीचें वर्णन'[१५०]

तव अस्तमाना गेला गभस्ती । तेथेंचि लोकीं केली वस्ती ॥
सकळ निद्रार्णवीं निमग्न होती । चिंता चित्तीं नसेच पं ॥ १८७ ॥
अस्ताचळा जातां वासरमणी । द्विज बैसती स्थळीं येऊनी ॥
मिलिंद वारिजकोशीं प्रवेशुनी । आमोदाते सेविती ॥ १८८ ॥
तरुण जे जे विषयपर । त्याचे हृदयीं सचरे पचशर ॥
रात्र झाली दोन प्रहर । श्वापदे दुर्धर वाहती ॥ १८९ ॥
परम दाटली घोर रजनीं । द्विजाच्या उठती नाना ध्वनी ॥
रिसे वाघुळा मिठी घालुनी । वृक्ष डाहाळिये लोबती ॥ १९० ॥

---

१५० ह. वि. ११, १८७-१९६

वनदेवता गंधर्व यक्षिणी । गोंधळ घालिती महावनीं ॥
आसरा जाज्वल्यरूप दाउनी । तेच क्षणीं गुप्त होती ॥ १९१ ॥
( जलदेवता )

नाना वल्लीचे भवाळ । दिसती अवचितोचि कल्लोळ ॥
प्रेतगण मिळाले सकळ । म्यासुर केवळ दीसती ॥ १९२ ॥
विकार करिती भूतें प्रेतें । छळिती अमंगळा अपवित्राते ॥
दिवाभीताचे घुघाट तेथे । पिंगळे थोर किलचिलती ॥ १९३ ॥
भालुवा भुंकती क्षणक्षणीं । टिटवे शब्द करिती गगनीं ॥
करुणा स्वरें करूनी । चक्रवाके बाहाती ॥ १९४ ॥
चंद्रकुमुदिनी विकासती । भ्रमर तेथे पाहों येती ॥
उरग बाहेर निघती । सैरा हिंडती चहूकडे ॥ १९५ ॥
निधानें चरावया निघती । क्षणक्षणा प्रभा दाविती ।
सभाग्यास बोलविती । येऊं म्हणती गृहा तुझ्या ॥ १९६ ॥

## ३ 'अरुणोदयवर्णन'[१५१]

तों सवेंचि झाली प्रभात । जान्हवीवरून येत वात ॥
दानवगुरु उदय पावत । अरुणप्रकाश पाहीं पा ॥ २११ ॥
कीं पूर्वदिशेनें मुख धुतलें । आरक्त कुंकुम निढळीं रेखिलें ॥
उडुगण जेवी तेज हरपलें । ज्ञानें निरशिलें अज्ञान जेवीं ॥ २१२ ॥
पक्षी उडोनि चालिले । भ्रमर कमळांतून मुक्त झाले ।
तस्कर ठाई ठाई लपाले । हिंडो लागले श्रेष्ठ पै ॥ २१३ ॥

---

१५१ ह. वि ११, २११–२२०

निजगृहास येऊन जार । माडिला दांभिक आचार ।
जे स्मशानीं जप करणार । कुटिळ नर पळताती ॥ २१४ ॥
कुक्कुट काग बाहती । त्रिमण्या ठाइं ठाई गुजगुजती ।
अग्निहोत्री स्नान करिती । होम द्यावया कारणे ॥२१५॥
कापडी तीर्थपथें जाती । भक्त प्रातःस्मरणे गर्जती ॥
वैष्णव विष्णूतें चिंतिती । शैव ध्याती शैवाते ॥ २१६ ॥
हातीं घेऊन अर्घ्यजल । सौर पाहती सूर्यमंडळ ॥
गाणपत्य परम सुशीळ । गणपतीते चिंतिती ॥ २१७ ॥
शाक्त चिंतिती शक्तीतें । गुरुभक्त आठविती गुरुचरणाते ॥
विद्यार्थी येकचित्ते । नानाभ्यास करिताती ॥ २१८ ॥
गृहीं गृहींच्या ललना उठती । अंग प्रक्षाळूनि कुंकुमें रेखिती ॥
मडा संमार्जनें करूनि निश्चितीं । मग घालिती रंगमाळा ॥ २१९ ॥
करूनिया गोदोहन । वेगीं आरंभिती घुसळण ॥
असो उदय पावला सहस्रकिरण । गौळी तेथून निघाले ॥२२०॥

## ४ ' प्रळयमेघवर्णन ' [१५२]

कृष्णाम मध्ये वेष्टून । गोप करिताती कीर्तन ।
तो उत्साह देखोन । मनीं शोभला सहस्राक्ष ॥ ४२ ॥
प्रळयमेघाच्या तोडिल्या शृंखळा । तयासि आज्ञा देत ते वेळा ॥
म्हणे वर्षोनिया चंडाशिळा । सर्व ही मारा व्रजवासी ॥ ४३ ॥
तामस गुणें इंद्र वेष्टिला । हरिचा प्रताप नेणवेचि त्याला ॥
असंभाव्य मेघ ओळला । येक येकीं चहूकडे ॥ ४५ ॥

१५२ ह. वि. १२, ४२–४९

हस्तिशुंडाऐशा धारा । नभींहून सुटल्या सैरावैरा ॥
त्यांत वर्षो लागल्या चंड गारा । पडती अनीवारा सौदामिनी ॥४६॥
चहूंकडोनि पूर चालिले तुंबळ । बुडालें न दिसे कोठें गोकुळ ॥
जैसें समुद्रांत पडलें ढेकुळ । मग तें कोठें पाहावें ॥ ४७ ॥
थरथरा कांपती सर्वजन । गारा मस्तकावरी पडती येउन ॥
गोळणीं बाळास पोटीं धरून । आक्रंदती तेधवां ॥ ४८ ॥
कडकडोनि वर्षती चपळा । महाप्रळय गौळिया ओढवला ॥
मग दीन वदनें ते वेळां । धांवा मांडिला सकळांनीं ॥ ४९ ॥

## ६ 'कृष्णनृत्य '[१५३]

नेपुरें रुणझुणती साजिरीं । मातेनें कृष्ण धरून करीं ॥
कांचबद्ध भूमिवरी । हळूहळू चालवीत ॥ ६० ॥
मंद मंद चाले गोविंद । हळूच नेपुरें करिती शब्द ॥
तों जवळीं पातला नंद । हस्त धरीत हरीचा ॥ ६१ ॥
नंदहस्ताश्रयें करून । चाले वैकुंठींचें निधान ॥
सवेंचि पडतो अडखळोन । नंद सावरोन धरीतसे ॥ ६२ ॥
बळिराम आणि जगजीवन । येक येकाचा आश्रय धरून ॥
कांपत कांपत दोघेजण । उठोन उभे राहती ॥ ६३ ॥
सवेंचि आदळती धरणीं । गदगदां हांसे चक्रपाणी ॥
सवेंचि उभे राहोनी । दुडदुडां नाचताति ॥ ६४ ॥
नंद आणि यशोदाजननी । भोंवत्या मिळाल्या नितंबिनी ॥
शेष आणि चक्रपाणी । नाचत दोघे पाहाती ते ॥ ६५ ॥

---

१५३ ह. वि. ५, ६०–७०,८२

लास्य आणि तांडव । दोन्ही नृत्याचे भाव ॥
लास्यकळा माधव । दावीतसे तेधवा ॥ ६६ ॥
कर टाळिया नितंबिनी । वाजाविती कौतुकें करूनी ॥
म्हणती नाच नाच रे चक्रपाणी । नंद नयनीं पाहत ॥ ६७ ॥
हस्तसंकेत दावी भगवंत । नृत्य करी डोलत डोलत ॥
भोंवत्या गौळणी हासत । हरि पाहात त्याकडे ॥ ६८ ॥
वेष्टित गोळिणी सुकुमार । त्याच कमळकार्णका सुंदर ॥
मध्ये श्रीकृष्ण भ्रमर । नीळवर्ण रुणझुणे ॥ ६९ ॥
सूर्याभोंवतीं जैसीं किरणे । कीं शशिवेष्टित तारागणे ॥
कीं मुगुटाभोंवतीं रत्नें । तैशा कामिनी विलसती ॥ ७० ॥
... .... .. . . ... .............. ........
नंद धावोनि जवळी आला । म्हणे सुकुमार माझा भागला ॥
हृदयीं धरून आलिंगिला । चुंबन दिधलें तेधवां ॥ ८२ ॥

## ८ 'रासक्रीडा.' १५४

याचा अंतरभाव जाणोनी । वश जाहला मोक्षदानी ॥
रासमंडळ रचोनि । चक्रपाणि खेळतसे ॥ ३८ ॥
जैसी का ओंविली माळ । सुवर्णमणि आणि इन्द्रनीळ ॥
एक गोपी एक घननीळ । हस्त धरिती परस्परें ॥३९॥
तप्तकांचनवर्ण गोपीबाळा । मध्यें इंद्रनीळ घनसांवळा ॥
ह्या वेदश्रुती निर्मळा । हरिरूपीं जडल्या हो ॥४०॥

१५४ ह. वि. १७, ३८–५४, ५७

एक गोपी एक कृष्ण । परस्परें स्कन्धीं हात ठेऊन ॥
नृत्य करितीं तें पाहता तल्लीन । अष्टनायिका पैं होती ॥ ४१ ॥
गानी सुरस सुस्वर । ऐकता तटस्थ होती किन्नर ॥
जगद्वन्द्य गात मधुर । प्राणी चराचर विस्मित ॥ ४२ ॥
षोडशकळीं नक्षत्रनायक । दिसे अत्यन्त आल्हादकारक ॥
यमुनापुलिन भूमीवर देख । रास सुरेख माडिला ॥ ४५ ॥
शरत्काळ परम सुन्दर । कुमुदिनीवर रुणझुणती भ्रमर ॥
येत सुगन्ध मलयसमीर । सकळ तरुवर फुटले हो ॥४६॥
जैसा विद्युल्लताभार गगनीं । तैशा तळपती दिव्य कामिनी ॥
तेथींच्या दिव्य सुवासे करुनी । दाही दिशा दाटल्या ॥ ४७ ॥
कृष्ण जलदवर्ण साजिरा । माजी सौदामिनी त्या सुन्दरा ॥
कीं त्या सुवर्णलतिका परिकरा । सुकल्या कामानळेंचि ॥ ५० ॥
त्याचे पूर्णकाम पुरवित । श्रीरग नीरद वर्षत ॥
कीं श्रीकृष्ण नक्षत्रनाथ । गोपी उडुगण शोभती ॥ ५१ ॥
कीं श्रीकृष्ण वासरमणी । भोंवतीं किरणें नितंबिनी ॥
प्रतिभास मित्रकन्या जीवनीं । तैशाच तेथें तळपती ॥ ५२ ॥
गोपींचीं कुडले आणि नयन । हेचि प्रतिबिंबीं तळपती मीन ॥
गोपीकुच हेचि तारक घेउन । मीनकेतन पोहतसे ॥ ५३ ॥
कीं त्या वनामाजीं सुन्दर । अनग हाचि नृपवर ॥
केशकुसुम वर्तुळाकार । हेंच छत्र तयाचे ॥ ५४ ॥
असो नाचता रासमंडळीं । गोपीमुखा मुख लावी वनमाळी ॥
तांबुल घाली मुखकमळीं । सुखी वेल्हाळी होती त्या ॥ ५७ ॥

## ७ 'जरासन्धाची स्वारी '[१५५]

कळे कन्याचे समाधान । म्हणे मथुरा क्षणमात्रें जाळीन ॥
यादव कुळसकळ छेदीन । धरून आणीन रामकृष्णां ॥ २३ ॥
ऐसी जरासंधे होड बाधोनी । घाव तेव्हा घातला निशाणीं ॥
तेणे दुमदुमिली अवनी । तेवीस अक्षौहिणी बळ ज्याचें ॥ २४ ॥
धडकला वाद्याचा कल्लोळ । प्रतिध्वनीने गाजिलें निराळ ॥
भयभीत ब्रह्मगोळ । चालिलें दळ मागधाचें ॥ २५ ॥
भेरी धडकल्या शशिवदना ते क्षणीं । ऐकता भास उपजे कर्णी ॥
रणतुरे खणखणिती तेणे गगनीं । देवयानें डळमळती ॥ २६ ॥
शृंगे तुरंगे पणव काहळ । गोमुखी चळका चौडकी दुटाळ ॥
मुखवातें सनया रसाळ । गर्जती ढोल गिडिबिडी ॥ २७ ॥
पदाती दळ पुढे जात । त्यांचे पाई ब्रीदें झणझणित ॥
पदीं त्याच्या तोडर गर्जत । हाक फोडित आवेशें ॥ २९ ॥
नाना परीच्या कासा घालूनी । यमदष्ट्रा खोविल्या जघनीं ॥
हातीं कुंत असिलता घेऊनी । खेटके अपार मस्तकावरी ॥ ३० ॥
जैसा फुटे कल्पांतींचा सागर । तैसे पायदळ जात अपार ॥
मडका पाश भिंडिमाळा थोर । घेऊन पुढें धावती ॥ ३१ ॥
वडगे चक्रे शिळा डागा । घेऊन बिलगती चमकती वेगा ॥
धनुष्यबाण सुरया उरगा । आकृती ऐशा सतेज ॥ ३२ ॥
लघु उल्हाटयंत्रें आधीं । घेऊन पुढे धावतीं खादीं ॥
उर्वी दणाणे चालता पदीं । भूधर होय साशंक ॥ ३३ ॥

१५४ ह. वि. २२, २३–३५

मुसळ गदा मुद्गल परिघ । शूळ शक्ति लोह कंदुक अभग ॥
पट्टीश बाण लोहवृश्चिक उरग । दशघ्न्या आणि शतघ्न्या ॥ ३४ ॥
लोहार्गळा त्रिशूळ कोयते कातिया । परशु तोमर कुठार घेऊनिया ॥
धावती पुढें लवलाह्या । मथुरापथ लक्षुनि ॥ ३५ ॥

## ८ 'रुक्मिणीहरण'[१५६]

ऐसे ऐकताच उत्तर । जाहला एकचि हाहा:कार ॥
म्हणती राजकन्या सुन्दर । गोरक्षक घेऊनि पळाला ॥ ११ ॥
जैसा फुटे कल्पांतींचा समुद्र । तैसे उठावले मागधवीर ॥
रण तुरें खाखाईलीं अपार । उभे म्हणती परवीरा ॥ १२ ॥
सिंहनादे गर्जती वीर । ऐकता मुरडले यादवभार ॥
हलधर आणि श्रीकरधर । रथ मुरडिती सवेगें ॥ १३ ॥
पायदळावरी पायदळ । मिसळता जाहला हलकल्लोळ ॥
उसणें ( घाई ) वीर सकळ । हाणताती परस्परें ॥ १४ ॥
सुपर्णासमान चपळ घोडे । राऊत मिसळले वेगाडे ॥
असिलता झळकती विद्युच्चेनि पाडे । वाहिले मेढे महावीरीं ॥ १५ ॥
घाये हाणती महावीर । वीरें वीर पाडती सत्वर ॥
न विचारित्ती आपपर । करीत सहार चालिले ॥ १६ ॥
हस्तीवरी हस्ती लोटिती । रथासीं रथ झगटती ॥
जैशा जळधारा वर्षती । तैसे येती बाण वेगें ॥ १७ ॥
जाहलें येकाचि घनचक्र । रणधुमाळी माजली थोर ॥
उल्हाट यंत्राचें भडिमार । धराधर गजबजिला ॥ १८ ॥

---

१५६ ह. वि. २४, १, ११–२४

रक्तगंगा चालिल्या महापूरें । वाहती रथ गजकलेवरें ॥
यादववीर महाघोरें । दाटले तिहीं क्षणभरी ॥ १९ ॥
ऐसें देखोनि बळिभद्रें । रथ पुढें लोटिला बळसागरें ॥
यादव भिडती परम निकरें । शिरें परवीरांचीं उडविती ॥ २० ॥
कंदुकाऐसीं शिरें उडती । मुखें घ्या घ्या हेंचि बोलती ॥
रणीं कबंधे नाचती । शस्त्रे घेऊनि सैरावैरा ॥ २१ ॥
नांगर मुसळ घेऊन हातीं । कृष्णाग्रज उडी घाली रथाखालतीं ॥
मृगाळामाजी भद्र जाती । रेवतीपती तैसा दिसे ॥ २२ ॥
हें देखोनि चैद्य धाविन्नले सवेग । नाते अंग वंग कलिंग ॥
वक्रदंत शाल्व पौंड्रक नृपाधिप । निजभारेसीं लोटले ॥ २३ ॥
कैशिक कारूष विदूरथ । जरासंध निजभारेसीं लोटत ॥
बाणांची वाकुडी वर्षत । मंडप दिसत अन्तराळीं ॥ २४ ॥

## ९ ‘ रुक्मिणीरूपवर्णन ’ [१५७]

जीचिया स्वरूपावरूनी । करावी कोटि कन्दर्प साडणी ॥
जे त्रैलोक्यलावण्यखाणी । अवनीतळीं अवतरली ॥ १८ ॥
तप्तसुवर्ण जैसें सुरंग । तैसें रुक्मिणीचें दिव्यांग ॥
आकर्ण नेत्र सुरेख चांग । मुखमृगांक कोण वर्णी ॥ १९ ॥
दन्ततेज जिकडे झळकत । पाषाण ते पद्मराग होत ॥
सहज बोलता मन्दिरात । प्रकाश होत दन्ततेजें ॥ २० ॥
जगन्माता बोले जे क्षणीं । वाटे विखुरते रत्नखाणी ॥
जीचिया स्वरूपावरूनी । ब्रम्हांडचि ओवाळिजे ॥ २१ ॥

१५७ ह. वि. २३,१८–२७, ३०

अगींच्या सुवासे करूनी गेल्या दशदिशा भरोनी ॥
पाय ठेवी जेथे रुक्मिणी । वसन्त भुलोनि तेथे लोळे ॥ २२ ॥
महातेज गाळून देखे । ओतिलीं कर्णीचीं ताटके ॥
नेत्रोत्पले अतिसुरेखे । अंजन झळके सोगयाचे ॥ २३ ॥
मुक्तघोष तळपती कानीं । कोटि मृगांक उणे वदनीं ॥
भगणे झळकती सुनील गगनीं । मुक्तजाळी शिरीं तेवि ॥ २४ ॥
साडून तीव्रता सकळ । वाटे मित्र जाहला शीसफुल ॥
शीतलत्व साडून समळ । मृगांक शिरीं विलसे ॥ २५ ॥
कस्तुरी मळवट विलसे भाळीं । नासिकी दिव्य मौक्तिके झळाळीं ॥
शुभ्र वस्त्र मुक्तलग काचोळी । एकावळी डोलत ॥ २६ ॥
बाहुभूषणे रत्नजडित । वज्रचूडेमंडित हस्त ॥
दशांगुळीं मुद्रिका झळकत । अवतारस्वरूपे हरीच्या ॥ २७ ॥
असो ऐसी ते रूक्मिणी । भीमक राजा अंकीं घेउनी ॥
बैसलासे सभास्थानीं । सकळ नृपानीं वेष्टिला जो ॥ ३० ॥

## १० ‘ कुब्जावर्णन ’[१५८]

( कृष्णपत्न्यानीं केलेले )

परमचतुर जगज्जीवन । भाळला कुब्जा नारी देखोन ॥
डोळे पिचक मुडे कान । मध्यें नासिक बैसले ॥ १७१ ॥
कोळशाहूनि कुब्जा गोरी । उवा सदा बुजबुजतीं शिरीं ॥
गुडघे घासीत जाय चाचरा । तीस मुरारी भाळलासी ॥ १७२ ॥
रडत रडत सदा बोले । टाचा उलस्या खिरडत चाले ॥
लंब स्तन अंग वाळले । वस्त्र फाटले चहूकडे ॥ १७३ ॥

१५८ ह. वि. २१,१७१-१७५

जैसा मृदंगमध्य देख । तैसा माज तिचा बारिक ॥
मर्कटा ऐसे तिचे मुख । तीस रमानायक भाळला ॥ १७४ ॥
हा तरी नंदाचा गुराखा । ते कंसाची दासी देखा ॥
शोधूनि जोडा नेटका । बरा पाहिला विधीने ॥ १७५ ॥

## ११ 'द्वारकावर्णन'[१५९]

चोवीस योजने सविस्तर । रमणीय दिसे द्वारका नगर ॥
सप्तदुर्ग भोंवतीं परिकर । महा विशाळ प्रचंड ॥ ६३ ॥
सुवर्णमय दुर्ग दिसती । चरव्या[१६०] झळकती शेषफणाकृति ॥
रजनीमाजी वाटती । नक्षत्रें वरी जडियेलीं ॥ ६४ ॥
रत्नजडित चक्रे दिसती । जैसें पक्तीने बैसले गभस्ती ॥
भोंवता खंदक सरितापती । असंभाव्य उचबळे ॥ ६५ ॥
जैसे कनकाद्रीचे पुत्र पाही । तसे हुडे झळकती ठाई ठाई ॥
वरवर ते सर्व दाही । गर्जताती कृष्णनामे ॥ ६६ ॥
वरी ठेविली उल्हाट यत्रें । शस्त्रे झळकताति अपारें ॥
हुडोहुडीं मगळतुरे । रात्रंदिवस गर्जती ॥ ६७ ॥
ततवितत घन सुस्वर । वाद्ये वाजती मनोहर ॥
त्या नादे गोपुरें समग्र । दुमदुमिती सर्वदा ॥ ६८ ॥
दुर्गावरून एक पक्ती । कल्पवृक्ष दिव्य झळकती ॥
चपळा ऐसे ध्वज निश्चिती । लखलखतीअपार ॥ ६९ ॥

१५९ ह. वि. २९, ६३–७२ , १६० तोफाचे झरोके

महाद्वारे विशाळ झळकती । नवरत्नाचीं चक्रे वोप देती ।।
ऐरावतारूढ अमरपती । येत जात संभ्रमेसीं ।। ७० ।।
शतखणीं दामोदरे विशाळें । वाटे आकाशासि टेकण दिधलें ।।
कीं मित्ररथ अडखळे । निराळ पथ क्रमिता हो ।। ७२ ।।

* * *

— १३ —

# रामविजय

श्रीरामविजय ग्रंथ सुन्दर । भक्तिज्ञान वैराग्य भाण्डार ।।
दृष्टान्तरत्नें अपार । माजी सतेज झगमगती ।।[1]

## १. ग्रंथलेखनकाल

मागील प्रकरणात लिहिल्याप्रमाणे 'हरिविजय' ग्रंथ शके १६२४ मार्गशीर्ष शुद्ध द्वितीयेस संपवून श्रीधराने लगेच 'रामविजय' ग्रंथाच्या लेखनास सुरवात केली असल्यास या ग्रंथाच्या रचनेस त्याला बरोबर आठ महिने व पाच दिवस लागले असावे असे दिसते. कारण तो त्याने शके १६२५ श्रावण शुद्ध सप्तमीस पंढरीस संपविल्याचे लिहिले आहे,[2] म्हणजे

---

१ रा. वि. १, २२१

२ शके सोळाशे पंचवीस । सुभानुनाम संवत्सरास ।।
भानुसप्तमी शुद्ध विशेष । श्रावण मास विख्यात पै ।। रा.वि.४०, २०५
पंढरीक्षेत्रीं निश्चयेसीं । रामविजय संपविला ते दिवशीं ।। रा. वि. ४०, २०६

नऊ हजार एकशे सत्तेचाळीस ओव्या लिहिण्यास त्यास आठ महिने लागले. यावरून सरासरीने त्याने रोज फक्त अडतीसच ओंव्या रचल्या असे होते. हे प्रमाण फारच अल्प दिसते. तेव्हा त्याचे पहिले चार-पाच महिने निरनिराळीं 'रामायणे' वाचण्यात व कथासामुग्री जमविण्यात गेले असावे, आणि पुढील तीन—चार महिन्यात त्याने ग्रंथरचना केली असावी असे अनुमान करणें योग्य दिसतें.

## २ ग्रंथनामाभिधान

'हरिविजया'त जसे श्रीकृष्णाचे पराक्रम वर्णिले आहेत तसें यात श्रीरामचंद्राचे वर्णिले आहेत. तेव्हा त्या ग्रंथाप्रमाणे यासही त्याने **'रामविजय'** हें नाव दिलें हे उचितच आहे. या दोन्ही ग्रंथाच्या नामकरणाची उपपत्तिही कवीनें अगदीं एकसारखीच दिली आहे:—

ग्रंथनाम रामविजय । श्रवणे सदा पाविजे जय ।।
चिंतित मनोरथ सिद्ध होय । एक आवर्तन करिताचि ।।[३]

कवि म्हणतो या ग्रंथाच्या श्रवणानें रामाप्रमाणे श्रोतेहीं सर्वदा विजयी होतील, एवढेंच नव्हे तर त्याची मनोरथसिद्धीही होईल. अर्थात् तत्कालीन भाविक लोकास याहून अधिक आकर्षक आश्वासन काय असू शकेल ?

मूळ 'रामायणा'प्रमाणे या ग्रंथाची सात 'काण्डे' असून त्या प्रत्येकाचे अनुक्रमे आठ, चार, चार, दोन, पाच, दहा व सात असे एकूण चाळीस अध्याय श्रीधराने केले आहेत यावरून कवीनें 'युद्ध'

३ रा. वि १, २०४

काण्डास सर्वात अग्रस्थान दिले आहे त्याची ओवीसंख्याही सर्व काण्डाहून अधिक असून ती सर्व ग्रंथाच्या जवळ जवळ एक चतुर्थांशाइतकी म्हणजे दोन हजार दोनशे पन्चाळीस आहे तर ' बाल ' काण्डाची ओवीसंख्या दोन हजार अडतीस आहे ' किष्किंधा ' काण्ड सर्वात लहान असून त्याची ओवीसंख्या फक्त चारशे सत्तर आहे. ओवीसंख्येच्या मानाने इतर ' काण्डें ' या दोन टोकाच्या मध्ये बसतात चाळीस अध्यायाच्या ओव्याचे सरासरी प्रमाण २२८ ६ असे पडते. पण ' बाल ' काण्डाचा आठवा अध्याय सर्वात मोठा म्हणजे तीनशे सोळा ओव्याचा आहे व ' अयोध्या ' काण्डाच्या चौथ्या अध्यायात फक्त एकशे अठ्याहत्तरच ओव्या आहेत. यावरून विषयाच्या महत्त्वानुरूप काव्यरचना कमी-जास्त करण्यात कवीने कलात्मकता दाखविली आहे हे सहज दिसून येईल

## ३ ग्रंथाधार

' रामविजय ' ग्रंथासाठीं श्रीधराने अनेक 'रामायणें' वाचलीं होतीं हे त्याने केलेल्या त्याच्या नावाच्या उल्लेखावरून स्पष्ट दिसते पुढील 'रामायणा'चा निर्देश त्याने केला आहे:– ' वासिष्ठ ', ' शुक ' मारुतीचे ' नाटक—रामायण ' ' बिभीषण–रामायण ', ' ब्रह्म–रामायण ', ' शिव–रामायण '. ' अगस्ति–रामायण ', ' शेष–रामायण ', ' अध्यात्म रामायण ', ' शैव–रामायण ', ' आगम–रामायण', ' कूर्म–रामायण ', ' स्कंद- रामायण ', ' पौलस्ति–रामायण ', ' अरुण–रामायण ', ' पद्म-रामायण ', ' भरत–रामायण ', ' धर्म–रामायण ',' आश्चर्य–रामायण ' येणेंप्रमाणे एकोणीस 'रामायणा'चा उल्लेख करून तो म्हणतो :—

मूळापासून इतुक्या कथा । कैशा वर्णवतील तत्त्वता ।।
त्यामाजी वाल्मीकि नाटक थोर ग्रथा । रामविजयालागीं कथूं[४] ।।

असें ग्रथारंभी सागून शेवटीं तो म्हणतो:—

मूळ वाल्मीकिकृत ग्रंथ फार गोड आहे. त्यात ‘ हनुमन्तकाव्य’ फारच गोड आहे. आणखी कित्येक ग्रंथात व्यासानेंही ‘रामकथा’ सागितली आहे. तेथींचीं संमते घेऊन पढरीनाथाने जे माझे कर्णीं सागितले ते मीं लिहिले आहे. “ तर पचविसाव्यान कवि म्हणतो: —

“पूर्वीं क्षीरसिंधु मंथून जशीं चतुर्दशरत्ने निवडून काढलीं त्याप्रमाणे रामकथार्णव शोधून हा ‘ रामविजय ’ काढला आहे. ” पण प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं ‘ समत वाल्मीक नाटकाधार ’ असे सामान्य विधान त्यानें केलें आहे. यावरून हें स्पष्ट होत आहे कीं, मुख्य कथाभाग वाल्मीकि–रामायणातला जरी असला तरी आपल्या ग्रथात त्यानें अनेक रामायणातील चमत्कारिक व सुरस कथाचा सग्रह केला आहे आणि यामुळे त्याचा ग्रथ अत्यन्त आकर्षक, मनोरजक व बहुश्रुततादर्शक असा झालेला आहे. गोष्टीवेल्हाळपणा हें जे श्रीधराचें वैशिष्ट्य ते या ग्रथातही ठळकपणे दिसते.

आधार–ग्रथासंबधीं अशी वस्तुस्थिति असल्यामुळें निरनिराळया कथाभागाचे मूळ शोधून काढणें अशक्य आहे. तरी पण काहीं कथाचा छडा लावण्याचा प्रयत्न पुढे केला आहे. तो असा : —

१ सुलोचनेकडून इन्द्रजिताचे शिर हसावयास लावून तिच्या पातिव्रत्याची परीक्षा घेणे व नन्तर तिचे सती जाणें ही कथा ‘अग्निपुराणा’तली

४ रा. वि. १, ८५

आहे, विपरीत नाहीं. ही कथा फार रसिक वाटली म्हणून 'रामविजया'त योजली असें कवीनेच सांगितलें आहे[५]

( २ ) पुढील एकतीसाव्या अध्यायातील 'अहिरावण-महिरावणाची' कथाही त्यानें 'अग्निपुराणा'तूनच घेतल्याचें म्हटले आहे[६]

( ३ ) श्रीहनुमन्तजन्मकथेचे निरनिराळे पर्याय निरनिराळ्या पुराणांत आहेत. याचें कारण असें कीं, व्यासानें कल्पपरत्वे अवतारचरित्र निराळें सांगितलें असल्यामुळें तिनच्या कथा निराळ्या सांगितल्या आहेत. म्हणून त्या विपरीत मानण्याचें कारण नाहीं, ही कथा मी मूळ ग्रंथाधारेंच दिली आहे असे श्रोत्यांचे शंकासमाधान कवीनें मोठ्या चातुर्यानें केलें आहे.[७]

पुढील कथाभाग आनन्दरामायणा'त आढळतो तेव्हा तो श्रीधरानें त्यातून घेतला असावा असे वाटतें 'आनन्दरामायणा'च्या प्रारंभीं नव्वद संस्कृत 'रामायणां'ची यादी दिलेली आहे. श्रीधरानें वर सांगितल्याप्रमाणें जीं एकोणीस 'रामायणे' उल्लेखिलीं आहेत त्यापैकीं या नव्वदांत फक्त दहाच नावें आढळलीं. आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, पुढील कथाभाग जरी 'आनन्दरामायणा'त आढळतो तरी श्रीधर वरील एकोणीस 'रामायणां'मध्ये त्याचा निर्देश करीत नाहीं. तेव्हा या कथा त्यानें अन्य 'रामायणांतू'न घेतल्या असण्याचाही संभव आहे. असो. त्या कथा अशा:-

१ दशरथ-कौसल्याविवाहाची अद्भुत कथा 'आनन्द-रामायणा'त आहे.[८] त्याचप्रमाणे दशरथाने इतर सातशें बायका केल्या असल्याचेही त्यात

५ रा. वि. ३०, २०७-२०८ ; ६ रा. वि. ३१, २४६
७ रा. वि. ४, १-२४ ; ८ आ.रा., सार काण्ड, सर्ग, १

आहे. 'रामविजया'त या दोन्ही कथा आल्या आहेत.[९] पहिली मुळात नाहीं, तर दशरथाच्या भोगांगना तीनशे पन्नासच होत्या असे त्यात म्हटलें आहे.

२ रामलक्ष्मण पञ्चवटींत आल्यावर लक्ष्मण वनस्थळी पाहण्यास गेला होता. तेथे वंशजाळींत शूर्पणखापुत्र 'शंबरी' हा 'काळखड्ग-प्राप्तीसाठीं शंकराचे आराधन करीत होता ते खड्ग गगनपथें लक्ष्मणा-जवळ येऊन पडले. ते त्यानें घेतले व शंबरीसहित जाळी तुखड केली ही 'रामविजया'तील कथा 'आनन्दरामायणा'त आहे.[१०] ही मुळात नाहीं

३ 'रामविजयात' 'जानकी–जन्म'कथा सांगितली आहे.[११] तींत–सीता असलेली पेटी रावणास मिळाली ती त्याने मन्दोदरीच्या सांगण्या-वरून जनकाच्या राज्यात टाकवली. हीच कथा 'आनन्दरामायणा'तही आलेली आहे.[१२]

४ इन्द्रजित मारुतीशीं युद्ध करीत असता पराभूत होऊन विवरात दडला. मग ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून मारुतीने आपणास ब्रह्मास्त्रानें बन्धन करून घेतले. मारुतीच्या शेपटीस लंकेंतील सर्व वस्त्रे पुरलीं नाहींत, मर्व नगर-वासी नग्न केले, राणीवसा नग्न केला, नगरात तन्तुमात्र उरला नाहीं. नाग-रिक नग्न झाल्यामुळे रावणाकडे तक्रारी घेऊन आले रावणाने सीतेचीं वस्त्रे आणा म्हणताच त्याने पुच्छ आवरलें व ते सर्व आच्छादलें गेले. त्यास अग्नि लावतांना रावणाच्या सगळ्या दाढीमिशा जळाल्या या गोष्टी 'राम-विजयात' व 'आनन्दरामायणात' आहेत.[१३] मुळांत नाहींत.

---

९ रा. वि. २,१६०–१९०,३, १२

१० रा. वि. १४, ११–२१, आ. रा., सर्ग, ७, ४२

११ रा वि.७,२०७–२५४ १२ आ. रा., सर्ग, ९, ८६

१३ रा. वि २१,१–१००, आ. रा., सर्ग, ९,१८८–१९३

५ मारुतीने लंकादहनादिवृत्त स्वमुखे न सांगता ब्रह्मदेवाने तद्विषयक दिलेले सविस्तर पत्र रामास दिले,[१४] हे 'आनन्दरामायणा' मध्यें आले आहे.[१५] मुळात नाहीं.

६ "हनुमन्तानें लंकादहन केले परी तें नगर सुवर्णाचे कसे झाले?" या रामाच्या प्रश्नास जांबुवन्तानें गजेन्द्रोद्धरणाचा व गरुडक्षुधेचा वृत्तान्त सांगितला.[१६] 'आनन्दरामायणा' मध्ये पण ही कथा आली आहे.[१७]

७ सेतुबन्धनात 'रा' व 'म' अशीं अक्षरे शिळांवर घालताच त्या तरू लागल्या.[१८] ही कथा 'आनन्दरामायणा'तही आली आहे,[१९] पण हे वर्णन मुळात मात्र नाहीं व 'हनुमन्नाटका'तही नाहीं.

८ अंगदशिष्टाईत अंगद रावणास सांगतो:—"माझ्या पित्यानें तुला माझ्या पाळण्यावर बांधले होते. तेव्हा तुझ्या मीं दाढीमिशा उपटल्या आहेत व माझ्या मूत्रोदकेकरून तुझे मन कंटाळून गेले होते." त्याचप्रमाणें अंगद रावणाचा सभामण्डप डोक्यावर घेऊन रामाकडे आला. पण रामाज्ञेनें त्यानें तो पुनः परत नेऊन ठेवला.[२०] ही कथा 'आनन्दरामायणा'त आली आहे.[२१]

९ इन्द्रजिताच्या ब्रह्मास्त्राने मूर्च्छित झालेले वानर उठविण्यास व रावणाच्या शक्तीनें मूर्च्छित झालेल्या लक्ष्मणास उठविण्यास असा दोन

---

१४ रा. वि. २१, २१५ , १५ आ. रा., सर्ग, ९, २८०
१६ रा. वि. २२, १०१–११६ ; १७ आ. रा., सर्ग, ९, २८०
१८ रा. वि. २३, १५१–१६१ , १९ आ. रा., सर्ग, १०
२० रा. वि. २५, ४५–१०० ; २१ आ. रा., सर्ग, १०, २३३

वेळा मारुतीनें द्रोणागिरी आणला व परत नेऊन ठेवला. 'कालनेमी' राक्षसाचें विघ्न व त्याचा मृत्यु. द्रोणागिरि आणतांच भरतानें शङ्काकुल होऊन बाणानें पर्वतासह मारुतीस खालीं पाडिलें व पुनः त्यास बाणाग्रावर बसवून लंकेत धाडण्याचें आश्वासन दिलें. हा कथाभाग 'आनन्दरामायणा'त व 'रामविजयात' पण आहे.[२२] 'अहिरावण-महिरावणा'ख्यानही 'आनन्दरामायणा'त व 'रामविजया'मध्यें पण आहे.[२३] तशीच ही गोष्ट 'हनुमन्नाटका'तही आहे.[२४]

१० मय-दैत्य व हेमा याची दासी 'सुप्रभा' (स्वयंप्रभा) हिनें सीता-शुद्धि करूं इच्छिणाऱ्या वानरांस डोळे मिटण्यास सांगून एकदम समुद्रतीरीं नेऊन सोडलें.[२५]

११ हनुमान प्रथम पडलंकेंत (परलंकेंत) गेला.[२६]

आता 'हनुमन्नाटका'धारें कोणकोणते कथाभाग श्रीधरानें घेतलेले आढळतात तें पाहू. प्रथमतः 'वाल्मीकि'नाटक व 'हनुमन्तकाव्य' या नांवासंबधीं थोडा विचार करणें अवश्य आहे. 'आनन्द-रामायणा'च्या प्रस्तावनेंतील नव्वद रामायणांत'हनुमद् रामायण','मारुती-रामायण'व नाटक-रामायण' अशा तिहींचा उल्लेख आहे, म्हणून 'हनुमन्तकाव्य गोड बहुत'[२७]

२२ आ. रा., सर्ग, ११, रा. वि. २८, ११०-१२६ रा. वि. ३२, १८० २२४

२३ आ. रा , सर्ग, ११, रा. वि ३१

२४ ह. ना. १३, २५-३०

२५ रा. वि. १८, १७३-१९०; आ. रा., सर्ग, ८. १०१

२६ रा. वि. १९,४८-४९; आ. रा , सर्ग, ९, १६

२७ रा. वि. ४०, १३३

असें जेव्हा श्रीधर म्हणतो, तेव्हां हें काव्य अभिप्रेत असेल असें वाटतें. पण समत 'वाल्मीकि-नाटक' हा ग्रंथ कोणता? कांहीं विद्वानाच्या मतें हेंच 'हनुमन्नाटक' असावें. पण श्रीधरानें या दोहोंचा पृथक् उल्लेख केलेला आहे. व 'हनुमन्नाटका'तून श्रीधरानें घेतलेला कथाभाग फारच थोडा आहे. तेव्हां 'वाल्मीकिकाव्य' व 'हनुमन्नाटक' असें म्हणण्याऐवजीं त्यानें उलटें म्हटलें कीं काय अशी शंका येते. असो पुढें कांहीं कथाविशेष दिले आहेतः—

(१) कमठपृष्ठकठोरमिद धनुर्मधुरमूर्तिरसौ रघुनन्दनः ।
कथमधिज्यमनेन विधीयतामहह तात पणस्तवदारुणः ।।[२८]
कूर्मपृष्ठी जैसी कठोर । तैसे हें कोदंड प्रचंड थोर ।
दशरथकुमार सुकुमार । कैसें उचलेल तयातें ॥[२९]
मदनदहनाचें धनुष्य थोर । रघुनाथमूर्ति मदन मनोहर ।
अहा तात परम दुस्तर । अनिवार पण हा तुझा ॥

आणखी पुढें एकशें नऊ पर्यन्त अशाच ओंव्या आहेत. वामनपंडिताच्या 'सीतास्वयंवरा'तहीं याचाच शब्दशः अनुवाद आढळतो. [३०]

मदनशत्रुशरासन हें महा ; मदनमूर्तिच केवळ राम हा ।
करिल सज्ज कसा धनु आपण ? अहह दारुण तात ! तुझा पण।।

( २ ) सीताविरहांत राम चंद्रोदयीं लक्ष्मणास म्हणतोः—

सौमित्रे ननु सेव्यतां तरुतलं चंडांशुरुज्जृंभते ।
चंडांशोर्निशिका कथा रघुपते चंद्रोयमुन्मीलति ॥

---

२८ ह. ना. १, ९; एकनाथ. भावार्थ रामायण, अ. १९

२९ रा. वि ८, ९९-१००

३० वामनपंडित सीतास्वयंवर. २५

ह.सुप्रसिद्ध श्लोकाचा अनुवाद श्रीधराने'रामविजया'त केला आहे.[३१]

( ३ ) हारो नारोपितः कण्ठे मया विश्लेषभीरुणा ।
इदानीमन्तरे जाताः पर्वताः सरितोद्रुमाः ॥[३२]

याचा अनुवाद श्रीधराने 'रामविजया'त केला आहे.[३३]

मज आलिंगिता रामचंद्र । तेव्हा कठीं न साहेचि हार ॥
आता गिरि–कानन–समुद्र । दोघामध्ये पाडियेला ॥

मुक्तेश्वरानेंही या श्लोकाचा अनुवाद खालीलप्रमाणें केला आहे:–[३४]

............................... ................

रघुपति ! तुज प्रेमें क्षेम देता विनोदे ।

( ४ ) सीतेचे अलकार ओळखण्याच्या प्रसगीं लक्ष्मण म्हणतो :–

कुंडले नैव जानामि नैव जानामि कङ्कणे[३५]

इत्यादि श्लोकाचा अनुवाद 'रामविजया'त आहे[३६]

( ५ ) वालिवधसमयीं सप्तताल वक्र होते ते लक्ष्मणाने चरणागुष्ठाने दडपताच सरळ झाले ही गोष्ट 'हनुमन्नाटका'त व 'रामविजया'त[३७] आहे.

( ६ ) राम सीताविरहात वृक्षलतास सीताशुद्धि पुसतो: —[३८]

रे वृक्षाः पर्वतस्थाः गिरिगहनलता वायुना वीज्यमाना ।

..........................................

हा सीता केन नीता मम हृदयगता को भवान् केन दृष्टा ॥

३१ रा.वि. १६, ४०–४१ ३२ ह ना. ५, २५
३३ रा. वि. २०, ७३ ३४ मुक्तेश्वर. अरण्यकाण्ड, ७४
३५ ह. ना. ५, ३६ ३६ रा. वि. १७, १०६–११२
३७ ह ना. १, ४५; रा. वि. १७, १५४–१६०
३८ ह. ना. ५, १०, रा. वि. १६, २५–४१

याचा अनुवाद रामविजयात आहे.

( ७ ) राम जटायूस सांगतोः--"सीताहरणाची कथा मात्र स्वर्गात गेल्यावर तातास सांगू नकाः—

.... ...... .... .. ..... .... .. .........

ब्रूमस्त्वेकमिमा वधूहृतिकथा तातान्तिके मा कृथाः ॥

ही कथा 'रामविजया'त आली आहे.[३९]

( ८ ) ये मज्जन्ति निमज्जयन्ति च परास्ते प्रस्तरा दुस्तरे॥[४०] इ. याचा अनुवाद 'रामविजया'त आहे. यावरून श्रीधराने 'हनुमन्नाटकां'तून काव्यमय वर्णनें घेतलीं आहेत तर 'आनन्दरामायणा'तून चमत्कारिक कथा घेतल्या आहेत असे दिसते.

श्रीधराने प्रत्येक अध्यायात समत-- वाल्मीकिनाटक' असे म्हटले आहे. हेच मळ वाल्मीकि 'रामायण' असे मानावे तर मुळास सोडून अनेक गोष्टी त्याने वर्णिल्या आहेत. त्यापैकीं काहीं मुख्य पुढे दिल्या आहेत

( १ ) वसिष्ठानें पायस तिघींस दिले. कैकेयीचा भाग घारीनें नला. तिला दोघींनीं अर्धे अर्धे दिलें. म्हणून 'भरत' व 'शत्रुघ्न' असे दोन पुत्र तिला झाले.[४१] मुळात पायसाच्या वाटणींत सुमित्रेस कौसल्या व कैकेयी याकडून दोन दोन आणे हिस्सा मिळाला म्हणून तिला 'लक्ष्मण' व 'शत्रुघ्न' असे दोन पुत्र झाले. याच्या उलट श्रीधर सांगतो कीं, कौसल्या व

---

३९ ह. ना. ५, १६, रा. वि. १६, ८४–८७

४० ह ना. ७, १९; रा. वि २३, १६२–१६३

४१ एकनाथ. भावार्थ रामायण. अ. ४ व ७

सुमित्रा या दोघींनी कैकेयीस पायसविभाग दिला म्हणून तिला 'भरत' व 'शत्रुघ्न' असे दोन पुत्र झाले. घारीचा वृत्तान्तही मुळात नाहीं, पण 'अध्यात्मरामायणात' या दोन्ही गोष्टी आहेत.[४२]

( २ ) अहिल्या 'देवराजकुतूहलात्' इन्द्राशीं जाणूनबुजून रममाण झाली व गौतमापासन आपले व माझें रक्षण कर असें त्यास म्हणाली.[४३]

कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ गच्छ शीघ्रमितः प्रभो ।
आत्मानं मां च देवेश सर्वथा रक्ष मानद ॥

तिला गौतमानें शाप दिला तोः—[४४]

वायुभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी ।
अदृश्या सर्वभूतानामाश्रमेऽस्मिन् वसिष्यसि ॥

व रामदर्शनानें पापमुक्त होऊन पुनः मजजवळ येशील. शापान्त होण्याचा समय आला तेव्हा ती रामदर्शनास आली व तिला पाहून रामलक्ष्मणानीं तिच्या पायावर डोकें ठेविलें अशी मुळात कथा आहे. श्रीधरानें ही कथा अगदीं निराळी दिली आहे:—[४५] सूर्यग्रहणाच्या दिवशीं 'गौतम' नदीवर ध्यान करीत बसला असता गौतमाच्या वेषानें इन्द्र आला व "अहल्ये ! धाव धाव" असें ओरडून त्यानें दारात अंग टाकलें. तिनें त्यास आत नेऊन पलंगावर निजविलें व त्याचे दुराग्रहास्तव स्वपति म्हणूनच त्यास रति दिली. पुढें गौतमासही तिनें असे सांगितलें कीं, मला चाण्डाळानें कापट्यानें फसविलें. इन्द्र समजून मीं कुकर्म केलें नाहीं. गौतमानें नन्तर "शिळा हो" असा

४२ रा. वि. ३, १७६–१९५; वा. रा. बालकाण्ड, सर्ग १७, २८–३०
४३ वा. रा. बालकाण्ड, सर्ग ४८, २१–२२
४४ वा. रा. बालकाण्ड, सर्ग, ४८, ३३–३४, ४९, १६–१८
४५ रा. वि. ७, १५०–१७०

शाप दिला व "रामाच्या पदरजस्पर्शाने उद्धरून तू मजप्रत येशील" असा उःशाप दिला. पुढे श्रीधर म्हणतो, काहीं कवि वर्णन करतात कीं, रामाने पादस्पर्शानें अहल्येचा उद्धार केला. पण अहल्या ही ब्राह्मणपत्नी, महासती होती तिला राम पाय कसा लावील ? याचा सन्तानीं विचार करावा.तेव्हा चरणरजानेच तिचा उद्धार झाला असेच समजावे. [४६] वाल्मीकिरामायणात 'बाल'काण्डाचे विरुद्ध 'उत्तर'काण्डात,'अध्यात्मरामायणात','गणेश' पुराणांत, 'ब्रह्म'पुराणांत, 'स्कन्द'पुराणात व 'आनन्दरामायणा'त अहल्येकडून अजाणता पाप घडलें असे आहे; पण अहल्येला दिलेल्या शापाबद्दल या सर्वात फरक आहे. 'उत्तर'काण्डात 'विरूप होऊन रहा'; 'अध्यात्मरामायणा'त 'शिलेवर बस व तप कर'; 'गणेश'पुराणात 'शिला हो', 'ब्रह्म' पुराण व 'आनंदरामायण' यात 'शुष्क नदी हो'; 'पद्म'पुराणांत 'तुझें शरीर मासरहित शुष्क होईल' असे आहे. तर 'स्कन्द'पुराणांत गौतमच अहल्येच्या शुद्धीसाठीं तप करू लागला असे आहे. त्या मानानें इन्द्रास दिलेल्या शापात कमी फरक आहे. मुळात 'विफल होशील' असे आहे. तर 'लिंग'पुराणात गौतमानें त्याचे वृषण उपटले असे म्हटलें आहे. इतरत्र 'सहस्रभगवान् भव' असाच शाप आहे. यावरून कविकल्पनानीं समूळ कथा कशी वाढत व बदलत जाते हें सहज दिसून येईल. श्रीधराचा कटाक्ष 'अहल्याशिळा राघवें मुक्त केली । पदीं लागता दिव्य होवोनि गेली॥' या रामदासांच्या श्लोकावर असावा असे दिसते.

*(३) राम-सीताविवाहाचे वर्णन वाल्मीकि'रामायणा'त आलें आहे. [४७] तो विवाह ब्राह्म पद्धतीनें झाला. त्यात स्वयवराचें नावही नाहीं. धनुर्भंगाचा

---

४६ रा.वि.७,१२१–१२२ ; ४७ वा.रा.बालकाण्ड,सर्ग,७०-७३

पण जनकाचा होता. निर्जीव वस्तु पणास लावली तर ते द्यूत होतें. सजीव लावली तर त्यास 'समाह्वय' म्हणतात.[४८] पण पुढे सीता स्वतःच अनसूयेस सांगते[४९]:—'एवं दत्तास्मि रामाय तदा तस्मिन् स्वयंवरे' येथे 'स्वयंवर' शब्द औपचारिक समजावा. कारण, स्वयंवरासारखे थाटमाट होतात. अनेक राजे शिवधनुष्य तोलण्याला आले व हरले. तेव्हा चिडून त्यानीं एक वर्ष-पर्यन्त मिथिलानगरी रोधली.[५०] पुढे देवास प्रसन्न करून चतुरंग बल जनकाने मिळविलें व त्यास पराभूत करून वेढा उठविला. त्या राजात रावणाचे नांवही नाहीं. रामाने धनुर्भंग केला तेव्हा रावण व इतर राजे नव्हते; पण इतर प्रेक्षक पुष्कळ होते.

या मूळकथेवर अनेक संस्कृत–प्राकृत कवींनीं कशीं रसभरित वर्णनें केलीं आहेत हे सुप्रसिद्ध आहे. अर्थात श्रीधरही त्यातलाच आहे. ('रामविजय', अध्याय ८;एकनाथ,'भावार्थ रामायणां'त–"रावण होता"–वगैरे प्राकृत कवींसारखे वर्णन केलें आहे.)

( ४ ) सीतेने आपल्या गळ्यातील दिव्य हार हनुमन्तास दिला ही मूळ कथा.[५१] पण श्रीधराने त्यावर मखलाशी केली आहे तीः—[५२]

---

* टीपः—वरील (२), (३) मधील माहिती सातवळेकर 'रामायण' प्रत पृष्ठे ५६६, ६११ व ६१३ च्या आधाराने दिली आहे.

४८ मनुस्मृति. ९, २२३

४९ वा. रा., अयोध्याकाण्ड, सर्ग, ११९, ५४

५० वा. रा. बालकाण्ड, सर्ग, ६६, १७–२४

५१ वा. रा., युद्धकाण्ड, सर्ग, ३०

५२ रा. वि. ३६, १६५–१७२

एक एक मणी फोडीला । दाढेखालीं घालूनिया ॥
म्हणे यांत नाहीं रघुनन्दन । म्हणोनि देतसे भिरकावून ॥
व्यर्थ पाषाण काय करू ॥

पुढे हृत्कपाट उघडून सर्वांस "राम" त्याने दाखवला ही कथा 'अध्यात्म-रामायणात' आहे; पण मुळात मात्र नाहीं.

( ५ ) सीतेच्या रावणगृहीं झालेल्या वासानिमित्त लोकापवाद उद्भवला हें मुळात आहे पण तेथे रजकाचे नाव नाहीं;[५३] पण श्रीधराने 'पद्म-पुराणा'नुसार रजकाचा उल्लेख प्रामुख्यानें केला आहे.[५४] एकनाथानीं. आपल्या 'भावार्थ रामायणा'त रजकाचा उल्लेख केला नाहीं.[५५]

( ६ ) मुळांत 'अश्वमेध' यज्ञार्थ गेलेल्या वाल्मीकि. ऋषीने लव-कुशांकडून रामचरित्र गायन करविलें. त्याचे पाचशे सर्ग होते. बहुत दिवस ते ऐकून झाल्यावर रामाने सीतेस पुनः दिव्य करण्यास सांगितले, तें तिने केलें व भूमिप्रवेश केला.[५६] त्यात लवकुशानीं अश्वमेधीय अश्वाचे बन्धन केल्यावर तत्प्रीत्यर्थ झालेले युद्ध ही कथा नाहीं.[५७] परन्तु संस्कृत–प्राकृत कवींचा हाही एक मोठा आवडता वर्ण्य विषय झालेला आहे. श्रीधराने

---

५३ वा. रा. उत्तरकाण्ड, सर्ग ४३, ५४ रा.वि. ३७,२३-२९; पद्मपुराण, पातालखण्ड अ. ५५, ४६

५५ एकनाथ. भावार्थरामायण. उत्तरकाण्ड, ४४-४५

५६ वा. रा., उत्तरकाण्ड, सर्ग, ९३-९७

५७ पद्मपुराण,पाताल ख.अ. ५४'लव अश्वमेध-घोडा धरतो';एक-नाथ भावार्थ रामायण अश्वमेधउ.कां अ. ६५-६६ 'लव अश्व बाधतो'.

तो फारच थाटाने वर्णिला आहे.[५८] त्यात सीतेचे द्वितीय दिव्य नाहीं. उलट रामाने सहकुटुंब सपरिवार वाल्मीकीसह अयोध्येस गमन केलें व यज्ञ पुरा केला व त्यासमवेत अनेक वर्षे राज्य केले असें सागितलें आहे.[५९] अर्थात् रामाचे 'निजधामवर्णन' त्यानें केलें नाहीं. तो सांगतो:–"रघुनाथ मध्यान्हीं प्रकट होऊन म्हणाला कीं, मी अज–अव्यय आहे. व तोच मी ब्रह्मानन्द पंन्ढरीनाथ भीमातीरीं उभा आहे. तेव्हा येथे ग्रथ समाप्त कर त्याप्रमाणें नमस्कार घालून मीं ग्रंथ संपविला".[६०]

यावरून एवढाच निष्कर्ष निघतो कीं,वर एका ठिकाणीं सांगितल्या-प्रमाणें श्रीधराने रामकथार्णव मन्थन करून अनेक अद्भुत व आकर्षक कथारत्ने काढलीं आहेत व त्यायोगें आपला रामविजय–कथाहार अत्यन्त रम्य व उज्वल.बनविला आहे; आणि त्याच बरोबर हे म्हणणेही क्रम-प्राप्तच होते कीं, प्रत्येक अध्यायाच्या अन्तीं ' संमत वाल्मीकिनाटक ' ही त्याची ग्वाही केवळ औपचारिक आहे.

## ४ काव्यस्फूर्ति, विनय व आत्मविश्वास

कवि म्हणतो:—" गजाननरूपी वरदचन्द्र उगवतांच माझा हृदय समुद्र उल्हासला व त्यास अपार साहित्यभरते आले. जरी एकन्दरींत हा माझा उद्योग असभाव्य असला, तरी बाळाचा छन्द जसा पिता पुरवितो तसा माझ्या ग्रथाचा छन्द तो गजानन सिद्धीस नेईल. त्याचप्रमाणें सरस्वतीनेंही माझी प्रार्थना ऐकून कृपेने माझ्या जिव्हाग्रीं ठाणें घातलें आहे व सद्गुरूचाही मला आशीर्वाद मिळाला आहे. तरी पण सतश्रोतेहो !

---

५८ रा.वि.अ.३७, ३८ व ३९ ; ५९ रॉ.वि.३९,१७८–१९०
६० रा. वि. ४०, १२७–१३१

माझें बोलणे अत्यन्त अरुष आहे. दृष्टान्त कसे द्यावे हें मी जाणत नाहीं; तरी तुम्ही प्राकृतावर बहुत प्रीति ठेविता हें नवल आहे. तो आनन्दघन सन्त बोलले:—"बा श्रीधरा ! तुझे बोल ऐकून आम्ही निवालों. आता रामकथा तुझ्या गोड दृष्टान्तांसह सुरू करः—

मेरु सुन्दर रत्नेंकरून । कीं नक्षत्रें मंडित गगन ॥
कीं वृक्ष फळीं परिपूर्ण । तैसा दृष्टान्तें ग्रंथ शोभे ॥[६१]

आता शब्दजाल टाकून देऊन कथेस सुरवात कर". असें ऐकताच त्यानें कथेस आरंभ केला.

या ग्रथाचा एक विशेष हा आहे कीं, यात श्रीधराने अनेक संस्कृत-प्राकृत कवींस त्याच्या वैशिष्ट्याचा उल्लेख करून त्यास नमन केलें आहे.[६२] ते कवि असे :—

समग्र कुमतांचा उच्छेद करून जगदुद्धार करणारा जगद्गुरु 'श्रीशंकराचार्य', भागवतटीकाकार 'श्रीधराचार्य,' अपार ग्रंथकर्ते 'मधूसूदनादि', शृंगारवनींचा विहंगम असा 'जयदेव', वेदान्तार्णवींचा मीन असा विवेकसिन्धुकार 'मुकुन्दराज', विष्णूचा अवतार व गीतार्थकार 'ज्ञानेश्वर', भानुदासकुलभूषण अनेक ग्रथकर्ता 'एकनाथ', चातुर्य राजधानीचा कळस व ज्याचे ग्रथ पाहता ब्रह्मानद उसळतो असा 'मुक्तेश्वर मुद्गल–दास', चंडांशूसारखा व्योमीं तळपणारा व अपूर्व श्लोकरचना करणारा वामन-

---

६१ रा. वि. १, ६६

६२ रा. वि. १, ८६-१०२

स्वामी, शान्तिदयेचें निजधाम असा ब्रह्मचारी 'कृष्णदास जयराम',[६३] श्रीराम-उपासक, भजनसरोवरींचा 'मराळ' व जनांस ज्याने प्रबळ भक्ति शिकविली असा 'रामदासमहाराज', ब्रह्मानंदस्वामीचा बन्धु व ज्याच्या कवितेच्या श्रवणाने अपार जन उद्धरले असा 'रंगनाथ' वगैरे कवींस व आणखी जे कित्येक कविवर आहेत तेही ब्रह्मानंदरूपच असल्यामुळें त्यासही मी शरण आलो आहे. या सर्वांनीं माझ्या प्रयास वर द्यावा.[६४] इतक्या ग्रंथकाराचा उल्लेख श्रीधराच्या इतर ग्रथात आढळत नाहीं.

पुढे श्रीधर विनोदाने सांगतो[६५] कीं, एखाद्या निरुद्योगी व आळशी माणसास देव साह्यकारी झाला कीं, त्याला सहज माती खणता खणता जशी अकस्मात् मांदूस सापडावी तशीच माझी गत गुरुप्रसादाने झाली बहुवस अभ्यास न करता मला ही 'रामविजय-मांदूस' सापडली. मग माझा हर्ष गगनात मावेना. उघडून पहातों तों आत सप्तकाण्डात्मक एकाहून एक रसाळ अशीं सात कोहळीं मिळालीं. न्याहाळून पहाता त्यात भक्ति, ज्ञान, वैराग्ययुक्त अशीं दिव्य नाणीं आढळलीं. तोंच चतुर, ज्ञानसपन्न श्रोते बंधुभावानें धावून आले व आम्हास समान वाटा दे असें. प्रेमभराने

---

६३ कृष्णदास जयराम । जो शातिदयेचे निजधाम ॥
ज्याचे ग्रंथ ज्ञानपरम । जो निःसीम ब्रह्मचारी ॥ रा. वि. १, ९९

हे दासपंचायतनातील सुप्रसिद्ध 'जयरामस्वामी वडगावकर' असावे. (शके १५२१ ते १५९४). याचे ग्रंथ: 'दशम-स्कन्ध टीका', 'रुक्मिणी-स्वयंवर', 'सीतास्वयवर', 'अपरोक्षानुभव', 'शान्तिपचीकरण' व 'ज्ञानी--भक्त संवाद'. याच्या गुरूचें नांव 'कृष्णस्वामी' होतें. भावे.म.सा पृ.२२८-२२९

६४ रा. वि. १, १०२ ; ६५ रा. वि. २७, १-९

भांडूं लागले. मी ही आनन्दाने त्याच्या पुढे एकसरें तीं रिचविलीं आहेत. यातील श्रीधराची ईश्वरश्रद्धा, व श्रोत्यावरील त्याचें सात्विक प्रेम यांचा आविष्कार फार हृदयगम झाला आहे.

श्रीधराने आपल्या ग्रथाची प्रशंसा प्रत्येक अध्यायाच्या आद्यंतीं केली आहे. आरंभीं प्रस्तुत अध्यायाची तर शेवटीं आगामी अध्यायाची स्तुति असते. चालू अध्यायावर वाचकाचें लक्ष स्थिर करावे व पुढल्या-सबधीं उत्कण्ठा वाढवावी असा दुहेरी हेतु या योजनेत आहे. या प्रशंसेचें सहज निरीक्षण केले असतां ती श्रोत्यांची व ग्रथाची अशी द्विविधरूप आहे. श्रीधराने आपले श्रोते सन्त, चतुर, पंडित, प्रेमळ व व्युत्पन्न असल्याचे सागितलें आहे.[६६] पुढे तो म्हणतो[६७]:—"अशी सज्जनाची मादी मिळालेली दिसताच वाग्देवी धावत आली व तिने शद्बरत्नाची भरणी (थैले) भरून तीं वेगानें भक्तिपेठेस आणलीं. ग्राहकांच्या आवडीप्रमाणे त्यातून शद्बरत्ने काढून त्याच्या पुढे ठेविलीं. ज्याप्रमाणे एखादी सुग्रण क्षुधिताच्या अपेक्षेप्रमाणें त्यास वाढते त्याप्रमाणे श्रोत्याचे अतरग जाणून मी त्यांच्या पुढें रामकथा ठेविली आहे. चतुर श्रोता भेटला असता वक्त्यास आनन्द होतो. उलट मतिमन्दापुढे तो मावळतो.पण सुदैवाने माझे सन्त श्रोते बृहस्पतीसारखे चतुर आहेत, म्हणून मी आता साहित्यसुमनाचे हार गुफून त्याच्या गळ्यात घालीत आहे." माझ्या या 'रामविजय' ग्रथ-मंदिराच्या चाळीस कोठड्यात अपार साहित्यद्रव्य भरले आहे.[६८] एकाहून एक सरस असे प्रसग यात आहेत. हा ग्रथ म्हणजे दृष्टान्ताकिरणांनीं वेष्टि-

६६ रा. वि. ३९

६७ रा.वि.१०,१-७;११,१-१०

६८ रा. वि. ४०, १९०

लेला वासरमणि व साहित्यगणांनीं वेष्टिलेला चन्द्रच आहे.[६९] अथवा या ग्रथपंढरीनगरात अपार दृष्टान्तयात्रा भरलेली आहे.[७०] मेरुपाठारीं जशा रत्नखाणी तसे दृष्टान्त या 'रामकथे'त आहेत. फार काय सागावें ? पण

' दृष्टान्तावीण ग्रथ संपूर्ण । रसीं न चढे सर्वथा॥[७१]

असें म्हणून समग्र ग्रथांत सहावा अध्याय हा दिव्य अलौकिक हिरा आहे व तोः—

हृदयपदकीं जडोनि देख । संतश्रोते अनुभविती ॥

अशी त्यानें शिफारस केली आहे.[७२] आणि हें रत्नजडित पदक कोणतें तर वसिष्ठानीं रामास उपदेशिलेलें 'योगवासिष्ठा'तील वेदान्त-तत्त्वज्ञान होय. यावरून काव्याचे रसानीं, रसाचे दृष्टान्तानीं, दृष्टान्तांचें शब्दरत्नानीं व शब्दरत्नांचें वेदान्तप्रतिपादनानें सौभाग्य वृद्धिंगत होतें असें श्रीधराचें मत होतें असें दिसतें.

ही झाली मनोरजनाची बाजू. पण श्रीधरानें आपली ग्रथरचना केवळ मनोरंजनासाठींच केलेली नाहीं. तें एक साधन आहे, साध्य नव्हे. रामायणांतील अनेक उद्बोधक कथांनीं श्रोत्यास नीति-सदाचारसंपन्न करून त्यांस परमार्थप्रवण करणें हें त्याचें ध्येय आहे. आणि म्हणूनच फलश्रुतींत वाचकाचें दुःखदारिद्र्य व संकटें याचें निरसन होऊन त्यास ऐहिक व पारमार्थिक सुखाचा लाभ होईल असे आश्वासन त्यानें दिलें आहे. एवढेंच नव्हे तर या ग्रंथरघुवीरानें अहंदशकंधर मारून ब्रह्मानंदकृपेनें–

" पळालें भवदुःख दरिद्र । भाग्य घरा आलें अपार"॥[७३]

---

६९ रा. वि. ४०, १९१ ; ७० रा. वि. ४०, १९४

७१ रा. वि. १३, ६ ; ७२ रा. वि. ६, २५३

७३ रा. वि. ४०, १९४

असा स्वानुभव त्याने सांगितला आहे असे वाटते. तेव्हा अशा ग्रंथाकडे धांव घेण्यास वाचकास आणखी आमिष कोणतें असू शकेल ?

'रामायणा'तील कथा आबालवृद्धांच्या परिचयाच्या आहेत, तेव्हा 'रामविजया'तील कथाभाग सांगण्याचें प्रयोजन नाहीं. या ग्रंथाचे आधार सांगताना काहीं विशेष गोष्टींचा उल्लेख मागे आलाच आहे. आता ज्या काहीं कथा सामान्यतः साधारण वाचकाच्या अवलोकनात येणाऱ्या नाहींत अशाचा उल्लेख कुतूहलार्थ केला आहे :—

वाल्मीकीची उत्पत्ति (अध्याय एक), रावण व त्याचे बंधु याची उत्पत्ति व दशरथकौसल्याविवाह (अध्याय दोन), विश्वामित्र रामलक्ष्मणास मागावयास आला होता त्या वेळीं रामाची उद्विग्नता दूर करण्यासाठीं वसिष्ठाने 'योगवासिष्ठ' सांगितले (अध्याय सहा), वालीसुग्रीवाची उत्पत्ति ( अध्याय सतरा ), उलूकगृध्राचा नीडाबद्दल वाद व त्याचा रामाने केलेला निवाडा. गौतमशापाने 'ब्रह्मदत्त' गृध्र झाला होता. त्याचा रामदर्शनाने उद्धार झाला. 'दण्डकारण्य' हे नाव का व कसें पडलें ही कथा अगस्ति रामास सांगतो. तिचा सारांश असा कीं,एकदा इक्ष्वाकुपुत्र 'दण्डक' मृगयेस गेला असता तो भृगूच्या आश्रमात विश्रामार्थ गेला. तेथे त्याची दशवर्षांची 'अरजा' कुमारी दृष्टीस पडली. तिच्यावर त्यानें कामातुर होऊन बलात्कार केला. भृगु आश्रमात परत आल्यावर ती अचेतन पडलेली पाहून क्रुद्ध झाला व सात दिवसात तुझें राज्य सर्व कुल व प्रजा यासह भस्म होईल असा दण्डकास त्यानें शाप दिला. त्याप्रमाणें तो सर्व देश शून्य होऊन पडला. म्हणून त्यास 'दण्डकारण्य' हे नाव पडले. पुढें मेरुविंध्याद्रींच्या कलहात अगस्तीनें दक्षिणेस येऊन तो देश वसविला. इ.

अशा रीतीनें निरनिराळ्या पुराणातून चमत्कारिक कथा निवडून

त्यांचा साक्षेपानें आपल्या ग्रंथांत संग्रह करणारा कवि जिज्ञासु वाचकास प्रिय व्हावा हें साहजिक आहे.

## ९ रसपरिपोष

(अ) करुण रस—मूळ 'रामायण' महाकाव्य नवरसानीं भरलेले आहे. पण आद्य कवि 'वाल्मीकि' यास 'रामायण' रचण्यास जी स्फूर्ति झाली तिचे मूळ शोकांत आहे. कारण वाल्मीकीचे 'शोकः श्लोकत्वमागतः' हे वचन सुप्रसिद्ध आहे. त्याच प्रमाणें 'रामायणकथा' ही शोकान्तिकाच असल्यामुळे तींत शोकास म्हणजे 'करुण' रसास प्राधान्य मिळावे हें स्वाभाविक आहे. तसेंच काव्याचा मुख्य विषय 'सीताहरण' व 'रावणवध' हा असल्यामुळें तदर्थ झालेल्या अनेक युद्धात 'वीर' रसासही त्याच्याचबरोबर अग्रस्थान मिळालें आहे. म्हणून 'करुण' व 'वीर' हे या काव्यातील मुख्य रस होत. अद्‌भुत शृंगार, वत्सल, प्रेयान्, शान्त भक्ति, हास्य, रौद्र, भयानक व बीभत्स वगैरे इतर रसांसही यथोचित स्थान श्रीधराने आपल्या 'रामविजयां'त दिलें आहे. या निरनिराळ्या रसाचा कोठे कोठें व कसा परिपोष झाला आहे हे थोडक्यांत पुढे पाहू.

'रामायण'कथेस प्रारभ 'श्रावण' वधापासून झाला आहे. त्या प्रसंगीं अकस्मात् घडलेल्या हत्येमुळे शोकाकुल झालेला 'दशरथ' व पुत्र निधनाचा शोक करणारीं श्रावणाचीं मातापितरें याचे चित्र आपल्यापुढें येतें. या ठिकाणीं त्याच्या तोंडीं जी कुपुत्रनिन्दा घातली आहे ती अस्थानीं असल्यामुळें येथे करुण रसाचा परिपोष चागलासा झालेला दिसत नाहीं. पण हा प्रसगही गौण असल्यामुळें मुख्य कथेकडे लक्ष ठेवून तो कवीनें थोडक्यात आटोपला हे योग्यच झालें.

शोकरसाचा मुख्य प्रसग रामवनवासाचे वेळीं येतो. त्या ठिकाणीं दशरथाचा व कौसल्येचा शोक अत्यन्त हृदयद्रावक झाला आहे.[७४] कवि म्हणतो[७५]:—

वनीं निघता रविकुळमंडण । दुःखे उलथती कठिण पाषाण ॥
गज तुरंग पशु पक्षी सपूर्ण । तृण जीवन न घेती ॥

या ठिकाणीं 'अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम्' या 'भवभूती'च्या वर्णनाची आठवण वाचकास झाल्याशिवाय राहाणार नाहीं[७६]. पुढें दशरथमृत्यु,[७७] सीताहरणप्रसगीं सीतेचा शोक,[७८] सीताविरहात रामाचा शोक,[७९] पुढे वालिवधप्रसगीं तारेचा शोक,[८०] सुलोचना गहींवर,[८१] रावणमदोदरीशोक,[८२] बिभीषणाचा व मंदोदरीचा रावणवधप्रसंगींचा शोक,[८३] या सर्व स्थळीं शोक रस अत्यन्त गाढ व गंभीर झाला आहे. 'उत्तर'काण्डांतील सीतात्यागाच्या वेळचा सीतेचा विलाप हृदयाचें पाणी पाणी करणारा असा झाला आहे.[८४] या सर्व वर्णनांवरून करुण रसाच्या परिपोषात श्रीधराचे तारतम्य व नैपुण्य हीं चांगलीं दिसून येतात.

( आ ) **वीररसः**— वीररसास मारुतीजन्मापासून जो प्रारभ होतो तो थेट अखेरपर्यन्त जागोजागीं आपणास आढळतो. धनुर्भग,

---

७४ रा. वि. १०, १६४–१९६ , ७५ रा. वि. १०, १९३
७६ भवभूति. उत्तररामचरित्र. १, २८ , ७७ रा. वि. ११, १०१-१०९
७८ रा. वि. १५, १४६–१६० , ७९ रा. वि. १६, १४–४२
८० रा. वि. १८, ९–१० , ८१ रा. वि. ३०, २५–६२
८२ रा. वि. ३३, २५–२७
८३ रा. वि. ३३, १४३-१४४; १५४-१६२ ; ८४ रा. वि. ३७, ७३-९२

परशुरामपराजय ताटकावध, मखसंरक्षणसमयीं खर-दूषणाशीं युद्ध, विराध-वध, हनुमन्ताची सीताशुद्धि व लंकादहन वगैरे प्रसंगींचा पराक्रम, या स्थळीं वीररसाचा उठाव चांगला झाला आहे; आणि 'युद्धकाण्डात' तर वीररसाच्या नद्या दुथडी भरून वाहात आहेत. अहिमहि–रावणाख्यान, लक्ष्मण–इन्द्राजितयुद्ध; राम-रावणयुद्ध या ठिकाणीं तो फारच उत्कट झालेला आहे. उत्तरकाण्डातील लवकुशाचा पराक्रम फारच चेतोहर व आश्चर्यजनक झाला आहे खरा.पण शत्रुघ्नाने व रामानें कुशलवाबद्दल त्यासमयीं जें प्रेमा-विष्करण केले आहे त्यामुळे येथे खरा वीररस न होता वीररसाभास झाला आहे. वीररसाचा प्रारंभ व परिपोष करण्याची श्रीधराची एक विशेष हातोटी आहे. प्रथमतः दोन्ही पक्षाकडील वीर समोरासमोर येताच ते एकमेकाचीं उणीं काढून व आपापली प्रौढी मिरवून वर्दळीवर येतात व तिचें पर्यवसान युद्ध जुंपण्यात होते युद्ध प्रथमतः बाणानीं व शस्त्रानीं, नंतर नाना विविध अस्त्रें व शक्ति याच्या क्षेपणाने बहुधा जमिनीवर, तर क्वचित् अन्तरिक्षातूनही होतें. या वर्णनातील भाषा मोठी ओजस्वी व उत्साहवर्धक असते

या ग्रंथात वरील दोन रसाच्या खालोखाल ' अद्भुत 'रसवर्णन आढळते. वाल्मीकीचा उद्धार, दशरथ–कौसल्याविवाह, सीताजन्म, हनुमन्तजन्म, रामजन्मसमयीं कौसल्येस झालेलें दिव्य दर्शन,हनुमन्ताचे समुद्र-लंघन, सभाविटंबन, लंकादहन, सीतेस रामलक्ष्मणाचीं शिरे दाखविणे, द्रोणाचल आणणें, सुलोचनेने मृतपतीचें शिर हंसविणें, सीतेचें अग्निदिव्य, व शंबूकवधानें ब्राह्मण मुलाचें पुनरुज्जीवन होणें वगैरे अनेक स्थळीं या रसाचा परिपाक उत्कृष्ट उतरला आहे. या अदभुततेने काव्यास जरी एक प्रकारचे अद्भुतरम्य व भव्य स्वरूप येत असले तरी पण एकन्दर चित्र

मानवतेपासून दूर दूर जाऊन ते अतिमानवतेकडे झुकत गेल्यामुळें त्या-पासन विस्मय वाटला तरी वास्तवतेचा आनन्द होत नाहीं.

( इ ) **शृंगाररस** :—यानन्तर शृगाराकडे वळूं. याचा स्थायिभाव रति हा आहे. पण आलंबन भाव भिन्न असता त्यास भिन्न नावे मिळतात. स्त्रीपुरुषविषयक रतीस 'शृगार' हे नाव दिलेलें आहे. तर देव, गुरु याच्या विषयींच्या रतीस ' भक्ति ' म्हणंतात. माता, पिता, पुत्र, बन्धु, भगिनी इत्यादिकाच्या रतीस ' वत्सल ' तर मित्रप्रेमास ' प्रेयान् ' अशा संज्ञा आहेत. मुख्य शृगाराचे 'सभोग' व 'विप्रलंभ' असे दोन भेद आहेत. आता ' रामविजया'त या रसाचा आविर्भाव जेथे झाला आहे त्या स्थळांचा थोडक्यांत निर्देश करू.

'रामायणा'त शृङ्ग ऋषि व अप्सरा याच्या भेटींत प्रथम शृंगार-वर्णन येतें. ते समोग शृगाराच असूनही कवीने पुष्कळ संयम दाखविला आहे. पण स्त्री ही महानरकाची वाट दाखवणारी दिवटी आहे. तिच्यायोगें मोक्षसुख दुरावते वगैरे जो लाबलचक वेदान्तपूर्ण पाल्हाळ केला आहे त्यामुळें शृगाराचा परिपोष न होता शान्ताचाच झाला आहे असें वाटतें.[८५]त्यानन्तर कान्तार्थिनी शूर्पणखा व लक्ष्मण याच्या भेटीच्या वर्णनात शृगार आला आहे. या ठिकाणीं शूर्पणखेची अभिसारिकेची भूमिका कवीनें फारच उत्कृष्ट रीतीने रगविली आहे. राम-सीतेस अनुलक्षून 'भावोजी' व 'बाई' म्हणून सबोधणारी व कामातुर असताही विवाहार्थ रामाची अनुज्ञा प्रत्यक्ष न मागता शालीनतेने बाईचे द्वारा मागणारी, सुन्दर शूर्पणखा म्हणजे कवीने आपल्यापुढें लज्जाविनयविनम्र अशी एक अभिजात कुलवधू उभी केली आहे असें वाटतें. परन्तु या ठिकाणीं आलंबन एकपक्षी असल्यामुळे

८५ रा. वि. ३, १३८–१५८

शृंगाराचा परिपोष होणें शक्य नाहीं व कवीस तें अभिप्रेतही नाहीं. त्यामुळें येथें खरा शृगार नसून 'शृगाराभास' आहे.[८६] तीच गत रावणाने सीतेस वश करण्यास वेळोवेळीं केलेल्या अनुनयाची असल्यामुळे तेथेही रसाभासच आहे. [८७] पण तत्पूर्वी सीताहरणानन्तर रामाच्या विरहात कवीनें विप्रलभ शृगार अतिशय हळुवार हातानें चित्रित केला आहे. हनुमन्नाटकादि सस्कृत काव्याची यावर दाट छाया पडल्यामुळे तो फारच अभिजात व हृदयस्पर्शी झाला आहे. [८८] पुढें रामसीता याच्या वनक्रीडेचे व वसंतऋतूचें वर्णन सुन्दर असून शृगाररसानुकूल आहे. पण येथेंही कवीने दोहदपृच्छेपुरते केले असल्यामुळे तेथेही शृगारपरिपोष पूर्णत्वाने झाला आहे असें म्हणवत नाहीं. या मुख्य स्थळाच्या निर्देशावरून ' राम विजयां'त खऱ्या शृगारपरिपोषास पूर्ण अवसर कोठेंहि मिळाला नाहीं असें म्हणावें लागतें.

( ई ) भक्तिरसः—भक्तिरस हा श्रीधराच्या विशेष आवडीचा असल्यामुळें जेथे जेथें अवसर मिळाला तेथें तेथें त्याने त्याचें अविष्करण मोठ्या तन्मयतेने केलें आहे. अगदीं प्रारभींच नाममाहात्म्याने 'वाल्या'चा ' वाल्मीकि ' कसा झाला ही कथा भक्तिरसपूर्ण झाली आहे. पाचव्या अध्यायाच्या आरभीं रामकथा हें एक दिव्य 'जहाज'आहे; त्यात नवविधाभक्तीचे नव खण, वरतीं फडकणारे प्रेमाचें शीड, व त्याचा कर्णधार स्वयें रघुनाथ आहे. हें रूपक मोठे सुन्दर झाले आहे. पुढें सातव्या अध्यायात अहल्याकृत रामस्तुतींत कवि म्हणतो:—

जैसी कोकिळा गर्जे वसंतकाळीं । तैसी स्तवून करीतसे । [८९]

---

८६ रा. वि. १४, ५२–८० ; ८७ रा. वि. २४, २५–३०
८८ रा. वि. अ.१६ व अ. २० , ८९ रा. वि ७, १९३

तशी गोड आहे. रामकृत रेणुकास्तोत्र,[१०] तारा, बिभीषण, सुलोचना, व मन्दोदरी यानी केलेली रामाची स्तुति व जागोजागीं कवीनें गाईलेलें गुरुमाहात्म्य हीं सर्व स्थळे भक्तिरसपूर्ण झालीं आहेत. दशरथकौसल्या यांचें रामप्रेम, व सीतेचें लवकुशांबद्दलचे प्रेम यांत उत्तम वत्सलरस पहावयास मिळतो. तर भरताचें अलौकिक व दिव्य बंधुप्रेम पाहून आपण थक्क होतों. सुग्रीव-बिभीषणाचे मित्रप्रेम व हनुमन्ताची दास्यभक्ति ही श्रेष्ठ प्रतीची आहे.

(उ) **हास्यरस.**—हास्यरसाला या कथेत फारच थोडें स्थान मिळालें आहे. भरत ससैन्य रामभेटीस आला तेव्हा भीतीने विप्रसमुदाय पलायन करू लागला.त्या वेळच्या त्यांच्या धादलीच्या वर्णनात थोडा विनोद आहे.[११] तसाच लक्ष्मणानें नाक-कान कापल्यावर शूर्पणखेच्या शखध्वनि-वर्णनांत भयानकमिश्रित हास्यरस थोडासा आहे.[१२] मारुतीने सीताशुद्धीच्या प्रसंगीं ज्या नाना चेष्टा व लकादहनादि जे पराक्रम केले त्यावेळी रावणाची व लोकाची झालेली स्थिति या वर्णनात हास्यरस आढळतो. सीता वश व्हावी म्हणून रावण अनुनय करताना तिला म्हणतो:—"राम-रावणाची राशि तूळ व नक्षत्र भिन्न तेव्हा तुझें माझे घटित जमतें, म्हणून तू मजशीं लग्न लाव" वगैरे भाषणांत थोडेशी विनोदाची छटा आहे. पण विनोदाला ठळक असे स्थान या ग्रथात मिळालेले नाहीं.

(ऊ) **इतर रसः**—गौतमाचा इन्द्रावरील क्रोध, रामभेटींत परशु-रामाचा क्रोध व अनेक प्रसगीं रावणाने व्यक्त केलेला क्रोध यात 'रौद्र' रस आला आहे. कुंभकर्णाच्या निद्रेचे वर्णन, विराधाचे व अशोकवनिकें-

१० रा. वि. १३, ३९-४६

११ रा. वि. १२, ३५-४० १२ रा. वि. १४,१०७-११३

तील राक्षसींचें वर्णन यात 'भयानक', तर रणात पडलेल्या वीराच्या व रावणाच्या प्रेताच्या वर्णनात 'बीभत्स' रस आला आहे. रामास, भरतास व दशरथस्त्रियास वसिष्ठानें केलेला उपदेश, तसाच तारेस, बिभीषणास व मन्दोदरीस रामानें केलेला उपदेश यांत'शान्त' रस विपुलतेनें आढळतो. पण 'रामायण' म्हटले कीं, दोनच रस डोळ्यापुढें येतात. ते म्हणजे 'करुण' व 'वीर'. अथवा भवभूति म्हणतो तसा:—[९३]

एको रसः करुण एव निमित्तभेदात् ।
भिन्नः पृथक् पृथगिवाश्रयते विवर्तान् ॥

एक करुण रसच खरा, आणि त्याच्या वर्णनात तर श्रीधराचा हातखण्डा असल्याचें सुप्रसिद्धच आहे. एकन्दरींत या ग्रंथांत रसाविर्भाव बऱ्यापैकीं झाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं आता 'दृष्टान्तावीण ग्रंथ पूर्ण रसीं न चढे' हें जें श्रीधराचें दुसरें विधान त्याजकडे वळू:—

## ६ दृष्टान्त अलंकार

अभिप्रेत अर्थाच्या सपूर्ण व्यक्तीस दृष्टान्ताचा फार उपयोग होता. त्यांत प्रतिभा, व्यवहारचातुर्य, सूक्ष्मनिरीक्षण, भाषाप्रभुत्व वगैरे कवीचे गुण चागले कसास लागतात व काव्यास शोभा येऊन वाचकास अवर्णनीय आनन्द होतो हे अगदीं खरें आहे. ही दृष्टान्ताची पद्धति प्रथम ज्ञानेश्वरानें आपल्या 'ज्ञानेश्वरीं'त मोठ्या यशस्वितेनें उपयोजिली. उज्वल प्रतिभेचा उजळा त्यास मिळाल्यामुळे त्याचे दृष्टान्त कातिमान् व औचित्यपूर्ण झाले आहेत. एकनाथानें या पद्धतीचें अनुकरण केलें. पण मन्द प्रतिभेबरोबर त्याचें तेजही मन्दावले. मुक्तेश्वराच्या उच्च प्रतिभेंत पुनः त्यास रग चढला. श्रीधराने या पूर्वगामी कविश्रेष्ठाची प्रथा उचलली. पण 'दृष्टान्त'हेंच काव्य-

९३ भवभूति. उत्तरराम–चरित्र. ३, ४७

सर्वस्व आहे अशी चुकीची समजूत त्याने करून घेतली आणि त्याचा त्यानें अतिरेक केला. 'अतिमात्रं सर्व दोषाय' या उक्तीप्रमाणें हा गुण दोषास कारण झाला आहे असें आम्हास वाटतें. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर यांच्या मानाने प्रतिभेची देणगी थोडेशी कमी प्रतीचीच मिळाली असल्यामुळे श्रीधराच्या दृष्टान्ताची प्रदीर्घ मालिका अगदीं निस्तेज व कंटाळवाणी वाटते आणि त्याच त्याच ठराविक दृष्टान्तांचें चऱ्हाट येऊ लागले कीं, असें म्हणावेसें वाटतें:–"बा ! श्रीधरा आता पुरे ! आम्हास सर्व पावलें. आता कथानु-सन्धान सुरू कर." असो.

'रामविजया'च्या कांहीं अध्यायातील दृष्टान्ताचे परीक्षण पुढे दिले आहे. त्यावरून श्रीधराच्या या बाबतींतील धोरणावर बराच प्रकाश पडेल असे वाटते. परीक्षणासाठीं एक, दोन, सहा, बारा, तेरा, बत्तीस व चाळीस असे अध्याय घेतले आहेत. ही निवड कोणत्याही विशिष्ट तत्त्वानुसार केलेली नाहीं, यदृच्छेनें केलेली आहे.

| अध्याय | एकूण ओंवी–संख्या | दृष्टान्ताच्या ओव्या | दृष्टान्त–संख्या | दृष्टान्त ओव्याचे एकूण ओंव्याशीं शेकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|
| १ | २०६ | ७६ | १५५ | ३८ |
| २ | २३३ | ४५ | ९० | १९ |
| ६ | २५७ | ५० | ५० | २० |
| १२ | १७८ | ६६ | १२६ | ३७ |
| १३ | २४३ | ४८ | ८० | २० |
| ३२ | २६४ | ४८ | ८० | १८ |
| ४० | २०४ | १४ | १४ | ७ |

पाहिल्यातील दृष्टान्ताचे पृथक्करण केल्यास 'श्रीगजानन' व 'सरस्वती' याची स्तुति व ती करण्याची अशक्यता यावर अनुक्रमे तेवीस व बारा,'गुरु'व 'सन्त-श्रोते' यावर वीस व एकुणचाळीस,'नरदेहाचें' 'नामा'चें व 'प्राकृत' भाषेचे महत्त्व यावर दहा, चौदा व वीस व बाकीचे 'वाल्मीकि', 'शंकर' वगैरेंवर मिळून एकशे पंचावन्न होतात. हा पहिलाच अध्याय असल्यामुळे व यात वरील वर्णनें आल्यामुळे त्यात दृष्टान्ताची गर्दी उडाली आहे. पण यातच चन्द्रास 'कापूर'; सूर्यास 'दर्पण', कामधेनूस 'अजाक्षीर' वा 'तृण' सुरतरूस 'बदरी' व मलयाला 'धूप' ,क्षीरसिन्धूस, 'पल्लवीं वायु बाधणें', सिन्धूचे जीवन गणणे, मृगाक–'चादणे','ऊर्वीचें'वजन वगैरे दृष्टान्त किंचित् फरकानें वा जसेच्या तसेच पुनरुक्त झाले आहेत. याची पुनरुक्ति इतर अध्यायात व श्रीधराच्या इतर ग्रंथातही पुष्कळ आढळते मात्र जेथे कवीस कथाभाग सागावयाचा असतो तेथे दृष्टान्ताचे प्रमाण कमी होत जाते. शेवटल्यात समारोप असल्यामुळे तें फारच कमी झाल्याचे वरील कोष्टकावरून दिसून येईल. या कोष्टकावरून विचार केल्यास स्थूलमानाने या ग्रथाचा सुमारे एक पंचमाश भाग दृष्टातानीं व्यापलेला आहे, असें अनुमान निघतें. एकन्दरींत श्रीधराने सन्ताच्या तोंडीं घातलेली आत्मस्तुति बरीचशी अत्युक्तीची दिसते.[९४]

वरी दृष्टात गोड तुझे । मेरु सुदर रत्नें करून ।।
कीं नक्षत्रे मडित गगन । कीं वृक्ष फळीं परिपूर्ण ।।
तैसा दृष्टातें ग्रंथ शोभे ।।

मात्र त्याचीं "शब्दरत्ने" तो म्हणतो त्याप्रमाणें निवडक व निर्दोष

९४ रा. वि. १, ६५–६६

आहेत. पण त्यातील वेदान्तप्रतिपादन म्हणजे 'पदक' हे मत मोक्षप्राप्ति हेंच काव्याचे ध्येय मानणाराव्यतिरिक्त इतरास रुचेलसे वाटत नाहीं, पण याही मताचा पुरस्कार अगदीं अलीकडे काहीं विद्वान् करूं लागले आहेत. असो.

## ७ विद्वत्ता व तत्त्वज्ञान

यासबधी 'हरिविजया'च्या चर्चेत बरीच सविस्तर माहिती दिली आहे. तिचेंच प्रतिबिंब या ग्रंथातही जागोजागीं पडलेलें आढळतें अद्वैत वेदान्त व मायावाद कवीस अभिप्रेत असून तो मोक्षसाधनात भक्तीस वर्चस्व देतो. पण अखेर "ज्ञानादेव तु कैवल्यम्" हाच वेदान्तसिद्धान्त त्यास मान्य आहे. म्हणून या ठिकाणीं पुन: ते सविस्तर न सागता केवळ काहीं ठळक स्थळाचा उल्लेख मात्र केला आहे.

श्रीधराच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें बहुश: नवीन अध्यायाच्या अथवा नवीन कथाविभागाच्या प्रारभीं थोडक्यात व सुलभ असें वेदान्त-प्रतिपादन असते. 'रामविजया'तही तसे आहे. वेदान्तावाचून नुसती व्युत्पत्ति हे कोरडे जान आहे, असे तिसऱ्या अध्यायात सागून दशरथ कौशल्येस डोहाळे पुसण्यास जातो त्यावेळेस ती चार देहाच्या पलीकडील परात्पर, परसात समाधिस्थ झालेली अशी त्याला दिसली. मी ध्याता, ध्यान, लय, लक्ष्य या वेगळा सर्वसाक्षी अचिन्त्य व अलक्ष्य श्रीराम आहे हें तिचें उत्तरही वेदान्ती थाटाचे आहे.[९५] पुढे पाचव्यात रामाच्या पाळण्याजवळच्या सुवासिनींत निर्वाणदीक्षा स्वरूपस्थिति, मुमुक्षा, निष्कामना, चार वाणी,

---

९५ रा. वि. ४, ८५–१०६

चार मुक्ति, तीन अवस्था, बारा, चवदा, सोळा वगैरे अनेक होत्या. त्यांनीं कौसल्येची ओंटी भरली व त्या घरीं गेल्या असें वर्णन आहे. यांतच षड्-दर्शनाचा त्यांच्या वैशिष्ट्यासह उल्लेख आहे. सहाव्यात वसिष्ठाने रामास महावाक्याचा दिव्योपदेश केला आहे. 'योगवासिष्ठा'चा उल्लेख 'हरि-विजया'तही आला आहे.[९६] पुढें दशरथ रामाच्या विवाहास वऱ्हाड घेऊन निघाला त्यावेळच्या वर्णनात सर्वत्र वेदान्तपरिभाषा उपयोजिली. आहे. उदाहरणार्थ शमदमाचें पायभार, सद्विवेकाचे तुरंग,निजबोधाचे कुंजर.,वगैरे थाटानें तें वऱ्हाड 'विदेह' नगरांत गेले तेथें अव्याहत वाद्यगजर होत होता[९७]इ. परशुरामभेटीच्या वर्णनात चारी, माही, अटराजणी इ. वेदान्त-रूपक बरेंच लाबले आहे.[९८] अयोध्यावर्णनांतही पुनः वेदान्त आहेच.[९९] रामानें तारेस उपदेश केला त्यात वेदान्त आहे.[१००]लंका व रावण यावरील दीर्घ रूपक अध्याय तीस मध्यें पहावयास मिळतें.[१०१]बिभीषण रामास शरण येतो तेव्हा त्याच्या तोंडीं जो वेदान्त घातला आहे त्यात व्याकरण, सांख्य, न्याय, मीमांसा याचा उल्लेख केलेला असून कवीने त्यास शब्दरत्ने कीं भक्तीचीं उडुगणे म्हटलें आहे.[१०२]मन्दोदरी–सीता याच्या भेटींतला संवाद वेदान्तमय आहे.[१०३] रामानें बिभीषणास वेदान्तोपदेश केला आहे.[१०४] तर लक्ष्मण शक्तिप्रहारानें मूर्च्छित झालेला पाहून मोहग्रस्त झालेल्या रामास

---

९६ ह. वि. १,१००;रा.वि.६,९;९७ रा. वि. ८, १६८-१७४
९८ रा. वि. ८, २३२-२५४ ; ९९ रा. वि.८,२८४-३००
१०० रा. वि. १८,१०-२५ ; १०१ रा. वि.२०
१०२ रा. वि. २३, २०-२८ ; १०३ रा. वि. २४,८३-११३
१०४ रा. वि. ३३, १५१-१५३

विभीषणानें उपदेश केला आहे. ही वेदान्तप्रतिपादनाची प्रवृत्ति कांहीं स्थळीं दोषावह कशी झाली आहे हें पुढे दोषदर्शनांत येईलच.

कवीची कल्पनाशक्ति व भाषाप्रभुत्व यांचें मूल्यमापन त्यानें उपयोजिलेले शब्दार्थालंकार, सुभाषितें व म्हणी यांवरून होत असल्यामुळे त्याचेही पुढे थोडेंसे दिग्दर्शन केलें आहे. शब्दालंकारांत श्रीधराला अनुप्रास व शब्दांवर श्लेषयुक्त कोट्या करण्याची फार हौस होती असें दिसतें. ग्रंथारंभीच "मंगळ" शब्दाचा अनुप्रास आढळतो. असे अनुप्रास मधून मधून पुष्कळ आहेत. अजन्मा जन्मेल; यज्ञभोक्ता रघुनाथ त्याला यज्ञोपवीत; ज्याला वर्णितां वेद वेडे झाले तो रामगुरूपाशीं वेद पढे; खर तो केवळ खरमुख; अखया तुझा क्षय एके क्षणें करीन; अमित्राचें भार पाहून स्मरारिमित्राचे वीर उठले; असे विरोधाभासात्मक शब्दश्लेष जागोजाग आढळतात. अर्थालंकारांत 'उपमा व रूपक' हे त्याचे आवडते अलंकार होत. पण त्यात विशेष चमत्कृतिजनक असे अगदींच थोडे. एक दोन उदाहरणे पुढे दिलीं आहेतः—

(१) स्फटिकशिळेवरी श्रीराम । बैसला तेव्हां घनश्याम ।
जेवीं कैलासा द्यावया क्षेम । बलाहक उतरला[१०५] ॥

(२) कनकफळावरी कंटक दाट । तैसे शर रुतले सघट[१०६] ॥

(३) वेळूवरी घालितां कुठार । चिरत जाय जैसा दूर ।
तैसी श्रीरामाची बुद्धि तीव्र । तर्क अपार न गणवे[१०७]॥

---

१०५ रा. वि. १६, १८१ , १०६ रा. वि. ३२, ९९
१०७ रा. वि. ९, ४७

(४) शब्दभवाब्धी भरला अपार । कवितालक्ष तारू थोर ॥
स्फूर्तिवायूच्या बळे सत्वर । जहाज चाले त्वरेनें [१०८] ॥
सद्गुरुकृपाब्धि बन्दर । येथे शब्दरत्नें भरलीं अपार ॥
संतपेठेसीं आणिलीं साचार । ग्राहक थोर म्हणोनियां [१०९] ॥
तरी सादरता देऊनि धन । घ्या जी शब्दरत्नें परीक्षा करून [११०] ॥

पहिल्या तीन ओव्यांतील उपमा व शेवटल्यातील परपरित रूपक हीं सर्व अभिनव असून हृद्य आहेत. इतर अलकाराची त्यास फारशी आवड नाहीं तरी पण उत्प्रेक्षा अपन्हुति, परिसख्या वगैरे क्वचित् आढळतात एकन्दरींत कवीची कल्पनाशक्ति फार उच्च जरी नसली तरी मध्यम प्रतीची खास आहे असें वाटतें पण सुभाषितें व म्हणी यांची मात्र गर्दी मोठी असून त्याचें भाषाप्रभुत्व वाचकांस सहज पटतें. मागें 'हरि-विजया'त आलेलीं उदाहरणें गाळून नवीन तेवढीच दिलीं आहेत.

## ८ सुभाषितें

१ ) विद्या बहुत जवळी असे । परी तयासी कोणी न पुसे ।
बोलों जाता मति भ्रंशे । तरी देव क्षोभला जाणिजे॥ रा.वि.६

२ ) मुख्य धर्म परोपकार । अधर्म नाम साचार ॥
परपीडा करणें हें ॥ रा. वि. ६, २४४

३ ) खरपृष्ठीस चदन देख । परी तो नेणे सुवाससुख ।
षड्रसीं फिरवि जे दर्वीपाक । रसास्वाद नेणे ती ॥ रा. वि. १२, १७०

१०८ रा. वि. १०, ८ ; १०९ रा. वि. १०, ९
११० रा. वि. १०, १०

४ ) दुर्जयाचा चित्ती घात । त्यासी निदोळी उमाकात ॥रा. वि.
१४, २९

५ ) जैसी आपण क्रिया करावी । ते ते सवेचि लागे भोगावी ॥
रा. वि. १४, ३२

६ ) जो बैसला क्षीराब्धीच्या तटीं । तो काजी न इच्छी कदा ॥
रा. वि. १४, ६२

७ ) सुमनावरून साचार। वृक्ष चतुर ओळखती ॥ रा.वि. १४,८२
बोलावरून कळे चित्त । आचरणावरून पूर्वार्जित ॥
रा. वि. १४,८३

८ ) शत्रु नाग कृशान । हे म्हणो नये लहान ॥
क्षणे हरितील प्राण । यास्तव सावधान असावे ॥
रा. वि. १५, २०

९ ) ज्याचे गाठीस आयुष्य फार । तोचि वृद्ध म्हणावा साचार ॥
ज्याचे मरण जवळी निर्धार । तोच धाकुटा बोलिजे ॥
रा. वि. १८, २०१

१० ) दुग्धे न्हाणिला वायस । परी तो कदा न होय राजहंस ॥
दह्यांमाजी कोळसा बहुवस । घालिता उजळ नव्हेचि ॥
रा. वि. २५, १०४

११ ) जन्मभूमी जान्हवी जननी । सद्गुरुस्थळ पवित्र अवनी ॥
शिव हरि प्रतिमा संत देखोनी । साष्टाग नमन करावें ॥
रा. वि. ३५, १३१

१२ ) अपवित्रासी उत्तर देता । येत हीनता श्रेष्ठासी ॥
रा. वि. ३५,२१४

## ७ ९ म्हणी

१ ) पाळती राखोन वाट पाडणें.

२ ) मजवर हत्या पडली.

३ ) भाष घेतली ( वचन ).

४ ) नसतें बंड वाढविसी.

५ ) शब्द कर्णीं आकर्णिले.

६ ) फांटा फुटलासे बहुत ( फार वाढले ).

७ ) भूताची झडपणी करणें.

८ ) पाप देशधडी जाहलें.

९ ) काळें तोंड घेवोनी गेला कोणीकडे.

१० ) क्षितीवर घालून घेतलें ( पडली ).

११ ) पाठीं न घाली तया कोणी.

१२ ) लागता पातया पातें दर्भे छेदिलें नयनांत.

१३ ) पडल्या आकाशा धीर देईन.

१४ ) बोबडी वळली.

१५ ) तुझी तुज फळेल करणी.

१६ ) बहुत भुंकती श्वान । परी कदा न भी वारण ।।

१७ ) चुना माखून वायस । जाहले जैसे राजहस ।।

१८ ) गोड शर्करा ओसंडून । राख का मुखीं घालावी ।।
मुक्तें टाकून पदरीं । खापरें का बाधावीं ।।

१९ ) पाषाणाखालीं सापडला हस्त । तो युक्तीने काढावा अकस्मात ।।

२० ) कास घालणें; कासे लावणे.

२१ ) उरावरला पाषाण उतरणें.

२२ ) बोटानें दिवस मोजणें.

२३ ) तुमचा मंत्र तुम्हाला फळला.

२४ ) कानावर हात ठेवणें इ.

## १० संवाद व चतुरालाप

'हरिविजया'प्रमाणे या ग्रंथात कवीनें चतुरालाप व संवाद यांचा स्पष्ट उल्लेख जरी केलेला नसला तरी मधून मधून चमकणारें त्याचें चटकदार सौन्दर्य वाचकाचें मन आकर्षित केल्याशिवाय रहात नाहीं. अशा कांहीं स्थळांचा पुढे निर्देश केला आहे. प्रथमतः 'मन्थरा' व 'कैकेयी' यांचा रामराज्याभिषेकासंबन्धीं झालेला संवाद आपल्या पुढे ठळकपणें येतो. त्यावरून मन्थरेसारखी कुटिल व दुष्ट दासी स्वभावतः सद्वृत्त पण चंचल अशा कैकेयीस कशी स्वार्थपरायण व दुष्ट बनविते हें चांगलें दिसून येते. तर पुढील कैकेयी-दशरथ संवादात एकीकडे कजाग बायकोची मनधरणी व दुसरीकडे अलोट पुत्रप्रेम या कात्रींत दशरथाच्या मनास झालेल्या तीव्र वेदना पाहून वाचकास त्याची कींव येते. तदनन्तर कौसल्या-रामाच्या भेटींत तिच्या व लक्ष्मणाच्या व्यवहारी दृष्टीपुढे रामाचा धीरोदात्त स्वभाव अधिकच उठावदार दिसतो. वनवासगमनप्रसंगीं राम-सीता-संवादात सीतेचा बाणेदारपणा व सहचारिणीधर्म चांगलाच प्रतीत होतो. शूर्पणखा व राम-लक्ष्मण संवाद, शूर्पणखा–रावण संवाद, कांचनमृगप्रसंगींचा सीता–लक्ष्मण संवाद, रावण–मन्दोदरी संवाद, अग्निदिव्याच्या वेळचें सीतेचें भाषण, सीता–लोपामुद्रा संवाद व सीतात्यागसमयीं तिचें भाषण हीं सर्व प्रसंगानुरूप चांगलीं वठलीं आहेत. हनुमन्त–रावण संवाद, अंगदशिष्टाई व अश्वहरणप्रसंगींचीं कुशलवांचीं सैनिकांशीं झालेलीं भाषणें,

चातुर्य व वीरोचित औद्धत्य या गुणानीं आकर्षक झालीं आहेत. एकन्दरींत वरील सर्व प्रसंगीं श्रीधराची संवादकुशलता चांगली प्रत्ययास येते.

## ११. स्वभावपरिपोष

'रामविजयात' दशरथ, राम, लक्ष्मण व भरत हीं पुरुषपात्रें व कौसल्या, कैकेयी व सीता हीं स्त्रीपात्रें मुळाप्रमाणें यथोचित रंगविलेलीं आहेत. मात्र त्यातल्या त्यात कवीनें कैकेयीचें पात्र थोडें अधिक भडक रंगविले आहे. उदाहरणार्थ:—तिने सीतेला वल्कले देऊन तिच्या वस्त्राभरणाचा अपहार केला.

कैकेयी चांडाळीण खरी । सीतेची वस्त्रें भूषणें हरी ।।[१११]

त्यावरून वसिष्ठ व दशरथ या दोघानींही तिची निर्भर्त्सना केली आहे. भरताबरोबर ती ही रामाच्या भेटीस गेली होती, असे मुळात आहे पण ती न जाता घरींच एकटीच राहिली असे 'रामविजया'त दाखविलें आहे. राम लंकेहून परत अयोध्येंत आल्यावर कैकेयीने सीतेस जो कुत्सित टोमणा मारला आहे तो अत्यन्त अश्लाघ्य व नीचपणाचा आहे.[११२]तसेच

१११ रा. वि. १०,११७

११२ श्रोत्रियाचे पात्र पूर्ण । न कळता घेउनि गेले श्वान ।।
तें श्वान मारिले क्रोधें करून । तरी तें पात्र पवित्र नोहेची ।।
रा. वि. ३५, २११

तसा रामे रावण मारून । तुज आणिले सोडवून ।।
कोणे एके प्रकारे करून । कीर्ति त्रिभुवनीं प्रकटली ।।
रा. वि. ३५, २१२

राम कष्टला वनवासीं । परी तू सुख होतीस लंकेसी ।।
तेथींचा सोहळा मानसी । आठवत असेल तते ।। रा.वि ३५,२१३

रामास राज्याभिषेक झाल्यानन्तर ती वसिष्ठाजवळ रडगाणे गाते कीं, माझा भरत एकूण अभागी खराच ! का कीं, मी त्याच्यासाठीं एवढी राज्यसंपदा मिळविली ती टाकून त्याने चोदा वर्षे वनवासच केला आणि आता तर तो आपल्या बन्धूचा दास झाला आहे. तेव्हा असा पुत्र पोटीं आला हे माझ्या पापाचेंच फळ असावेसे वाटते.[११३] एकन्दरींत कवीने म्हटल्याप्रमाणे कैकेयीचे पात्र " कपटप्रकृति व सर्वदा रजतमयुक्त " असे रगलेले आहे.

रामाच्या प्रतिपक्षातील रावण, बिभीषण व इंद्रजित् इत्यादि पुरुषपात्रे; व मन्दोदरी, बिभीषण, पत्नी सुरमा व सुलोचना हीं स्त्रीपात्रें याचा स्वभावपरिपोष मुळाप्रमाणे सुरेख झाला आहे. त्यातल्या त्यात सुलोचनेचे पात्र अत्यन्त लोभनीय व उदात्त असे झाले आहे. इतर गौण पात्राचे स्वभावरेखन त्या त्या पात्रास अनुरूप असे झाले आहे. आता वर्णनाकडे वळूं :—

## १७ वर्णनें

( अ ) निसर्गवर्णनें :—क्षीरसागराच्या वर्णनात ' हरिविजया तील त्याच वर्णनाची पुनरुक्ति दिसते त्याचप्रमाणे ' अशोक ' वनात नेहमीप्रमाणे फणस, इक्षुदण्ड, लवग, केळी, नारळी, देवदार, जबू, कपित्थ अजीर वगैरे वृक्ष आहेतच. तीच गोष्ट रात्रीच्या वर्णनाची. त्यात 'काळ-पुरुषाची कावळी' कीं 'अविद्येने जगावर घातलेली खोळ' या रात्रीवरील उत्प्रेक्षा आहेतच. त्यातल्या त्यात ' काचनमृग ' वर्णन व सीतेचे ' अग्निदिव्यवर्णन हीं सरस उतरलीं आहेत

---

११३ रा वि. ३६, ११३–११६

(ब) स्वरूपवर्णनें :—यांत अहल्या, सीता, मन्दोदरी, सुलोचना यांची वर्णनेंही एक ठशाचींच दिसतात. हीं वर्णनें अनुक्रमे आठ, सव्वीस व तीस या अध्यायात आलीं आहेत [११४] दुसरी उपमा द्यावया नाहीं: मुखीं दंतपंक्ती अशा झळकतात कीं, बोलताना रत्ने विखुरतात; अंगींचा सुवास कोठे सदनात मावत नाहीं तर कोठे कोसभर पसरतो तर कोठे महदाकाश भेदून जातो, लावण्यसागरींच्या लहरी. अंगाच्या प्रभेने भूषणे झळकतात, कोटि अनंग तिच्या रूपावरून ओवाळून टाकावे; वगैरे ठरा-विक वर्णनें तिहींत आहेत.

(क) स्थलवर्णनें: —यात अयोध्या व लंका यांचीं वर्णनें बरीं आहेत इतर वर्णनात धनुर्भंग व सीतास्वयंवर हीं वर्णनें 'आनन्दतनया'च्या थाटाचींच झालीं आहेत. रामाने राज्याभिषेकानन्तर वानरभटास जी मेजवानी दिली त्या वेळच्या भोजनवर्णनात प्रारंभींचा थाटमाट मोठा आकर्षक वाटतो. [११५] त्या दिव्यान्नाच्या सुवासाला मोहून देवही लाळ घोटू लागले असे वाचून वाचकाच्या तोंडासही पाणी सुटते व श्रीरामपंक्तीचा लाभ आपणासही मिळावा म्हणून तो जो धिटाईने पुढे सरसावतो तोच दिव्यरत्नाच्या ताटातील पदार्थ वेदान्तरूक्ष झालेले पाहून सुवर्णपाटावर बसण्याचे त्यास रुचत नाहीं. हे पहा ते पदार्थ:—विश्वासाचे लवण, विरक्तीचे मिरगुंडें, नाना साधनांच्या शाखा सत्कर्मांच्या कोशिंबिरी, नवविधा भक्तीच्या खिरी, निश्चयाची शर्करा, निजबोधाचा भात, शान्तीचें वरान्न, अभेदाचे वडे, पूर्ण प्राप्तीचे मांडे, भूतदयेच्या धारिया, तलवरिया, सत्त्व घृतांत तळलेल्या गुळवरिया, वैराग्य अग्नीवर भाजलेले विवेकपापड, क्षमाफेण्या.

११४ रा. वि ८, ४२–५० २६, ६५–७२ ३०, १०–१५
११५ रा वि ३६, १२१–१४८

सर्वाभूतीं समता हीच घमघमीत कढी, गुरुकृपेचें घृत; अशा भोजनास सद्भक्त बसले; स्वानन्दजलाने प्रोक्षण झालें; मग देहबुद्धीच्या चित्राहुती घालून निवृत्तीचें आपोशन घेऊन 'सीताकान्त स्मरण जयजयराम' अशी गर्जना करून ते भोजनास बसले. मात्र कवि म्हणतो त्याप्रमाणें जे वेदान्त शास्त्रवेत्ते तेच याची गोडी जाणतील. इतर--

'ते टकमका उगेच पाहत । ग्रास एक न सेववे[११६] ॥

सामान्य वाचकाचीही अशीच निराशा होण्याचा संभव फार आहे. हा वेदान्ताचा अतिसोस जागोजागीं या ग्रंथात आढळतो. त्यामुळे लौकिक वर्णनाची निर्भेळ मौज त्यात पहावयास मिळत नाहीं.

'हरिविजया' प्रमाणें यातही नीति-सदाचाराचा उपदेश आला आहे. अहल्या, सीता, तारा, मन्दोदरी व सुलोचना या पतिव्रतांची जशी प्रशंसा आली आहे तशी शृंगऋषीस मोहविणाऱ्या स्त्रियांवरून स्त्रीनिंदाही आली आहे. परदाराभिलाष निंद्य व घातक आहे हे मारीच, मारुति अंगद, बिभीषण व मन्दोदरी यांनीं रावणाच्या कानउघडणींत स्पष्टपणे प्रतिपादिले आहे. त्याचप्रमाणे माता, पिता, देव, गुरु व ब्राह्मण यास मान द्यावा असे सागून कवीने सुपुत्रप्रशंसा व कुपुत्रनिंदा केली आहे. वाल्यास नारदाने केलेल्या उपदेशात पापपुण्याचे फळ ज्याचे त्यासच मिळतें व पाप्यास घोर यमयातना भोगाव्या लागतात, हे साविस्तर वर्णिलें आहे. सीताशुद्धिनन्तर हनुमानानें जे लंकावर्णन केलें त्यावरून धर्मात दंभाचरण निष्फळ आहे असे रामाने अनेक दृष्टान्त देऊन स्पष्ट केलं आहे.[११७] अर्थात् या मिषानें कवीने ढोंगी लोकास चांगला इशारा दिला आहे. पण

११६ रा. वि. ३६, १८८, ११७ रा. वि. ३४, १८३–१९०

रामानें शत्रुघ्नास जी राजनीति सांगितली आहे ती विशेष उल्लेखनीय आहे.[११८] का कीं, तींत साधुसन्त–गोब्राह्मण यांचा प्रतिपाळ वर्णाश्रमधर्मानुसार व यथान्याय करून सकळ दुष्टास दवडून स्वधर्म पूर्ण रक्षावा असें सांगितले आहे. यात कवीच्या काळीं रूढ असलेल्या स्वराज्याच्या ध्येयाचें प्रतिबिंब पडलेले दिसते.

आता 'रामविजयां'त श्रीधराने उल्लेखिलेल्या चालीरीति, लोकभ्रम, वेषभूषा, अलंकार यांचे थोडक्यात दिग्दर्शन करू. अर्थात् 'हरिविजयां'त ज्या गोष्टी आल्या आहेत त्याची पुनरुक्ति या ठिकाणीं टाळली आहे:—

## १.३ समाजस्थिति

रामाच्या मोंजीबंधनाचा उल्लेख मुळात नाहीं. पण श्रीधराने ते अकराव्या वर्षी झाल्याचे सांगितलें आहे, ते योग्यच आहे.[११९] पण लवकुशाची मुंज सातव्या वर्षी झाली असे तो म्हणतो.[१२०] वाल्मीकीस ते रामपुत्र व क्षत्रिय होते हे माहित असून असे कसे झाले? कदाचित् आश्रमात ब्राह्मण बटूबरोबर यांच्या मुंजीही झाल्या असाव्या अशी कल्पना श्रीधराने केली असावी. मुंजीनन्तर रामाचे वेदपठन, ब्रह्मचर्यआचरण व तीर्थाटन हे शास्त्राप्रमाणें झाल्याचेही सांगितले आहे.[१२१] लग्नविधि व सोहळे मागे वर्णिल्याप्रमाणेच आहेत. हल्लींच्या मंगळसूत्राऐवजीं गळसरी हे सौभाग्यचिन्ह होतें.[१२२] सुवासिनी कुंकुमतिलक लावीत.[१२३]

११८ रा. वि. १२, १२५--१४२ , ११९ रा. वि. ५, ६९
१२० रा. वि. ३७, १३७ , १२१ रा. वि. ५, ७३–७५
१२२ रा. वि. ५, ३५-९, १८६ , १२३ रा. वि. ५, ३६

कौसल्या व सुमित्रा या भरताबरोबर रामाच्या भेटीस गेल्या तेव्हा वस्त्रावरण त्यांनीं घेतले होते व त्याची पालखीही झाकलेली होती [१२४] सीताही रावणवधानन्तर रामाच्या भेटीस बुरखा घालून येते. यावरून सामान्यत: बुरख्याची चाल होती असे दिसते. मात्र पतिसन्निध धर्मकार्य वगैरे प्रसगीं अपवाद असे.[१२५] कन्यादान केल्यावर तिच्या घरीं मातापित्याने अन्न नेऊं नये, गोदान केल्यावर तिचे दूध पिऊ नये व विप्रास सदन दान केल्यावर त्यात शिरू नये, त्याप्रमाणें मीं तुला दान केलेल्या लंकेत येणार नाहीं असें राम बिभीषणास सागतो.[१२६] यावरून त्या चाली श्रीधराच्या वेळीं होत्या असे दिसतें. गतधवांचें सौन्दर्य व यवन काय जाळावयाचे आहे ? असे विधान दोनदा आलें आहे यावरून पुनर्विवाह रूढ नव्हता हे स्पष्ट आहे.

जन म्हणती ओस नगर । कैकेयीचे वपन करू सत्वर ॥

असे म्हटले आहे; यावरून विधवावपनाची चाल श्रीधराच्या वेळीं चालू होती असे दिसतें.[१२७] पुत्रवतीस सती जाण्याची मनाई होती स्वामीद्रोही माणसाचे नाककान कापून त्याची गाढवावर धिण्ड काढीत. राजा मृत झाल्यावर त्याच्या जागीं दुसरा गादीवर बसविल्याशिवाय मृताचे प्रेत दहन होत नसे. सदाचारी ब्राह्मण जरी वन्द्य होते तरी भ्रष्ट ब्राह्मणास वाळींत टाकीत. अन्त्यजाला श्रोत्रियाच्या घरीं प्रवेश होत नसे. इतकेंच नव्हे तर त्यास पाहून श्रोत्रिय पळत सुटे [१२८] महाराचा सपर्क पडल्यास

१२४ रा. वि. ११, २०५ . १२५ रा. वि. ३४, ७३
१२६ रा. वि. ३३, १८०–१८३ १२७ रा. वि. ११, २०७
१२८ रा. वि. १९, ९५

संपर्कवाल्यांस देहान्तप्रायश्चित्त होतें असे 'कटज' महार राजा झाला होता त्याच्या गोष्टीवरून दिसते.[129] आपला खरेपणा सिद्ध करण्यासाठी दिव्य करीत असत व त्यात जो खोटा ठरेल त्यास बहिष्कृत करीत असत.[130] अयोध्याप्रवेश रामचंद्रानें पुष्यार्कयोगावर केला.[131] तरीही तो शुभ-दायक झाला नाहीं ! मूद ओवाळून दृष्ट काढण्याची चाल होती. [132] राम वर प्राप्त व्हावा म्हणून सीता कोणता नवस करू म्हणून आपल्या 'विजया' सखीस विचारते.[133] व जेव्हा रावण शिवधनुष्य उचलू लागला तेव्हा सीता शंकर, गजानन व अंबा यास तें धनुष्य रावणास न उचलेल इतके जड करा अशी प्रार्थना करते.[134] राम वनात जातेवेळीं तो दृष्टावेल म्हणून कौसल्येने त्याच्या दण्डास व शेंडीला औषधी मणि बांधला.[135]

भूषणें व शस्त्रास्त्रे 'हरिविजया'प्रमाणेंच यातही आहेत म्हणून त्याची पुनरुक्ति केली नाहीं.

या वर दिलेल्या चालीरीतींत श्रीधराच्या काळीं रूढ असलेल्या अन्या-न्यशा चालीरीतींचे प्रतिबिंब पडलेले दिसते.

## १.४ भाषाशैली व व्याकरणविशेष

श्रीधराची भाषाशैली त्याच्या सर्व ग्रन्थात सामान्यतः एक ठशा-चीच दिसून येत असल्यमुळें तिच्या विषयीं येथे पुनः चर्चा न करिता फक्त निरनिराळ्या वैशिष्ट्यांची कांहीं नवीन उदाहरणे खालीं दिलीं आहेतः—

---

१२९ रा. वि. ६, १०० ; १३० रा. वि. २६

१३१ रा. वि. ३६, ३९–४०

१३२ रा. वि. ३९, १८५ ; १३३ रा. वि. ८, ५४

१३४ रा. वि. ८, ७३–७५ , १३५ रा. वि. १०, ७१

(अ) जुने शब्दः–मुक्ताफळाचा निढाळ ( गोळा )

बुन्थी ( बुरखा ); समुद्र पालाणील ( मार्ग बांधील ), ओंआती ( ओरडतात ); उलणें ( दुभगणे ), हेळसणें ( हेळसांड करणे ), वोळम्बा ( वाळवी. उदा:–अग्नीस वोळम्बा कैंची लागे[136]) पालेखाद्रा ( वानर ), चंवरडोल ( अम्बारी ); गुढार ( हौदा ), भकभकले ( थरथरले ), लवण ( उतार. उदा.–लवण पाहून उदक धावे ); निचार नेहाळीं ( मालिका ); घरटीकर ( गस्तवाला ); वरकोल ( कसवटी ), नाळीं ( भाडीं उदा:–कासार नाळीं करी ), असाळी ( भयकर-राक्षसी ); आरंबळे ( ओरडे. उदा: –व्याघ्र आरबळे ); खेटके ( चिलखत, ढाल ), चौबारा ( चवाठा ); ओंगें ( मातीचीं चित्रे ), कळापात्रे ( कलावन्तिणी ), आगवग ( नित्यक्रम, सवय ) कानाडी ( धनुष्याची दोरी ), कवेंत ( मिठीत ) झाकोळती ( निस्तेज होती ), तिवडा ( तिरपा पाय पडला ), किरणे ( शुडी. उदा: –कपींची किरणे बाहेर पडली ).

(ब) अप्रसिद्ध मस्कृत शब्द .–– राम =अनगदहनहृदयविहार; मगलभगिनीचा वर, मगलजननीचा जीवन, मदनारिमित्र, पद्मजातजनक; अपर्णावरविश्राम; मंगलजननीजामात. पद्मिनीपतिकुलभूषण ( सूर्यवंशी ); मेदिनीगर्भभूषण; द्विपंचमुखगर्वहरण.

अग्निः––ज्वाळामाळी; चत्वारिशृंगा द्विमूर्धान, सप्तपाणि, चित्ररथ, जातवेद. इद्रः––शक्र; सुत्रामा; पाकशासन, वज्रधर. शक्रसुत (वाली); सूर्यसुत (सुग्रीव). रमाधिपति (वरुण). अंगिराकुमार, अंगिरासुत (बृहस्पति)

- - - -

१३६ रा. वि. १५, १४२

मयजापति; विंशतिचक्षु; द्विपन्चमुख (रावण). द्विपचरथ;अजसुत: श्रावणारि; (दशरथ). सरसिजोद्भवनन्दन; ब्रह्मसुत (वसिष्ठ); भूधर (लक्ष्मण). लोकप्राणेश (वायु); अत्रिसुत (चन्द्र), चित्रकिरण (सूर्य); जीमूत, बलाहक (मेघ); रंभापुत्र (कापूर); कर्पूरजननी (केळ); कुहू (अमावास्या); राका (पौर्णिमा); यामार्ध (अर्धप्रहर); कोटीर (मुकुट); अतसीकुसुम (अळशीचें फूल): आतपत्रें (छत्रें); मित्रपत्रे (अब्दागीर); मृगाकपर्णे (चामरें); तुंगारपत्रे.

**संस्कृतप्रचुर दुर्बोध समास :—** हिमनगजामातसायकासन; भवइन्धनदाहक, अज्ञानतिमिरच्छेदक; दिवाकर; दुःखपर्वतभंजनपुरदर; बोधवज्र झळके वरी–हें गुरूचें वर्णन, क्षत्रियजलदजालप्रभंजन अरिचक्रवारणपञ्चानन;

जो दानवकुळवैश्वानर । साधुहृत्पद्मभ्रमर ॥
अज्ञानतमछेदक दिवाकर । नेणे साचार कौसल्या ॥[१३७]
कीं विप्रकाणिपाळ दारुण । त्यापरि सुपर्ण रघुवीर ॥[१३८]
माझा प्राण घटोद्भव थोर । तुझे आयुष्याचे नीर ।
प्राशील आज निर्धारे ॥[१३९]

अध्याय बावीस मधील ब्रह्मदेवाच्या पत्रात आरंभीं संस्कृत विशेषणाची गर्दी उडाली आहे.

( क ) व्याकरणविशेषः —

क्रियापदें: – क्षोभावला, अवमानला,आवेशला,चाढिन्नला, हांसिन्नला.

प्रयोगः—तिहीं धरणीवर देह टाकिला, आपण निजेला, पन्नगटिये ( ला ) परतले.

---

१३७ रा. वि. १०, ९१ ; १३८ रा. वि. १०, ९२
१३९ रा. वि. १३, ७७

प्राकृत भाषीं ऐकोन कथा । लाभ श्रोतीं घेइजे ॥

विकृत रूपः—दुराचारी ( णी ) स्त्री; अमौल्य.

लिंगः—मस्तक शतचूर्ण केला ( पु. लिं.), दुर्ग रचलें ( न. लिं )

अशुद्ध समास :—कल्पांतवीजु, दशरथउदरीं; राकाइंदु; मन-हरणार्थ; तमनाशना, गुरुआज्ञेनें; प्रेमपाळणा, पितृसूड; हृदयसदूक, हृदयसंवळी, रत्नमादुस.

## १९ दोषदर्शन

या ग्रन्थांतील दोषाचें स्वरूप 'हरिविजया'तील दोषप्रमाणेंच असल्यामुळे त्याच्यापैकीं काहींचा नामनिर्देश व काहींची थोडींशीं उदाहरणें मात्र पुढे दिलीं आहेतः—

(१) क्लिष्टताः—मागें जुने शद्ब, अप्रसिद्ध संस्कृत शद्ब, संस्कृत शद्बांची प्रचुरता व मोठे समास यांचीं उदाहरणें दिलीं आहेतच. अशा बोजड भाषाशैलीमुळें क्लिष्टता आली आहे.

(२) दृष्टान्तांचा कण्टाळवाणा पाल्हाळ :— याविषयींही मागें चर्चा झालीच आहे.[140]

(३) पुनरुक्तिः—हा प्रकारही अगदीं मागल्याप्रमाणेंच.तेंच दृष्टान्त, तींच रूपवर्णनें, स्थलवर्णने वगैरे. पुढें काहीं उदाहरणें दिलीं आहेतः—

---

१४० श्रीधर च. आणि का. भा. २. प्र. १३. पृ. २९६–२९९

दृष्टान्तः—( १ ) "जसे मूढाचें ( वाग्जाळ ) बोल अपार । एका शद्बे छेदी ( पंडित ) चतुर." हा दृष्टान्त श्रीधराच्या अनेक ग्रंथात तर आहेच, पण एकाच ग्रंथात अनेक वेळा आढळतो.[१४१] पुढील दृष्टान्त असेच पुनरुक्त झाले आहेतः—

मर्यादयी भगणे लोपती, एक विनायक...असंख्य विघ्ने पळती [१४२] ॥

मेरूचे वजन केवीं होय, गगनाम साबाचे टेकण, टिटवी-समुद्र.[१४३]

भवानीस्तुतींत—"सुग्रीवादि दिवटे नाचती" वगैरे समग्र रूपक.[१४४] विष्णुनामे असंख्य दुरिते पळती.[१४५] राम-रूपवर्णनात-कृष्णरूपाची पुनरुक्ति.[१४६] 'हरिविजया'तील पुत्रावणाचे वर्णन 'रामविजया'त बहुतेक तसेच आले आहे.-- मधुबिन्दु, पुण्याहवाचन, पिकपात्र हातीं घेणाऱ्या दासी, कौसल्येस कनकाबराची बुन्थी, वसिष्ठाचे भविष्य व जातक, नामकरणविधि, पाळणा, मोवनाली चार अवस्था

१४१ रा. वि. ३, ७५; १५, ७३

१४२ रा. वि. अ. १९, अ. १५ व अ. २८

१४३ रा. वि. २०, १३६; ८, ३

१४४ रा. वि. २६, १–९

१४५ रा. वि. ७, १५; ७, ३४

१४६ रा. वि. ८, १६३–२२२

बारा चौदा सोळा चौसष्ट नारी गलबला करतात इ. इ. अध्याय चार मधील आरंभीचें वर्णन अध्याय सहामध्ये पुनरुक्त झाले आहे. सागरात बुडी मारून मोतीं काढ-तात; अन्नाचा पर्वत पाहिला तरी क्षुधिताने आपणा पुरतेंच घ्यावें.[१४७] वक्ता-श्रोता, स्फूर्तिधनुष्य, शास्त्रबाण इ. रूपक तसेच आले आहे.

'रंगमंडपरचना' व पहिल्या अध्यायातील 'क्षीरसागररचना' यांचीं वर्णने 'हरिविजया'तील 'क्षीरसागरवर्णन' व 'मयसभा' यांच्या वर्ण-नाची आवृत्ति आहे.[१४८]

अगस्त्याश्रमवर्णनातील वृक्ष, पशु, पक्षी व ग्रथाध्ययन एक दशाचेंच आहे.[१४९]

(४) अनौचित्यः—

(१) लौकिक वर्णनात वेदान्तमिश्रण कर्णकटु व अस्थानीं वाटतें. उदाः—पाळण्यातील सुवासिनींचें वेदान्तपरिभाषेत वर्णन.[१५०] दशरथाच्या नऱ्हाडात वेदान्तरूपक,[१५१] अयोध्यावर्णनात वेदान्त,[१५२] मन्दोदरी, तारा, सीता वेदान्त बोलतात. मागे भोजनवर्णनातील वेदान्त सविस्तर दिलाच आहे.[१५३] सुमन्त रामाकडे जातांना वेदान्त सांगतो.

१४७ रा. वि. ६, १२

१४८ रा. वि. ९, ५०–५८: अ.

१४९ रा. वि. १३, १५६–१६८

१५० रा. वि. ५, २३–३०, १५१ रा. वि. ८, १५८–१७५

१५२ रा. वि. ८, २८४–२९०

१५३ श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. १३, पृ. ३०८–३०९

( २ ) पात्रानुरूप भाषा न घालणें:—

अध्याय नऊमध्यें 'मन्थरे'च्या व पुढें 'कैकेयी'च्या तोंडीं 'मनुसंख्या संवत्सर वनासि धाडी' इ.

अध्याय दहामध्यें कौसल्येच्या तोंडीं 'अवनिजाकान्त' शब्द घातला आहे. रामास पाहाणाऱ्या भिल्लिणी 'निरजनीं राहिला तो राम पाहू चला' असें म्हणतात व पुढें जाडे पडिती थाटाचे सस्कृत शब्द योजतात.[१५४]

( ३ ) अनुचित उपमा:—

( अ ) कीं क्षमेचा पर्वत पूर्ण । कीं निर्विकार दिव्य चंदन ।
मुमुक्षु फणिवर वेष्टून । सर्वदाही बैसले ॥[१५५]

या ठिकाणीं मुमुक्षूवर 'फणिवरा'चा आरोप उचित दिसत नाहीं. सर्पाची चंदनावरील आसक्ति जरी येथें इष्ट दिसली तरी त्याच गुणाबरोबर त्याची दश करण्याची प्रवृत्ति मुमुक्षूंत असणे अनिष्ट असल्या-मुळें हें रूपक सदोष वाटतें.

( ब ) सुन्दरकाण्ड हें इंद्रभुवन । प्रेमरस तो सहस्रनयन ॥
वाग्देवी हे रंभा पूर्ण । नृत्य करी कुशलत्वें ॥[१५६]

या ठिकाणचें वाग्देवीवरील रंभेचें म्हणजे स्वर्गवेश्येचें रूपक अनुचित भासतें.

(५) भाषाव्याकरणविषयक दोषाचीं उदाहरणें मागें आलींच आहेत.

(६) अतिशयोक्तिः—एकच उदाहरण पुढे दिले आहे.

---

१५४ रा. वि. १३, २२९ ; १५५ रा. वि. ७, ५
१५६ रा. वि १९, ८

शतयोजनांतील झाडें उपडोनी । निजबळे घालिती उचलोनी ॥

........ .. ........... ... ....................

चक्राकार पर्वत फिरवीत । मुष्टिप्रहारानें नक्षत्रें खालीं पडत ॥ [१५७]

दुसरे उदाहरण: -सुग्रीववानरसेना वर्णन.[१५८]

(७) उत्तान शृंगार (अश्लील):—अश्लील वर्णनें क्वचित् आहेत. उदाहरणार्थ:-अध्याय एकवीसमध्ये मारुतीनें पुच्छास बांधण्यासाठीं वस्त्राचा तुटवडा पडला. त्यासाठीं नगरवासी स्त्रीपुरुष नग्न केले.[१५९] राणीवसा नग्न केला तेव्हा नग्न नागरिक रावणाकडे तक्रार घेऊन आल्याचें वर्णन अश्लील झाले आहे. उत्तान शृंगारवर्णनें या ग्रथात नाहीत.

(८) कालविपर्यासः— (अ) हरिविजयाप्रमाणे यांतही श्रीधर-कालीन चालीरीति व लोकभ्रम याचें वर्णन आहे.

(ब) दशरथाचा बाण श्रावणावर रामस्मरण करीत गेला व श्रावण विद्ध होऊन रामस्तवन करीत पडला होता.[१६०]

श्रीधराच्या वेळीं त्याचे जसे चहाते होते तसे त्याचे कांहीं दूषकही होते. कारण, त्याचा उल्लेख आपल्या ग्रंथातून त्यानें मुद्दाम केलेला आढळतो. याही ग्रंथात तसे उल्लेख आहेत. तो म्हणतो:—समग्र ग्रंथ न पाहतां जे अकस्मात् दोष ठेवितात ते निश्चित शतमूर्ख जाणावे.[१६१] वक्ता अगदीं बृहस्पतिसारखा असला तरी त्यास श्रोता जर मतिमन्द मिळाला तर त्याची

१५७ रा. वि १७, १८४–१८६

१५८ रा. वि. १८, ९३–१००

१५९ रा. वि. २१, ७५-८१; १२३–१२७

१६० रा. वि. ३, ३५–३६ ; १६१ रा. वि. १, २०३

सर्व कथा व्यर्थ जाते.[१६२] पण कवीनें उघडलेली शब्दरत्नमादूस पाहून पंडिताना संतोष होतो, तर इतर कुबुद्धि मतिमन्दांस रत्नपरीक्षा नसल्यामुळे आनन्द होत नाहीं हे स्वाभाविक आहे.[१६३] आम्हीं समग्र ग्रंथ बारकाईनें वाचला असून त्याचें रसग्रहण व यथोचित गुणवर्णनही केले आहे. तेव्हा कर्तव्य म्हणून वर दोष दाखविल्याबद्दल श्रीधराचे चहाते आम्हास निन्दकाच पंक्तीस बसविणार नाहींत अशी खात्री वाटते.

'हरिविजया'च्या मूल्यमापनात जे विचार आम्ही प्रगट केले आहेत ते बहुतांशीं या ग्रंथासही लागू असल्यामुळे त्याची पुनरुक्ति येथें करण्याचे प्रयोजन नाहीं. तरी पण रसाळपणा व मनोरंजकता या गुणात या ग्रन्थाचा क्रम 'हरिविजया'च्या खालींच लागतो असे म्हणावेसे वाटतें.'अत्र सहृदयाः प्रमाण' इति शम् ।

पुढे श्रीधराचे या ग्रंथांतील काहीं नमुनेदार उतारे दिले आहेत.

## १८ 'रामविजयां'तील नमुनेदार उतारे

### (१) सीतारूपवर्णन [१६४]

जैसें जाम्बूनदसुवर्ण तप्त । तैसें सर्वांग दिव्य विराजित ॥
आकर्णनेत्र विकासत । मुखमृगांक न वर्णवेचि ॥ ४० ॥
मुखीं झळकती दंतपंक्ती । बोलतां पडे फार दीप्ती ॥
पाषाण ते पद्मराग होती । रत्नें विखुरती बोलतां ॥ ४१ ॥
जानकीचे अंगींचा सुवास । भेदोन जाय मदनाकाश ॥

१६२ रा. वि. ५, ६–१४ ; १६३ रा. वि. १२, २५४
१६४ रा. वि. ८, ४०-४१

जिंगें भुलविला आदिपुरुष । आपुले स्वरूपें करूनिया ॥ ४२ ॥
पाय ठेविता धरणीं । पदमुद्रा उमटे तये स्थानीं ॥
तेथे वसन्त येऊनी । लोळत भुलोनी सुवासा ॥ ४३ ॥
चन्द्रसूर्यांची गिळोनि ज्योती । तैसीं कर्णपुष्पें झळकती ॥
कर्णीं मुक्तघोष ढाळ देती । कृत्तिका मण्डळासारिखे ॥ ४४ ॥
आकर्णपर्यंत विशाळनयन । माजि विलसे सोगियाचें अंजन ॥
कपाळीं मृगमद रेखिला पूर्ण । वरी बिजवरा झळकतसे ॥ ४५ ॥
शीत दाहकत्वा सांडोनी । शशांक आणि वासरमणी ॥
सदा विलसती दोनी । मुक्तजाळीं तारागणे जैसीं ॥ ४६ ॥
विद्युत्प्राय पीतांबर । मुक्तलग चाळी विचित्र ॥
वरी एकावळी मुक्तहार । पदकीं अपार तेज फाके ॥ ४७ ॥
दशांगुळीं मुद्रिका तंगाकार । वज्रचूडेमण्डित कर ॥
कण्ठी पदकावरी हिरे थोर । जैसे दिनकर जडियेले ॥ ४८ ॥
वांकी नेपुरें दिव्य चरणीं । रुणझुणती चालता धरणीं ॥
जीचिया स्वरूपावरूनी । कोटी अनंग ओंवाळिजे ॥ ४९ ॥

## २ श्रोत्यावक्त्यांचें आनन्दयुद्ध [१६५]

रणामाजी एकांग वीर । तैसा जाणिजे कवीश्वर ॥
बहुत श्रोतयाचा भार । परम चतुर सागर जे ॥ १० ॥
सभानायक प्रवीण अत्यंत । करीं संदेहधनुष्य घेत ॥
प्रश्नाक्षर शर सोडित । वक्ता समोर लक्षोनि ॥ ११ ॥
मग धैर्यठाण कवीनें मांडून । चढविलें स्फूर्तीनें शरासन ॥
शास्त्रसंमत घेऊन बाण । सोडी अभंग अनिवार ॥ १२ ॥

---

१६५ रा. वि. ४, १०–१९

सत्व ओढी काढून सत्वर । क्षमावेशें सोडी शर ॥
परम कौशल्यें साचार । प्रश्नबाण छेदित ॥ १३ ॥
श्रो या वक्त्याचें संधान । तटस्थ पाहती विचक्षण ॥
धन्य धन्य म्हणोन । तर्जनी जाण डोलविती ॥ १४ ॥
आवेशा चढले दोघेजण । सप्रेमें करिती नामस्मरण ॥
तो घनघोष ऐकून । अवदसा श्वापदें दूर पळती ॥ १५ ॥
वक्त्याचे वाग्बाण अत्यंत । अर्थ गौरव मुख लखलखित ॥
पद्यरचना पक्षमंडित । सुरंग मिरवित साहित्य ॥ १६ ॥
ऐसे शर सुटता अपार । भेदलें श्रोतयांचें अंतर ॥
डोलविलें तेणें शिर । सुखोर्मीचे निजभरें ॥ १७ ॥
वैरभाव नसता किंचित् । हे आनंदाचे युद्ध होत ॥
क्षीराब्धीच्या लहरी मिळत । जैशा एकमेकासी ॥ १८ ॥
निष्कपट श्रोता पुसत । निरभिमान वक्ता बोलत ॥
शब्द कौशल्य युद्ध सत्य । जाणती पंडित विवेकी ॥ १९ ॥

## २ लवाचें अश्वबन्धन[१६६]

लव उपवन रक्षित । सवें असती बाळके बहुत ॥
नाना क्रीडा विनोद करित । वृक्षछाये बैसले ॥ १९७ ॥
अष्टवर्षी दशवर्षी कुमर । कटीं कौपीन मौंजी सुंदर ॥
मस्तकीं शिखा परिकर । खेळता उड साजिरी ॥ १९८ ॥
तों श्यामकर्ण धावत । आला त्याच पंथें अकस्मात ॥
ऋषिपुत्रास लहू दावित । पहा रे येतो अश्व कैसा ॥ १९९ ॥

१६६ रा. वि. ३७, १९७–२०८

भग सीतासुतें धावून । शीर्षी धरिला श्यामकर्ण ।।
कपाळींचें पत्र तोडून । वाचितसे ते काळीं ।। २०० ।।
पत्रार्थ पाहुनि समस्त । लहू गदगदा हासत ।।
चळिया काय रघुनाथ । त्रिभुवनीं थोर जाहला ।। २०१ ।।
काय त्यासच व्याली जननी । काय निर्वीर झाली अवनी ।।
तरी कैसा अश्व सोडोनी । नेईल पुरुषार्थे पाहू पां ।। २०२ ।।
माझी प्रतिज्ञा हेच आतां । धरिला अश्व न सोडीं मागुता ।।
तरीच सीतेउदरीं तत्त्वता । जन्म घेऊन सार्थक ।। २०३ ।।
अश्वाचे नेत्र पुसोन । कौतुके करून थापटी मान ।।
उत्तरीय वस्त्र गळां घालून । बांधे नेऊन कर्दळीं ।। २०४ ।।
ऋषिपुत्रास लहू म्हणत । पाहा रे घोडा कैसा नाचत ।।
तों ऋषिबाळ समस्त । भये पोट बडविती ।। २०५ ।।

.......................................

लहू तयाप्रति बोलत । आमुचीच निश्चये हें वस्त्र ।। २०७ ।।

.......................................

काळासी शिक्षा करूनिया । लया पाववीन सर्व क्षत्रिया ।।
तों वीर आले धावूनिया । अश्वरक्षक पुढील जे ।। २०८ ।।

## ४ सीतेचें अग्निदिव्य [१६७]

ऐसे बोलतां रघुनाथ । सीतेसी वाटला कल्पांत ।।
कीं शब्दरूपे शस्त्रघात । अकस्मात जेवीं खोंचे ।। ९२ ।।

---

१६७ रा. वि. ३४, ९२–१२९

शब्द नव्हे ते सौदामिनी । अंगावरी पडे तें क्षणीं ॥
कीं शब्दशल्ये करूनी । तोडिलें वाटे शरीर ॥ ९३ ॥

.........................................

नयनीं वाहती अश्रुपात । सीता वानरांसि आज्ञापित ॥
म्हणे कुंड करून अद्भुत । अग्नि सत्वर चेतवा ॥ ११६ ॥
तव केलें अद्भुत कुंड । काष्ठें घातलीं उदंड ॥
अग्निज्वाला माजल्या प्रचंड । निराळ ग्रासूं धावती ॥ ११७ ॥

..............................................

कुण्डासि करूनि प्रदक्षिणा । दृष्टिभरी पाहिले रघुनन्दना ॥
कण्ठींचा सुमनहार काढोनि जाणा । अग्नीवरी टाकिला॥ १२२ ॥
सत्यसत्य जयसत्य म्हणोनी । त्रिवार गर्जे त्रिजगज्जननी ॥
अग्निकुण्डीं तये क्षणीं । उडी घाली अकस्मात ॥ १२३ ॥
मङ्गलजननीहृदयरत्न । अग्निकुण्डामाजी पडताहि जाण ॥
कन्या गाजिली म्हणून । पृथ्वी कांपे थरथरा ॥ १२४ ॥

.......................................

दशदिशा दाटला धूर । कढों लागले सप्त समुद्र ॥
वैकुण्ठ कैलासपदें समग्र । डोलों लागलीं तेधवा ॥ १२६ ॥
थरथरा कांपे अंबर । नक्षत्रें रिचवतीं अपार ॥
सौमित्र मारुति वानर । नेत्रोदकें टाकिती ॥ १२७ ॥

.........................................

एक घटिकापर्यंत । अग्निमाजी जानकी गुप्त ॥
तों मस्तकीं पुष्पें घवघवित । अकस्मात निघाली ॥ १२९ ॥

* * *

## — १४ —

# वेदान्तसूर्य

मंथुनियां क्षीरसागर । चतुर्दशरत्नें काढिलीं सुदर ॥
तैसे पाहोन अद्वैतशास्त्र । वेदान्तसूर्य काढिला ॥[1]

मागें सांगितल्याप्रमाणें 'रामविजय' शके १६२५ श्रावण शुद्ध मासास संपल्यावर श्रीधरानें लगेच 'वेदान्तसूर्य' हा ग्रंथ लिहिण्यास घेतला असावा. हा त्यानें शके १६२५ माघ शुद्ध सप्तमीस संपविला; म्हणजे त्याने तो बरोबर सहा महिन्यात संपविला. पंढरपूर येथील श्रीधराच्या घरात मळप्रत नाहीं. तिच्या ऐवजीं दुसरी एक प्रत पहावयास मिळाली; तिचे वर्णन असे :—

प्रारंभीं 'ग्रंथ वेदान्तसूर्य प्रथमारंभ प्रकरण श्रीदेवदत्त श्रीब्रह्मानंद' असे लिहिलेलें आहे व शेवटीं लेखकाने आपली माहिती दिली आहे तीः—

"शके १६२७ तारण नाम संवत्सरे श्रावण वदि ९ रविवासरे श्रीपांडुरगक्षेत्रे इदं ग्रंथ लिखितं । हस्ताक्षर नारायणसुत कृष्ण उपनाम आराध्ये (पाटील पंढरपुरचे) । श्रीपांडुरगार्पणमस्तु । श्रीरस्तु ।

१ वे. सू. ११, १

शुभं भवतु ॥ ओव्या येकुन दोनि हजार च्यारसे चोद।

यावरून ही प्रत मूळ ग्रथानन्तर सुमारें दीड वर्षांने झाली असून ती पंढरपुरासच लिहिली गेली. या प्रतींत मूळ प्रतीचा स्थलकालनिर्देश कसा दिलेला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. असो. हा ग्रंथ प्रकाशितही झालेला आहे.

प्रकरण पहिलें:—या ग्रंथाची एकन्दर बारा प्रकरणें असून एकूण ओवीसंख्या दोन हजार चारशें चौदा आहे. पहिल्या प्रकरणात दोनशें एक्यायेंशीं ओंव्या असून त्यात पुढील विषय आले आहेत:—

पहिल्या एक्याण्णव ओंव्या प्रास्ताविक आहेत. प्रथमतः आपला पिता व गुरु जो 'ब्रह्मानद' त्यास 'ज्ञानसूर्य', 'अज', 'अव्यय', 'जगद्वंद्य' इत्यादि विशेषणपूर्वक वन्दन केले आहे. नन्तर गुरुदयेवीण अपरोक्षज्ञान कदा होणे शक्य नाहीं असें म्हणून अशा रीतीने मिळविलेल्या ज्ञानाचा पूर्ण परिपाक म्हणजेच हा 'वेदान्तसूर्य' ग्रंथ होय असें प्रतिपादिलें आहे. सूर्य उगवताच सर्व पदार्थ दिसतात तसा वेदान्तसूर्य प्रगट होतांच सर्व अपरोक्षज्ञान प्रगट होतें; आणि जग आत्मरूप दिसावयास लागून प्रवृत्तिशास्त्री द्वेत उपजत नाहीं. संपूर्ण स्वानन्द-उद्यान या ग्रंथरूपानें उगवलें आहे. हें आत्मप्रतीतीचे सदन आहे; किंवा हा सर्वसुखाचा तरुवर, समाधीचे माहेर, व शान्तिक्षमेचें अम्बर उभविले आहे; किंवा हें अध्यात्मदेवीचें मूलपीठ आहे आणि नाना मताची भगणें लुकलुकत असता त्यावर हा सूर्य उदेला आहे. श्रमलेले नवरस येथें विश्रान्तीस आले आहेत. म्हणून—

जे तीर्थें हिंडता भागले । व्रतें नेम करिता वाळले ॥
प्रवृत्तिग्रंथ ऐकता श्रमले । तेही निवती येथेंची[२] ॥

२ वे. सू. १, ३७

अशा रीतीनें श्रीधरानें या ग्रंथाचे महत्त्व, आपला त्याबद्दलचा आत्मविश्वास फारच सुन्दर रीतीनें प्रगट केला आहे.

नन्तर या ग्रंथाचे अधिकारी कोण हे सांगितलेलें आहे. नन्तर शिष्यानें पुढील बारा प्रश्न विचारले आहेत:—

[१] मी कोण ? [२] मला भ्रमण कोणीं लावले ? [३] ईश्वरस्वरूप काय ? [४] मायेचे लक्षण कैसें ? [५] पिंडब्रह्माण्डाची उत्पत्ति व उभारणी. [६] अनादि वस्तूंत प्रथम स्फुरण कसे झाले. [७] मायाविकास कसा मावळतो व संहारणी कशी होते ? [८] मुमुक्षु, साधक यांचीं चिन्हे कोणतीं ? [९] तत्त्वांसहित पंचभूते सत्य कीं मिथ्या ? [१०] जीवशिव हे कोण ? व हे दोघे कोठून उद्भवले ? [११] एक बद्ध एक मुक्त किंनिमित्त झाले ? [१२] प्रणवाचें विवरण करा.

शिष्याचे हे प्रश्न ऐकून गुरुस जो आनन्द झाला त्याचे वर्णन फारच छान झालें आहे.[३] त्याचप्रमाणे पुढील सन्तवर्णनही फार गोड झाले आहे.[४] श्रीधरानें त्यास शरण जाऊन आपल्या ग्रंथास वरदान मागितलें तोंच ते म्हणाले[५]:—

आम्ही इच्छितों वेदांत श्रवण । वरी दृष्टान्त तू गोड देसी ॥
भगणीं मंडित जेंवि पुष्कर [आकाश] । कीं फलीं संपूर्ण तरुवर ॥
कीं कनकाचल सुन्दर । रत्ने कळनी जेंवि दिसे ॥
तैसा दृष्टान्तेंकरून ग्रंथ । वेदांतसूर्य विराजत ॥

---

३ वे. सू. १, ५५–६२ , ४ वे. स. १, ६५–८०
५ वे. सू. १, ८१–८४

कीं दळभारें मंडित । नराधिप जेंवि दिसतसे ॥
तरी पुढें बोल गहनार्थ । वेदान्तशास्त्रीं असे जो ॥

या गुरुशिष्यसंवादानें सर्वांसच अनायासें लाभ होणार आहे. ब्रह्म वर्णनही मोठें ठसकेदार झालें आहे. यानन्तर पहिल्या प्रश्नाचें उत्तर पञ्चकोश विवरण करून दिलें आहे. पुनः प्रकरणाच्या अखेरीस ग्रंथस्तुति व पुढील विषयावतरण नेहमींप्रमाणें चांगलें झालें आहे. ग्रंथस्तुतींत तो म्हणतो.—[6] हा 'वेदान्तसूर्य' ग्रंथ म्हणजे परमामृताचें ताट वाढलें आहे. त्यास भक्तीची उत्कट क्षुधा असेल तेच भोजनाला बसतील. कीं हे निज मुक्तमाला वेदान्तज्ञानी गळा घालून जे सद्गुरुस कायावाचामनेंकरून शरण जातात त्यानींच हा ग्रंथ साधुमुखें श्रवण करावा.

पुढील प्रकरणीं रस अपार । उचंबळेल स्वानंदसागर ॥
तें ब्रह्मानंदें श्रीधर । निरोपील कैसें ऐका तें[7] ॥

इ. असें म्हणून त्यानें पहिलें प्रकरण संपविलें आहे.

प्रकरण दुसरें:—माझी प्राकृत आर्षवाणी तुम्ही सन्त ऐकतां हें माझें महद्भाग्य आहे,[8] असें प्रारंभीं मोठ्या चटकदार रीतीनें वर्णन करून —स्वरूपप्राप्तीस कारण ज्या सप्तभूमिका त्यांचें कथन केलें आहे. नन्तर ग्रंथकार म्हणतो, "ज्याचा लौकिकावर भर आहे त्यास आत्मसाधन घडत नाहीं. ते दांभिक असतात." दांभिक–पंडितांचें वर्णन मोठें चटकदार झालें आहे. या वर्णनांत सर्व शास्त्रें व कला यांचा उल्लेख असल्यामुळें श्रीधराची बहुश्रुतता सहज प्रतीत होते. या सात भूमिका कळल्याशिवाय स्वरूपज्ञान होत नाहीं; म्हणून त्या येथें साक्षेपें सांगितल्या असें तो म्हणतो. शेवटीं:

६ वे. सू. १, २७७–२७९ ; ७ वे. सू. १, २८०
८ वे. सू. २, १२

वेदान्तसूर्य दिव्य ग्रंथ । हाचि क्षीराब्धि उचंबळत ॥
यांतील रत्नें तीं दृष्टान्त । ग्राहक पंडित तयाचे [९] ॥
अशी नेहमींप्रमाणें ठराविक दृष्टान्तस्तुति केली आहे.

प्रकरण तिसरें:—प्रपंचरणांत धांवणाऱ्यावरील रूपक थोडेंसें लांब असलें तरी तें चमत्कृतिजनक आहे खास. पुन: गुरुस्तवनांत 'ज्ञानेश्वरा'-सारखा तल्लीन होऊन तो स्वतःच म्हणतो [१०]:—

ग्रथपीठिका राहिली दुरी । संतीं परिसिजे या उपरी ।
पूर्वप्रकरणीं काय झालें ॥

असा भानावर येऊन सांगतो कीं, दुसऱ्यांत मतवाद—निरसन केला. आतां जीवन्मुक्त प्रकरण ऐका. या प्रकरणात ज्ञान्यासही ज्ञानाभिमान कसा होतो हें सांगून धुवट वस्त्रावर जसा बिब्याचा डाग तसा त्यांचा तो अभिमान ठळकपणें दिसतो. [११] हा व पुढील दृष्टान्त हे अगदीं अभिनव वाटतात:—

अभिमानें हृदयीं फुटलें । गुणीं वोंवून दृढ बांधलें ॥
कीं वनितांचे नाकीं जडलें ॥ स्लेस्म (श्लेष्म) स्वासें आवळत [१२] ॥
शेवटीं ग्रंथस्तुति आहेच. [१३]

वेदान्तसूर्य दिव्य ग्रंथ । हाचि प्रयागराज यथार्थ ॥
भक्ति—ज्ञान—वैराग्य युक्त । वाहे निश्चित त्रिवेणी ॥
माजि दृष्टांत साचार । हेचि तळपति जलचर ॥
अनुभव तोचि निर्धार । अक्षयवट जाणिजे ॥ दृ. दृ.

---

९ वे. सू. २, १९६ ; १० वे. सू. ३, ४९
११ वे. सू. ३, २०४ ; १२ वे. सू. ३, १९५
१३ वे. सू. ३, २१३—२१४

यातील दृष्टान्तांची पुनरुक्ति श्रीधराच्या सर्व ग्रंथांत आढळते.

**प्रकरण चाथे :—** या ग्रथातील श्रीधराची तल्लीनता मोठी अजब आहे. अशी वृत्ति त्याच्या इतर कोणत्याही ग्रंथात दिसून येत नाहीं. वरच्या प्रमाणेंच येथेंही श्रीधराची अद्वैत समाधि इतकी लागली कीं, तो निरूपण विसरूनच गेला[१४]:—

तो बोलती तेव्हा सत । वेदांतसूर्य गोड ग्रथ ।।
चतुर्थ प्रकरण त्वरित । आरंभी पुढें कैसे तें ।।

मग स्वानंदलहरी जिरवून । श्रीधरे घातलें लोटांगण ।।
म्हणे अबोलणे बोल पूर्ण । वदवा जी मज मुखें ।।

अशा रीतीने सावध झाल्यावर यांतील निरूपण झालें आहे. शेवटचा ठराविक दृष्टान्त पहा:—

ब्रह्मानंदकृपेच्या बळे । हें ग्रथ जहाज चाले ।।
वरी भक्तीचें शीड लागले । भाववातें फडकतसे[१५] ।। इ.

**प्रकरण पाचवें :—** यात सारासारविचारावर केलेलें क्षीराब्धीचें रूपक चागले आहे. ज्ञानोत्तरही गुरुभक्ति सोडू नये हें या प्रकरणाचें सार आहे.

**प्रकरण सहावें :—** येथे प्रस्तावनेंतील भवसमुद्रावरील रूपक व शेवटच्या एकशें साठ ते दोनशें ओंव्या हीं वर्णनें फार छान झालीं आहेत. शेवटचें ठराविक रूपक पहा:—

---

१४ वे. सू. ४, ११-१२ : १५ वे. सू. ४, १७४

कीं हा ग्रंथ पंढरीनगर । दृष्टांत हेचि संत अपार ।।
यात्रेसी आले समग्र । निज माहेर म्हणोनि ॥[१६]

प्रकरण सातवें :—या प्रकरणात विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं.

प्रकरण आठवें :— या प्रकरणात प्रारंभीं आदित्य असता दीपाची आवश्यकता, क्षीराब्धींत क्षुधाबाधा; सुरतरु असतां कामना, इत्यादि अनेक दृष्टान्तानीं वेदान्तज्ञानाची थोरवी वर्णिली असून शेवटीं-

तेसें ज्यासि वेदांतज्ञान । त्यास न बाधी विषयभ

असें त्याने म्हटलें आहे.[१७] शेवटीं पंचम प्रळय—ज्यास निजमोक्ष म्हणतात— तें वर्णन फारच सुबोध व बहारदार झालें आहे.

पिंडब्रह्मांड जाळून । तो आनंदमय वर्ते पूर्ण ।
सारूनियां दृश्यमान । येकांत सेजे पहुडला ।।[१८]

अखेरीस ग्रथावर रामेश्वराचें व त्यावर प्रेमोदक भागीरथीजलाच्या कावडी घालणारे साधक हें ठराविक रूपक आलेंच आहे.[१९]

प्रकरण नववें:—असो सिद्धिसाधनीं लागला । परमपद दुर्लभ त्याला॥
हिंसक पंक्तींत जो बैसला । ब्राह्मणत्वासि मुके तो[२०] ॥

अशा रीतीनें सिद्ध साधकाचा तीव्र निषेध केला आहे.

---

१६ वे. सू. ६, ११९
१७ वे. सू. ८, ५ ; १८ वे. सू. ८, २०१
१९ वे. सू. ८, २०२–२०३ , २० वे. सू. ९, ११९

प्रकरण दहावें:—यांतील नरदेह पडिक क्षेत्र हें परंपरित दीर्घ रूपक मोठें उद्बोधक झालें असून[21] दैवी संपत्तिवाले व गुरुभक्तच हा ग्रंथ ऐकतील असें स्पष्टपणें म्हटलें आहे.[22]

> प्रकरण अकरावें: —मंथुनियां क्षीरसागर। चतुर्दशरत्नें काढिलीं सुंदर॥
> तैसें पाहोन अद्वैत शास्त्र। वेदांतसूर्य काढिला[23] ॥

येथे क्षीरसागरमंथनाचा ठराविक दृष्टान्त जसा आढळतो तसा श्रीधराच्या वेदान्तशास्त्राच्या सखोल अभ्यासाचाही प्रत्यय येतो. यापुढे अनेक काव्यमय दृष्टान्त देऊन मराठी भाषेचा गौरव केला आहे. त्यात 'रामविजया'तील बहुतेक सर्व दृष्टान्त पुनरुक्त झालेले आहेत.

उदाहरणार्थ:—संस्कृत–प्राकृत हीं दोन तीरें असून त्यांत अर्थ प्रवाहरूपानें वाहत आहे. किंवा दोन स्त्रियांचा एक नाथ, अथवा एकाच अंगाचे दोन हात, दोन ओष्ठ पण स्वर एकच, त्रिवेणीजल सुवर्ण व काच-कुपिकेंतून वाहिलें तर रामेश्वरास तें सारखेंच प्रिय; अबळें संस्कृत नेणती; दोर पात्रावीण जसें कूपोदक अलभ्य तसें तें त्यास अलभ्य; पण तडागादिकात त्याचें सहज तृषाहरण होते. तसेंच प्राकृत सहज समजतें; वगैरे वर्णन करून तो म्हणतो,''आधींच हा वेदान्तविषय कठीण; पण त्याबरही मी साहित्य चढवून तो इतका सुन्दर केला आहे कीं, पण्डित आपलीं इतर कार्यें टाकून तो आदरानें श्रवण करतील. पण तो यथार्थ न पहातां उगाच जे दोष ठेवतील ते पण्डित नसून शतमूर्ख होत. महापुरुषाचे ग्रंथ निंदून

---

२१ वे. सू. १०, १ ; २२ वे. सू. १०, १७६
२३ वे. सू. ११, १

कुमत प्रतिपादन करणाराची संतानवृद्धि होणार नाहीं, असें कर्मविपाकांत निरोपिले आहे.[२४] असें म्हणून पुढें पुनः ग्रंथाची व दृष्टान्तांची थोरवी गाईली आहे[२५]:—

दळभारें सहित शोभे नृपनाथ । तैंवीं दृष्टान्तयुक्त शोभे ग्रंथ ।।
कीं ग्रंथ हा सरितानाथ । साहित्यतरंगें मिरवतसे ।।
षड्रस अन्न उत्तम होय । परी शाखावीण गोडी नये ।।
दृष्टांतेंवीण ग्रंथ पाहें । रस न चढे सर्वथा ।।

या ठिकाणीं जो विस्तार केला आहे त्याचें एक कारण असें कीं, त्याच त्याच दृष्टान्ताची पुनरुक्ति श्रीधर नि.शंकपणें कशी करतो याचें प्रत्यंतर यावें; आणि दुसरें असें की, 'रामविजय' प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें तो साहित्यात दृष्टान्तास किती उच्च स्थान देतो हेंहीं पटावें.

या प्रकरणांत ज्या दोन गोष्टींवर श्रीधरानें जोर दिला आहे त्या या:—संन्यासग्रहणापर्यन्त शिखासूत्र यथाविधि संभाळावें व मनोजय होईतो सर्व सत्कर्में करीत रहावे; तीं सांडू नये.[२६] जे ब्रह्मानंदानें सदा तृप्त, शान्त, दान्त व विरक्त आहेत त्यानाच या ग्रंथाची गोडी कळेल असें सांगून हें प्रकरण त्यानें संपविलें आहे.[२७]

प्रकरण बाराबें:—यांत सर्व विषयाचा समारोप करून शेवटीं श्रीधरानें आपली परपरा देऊन मातापितरांचा नामनिर्देश केला आहे. पुनः ग्रंथावर द्वादशकलायुक्त सूर्य, वृंदावन, गोपूर व कोहळीं इत्यादि ठराविक

---

२४ वे. सू. ११, २० ; २५ वे. सू. ११, २१–२२
२६ वे. सू. ११, ४६ ; २७ वे. सू. ११, १६९

रूपकें करून व फलश्रुति सांगून ग्रंथ संपविला आहे. 'वेदान्तसूर्या'तील पुढें एक उतारा दिला आहे. यांतील परपरित रूपक किती समर्पक शब्दयोजनेनें केलें आहे हें रसिकास सांगणें नलगे.

## 'नरदेहावरील रूपक'[२८]

नरदेह पडिक क्षेत्र । तेथ महा मोहाचें तृण अपार ।।
अहंकार काटवण दुस्तर । माजलें असे न पेरिता ।। १ ।।
तेथ द्वेषाचीं सावजें थोर । गर्जतात अहोरात्र ।।
दंभलोभाचे अपार । पक्षी तेथें विचरती ।। २ ।।
ऐसें पडिक क्षेत्र निश्चित । स्वयें अंगीकारी सद्गुरुनाथ ।।
ज्ञानाग्नि लाउन त्वरित । मोहतृण जाळिलें ।। ३ ।।
द्वेषाचीं श्वापदे सकळीं । जळोन तेथे भस्म जाहलीं ।।
दंभलोभाचे पक्षी ते वेळीं । आहळोन जाहले गतप्राण ।। ४ ।।
अभय हस्त कुठारे पूर्ण । तोडिलें अहंकार काटवण ।।
कामक्रोधाचे खुट तोडुन । बोध नागर झुंपिला ।। ५ ।।
आशा तृष्णा पीडिती थोर । नांगरें विदारल्या समग्र ।।
कल्पनेच्या काशा[२९] अपार । गोळा करून जाळिल्या ।। ६ ।।
विरक्तीची घ्या घालुनी भरी । कल्पनेच्या बुजाल्या गारी (खळगे)।।
भेद पाषाण क्षेत्राभीतरीं । न दिसती कोठें शोधिता ।। ७ ।।
गुरुकृपा हा जळधर । वर्षतां शीतळ जाहलें क्षेत्र ।।
त्रिविध ताप शमले समग्र । ढेंकळें विरालीं भ्रांतीचीं ।। ८ ।।

---

२८ वे. सू. १०, १–८

२९ काशा=कलिंगडें वगैरेंची भागशांहे

या ग्रंथासंबंधीं 'महाराष्ट्र-सारस्वता'शिवाय इतरत्र चर्चा झालेली आढळली नाहीं.[२०] भावे म्हणतातः—"पौराणिक वर्णनात्मक ग्रंथांत कवीचें तेज पडलें तसें या विषयांत पडलें नाहीं. हा ग्रंथ फारसा नावाजला गेला नाहीं व कवीलाही त्यापासून कांहीं विशेष समाधान झालेलें दिसत नाहीं." आतांपर्यन्त मागे दिलेल्या वर्णनावरून व कवीनें या ग्रंथाविषयीं जागोजाग दिलेल्या आपल्या अभिप्रायावरून भावे यांचीं विधानें निराधार व चुकीचीं आहेत हें निराळें सांगण्याचे प्रयोजन नाहीं. कारण वरील उल्लेखांत श्रीधराचा आत्मविश्वास आत्मतुष्टि आणि पण्डितांची या ग्रंथाबद्दलची प्रशस्ति याचा विपुल पुरावा प्रत्यक्ष पहावयास मिळतो. हा ग्रंथ केवळ तात्त्विक विवेचनाचा असल्यामुळें तो पौराणिक आख्यानाप्रमाणें सामान्य जनात लोकप्रिय होणे शक्य नाहीं. कारण वेदान्तप्रेमी पण्डित केव्हांही थोडेच असतात. 'ज्ञानेश्वरी'ची लोकप्रियता 'अमृतानुभवास' लाभली नाहीं. किंवा 'यथार्थदीपिका'दि वेदान्तपर ग्रंथ 'वामनी स्फुट प्रकरणा'इतके नावाजले गेले नाहींत म्हणून त्या त्या ग्रंथांची योग्यता कमी लेखणें कधींही उचित होणार नाहीं. तोच न्याय 'वेदान्तसूर्या'स लागू पडतो. श्रीधर म्हणतोः—"ब्रह्मानदानें कृपा करून जें मुक्तीचें निजज्ञान मला सांगितले तेच बोल मी येथें लिहिले आहेत." 'आत्मप्रकाश' हा वेदान्तपर ग्रंथ ब्रह्मानंदाने मुद्दाम श्रीधरासाठीं लिहिला होता हें सुविदितच आहे. तेंच विवरण अत्यन्त सुबोध व सरळ रीतीनें श्रीधरानें येथें केलें आहे. एवढेंच नव्हे तर दृष्टान्तादि साहित्यरत्नांनीं तें तेजस्वी व रसाळही झालें आहे असें आम्हांस वाटतें.

---

२० भावे. म. सा. पृ. ३३२

* * *

— १६ —

# पांडवप्रताप

पांडवप्रताप ग्रंथ सुन्दर । सकळ साहित्याचें भांडार ॥
ब्रह्मानंदें सांगे श्रीधर । पंडित चतुर परिसोत का[१] ॥

## १. ग्रंथाचें नामकरण

श्रीधरानें यापूर्वींच्या आपल्या दोन ग्रंथास 'हरिविजय' व 'रामविजय' अशीं नावें दिली आहेत व त्याचा उल्लेखही त्यानें या ग्रंथांच्या शेवटीं केला आहे.[२] त्याप्रमाणें या ग्रंथासही त्यानें 'पांडवविजय' असें नांव द्यावयास पाहिजे होतें, अशी आपली अपेक्षा असणें अगदीं साहजिक आहे. अशा नामाभिधानास पूर्वपीठिकेचाही आधार होता. कारण व्यासांनीं आपल्या ग्रंथाचा उल्लेख ' जयग्रंथ ' या नांवानें केला

१ पां. प्र. ६८, २०७

२. हरिविजय रामविजय ग्रंथ । तिसरा हा पांडवप्रताप अद्भुत ॥
पां. प्र. ६४, १५४

आहे.[३] आरंभींच्या नमनातही त्या नांवाची सूचना त्यानीं मोठ्या खुबीनें केली आहे. कारण ते म्हणतातः—

नारायण नमस्कृत्य नर चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

या ठिकाणीं 'नारायण', ' नर ' आणि ' जय ' या शब्दानीं श्रीकृष्णार्जुनाचा विजयग्रंथ असें ध्वनित केलें आहे. श्रीधरानन्तर मोरोपंतानींही ' अष्टादशपर्व जयग्रंथकथा ' असा आपल्या 'आर्याभारता'चा नामनिर्देश केला आहे.[४] 'प्रल्हादविजय', 'कृष्णविजय' व 'नरनारायणविजय' हीं नावेंही त्यास यावरूनच सुचलीं असावीं. कदाचित् ' हरिविजया'च्या पंताच्या स्तुतीवरून ही तीं सुचलीं असण्याचा संभव नाहीं असें नाहीं.[५] तेव्हा 'पांडवविजय' हें स्वाभाविकपणें सुचणारें नाव कवीनें का दिलें नाहीं याचें साहजिकच कोणासही आश्चर्य वाटेल.

पण सामान्यतः कवि आपल्या ग्रंथाचें नामकरण मोठ्या चातुर्यानें करीत असतो. तें बहुधा साभिप्राय असतें. ते असे असावें लागतें कीं, त्यावरून सर्व ग्रंथातील मध्यवर्ती विषयाचा बोध वाचकास तत्काल व्हावा. हीच खुबी श्रीधराने "पांडवप्रताप" या नावांत साधली आहे. नमनानन्तर लगेचः—

'पांडवप्रताप ग्रंथराशी । वद साहित्य दृष्टांतेशीं । नवरसीं सुरस जो'[६] ॥

३ 'जयो नामेतिहासोऽयम् । महाभारत. आदिपर्व

४ मोरोपत. स्वर्गारोहणपर्व. २, ५३

५ हरिविजय ग्रंथाते आधीं मग श्रीधरास वदीन ॥
पांगारकर. मोरो. वेंचें पृ. ४३, ४

६ पां. प्र. १, ११

असें म्हणून हें नाव त्यानें सांगितलें आहे. व तेच त्याने सर्व चौसष्ट अध्यायाच्या अतीं उल्लेखिले आहे.[७] तेव्हा तें ग्रथातील विषयाच्या महत्त्वावरून व व्याप्तीवरून त्यानें सहेतुकपणें ठेविलें आहे असें वाटते. अर्थातच या नावावरून श्रीधराचा उद्देश मुक्तेश्वरादि इतर कवींप्रमाणे सर्व महाभारत—मग तें सक्षेपतः का होईना—मराठींत आणण्याचा नसून त्यातील पाडवाच्याच चरित्राशीं निगडित असलेल्या कथाचें वर्णन करण्याचा होता. आणि पाडवेतिहासात त्याचा अद्भुत पराक्रमच सर्वव्यापी व उठावदार असल्यामुळे त्यानें "पाडवप्रताप" हेंच नाव आपल्या ग्रथास दिले यांत त्याची मोठी चतुरस्रता दिसून येते. कारण, त्यायोगें त्याच्या ग्रथाची आकर्षकता वाढली आहे. 'महाभारत' म्हणजे प्रचड विस्ताराचा ग्रथ. त्यात कितीतरी अवान्तर आख्यानें व उपाख्यानें. त्याच्या विस्ताराचा विचार मनांत येतांच वाचकाचा ऊर दडपून जातो. आणि ह्या अवान्तर कथा आपल्यापरी कितीही उद्बोधक व रसाळही असल्या तरी त्यायोगें पाडवकथेच्या एकसन्धी अनुसन्धानात व्यत्यय येतो हे कोणासही कबूल करावे लागेल. शिवाय श्रीधराने शेवटचीं 'निजधाम'-वर्णनाचीं व 'अनुशासन' हीं पर्वे माळलीं असल्यामुळें हा केवळ पाडवप्रताप वर्णन करणारा ग्रथ 'पाडवप्रताप' नावाने सार्थ झाला आहे.

अशा रीतीनें श्रीधरानेंच पाडवप्रताप हें नामकरण बुद्धिपुर:सर स्वकल्पनेनेच केलें असलें तरी तो आपल्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें निराळेंच दैवी प्रेरणेचें कारण सागतो[८]:—.

---

७ 'स्वस्ति श्रीपांडवप्रताप ग्रंथ......प्रथमोऽध्यायः' ॥

८ पा. प्र. २२, १५७

पांडवप्रताप ग्रंथ गहन । पांडुरगे हें अभिधान ॥
नाम ठेविले असेल पूर्ण । प्रीती करून सत्य पै ॥

या मित व रसाळ ग्रथाचे साहित्य पाडुरंगानें पुरवलें. तोच याचा कर्ता. त्यानेंच प्रीतीने 'पाडवप्रताप' हे नांव ठेविले असेल असें तो आपल्यासारख्याच श्रद्धाळु वाचकास सागतो. पण हा श्रद्धाळूपणा जर घटकाभर बाजूस ठेविला, तर हे नाव मुक्तेश्वराच्या 'पांडवप्रतापा' वरील एका सुन्दर पण थोड्याशा अश्लील अशा रूपकातील त्या शब्दावरून सुचलें असावें असा आमचा तर्क आहे, आणि मुक्तेश्वरी 'भारता'शीं श्रीधराचा जो दृढ परिचय दिसून येतो त्यावरून आमच्या या अनुमानास पुष्टि मिळते. तो उल्लेख असा[९]:—

पाडवप्रताप पुरुष तरणा । नववधू कौरवसेना ॥
शृंगारिली परी संघट्टना । युद्धसुरता न थारवे ॥

श्रीधर या रूपकास इतका भाळलेला दिसतो कीं, तें त्यानें थोड्याफार फरकानें पण बऱ्याचशा संयमानें उचलले आहे.[१०] यावरून वरील अनुमान संशयातीत होतें.

---

९ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४४, ११४

१० पाडवप्रताप पुरुष थोर । रणमदें जाहला कामातुर ॥
कौरवसेना नववधू साचार । शृंगारोनि पातली ॥पा.प्र. १२, १४७
न तगता युद्धसुरतीं जाण । पळाली अभिमान वस्त्रे टाकून ॥
असो हस्ती वाजी शिबिरे साडून । कौरव सर्व पळाले ॥
पां. प्र. १२, १४८
गळाले अभिमानाचें वस्त्र । अधैर्याचे मोकळे केस ॥
रणशय्यासनीं त्रास । पावोनिया पळाली ॥
मुक्तेश्वर. आदिपर्व. ४४, ११५

## २ स्थलकाल

श्रीधरानें आपल्या ग्रंथलेखनाचा स्थलकालनिर्देश केला असल्या-मुळें, इतर कवींच्या प्रमाणे या बाबतींत संदिग्धता राहिलेली नाहीं. या ग्रंथाच्या शेवटीं नेहमींच्या रिवाजास अनुसरून त्यानें आपल्या 'नाझरें' नगराची, आपल्या मातापितराची, आपल्या देशलेखकाच्या वतनाची व आपल्या गुरुपरंपरेची माहिती मोठ्या अभिमानाने सांगितली आहे.[११] नन्तर ग्रंथाच्या स्थलकालाविषयीं तो लिहितो कीं, हा ग्रंथ पंढरपुरीं, शके १६३४ त विजयनाम संवत्सरीं माघमासीं शुद्ध दशमीस बुधवारीं समाप्त झाला.[१२] श्रीधरानें यापूर्वी 'हरिविजय' शके १६२४ त व 'रामविजय' आणि 'वेदान्तसूर्य' शके १६२५ त लिहिले होते. त्यानन्तर नऊ वर्षांनीं 'पांडवप्रताप' त्यानें रचला. महाभारताच्या अध्ययनास त्या ग्रंथावरून आपल्या ग्रंथाची रूपरेखा आखण्यास व तो तयार करण्यास त्याला निदान तीन वर्षे तरी लागलीं असलीं पाहिजेत असे मानिले तरी त्यानें मध्यन्त-रींच्या सहा वर्षांत काहीं रचना केल्याचा कालनिर्देश उपलब्ध नाहीं. कदा-चित् या कालात त्यानें काहीं लघु ग्रंथ लिहिले असावेत, परन्तु कालनिर्देशाच्या अभावीं निश्चित असे काहींच सांगता येत नाहीं.

---

११ विजयनाम संवत्सरीं । ग्रंथ जाहला पंढरपुरीं ॥
शके सोळाशें चौतीस निर्धारीं । ग्रंथ आकारा तैं आला ॥
पा. प्र. ६४, १९६

१२ माघ मास विजय संवत्सरीं । शुद्ध दशमी बुधवारीं ॥
श्रीपांडुरंगनगरीं । ग्रंथ ते दिवशीं संपविला ॥ पां.प्र.६४, १९९

## ३ विषय

यानन्तर ग्रंथाच्या विषयाकडे वळावयाचें. परन्तु त्याच्या नामकरणातच तो सुव्यक्त झाला असल्यामुळें व 'महाभारत'कथा विश्रुत असल्यामुळें त्यातील कथासूत्र सांगत बसण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

## ४ ग्रंथाधार

ग्रंथास मुख्य आधार 'महाभारता'चाच आहे. श्रीधराने हे ग्रंथारंभींच स्पष्ट केलें आहे. नमनाचा पाल्हाळ ऐकून श्रोत्यानीं विनति केली कीं, बा श्रीधरा ! हें आतां पुरे. आदिपर्वापासून रसाळ भारतकथा सांग. पण संभाळ हो ! भारतग्रंथ आधींच थोर. सविस्तर सांगूं लागशील तर तुझा ग्रंथ समुद्रासारखा होईल आणि मग चतुर श्रोते त्रिटतील. पण अगदीं गुह्यार्थ ध्वनित बोलशील तर तो अबलास कसा कळेल ? तरी थोडक्यात पण सरस रीतीनें कथा सांग. हें ऐकून त्यानें ग्रंथास सुरवात केली व प्रथमाध्यायाच्या शेवटीं तो सांगतो कीं,व्यासभारताच्या'आदिपर्वा'चा साराश मी यथार्थ सांगितला आहे. मधून मधून अध्यायाच्या शेवटीं ही घोषणा श्रोत्यास ऐकविण्याची खबरदारी त्याने ग्रंथभर घेतली आहे. सातव्या अध्यायाच्या अखेरीस तो म्हणतो, पांडवजन्मकथा कृष्णद्वैपायनानें जी संस्कृतात सांगितली तीच मी येथें प्राकृतात सांगितली.[१३] मूळ भारत प्रमाण. तीच कथा येथें सांगितली आहे. पुढे त्रेपन्नाव्या अध्यायांत तो पुनः अधिक स्पष्टतेनें सांगतो कीं, जें जे वैशंपायन बोलला तेंच येथें कथियलें.[१४]

---

१३ पां. प्र. ७, २०९–२१२

१४ पां. प्र. ५३, ११२–११६

सगळया दन्तकथा सोडून व्यासभारताचा मी आश्रय धरला आहे. प्रमाण व निर्मळ कथा मी निरूपिल्या आहेत. त्यातील कथा सोडली नाहीं. दुसरी दन्तकथा योजिली नाहीं. व सहसा प्राकृत कवींची कास धरली नाही. क्षणोक्षणीं पाडुरग येऊन व्यासभारत लिही असें मला सांगे इ. इतक्यानेंही समाधान न झाल्यामुळें पुनः ग्रंथाच्या शेवटीं तो बजावतो–ज्या मूळभारतीं कथा आहेत त्याच येथें मी तत्त्वतः लिहिल्या आहेत. प्राकृत कवींच्या समता कदा धरिले नाहीं.[१५] पण हा कवीचा आक्रोश भावे याच्या श्रुति-पथावर काहीं पोंचला नाहीं. म्हणूनच ते निभ्रान्त म्हणतात कीं[१६]:—

पांडवप्रताप ग्रंथ रचतांना कोणत्या ग्रंथाचा आधार घेतला हें शेवटीं कवीनें सांगितलें नाहीं.

स्थूलमानाने पाहाता श्रीधरानें ही आपली प्रतिज्ञा बरीचशी पाळली आहे, असें म्हणण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. पण यास काहीं अपवाद आहेत ते असे:—

( १ ) अपवाद पहिला:—[१७] श्रीकृष्णानें ‘राजसूय’यज्ञप्रसगीं एका ब्राह्मणाचे प्रेत उठविलें त्याची व ‘जंबूक–भविष्य’ कथनाची अशा दोन अद्‌भुत व सुरस कथा आल्या आहेत. पण या व्यास ‘भारतात’ नाहींत. त्या श्रीधराने ‘जैमिनिभारता’तून घेतल्या असल्याचें स्वतःच सागितलें आहे. तो म्हणतो :—‘ तेथे एक जबूक आला व तो–‘येथें एक शिरच्छेद होईल ’ असे म्हणून एकदम गुप्त झाला. हे जैमिनिभारतींचे

१५ पा. प्र. ६४, १८०

१६ भावे. म. सा. पृ. ३३३

१७ पा. प्र. १७, २२५–२२७. या दोन्ही कथा ‘हरिविजया’त आल्या आहेत. ह. वि. ३३, २११–२३३, २३४-२३७

मत आहे असें श्रोत्यांनीं जाणावें. श्रीकृष्णानें प्रेत उठविलें हीही कथा तेथींचीच आहे. ही गोड कथा ऐकली म्हणून ती येथें योजिली.'

( २ ) अपवाद २ रा:—अध्याय अठ्ठावन ते त्रेसष्ट या सहा अध्यायात श्रीधराने 'अश्वमेध'पर्व सागितलें आहे. पण मुळातील कथेने त्याचे समाधान न झाल्यामुळें तो पुन: जैमिनीकडे वळला आहे. अठ्ठावन अध्यायाच्या प्रारभींच तो सांगतो कीं, जैमिनीनें सर्व भारत केले, परन्तु व्यासाने शापिलें, मात्र त्यातील 'अश्वमेध'पर्व फार रसाळ असल्यामुळे तें मात्र वद्य केलें म्हणून मी 'जैमिनिअश्वमेध' पाहून त्यातल्याच कथा लिहिल्या. बाडग्या ऐकींव दन्तकथा मी स्वीकारल्या नाहींत. दुंदुभि–विध्वंश आख्यान मुळात नाहीं. इतर कवींनीं तें कोठून घेतले कळत नाहीं.

" मूळ संस्कृत आधारावीण । कविता करी जो अज्ञान ।।
तयास होय बंधन । कल्पातवरी यमलोकीं [१८] ।।

जैमिनिभारतात जर ही कथा असती तर ती वर्णावयाला मला काय शीण पडता? हें मनात आणून श्रोत्यानीं माझ्या ग्रथास दोष ठेवूं नये.

पण गमत अशी आहे कीं, 'जैमिनिअश्वमेध' पुढें श. १६३७ त लिहिताना, मूळाबरहुकूम पाहिले साठ अध्याय लिहिल्यानन्तर पुढील अठ्ठावीस अध्यायात निरनिराळ्या पुराणातील कथा त्यानें मोठ्या आवडीनें वर्णिल्या आहेत. त्यात "ही तों भविष्यपुराणींची कथा" असे सागून, जी दुदुभीची कथा इतरानीं कोठून घेतली हे कळत नाहीं असें येथें प्रतिपादिलें आहे, एवढेंच नव्हे तर त्या पापाबद्दल त्यास कल्पान्तापर्यंत यम-

१८ पां. प्र. ६३, १४९

बन्धनाची शिक्षा होईल असा शाप दिला आहे, त्याच दुन्दुभिकथेपासून त्यानें आरंभ केला आहे. व शेवटच्या अध्यायातही पुन:—

'विभ्रंशी दुदुंभी सैन्यपाळ । या कथा वर्णिल्या सकळ ॥
तें व्यासवाक्य रसाळ । बोलिला सकळ पुराणीं[११] ॥

असें म्हणून या दोन्ही कथा आपणच मोठ्या पाल्हाळानें वर्णिल्या आहेत. पण यात आश्चर्य करण्यासारखें काहीं नाहीं. याचा अर्थ एवढाच कीं, पाडवप्रताप शके १६३४ त पूर्ण होईपर्यन्त श्रीधरानें 'भविष्य,' 'अग्नि,' 'पद्म,' 'शक्ति,' 'स्कन्द,' व 'ब्रह्म' इत्यादि पुराणें अवलोकिलीं नव्हतीं. शके १६३७ पर्यन्त त्यास त्यांचा परिचय घडला. तेंव्हा त्यातील निरनिराळ्या अद्भुत कथांचा समावेश त्यानें आपल्या "जैमिनिअश्वमेधात" केला. खरें म्हटले असता या ठिकाणीं तरी त्याला मागें (शके-१६३४ मध्यें) प्राकृत कवींस दिलेल्या शापाची आठवण होऊन त्यानें त्यास उ:शाप देऊन शाश्वत यमबंधनापासून मुक्त करावयास पाहिजे होतें ! पण तो विसरला झालें !

या वरील दोन अपवादाचे आधार श्रीधराने कारणासह स्वत:च नमूद करून ठेविले असल्यामुळें माझी रचना 'महाभारता'नुसारी आहे या त्याच्या सामान्य विधानास बाध येतो असें मानता येत नाहीं. परन्तु त्यानें 'महाभरता'च्या प्रचलित प्रतींत न आढळणाऱ्या व कांहीं थोड्या-फार भिन्न अशा अनेक गोष्टी आपल्या 'पांडवप्रतापा'त समाविष्ट केल्या आहेत. प्रस्तुत स्थळीं दोन्ही ग्रंथाची समग्र तुलना करण्याचा उद्देश नसल्यामुळें पुढें कांहीं ठळक गोष्टींचा उल्लेख केला आहे.

---

११ जै. अ. ६६, ७४

१) द्रौपदीस्वयंवरांत अर्जुनानें पण जिकल्यावरून कौरवानीं इतर राजाबरोबर द्रुपदाशीं युद्ध केले पण पराभूत होऊन ते परत गेले. पुढे विवाहविधीनन्तर त्यानीं द्रुपदाशीं युद्ध केले नाहीं. परन्तु श्रीधर पुनः युद्ध झाल्याचें सागतो. पाडव जोहारापासून वाचले व द्रुपदाचे जामात झाले हे ऐकून कर्ण, दुर्योधन, शकुनि व दुःशासन इत्यादिकास फार दुःख झालें. भूरिश्रव्याचा सामाचा सल्ला न स्वीकारता त्यानीं पाचालनगरीवर स्वारी केली. हें वर्णन श्रीधरानें मोठ्या थाटानें केलें आहे.[२०]

२) नारदानें तिलोत्तमा व सुन्दोपसुन्द याची कथा पांडवास सागितली हे मुळाप्रमाणें आहे. पण द्रौपदीची पाच भावात करून दिलेली दिवसविभागणी त्यात नाहीं. श्रीधर सागतो[२१]:—

तरी द्रौपदीचे दिवस नेमस्त । वर्ष वाटितों समस्त हे ॥
दोन मास द्वादश दिवस । पाचा ठायीं नेमस्त वरुष ॥
एकाची स्त्री असता चौघास । संबध नाहीं तत्वता ॥
"होईल कलह म्हणोनी । कीं मासद्वय बारा रजनी ॥

यारतव दिधली वाटोनी ॥

इत्यादि किर्लोस्कराचें सुप्रसिद्ध पद यावरूनच सुचलें असावें कीं काय अशी शंका येते. हीच गोष्ट त्यानें 'हरिविजया'त सागितली आहे.[२२]

३) तीर्थयात्रासमयीं 'काम्यक'वनात शिवार्जुनयुद्ध होतें, व त्यात शिवाकडून कवच–किरीट प्राप्ति होते[२३]

---

२० पा प्र. १२, १२१–१५१

२१ पा. प्र. १३, १०१–१०२

२२ ह. वि. ३२, १३७ ; २३ पां. प्र १३, १४७

मग शिवें कवच किरीट काढून । प्रसाद दिधला अर्जुनासि ।।
मग शिवे कवच किरीट कुंडले जाण । प्रसाद दिधला अर्जुना [२४]।।

४) अर्जुन–हनुमन्ताची सेतुबन्धनरामेश्वरीं भेट, त्यांच्या प्रतिज्ञा व हनुमन्ताचे ध्वजस्तंभीं राहण्याचें कबूल करणें. [२५] हीच गोष्ट 'हरिविजया'त आली आहे.[२६]

५) अर्जुनानें त्रिदण्डी सन्यास घेऊन सुभद्राहरण केलें.[२७]

ही कथा 'भागवत' दशमस्कन्धात आहे.[२८] पंतानीं आपल्या ' मंत्र भागवता'त व 'कृष्णविजयां'त ती वर्णिली आहे. पण ' आर्याभारता'त ती दिली नाहीं.[२९] 'हरिविजया'त अर्जुनास 'ब्रह्मचारी','तापसी', 'महातापसी' असे म्हटलें आहे. पण त्रिदण्डी सन्यास नाहीं.[३०] बाकी सर्व एकच आहे.

६) जरासन्धानें बावीस हजार राजे बन्दींत टाकिले होते.[३१] पाण्डवानीं कृष्णास पत्राने बोलाविले. भीमार्जुनासह कृष्ण त्याचेकडे गेला. मल्लयुद्ध चालू असतां कृष्णाने काडी चिरून संकेत दाखविला.

२४ ह. वि. ३२, १५९
२५ पा. प्र. १३, १४९–१८१
२६ ह वि. ३२, १८८–१९१
२७ पा. प्र. १३, १८२–१९५
२८ भागवत. दशमस्कन्ध, ८६
२९ मोरोपंत. आदिपर्व. ३८, ४२–६९
३० ह. वि. ३२, १९७–२५०
३१ "मूर्धाभिषिक्त राजे पशुसे षडशीति बद्ध आहेत."
मोरोपंत. आर्याभारत. सभापर्व. १, ६२

पुनःदुसऱ्यादा–'घेऊनि खर्जुरिकपात्र। चिरून दाखवी शतपत्रनेत्र[३२]॥

ही कथा मुळात नाहीं. काहीं कवींनीं ती सागितल्याबद्दल मुक्तेश्वराने त्यांवर टीका केली आहे.[३३] 'हरिविजया'त ही कथा आहे.[३४] पण तेथे खर्जुरीपत्राचा सकेत नाहीं. बावीस हजार छत्रपति राजे मुक्त केल्याचा व तृणकाडीचा सकेत मात्र दोनदा आहे. तेव्हा ती 'हरिवंशा'वरून घेतली असावी.

७) दुर्योधन श्रीकृष्णास म्हणतो:—तू पाडवास साह्य करतोस तसें मला का करीत नाहींस ? यावरून कृष्णानें त्यास व धर्मास एक सज्जन निवडून आणण्यास सागितलें. ही कथा 'पाडवप्रतापा'त आहे,[३५] 'भारतात' नाहीं. पण ती 'हरिविजया'त आहे.[३६]

८) द्रौपदी वाढीत असता तिच्या चोळीची गाठ सुटली, तो प्रसग व कौरवाची दुष्ट थट्टा हेंही वर्णन 'पाडवप्रतापात', 'हरिविजया'त व मुक्तेश्वरातही आहे[३७]

९) 'राजसूय'यज्ञात शुकमिषाने श्रीशुकाचे आगमन. ही कथा 'हरिविजया'त पण आली आहे.[३८]

---

३२ पा. प्र. १६, १९९ ; ३३ मुक्तेश्वर. सभापर्व. ७, ६०–६१
३४ ह. वि. ३३, ६७–९५ ; ३५ पा. प्र. १७,१८०–१८६
३६ ह. वि. ३३, १८४–१९८
३७ पां. प्र. १८, ४१–५६; ह. वि. ३४, ४०–५६;
मुक्तेश्वर. सभापर्व. ९, ७५–९०
३८ पा. १८, ८९–११०, ह. वि. ३४, ९२-११०

१०) आळस आला आहे, द्यूतानें करमणूक करावी वगैरे द्यूतारंभींचे दुर्योधनाचे विचार.[३९]

११) द्यूतात भीमाच्या हाकेविरुद्ध दुर्योधनाची तक्रार.[४०]

१२) पांचा ठायीं वाटिलें वर्ष । दोन मास द्वादश दिवस ॥
यात मी स्त्री भीमाची नि:शेष । तरी धर्में केवीं हारवी[४१] ॥

सभेंत नेण्यांस आलेल्या दूताप्रत हें द्रौपदीनें दिलेलें उत्तर

१३) द्यूतसभेंत भीम धर्मास गदेनें मारू पहातो:—भीम धर्मास म्हणतो:—"तुझे हात आतां गदाघाये तोडतों." धर्म म्हणाला "अवश्य तोड." इतक्यात अर्जुनाने भीमाचा हात धरला.[४२]

१४) जनकाच्या विनन्तीवरून अष्टावक्रानें जें दिव्य आत्मज्ञान सांगितले आहे तें मुळात नाहीं.[४३] 'महाभारता'त अष्टावक्राची गोष्ट आहे. पण तेथें दिव्य आत्मज्ञान नाहीं. अनुशासनपर्वांतही अष्टावक्र आहे पण तेथेही दिव्य आत्मज्ञान नाहीं.[४४]

---

३९ पा. प्र. २०, १४०–१४८

४० पा प्र. २०, १६३–१६८

धर्मासम्हणे दुर्योधन । हाक फोडितो भीमसेन॥
फांसे पडती उलथोन । आम्ही न खेळूं सर्वथा ॥

पां. प्र. २०, १६६

४१ पां. प्र. २१, १५ , ४२ पा. प्र. २१, ४९–६३

४३ पा. प्र. २६, १४४–२१६

४४ महाभारत. वनपर्व. १३२–१३४; अनुशासनपर्व. १९

१५) याज्ञवल्क्यानें जनकास जो उपदेश केला आहे, तो लोमशाने धर्मास सांगितला असें श्रीधर म्हणतो, पण तो मुळांत 'वनपर्वांत' नाहीं;[४५] पण वसिष्ठ–जनक संवाद आहे.[४६] पंचशिखानें जनकास ज्ञान दिलें. जनक–पराशर संवाद आहे.[४७]

१६) 'पांडवप्रताप' अध्याय तीसमध्ये संपूर्ण 'हरिश्चंद्रा'ख्यान आलें आहे. हें मूळ भारताच्या कोणत्याही प्रतींत नाहीं. मुक्तेश्वरी स्फुट प्रकरणां-पैकीं ते एक आहे. कथाभागानुसार ते श्रीधरानें 'वनपर्वांत' घातलें असावें. ही कथा लोमशाने धर्मास—तूही हरिश्चंद्राप्रमाणे सत्वधीर आहेस–असे म्हणून सांगितली आहे.[४८]

स्वस्ति श्रीपांडवप्रताप ग्रंथ । अरण्यपर्व व्यासभारत ।।
त्यातील सारांश यथार्थ । तिसाव्यांत कथियेला ।।

असा शेवटीं व्यासभारताचा हवालाही त्याने दिला आहे. तेव्हा एखाद्या मराठी कवीच्या भारतातून तें त्याने घेतलें असावे. मराठवाड्यात वसमतनगर येथे आम्हास मुक्तेश्वरी चार पर्वे मिळालीं आहेत. त्यात 'वन' पर्वांतच पण शेवटीं निराळें ' हरिश्चंद्राख्यान ' आहे. शेवटीं " इतिश्री महाभारते अरण्यपर्वणि हरिश्चंद्रोपाख्यान नाम पंचमोध्यायः " असे म्हटलें आहे. ही प्रत शके १६७२ तली आहे. तेव्हा श्रीधराच्या ' महाभारत ' प्रतीत तें असावें.

४५ पां. प्र. २७, ४०–२२७

४६ महाभारत. शान्तिपर्व ३०३, २१०–२११

४७ महाभारत शान्तिपर्व ३११–३२०

४८ पां प्र. ३०, ३५०

१७ ) विप्रवेषधारी इन्द्रास कर्ण म्हणतो[४९]: —" तूं पूर्वी कवच घेऊन गेलास. आतां तुला कर्णभूषणे देतों. " मुळात हे असे दोन प्रसंग नाहींत. एकच आहे.

१८ ) कीचक–सैरन्ध्रीचा एकान्त पाहून विराटाने त्याची कान-उघडणी केली. अपशकून होत आहेत. तिचा नाद सोड नाहीं तर तिचे पाच गुप्त गंधर्व तुझा घात करतील.[५०]

हे असे काहीं ठळक व तपशीलांत बरेचसे किरकोळ फरक श्रीधरात आढळतात. तेव्हा मी व्यासाधारे रचना केली आहे अशी वारंवार दिलेली त्याची ग्वाही सशयास्पद वाटते. कदाचित् त्याची 'महा-भारता'ची प्रत प्रचलित प्रतींहून भिन्न असण्याचाही संभव आहे. श्री. बा. अ. भिडे यांनीही असाच संशय प्रगट केला आहे[५१] किंवा कथा वैचित्र्याच्या मोहामुळें त्याने इतरत्र वाचलेल्या वा ऐकिलेल्या गोष्टी कळत वा न कळत समाविष्ट केल्या असाव्या व असें करताना बारीक-सारीक फरकाचा उल्लेख करणें राहून गेलें असेल, किंवा अशक्यही झालें असेल. कसेंही असो. वस्तुस्थिति ही अशी आहे खरी!

## ५ ग्रंथसंक्षेप

श्रीधर सांगतो, "माझा सुरस 'पांडवप्रताप' ग्रंथ व्यास–भारताचा सारांश आहे. " त्यालाच तो 'टीका' म्हणतो.[५२] सारांशात सामान्यत: मूळाबाहेरील कथाभाग येऊ शकत नाहीं. परन्तु श्रीधरानें अवान्तर

---

४९ पा. प्र. ३१, १८८ ; ५० पा. प्र. ३३, १११–११७

५१ भिडे. 'मुक्तेश्वर.' पृ. ९४ ; ५२ पा. प्र १, २६७–२६८

कथांसही त्यांत स्थान दिलें असल्यामुळे ' सारांश ' हा शब्द अधिक व्यापक अर्थानेंच घेणें प्राप्त त्याचप्रमाणे ही 'टीका' हा शब्द त्यानें मराठी अनुवाद या अर्थी योजिला आहे. 'ज्ञानेश्वरी' अथवा 'एकनाथी-भागवत' या मूळ ग्रंथांवरील टीका होत. म्हणजे त्यात मुळाचे स्पष्टीकरण किंवा रहस्यप्रकटन आहे. पण हा अर्थ येथे नाहीं. आणि विसाव्या शत-कांतील 'टीका' शब्दाचा अर्थ तर येथे नाहींच नाहीं. आतां या सारां-शाच्या संक्षेपविस्ताराकडे वळू.

आपल्या ग्रंथरचनेचें धोरण श्रीधराने आपल्या उपक्रमोपसंहारांत अगदीं स्पष्टपणें नमूद करून ठेविलें आहे. तो आरंभीं आपणासच म्हणतो, आधीच भारत ग्रंथ थोर, तू सविस्तर बोलशील तर ग्रंथ समुद्रासारखा होईल, आणि ध्वनित गुह्यार्थ बोलशील तर तो अबलांस यथार्थ कळणार नाहीं. तरी थोडक्यांत त्याचा अद्भुत रस आणून समस्तकथा आवर.[५३] पुनः शेवटीं तो सांगतो कीं, मूळ भारत सवालक्ष तितक्याचा जो मथि-तार्थ तो चौसष्ट अध्यायात सर्व कथा आकर्षून आणिला आहे. बहुत पाल्हाळ केला नाहीं व बहुत संकलितही केला नाहीं तर नेमस्त माथितार्थ धरून 'पाण्डवप्रताप' संपविला आहे.[५४] मध्यन्तरींच्या अनेक अध्यायांत त्याने याच हेतूस अनेक सुन्दर रूपक-दृष्टान्तांनीं पुष्टि कशी दिली आहे पहा:— "भारत रत्नांचा पर्वत आहे महद्भाग्याने तो दिसला. समस्त उचलेना म्हणून त्याकडे उगाच तटस्थ पहात राहिलों. मग त्यातील वरिष्ठ रत्ने काढून उचलेल अशी त्याची मोट बांधली, तिचाच हा ग्रंथ झाला. हा वटबीजवत् अणुमात्र असला तरी त्यातील कथासार सुरस साहित्ययुक्त

---

५३ पा. प्र. १, ४२-४३ ; ५४ पा. प्र. ६४, १६४–१६५

आहे.[५५] व्यासभारत महागंगा आहे. तृषाक्रांत होत्साता मी दीन श्रीधर तिजपुढें उभा ठाकलो. पण ती अद्भुत ! अवघी प्राशवेना ! मग तिचें जल किंचित् अञ्जलीने घेतलें तें 'पांडवप्रताप' गोड जीवन प्राशिता मी शीतल होऊन मला ब्रह्मानद झाला.[५६] कोणी पर्वताइतके धन दिलें तरी आपली शक्ति पाहूनच स्वीकारावें[५७] अहो ! टिटवा चचूभरून समुद्र रिता केव्हा करील ? भारतग्रथ तरी माझ्यानें कसा वर्णवेल ?[५८] क्षुधाक्रान्तानें दिव्यान्नाच्या पर्वत पाहून तो पोटात कसा मावेल म्हणून चिन्ताक्रान्त होऊन न बसता उदराइतके किंचित् घ्यावे. 'भारत' हा क्षीरसागर येथे थोर असंभाव्य भरला आहे. क्षुधातुर श्रीधर तिकडे धावला व त्यानें अञ्जुलीनें किंचित् क्षीर घेतलें.[५९]

यावरून 'पाडवप्रताप' ग्रथ अगदीं आटोपशीर करण्याचा निश्चय श्रीधरानें अव्वलपासून अखेरपर्यन्त आपल्या मनाशीं केला होता हे उघड दिसत आहे.

'हरिविजय' व 'रामविजय' या पूर्वींच्या ग्रथात आपल्या विस्तारभीरुतेचे उल्लेख श्रीधराने केले आहेत खरे, तरी पण ते येथल्यापेक्षा अगदीं अल्प व साधे आहेत. येथील सक्षेपावरील त्याचा कटाक्ष पुनरुक्तीनें व विस्तृततेनें फारच ठळकपणें दिसून येतो. 'महाभारता'चे मराठी अवतार अनेक झाले आहेत. पण श्रीधरासारखी संक्षेपकुशलता अन्यत्र दिसत नाहीं. या त्याच्या संक्षेपकुशलतेतच त्याच्या अलौकिक लोकप्रियतेचें बीज

५५ पा. प्र. १५, १६–१९ , ५६ पा. प्र. १६, २२९–२३०
५७ पां. प्र. ४१, १३९–१४८ ; ५८ पा. प्र. ३५,२३३
५९ पां प्र. ४१, १४७–१४८

आहे. कारण, नातिसंकोच वा नातिपाल्हाळ म्हणजे नेमस्त पण अतुटक अशा रीतीनें त्याने पाडवकथा मागितल्या आहेत.

अशा रीतीने वारवार उद्घोषित केलेलें संक्षेप–भारत तरी आपल्या हातून पुरें हाते कीं नाहीं याची त्याला अथपासून इतिपर्यन्त फार काळजी पडलेली दिसते; व तिचे पडसाद ग्रथात अनेक स्थळीं आपल्या कानावर येतात. तो सागतो:—

श्रीधरमुख निमित्त करून पंढरीनाथच हा ग्रथ बोलतो आहे.[६०]

" हे भीमातटविहारा, रुक्मिणीवरा, या भारताच्या परपारा माझेनि कदा न जावचे किती लिहू ! अत लागत नाहीं, म्हणून ग्रथ राहविला. लेखन सोडून दिलें व स्वस्थ झोपलो. तो काय नवल सागावे ! पढरीनाथ स्वये जवळ येऊन थापटून म्हणाले–श्रीधरसखया, लोकर ऊठ, लेखनास सुरवात कर. असे म्हणून आपले हातीं लेखनी करून मषीपात्र पुढे आणून मजपुढें त्यानें पुस्तक सोडून ठेविले." माझा हात धरून मला उठविलें. हातानें वदन कुरवाळून व हनुवटी धरून माझे हातात नाथाने लेखनी दिली व तो म्हणाला,"श्रीधरा, भारत पुरते कर. तू जे जे लिहिशील त्यात मी रस पुरवीन आणि हा तुझा ग्रथ, सकळ सन्त भक्त व पंडित हृदयी धरतील." असें लाघव दाखवून तो द्वारकानाथ झडकरी जाऊन विटेवर उभा ठेला.[६१] याच गोष्टीचा अनेक वेळा[६२] उल्लेख करून तो सागतो[६३]:—"पहा, पंढरीनाथानें माझी कशी अगदीं पाठ घेतली आहे.

६० पा. प्र. २७, २५८ ; ६१ पा. प्र. २९, ६–१३
६२ पा. प्र. ३९, २३५–२३८ ; ४१, ११–१३
६३ पा. प्र. ५३,११६–११७



८५

दुसरी गोष्ट आठवूं देत नाहीं. माझे पाठीशीं उभा राहून म्हणतो कीं, हें व्यासभारत लिही. पाल्हाळ टाकून साराश मी तुझ्या कानात सागतों तोच तूं पत्रीं लिहून ठेवलास कीं मला फार आनन्द वाटतो. '' पुढें ' आश्रमवासिक'पर्व सपाविल्यावर तो म्हणतो:-[६४] '' श्रीकृष्ण निजधामा गेले ते माझानि वदवेना. 'स्वर्गारोहण'पर्व तू लिहू नको असे वारवार पढरीनाथाने मला सागितलें. मी प्रत्यक्ष पढरीस उभा आहे मी आज अक्षय आहे.'न जायते म्रियते वा' हे गीतेचे वचन आहे. मी क्षराक्षरातीत उत्तम पुरुष आहे. तेव्हा तू निजधाम वर्णू नको. परन्तु ते वगळल्यास तुझे ' भारत ' पूर्ण होणार नाहीं, म्हणून कोणी पंडिताने आक्षेप घेतला म्हणून तें लिहिण्याचा विचार करू लागलों तों तोचि दिवशीं मला स्वप्नात येऊन पढरीनाथानें सागितले कीं, तू ते सर्वथा लिहू नको.'हरिविजय','रामविजय' व 'पांडवप्रताप' या तिन्ही ग्रथात मी तुला 'निजधाम' वर्णूं देत नाहीं. तथापि तूं अतिशय हट्ट करशील तर तें लिहिता वाचता प्रलय होईल ग्रीष्म-काळच्या तोयाप्रमाणें तुझी स्फूर्ति लय पावेल '' अशी आज्ञा होतांच मी नमस्कार घातला व जयजयकार करून पाडवप्रताप संपविला व जगज्जीवनाने तो ग्रथेंद्र उचलून माझे हातीं दिला व म्हणूनच तो ' वरदग्रथ ' आहे पण मौज ही कीं, हीं दोन्हीं त्यानें 'स्फुट प्रकरणात' स्वतंत्र रीतीनें वर्णिलीं आहेत.[६५] याचे त्याम येथे विस्मरण झालेंसे दिसते. त्यावरून हीं स्फुट प्रकरणें' त्याने अगोदर लिहिलीं असलीं पाहिजेत हे आमचें मागील विधान खरें ठरतें[६६]

---

६४ पा. प्र. ६४, १४८–१५६

६५ श्रीधर. च. आणि का. भा. २, प्र. ११, पृ. १७२

६६ श्रीधर. च. आणि का. भा. २, प्र. ११, पृ. १९०–१९१

या सक्षेपाचा विस्तार करितांना श्रीधराने एकन्दर पर्वे किती लिहिलीं त्यातील 'महाभारता'नुसार किती, त्यातील कोणकोणतीं गाळलीं व कोणकोणतीं अन्य ग्रथाधारे लिहिलीं व ग्रथातील ओव्याची वाटणी कशी झाली आहे वगैरे गोष्टींचा आता विचार करू

प्रथमतः असे दिसून येते कीं, श्रीधराने 'आदि'पर्वापासून 'शल्य' पर्वापर्यन्त ओळीनें नऊ 'पर्वे' लिहिलीं आहेत. नन्तर'शल्या'तील 'गदा'पर्व व 'सौप्तिका'तील 'ऐषिक''पर्व हीं पृथक्पणे वर्णिलीं आहेत[६७] यामुळें आतापर्यन्त श्रीधराची पर्वसख्या बारा होते पुन: 'स्त्री'पर्वान्तर्गत'विशोक'-पर्व निराळें काढून ''स्त्री'' व ''विशोक'' अशीं त्याचीं दोन पर्वे केलीं आहेत.[६८] नन्तर मुळाप्रमाणे ''शान्तिपर्व'' सागून ''अनुशासन''पर्व गाळलें आहे. परन्तु, या गाळणीचा उल्लेख त्याने कोठेच कसा केला नाहीं याचें आश्चर्य वाटतें ! त्याने त्यानन्तरचे 'अश्वमेध'पर्व जैमिनीवरून लिहिल्याचें त्याने स्पष्टपणेच सागितले आहे, आणि सरते शेवटीं ''आश्रमवासिक''पर्व सांगून 'पाडवप्रताप' सपविला आहे. 'स्वर्गारोहण' पर्व पाडुरंगाज्ञेनें त्यानें लिहिलें नसल्याचें सागितलें आहे. त्याच्याबरोबर 'मौसल' व 'महाप्रस्थानिक' हीं दोन पर्वें 'निजधाम'वर्णनानुबधीं असल्यामुळे तींही त्यानें गाळलीं आहेत. मात्र ही गोष्ट त्याने स्पष्ट केलेली नाहीं. तेव्हा एकन्दरीनें

---

६७ 'महाभारता'त 'शल्य'पर्वातच 'गदा'पर्व आहे. पर्वसग्रह श्लोक १७३–१७६ व 'सौप्तिक' पर्वात 'ऐषिक' पर्व आहे. डॉ. भाडारकर. स. प्रत. पर्वसग्रह १९०

६८ 'विशोक' पर्व हा 'स्त्री'पर्वाचाच भाग आहे. कारण, त्यातच मूळात वीरपत्नीचा विलाप,गान्धारी–धृतराष्ट्र क्रोध, शोक व प्रसन्नता याचें वर्णन आहे. त्यातच व्यासोपदेश आहे.

पाहता श्रीधराने 'महाभारता'नुसार महापर्वे, तेरा, उपपर्वे तीन व 'जेमिनि-अश्वमेधा'नुसार एक, अशीं एकूण सतरा पर्वेच लिहिलीं आहेत.[६९] मोरोपतांनींही आपल्या 'आर्याभारता'त पर्वासंबधीं अशा प्रकारची थोडीशी फिरवाफिरव केलेली आहे. त्यानी 'शल्य'पर्वातर्गत 'गदा' स्वतत्र करून व त्याला 'सौप्तिक' व 'ऐषिक' या जोड पर्वाची जोड देऊन 'आर्याभारताचे' दहावें पर्व केले आहे.[७०] 'पाडवप्रतापा'तील पर्वे, अध्याय व ओव्या हीं खालील कोष्टकात दिलीं आहेत.

| अनुक्रम | पर्व | अध्याय | ओव्या | अनुक्रम | पर्व | अध्याय | ओव्या |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | आदि | १४ | ३१९४ | ९ | शल्य | १ | १३९ |
| २ | सभा | ८ | १६३२ | १० | गदा | १ | १६६ |
| ३ | वन | ९ | २१०३ | ११ | सौप्तिक | १ | ११९ |
| ४ | विराट | ४ | ८९३ | १२ | ऐषिक | १ | १२१ |
| ५ | उद्योग | ५ | १११७ | १३ | विशोक | १ | १०५ |
| ६ | भीष्म | ३ | ६५४ | १४ | स्त्री | १ | १३४ |
| ७ | द्रोण | ३ | ७२३ | १५ | शान्ति | २ | ३१४ |
| ८ | कर्ण | ३ | ६२५ | १६ | अश्वमेध | ६ | ११५३ |
| | | | | १७ | आश्रमवासिक | १ | २०५ |

एकूण अध्याय ६८, ओव्या १३,३९७. अश्वमेध वजा करून =१२,२४४.

६९ म्हणे आश्रमवासिक पर्व जाण । सत्रावें हें सपविलें ॥

पा. प्र. ६४, १४६

७० मोरोपत. आर्याभारत. ३, पृ. २९३ पाददीप

ओव्यांच्या सख्यानुसार पाहता श्रीधराने 'आदि' व 'वन' यांस सर्वांत जास्त महत्त्व दिले आहे 'सभा' व 'उद्योग' त्याच्या खालोखाल येतात. नन्तर 'विराट', 'द्रोण', 'भीष्म' व 'कर्ण' हीं येतात. कारण, यात 'वीर'रसाचा सुन्दर आविर्भाव करण्यास कवीस अवसर मिळाला आहे बाकीचीं पर्वे शेदीडशात भरकन् आटोपून त्यानें शान्ति-पर्वास त्यांतल्यात्यात थोडेंसें अधिक महत्त्व दिलेलें दिसतें. 'अश्वमेधा'कडे कवीचा फार मोठा ओढा 'महाभारत'कथेनें समाधान न झाल्यामुळें तो 'जैमिनी'कडे वळला आहे. व त्यास हजार अकराशेंवर ओंव्या देऊन दुसऱ्या श्रेणींत त्याने बसविले आहे. पण येथेंही त्यास पुरेसा अवसर न मिळाल्यामुळे पुढे त्याने शके १६३७ त त्यावर प्रचड स्वतत्र रचना केली. कदाचित् तिचा पाया याच वेळीं रचला गेला असावा असें वाटतें.

आता या श्रीधरी सक्षेपाच्या मुळाशीं काय प्रमाण वसतें तें पाहू.—तो म्हणतो-मूळ भारतात आदिपर्वाचे दोनशे तीस अध्याय असून अठरा हजार नऊशें चौऱ्यायशीं श्लोकसख्या आहे.[७१] याचा सक्षेप श्रीध-राने चौदा अध्यायात व तीन हजार एकशें चौऱ्याण्णव ओंव्यात केला आहे. म्हणजेच अध्याय व श्लोक याच्या सक्षेपाचे प्रमाण अनुक्रमें शेंकडा

७१ व्यासभारताचे अध्याय विशेष । दोनशत आगळे तीस ॥
अवघ मिळोनि श्लोक सुरस । किती मर्यादा ऐका ते ॥
पा. प्र. १४, १७४
अठरा सहस्र नवशत । चौऱ्यायशी श्लोक विशेष परिमित ॥
इतुकी गणना नेमस्त । वैशपायनें केली असे ॥ पा.प्र.१४,१७५
या ठिकाणीं 'आठा'च्या जागीं 'अठरा' चुकीनें पडलेले दिसतात.

६ व ३५·५ असें पडतें. तर 'वन'पर्वातील[७२] दोनशे एकुणसत्तर अध्याय व अकरा हजार सहाशें चौसष्ट श्लोकाचा अनुवाद श्रीधराने नऊ अध्यायात व दोन हजार एकशे तीन ओव्यात केला आहें. याचे प्रमाण अनुक्रमे ३·३ व १८ असें बसते तर 'विराट' पर्वाच्या मूळ एकाहत्तर अध्यायाचे व दोन हजार पाचशें दहा श्लोकाचें श्रीधराच्या चार अध्यायाशीं व आठशे त्र्याण्णव ओव्याशीं हें प्रमाण अनुक्रमे ५.६ व ३५.५. असे झाले आहे म्हणजेच 'आदि'पर्वाप्रमाणे 'विराट' पर्वही श्रीधरास सारखेच आकर्षक वाटले. मुक्तेश्वराच्याही 'विराट'पर्वाच्या ओव्या नऊशें एक्याण्णव असल्या-मुळें उभयताची या पर्वावरील आवड अगदीं सारखी दिसते.

महाभारताच्या खालीं दिलेल्या निरनिराळ्या प्रतींत वरील पर्वाचे अध्याय व श्लोक असे आहेत[७३]:—

| | नं. १ | | न. २ | | न ३ | | न. ४ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अनुक्रमणि. | | गोपाळ नारायण | | गणपत कृष्णाजी | | कुंभकोणम् | |
| पर्व | अध्याय | श्लोक | अध्याय | श्लोक | अध्याय | श्लोक | अध्याय | श्लोक |
| (१) आदि | २२७ | ८८८४ | २३४ | ८६१९ | २३४ | ८४६६ | २६० | १०९९८ |

७२ या पर्वाचे अध्याय सस्कृत । सख्या बोलिला सत्यवतीसुत ॥
दोनशें अध्याय सुरस बहुत । एकोणसत्तर वरी बरवे ॥
पा. प्र. ३१, २५०
एकादशसहस्र चौसष्टी । इतके श्लोकाची मूळ गाठी ॥
साराश कथा गोष्टी । पाडुरंगे वदविली ॥ पां. प्र. ३१,२५१
या ठिकाणीं पण सहाशें चौसष्टबद्दल नुसते चौसष्ट चुकीनें पडलेले दिसतात.

७३ वैद्य चिं. वि. 'महाभारत' - उपसहार

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (२) वन | २६९ | ११,६६४ | ३१५ | १०,४९४ | ३१५ | ११,८५४ | ३१५ | १४,०८१ |
| (३) विराट | ६७ | २०५० | ७२ | २२७२ | ७२ | २३७३ | ७८ | ३०७५ |
| (४) भीष्म | ११७ | — | १२२ | — | १२२ | — | १२२ | — |

या दोहोंची तुलना करतां ‘ आदि ’पर्वाच्या अध्यायाची श्रीधराने सांगितलेली दोनशे तीस ही सख्या वरील कोणत्याही प्रतीशीं जुळणारी नाही, तरी ती नंबर एक, दोन व तीन याच्या मधली आहे. तसेंच श्रीधराने सांगितलेले ‘ वन ’ पर्वाचे दोनशे एकुणसत्तर अध्याय व अकरा हजार सहाशे चौसष्ट श्लोक या सख्या अनुक्रमणीशीं बरोबर जुळत आहेत. पुढे ‘ विराट’ पर्वाचे श्रीधरकथित अध्याय एकाहत्तर हे नंबर दोन व नंबर तीनशीं बरेच जुळते आहेत. तरी पण श्रीधराने सांगितलेली श्लोकसख्या दोन हजार पाचशे दहा ही कोणाशींच जुळत नाहीं त्याचप्रमाणे भीष्म-पर्वाचे श्रीधरकथित एकशे चार अध्याय हे कोणत्याही प्रतीपेक्षां फारच कमी असे आहेत. यावरून असें अनुमान निघते कीं, श्रीधराची महाभारताची प्रत विद्यमान प्रतींहून बरीच भिन्न होती. मागे कथेतील फेरफारावरून केलेल्या अशाच अनुमानास यानें पुष्टि येत आहे[७४]

आता ‘ महाभारता ’च्या एकन्दर श्लोकसंख्येचा विचार करू. ही सुमारे एक लक्ष असल्याचे सुप्रसिद्ध आहे. ‘ एक शतसहस्र च मयोक्तं वै निबोधत ’’ असे ‘ आदि ’ पर्वात म्हटले आहे. परन्तु, ‘ खिल ’ पर्वा-सह ही सख्या अनुक्रमणीनुसार शहाण्णव हजार आठशें छत्तीस आहे व

---

७४ श्रीधर च. आणि का भा. २, प्र. १५, पृ.३४५–३४९

त्यातील ' खिल ' पर्वाचे बारा हजार श्लोक सोडल्यास चौऱ्यायशीं हजार आठशें छत्तीस श्लोक राहातात. इतर प्रती पाहाता 'हरिवंशा' सह ही संख्या पंचाण्णव हजार आठशे सव्वीस व जास्तींत जास्त एक लाख दहा आहे. तेव्हा ' महाभारत ' ग्रंथ जवळ जवळ एक लक्ष आहे हे वस्तुस्थितीस धरून आहे.[७५] ज्ञानेश्वर–मोरोपतादि[७६] मराठी कवि महाभारताची श्लोकसंख्या एक लक्षच सांगतात. परन्तु, श्रीधरानें मात्र आरंभीं व शेवटीं ही संख्या सव्वा लक्ष म्हणून सांगितली आहे :—[७७]

हरिवंशासमवेत । अवघे सवालक्ष भारत ।।

सवालक्ष मूळ भारत । तितक्याचा जो मथितार्थ ।।

या एकंदर सव्वालक्ष संख्येवरून ही श्रीधराची महाभारताची प्रत

---

७५ केळकर न. चिं. ' महाभारतासंबंधीं काहीं नवीन माहिती.' 'सह्याद्रि' सप्टेंबर १९४६

"श्री. पी. आर चिदंबर अय्यर यांच्या इंग्रजी व्याख्यानानुसार–
डॉ. सुखटणकर ८२, १३६
दक्षिण संप्रदाय ९५, ५८६
अय्यर पद्धतीनें ८६, १७५
शेवटली भारतकारांनीं सांगितली म्हणून विश्वासार्ह. नऊ व अठरानी भाग जाईल ती संख्या खरी मानावी.

७६ 'व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी'. मोरोपंत. आदिपर्व १, ९

७७ पा. प्र. १, ५१ , ६४, १६४

प्रचलित प्रतींहून निराळी व सर्वांहून मोठी अशी असावी असे सिद्ध होतें. याच कारणास्तव मागें दर्शविलेले कथेतील बारीक मोठे फरक उद्भवले असण्याचा संभव आहे. तसेंच खरोखरी असल्यास माझा ग्रंथ व्यासानुसारी आहे या त्याच्या प्रतिज्ञेस फारसा बाध येणार नाहीं.

पण मोठ्या मौजेची गोष्ट ही कीं, 'रामायण' व 'गीता' यांस अजिबात संक्षेप देणाऱ्या या संक्षेपप्रिय व विस्तारभीरु श्रीधराने आपल्या या ग्रंथात कित्येक स्थळीं आपण होऊनच विस्तार व पाल्हाळ केला आहे. त्याने विद्यमान महाभारतप्रतींस सोडून जे अन्य कथाभाग वर्णिले आहेत त्याचा यातच समावेश होतो याचा उल्लेख मागें आलाच आहे.[७८] बारीकसारीक फरक प्रतींच्या भिन्नपणामुळे उद्भवले असणें संभवनीय आहे असे मानून ते घटकाभर बाजूस ठेविले तरी कोणत्याही विद्यमान प्रतींत समाविष्ट नसलेले 'हरिश्चन्द्राख्यान' तिसाव्या अध्यायात तीनशे पन्नास ओव्यात वर्णून श्रीधराने विस्तारप्रियताच व्यक्त केली आहे. त्याचप्रमाणे मूळभारत सोडून जैमिनीकडे धाव घेऊन सहा अध्यायात व एक हजार एकशे त्रेपन्न ओव्यात त्याने जे 'अश्वमेध'पर्व वर्णिलें आहे त्यायोगें त्याच्या संक्षेपप्रतिज्ञेस हरताळच फासला गेला आहे पण यास कारण एकच. त्याचा गोष्टीवेल्हाळपणा. ' स्वभावो दुरतिक्रमः ' म्हणतात तो असा. ही गोष्ट झाली विस्ताराची. पण ग्रंथात अनेक स्थळीं त्याने स्वतःच पाल्हाळही केला आहे. त्यापैकीं पुढे काहींचा नामनिर्देश केला आहे.

समुद्रमथनसमयीं अमृताची वाटणी करण्यास आलेल्या मोहिनीचे

---

७८ श्रीवर्ग च आणि का. भा. २, प्र. १५, पृ ३४५–३४९

स्वरूपवर्णन पाल्हाळानें केलेले आहे.[७९] पुढे शकुंतला विवाहानन्तर बरेच दिवस पितृगृहीं राहिली यावरून तरुण, सुन्दर वनिता माहेरीं फार दिवस राहिल्याने लोकनिन्दा कशी उद्भवते, त्यात कोणी दुराचरणी निघाल्यास त्या कुळाला कलंक कसा लावतात, वगैरे गोष्टी सागून अशा स्त्रियाची त्याने निन्दा केली आहे. आणि शेवटीं सावरून नेऊन त्याने म्हटले आहे कीं, हा पाल्हाळ बहुत झाला खरा. पण किंचित् लोकचर्चा सांगितली.[८०] पुढें इंद्रप्रस्थातील धर्मराज्याचे वर्णन बरेच लांबले आहे[८१] त्याचप्रमाणे वस्त्रहरणप्रसगीं द्रौपदीचा धावा, पेठाची व पातळाची नामावळी,[८२] दुर्वासभोजनवर्णन दमयन्तीरूपवर्णन,[८३] अष्टावक्र व बंदी याचा संवाद,[८४] पतिव्रताधर्म,[८५] क्षत्रियधर्म.[८६] सौप्तिकवधानन्तर पांडवद्रौपदी याच्या शोकाचे वर्णन,[८७] धर्मास गंगेवर ऋषि भेटले त्याची नामावळी,[८८] 'अश्वमेधा'तील चौसष्ट दापत्ये व भोजनवर्णन,[८९] या सर्व ठिकाणीं कवीनें पाल्हाळ केला आहे. अशी आणखी किती तरी स्थळे दाखविता येतील. क्वचित् स्थळीं रसिकता दर्शविण्याचा व प्रसंग सापडेल तेथे धर्म, नीति, लोकव्यवहार इत्यादिकाचा उपदेश करण्याचा त्याचा हव्यास अशा पाल्हाळास कारणीभूत झाला आहे

७९ पा. प्र. १, २३१–२६०, ८० पा. प्र. ४, २०–४७
८१ पा. प्र. १३, ६१–६९, ८२ पा. प्र. २१, १४०–१८५
८३ पा. प्र. २५, १०–२४ ; ८४ पा. प्र. २६, १५०–२१०
८५ पा. प्र. २८, ४६–७४ ; ८६ पा. प्र. ३६, ४२–४९
८७ पा. प्र ५३, १८–३५, ८८ पा. प्र. ५६, १०–२९
८९ पा. प्र. ६३. ५०–५८

## ६ ग्रंथरचनेचा हेतु

आता पाण्डवप्रताप'ग्रंथाची रचना करण्यात श्रीधराचा काय हेतु होता हें पाहू या महाराष्ट्रांतील सन्तकवींचा मराठींत ग्रंथरचना करण्याचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे संस्कृत ग्रंथातील वेदान्त व धर्मरहस्य याचे भाण्डार खुले करून स्त्रीशूद्रादि सामान्य जनास परमेश्वरप्राप्तीचा मार्ग मोकळा करून देणें हाच होता. ज्ञानेश्वरापासून तो मोरोपंतापर्यन्तच्या सर्व सन्तपण्डितकवींनीं तो आपापल्या काव्यात स्पष्ट केला आहे.[१०] रमावल्लभदास,[११] रामदासाप्रमाणेंच[१२] श्रीधरानेही हाच हेतु व्यक्त केला आहे. तो म्हणतो,[१३] "आबाल भोळे अज्ञानजन प्रपंचरजनींत चाचपडत पडले आहेत त्याना ही ज्ञानदीपिका पाजळून मी सन्मार्गाचें दर्शन घडवीत आहे. हा माझा ग्रंथ वरद आहे.[१४] त्यानेच ते तरतील. पण या परोपकाराबरोबर थोडा स्वार्थही आपाआप साधतो. तो म्हणजे 'सद्यःपरनिर्वृति' हा होय. तो म्हणतो[१५]:—

'वाचेचे सार्थक करावे यथार्थ । म्हणोनि आरंभिले व्यासभारत ।।

---

१० तीरें संस्कृताचीं गहने । तोडोनि मऱ्हाटिया शब्दसोपाने ।।
रचिलीं धर्मनिधाने । श्रीनिवृत्तिदेवे ।। ज्ञानेश्वरी. ११, ९

११ 'कवि नसते धरणीवरी । परमार्थ कळता केंवि तरी'?
रमावल्लभदास.'चमत्कारी 'टीका'—पांगारकर. म.वा.इ.खण्ड २
पृ. ७२१

१२ नसता कवींचा व्यापार । तरी कैंचा असता जगदुद्धार ।।
रामदास. दासबोध. द. ७, २१

१३ पा. प्र. ४१, ९ १४ पा. प्र. ५३, ११८

१५ पा. प्र. ४१, १४९

सामान्यतः मराठी कवींत ही प्रवृत्ति पुष्कळदा आढळते. पुढे मोरोपंतानींही असेच उद्गार काढले आहेत [१६]

या वरील दोन हेतूव्यतिरिक्त आणखीही दोन हेतु श्रीधराने व्यक्त केलेले दिसतात.ते म्हणजे रसिकाचे मनोरंजन व लोकशिक्षण तो म्हणतो[१७]:-

"रसिक साहित्य, चातुर्यवाणी वदून श्रीधराची वाग्भवानी स्वानन्दानें गोन्धळ घालील. चतुर पंडिताना काव्यरसाची मेजवानी देऊन त्यास डोलवावयास लावीन माझा ग्रंथ अभिनव चातुर्याने भरलेला जलार्णव आहे. तो नवरसाचे भांडार आहे. वीर पुरुष त्यातील अपार वीररसाने सतुष्ट होतील वेदशास्त्रपंडितास वेदींचा साराश पाहून समाधान होईल. परमहंसाना समाधिसुख लाभेल भक्ताना प्रेमरस दाटेल विलासी लोकास त्यातील शृंगार रजवील युक्तिवन्तास बुद्धिचातुर्य मिळेल. एवच प्रापञ्चिक, रसिक, भक्त, मुमुक्षु, साधक सिद्ध व सन्त अशा भिन्न भिन्न रुचींच्या लोकास हे माझे काव्य"एक समाराधनम्" असें होईल" पण विशेष कौतुकाची गोष्ट ही कीं, या बहुविध मेळाव्यात तो स्त्रियास विसरला नाहीं, ग्रंथारंभींच तो स्वतःस इषारा देतो की- [१८]

'बोलसी ध्वनित गुह्यार्थ । तरी अबलास न कळे यथार्थ ।।
तरी थोडक्यात रस अद्भुत । कथा समस्त आवरीं ।।

---

१६ हरि ज्याचा कैवारि त्या पांडुसुतासि वंदितो भावें ।
वाटे चरित्र त्याचे कांहीं आपण तरावया गावें ।।
मोरोपंत. आदिपर्व. १, ८

१७ पां. प्र. १५, २२६–२२७, १५, ८–१९

१८ पां. प्र. १, ४३

तेव्हा अबलास आपला ग्रंथ सहज समजावा व कण्टाळवाणा होऊं नये म्हणून त्याने सुबोध, रसाळ व आटोपशीर करण्याची खबरदारी घेतली आहे अशी स्त्रियाविषयींची कळकळ त्यानें इतरत्रही व्यक्त केली आहे. यावरून अशा प्रकारचे स्त्रीदाक्षिण्य दर्शविणाऱ्या मराठी कवींत श्रीधरास अग्रमहत्व देणे योग्य ठरते.

या चतुर्विध हेतूंत सुन्दर साहित्यनिर्मितीवरच श्रीधराचा विशेष भर दिसतो. निदान या गोष्टीची जाणीव तरी त्यानें पदोपदीं वाचकास करून दिलेली ग्रंथभर आढळते. तो म्हणतो:— 'माझे काव्य गोड आहे.[९९] तें रसाळ आहे.[१००] ते फार सुरस आहे.[१०१] सुधारसाहूनही ते गोड आहे.[१०२] ते कमलाप्रमाणे सुन्दर व सुवासिक आहे [१०३] म्हणूनच सज्जनमिलिंद त्याचा आमोद सेवण्यास धावतात. तें परमपवित्र अन्नसत्रच आहे [१०४] क्षुधातुर श्रोते त्याचा कर्णद्वारें आस्वाद घेतात माझे चौसष्ट अध्याय म्हणजे चौसष्ट कलांची एक अद्भुत व सुन्दर 'माला'च आहे [१०५] भाग्यवन्तास विश्रान्तीसाठीं ही चौसष्ट 'गोपुरे'च आहेत किंवा अपार द्रव्यानें भरलेलीं भवदरिद्रनाशक हीं 'कोहळीं'च आहेत. हे चौसष्ट हिऱ्यांचे 'पदक' आहे. सभाग्य भक्तच तें धारण करतात. त्यातील वनपर्व तर वसन्तवनच असून त्यात दृष्टान्तवृक्ष सघन दाटले आहेत.[१०६] त्यात साहित्यवनश्री आपल्या टवटवीतपणाने विराजमान झाली आहे.

---

९९ पा. प्र १, २६५ . १०० पा. प्र. ३, २२३, ४, १४४
१०१ पां. प्र. २, २१६ , १०२ पां. प्र १, २६५
१०३ पा. प्र. २२, १५१-१५८ १०४ पा. प्र ३४, २३०
१०५ पा. प्र ६४, १८० . १०६ पा. प्र २२, १५८

माझा ग्रंथ नवरसानीं भरला आहे. 'भीष्म' व 'द्रोण' या पर्वांत वीररस माजला आहे.[107] तर 'स्त्री'पर्व करुणरसाने भरला आहे.[108] एवच माझा ग्रंथ सकळ साहित्याचे भांडार आहे.[109] त्यात अपार साहित्यरत्नें आहेत.[110] जे रसिक पंडित, भावार्थी व चतुर नर असतील तेच याचे ग्राहक होतील.

यावरून सुन्दर साहित्य निर्माण करण्याकडे श्रीधराचा कसा प्रमुख कटाक्ष होता हे सहज ध्यानात येईल. तेव्हा हा ग्रंथ लिहिण्यात श्रीधराची भूमिका पुढीलप्रमाणे दिसते :—

( १ ) पांडवकथा सुसूत्र व संक्षेपाने सांगणे व आपली वाणी पावन करणे.

( २ ) रमणीय काव्यनिर्मिति करणे.

( ३ ) लोकशिक्षण देणें.

आता हा त्रिविध अर्थ श्रीधराने आपल्या या ग्रंथात कोणत्या प्रकारे साधला आहे हे क्रमशः पाहू.

आपल्या प्राचीन वाङ्मयात 'महाभारता'स अलौकिक महत्त्व आहे. ज्ञानेश्वरानें आपल्या 'ज्ञानेश्वरी'त त्याचा महिमा तितक्याच अलौकिक माधुर्यानें गाइला आहे आणि शेवटीं असे म्हटले आहे कीं—

म्हणौनि महाभारतीं जे नाहीं । ते नोहेचि लोकीं तिहीं ॥
येणेंकारणे म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्त्रय ॥ १, ४७

---

१०७ पा. प्र. ४१, २००, ४४, ५–६

१०८ पा. प्र. ५४, १०२ १०९ पा प्र ३८, २०७

११० पा. प्र. ५, २८५

अशा या राष्ट्रीय ग्रंथावर रचना करण्याचा मोह अनेक मराठी कवींस व्हावा यात नवल नाहीं. अनन्ततनय, चन्द्रात्मज रुद्र, नरहरी मोरेश्वर, नवरस नारायण, विष्णुदासनामा, पद्मनाभ, माधव, मुक्तेश्वर, मोरोपंत, विश्वनाथ, विप्र, शुभानन्द, हरिदास कान्हा, गोपाळ, शिवाशिवा, मुरारि, जनार्दन, शिवनाथ, माल्नाथ व श्रीधर अशा वीस कवींनीं 'महाभारता'वर रचना केल्याचे वाङ्मयतिहासावरून समजते.[१११] यापैकीं विष्णुदासनामा, माधव, शुभानन्द, गोपाळ व मोरोपंत अशा पाच जणांनींच समग्र भारतावर रचना केल्याचें आढळतें बाकीच्या पैकीं हौशीने कोणीं दोन, कोणीं चार अशीं पर्वे लिहिलीं आहेत यापैकीं मुक्तेश्वर, मोरोपंत वगळल्यास इतर भारतकारांचीं नुसतीं नावेही वाङ्मय-संशोधक व इतिहासवाचक याशिवाय इतरांस ठाऊक असणे शक्य नाहीं. त्या मानानें मुक्तेश्वर, मोरोपंत हे बरेच सुप्रसिद्ध आहेत. पण त्यांच्या ग्रंथाचें वाचन–पठण त्यांचे चरित्रकार, टीकाकार, इतिहासकार व शाळाकॉलेजातील शिष्य व शिक्षक यांच्या मध्येच चालू असलेले दिसेल मोठमोठे रसिकही त्यांच्या ग्रंथाचें वारंवार अवलोकन करीत असणें शक्य नाहीं. पण श्रीधराच्या 'पाडवप्रतापा'चीं मात्र अगदीं खेड्यापाड्यातून सुद्धा अठरापगड साक्षर स्त्रीपुरुषाकडून अनेक पारायणे केलीं जातात. याचे कारण त्याची सुसूत्र व संक्षिप्त अशी निवेदनपद्धति व आबाळ सुबोध, रसाळ व गोड अशी वाणी हे होय. ग्रंथलेखनाचें कार्य चालू असता वारंवार ईश्वरी साक्षात्कार झाल्याच्या त्याच्या वर्णनावरून आपली वाणी पावन करण्याचाही त्याचा हेतु सिद्धीस गेला आहे असे म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

१११ भावे.म सा. पृ. ४४५

आता उत्कृष्ट काव्यनिर्मितीचा त्याचा दुसरा हेतु कितपत साध्य झाला आहे ते पाहू. ग्रंथलेखनात काव्यनिर्मितीवरील त्याचा कटाक्ष व आपल्या काव्यसौन्दर्याची त्याने केलेली प्रशंसा याचा उल्लेख मागे येऊन गेलाच आहे.[११२] इतर मराठी कवींप्रमाणें श्रीधरानेही आत्मप्रशस्तींत थोडीशी अत्युक्ति केली आहे हे कबूल केले पाहिजे. ती वजा करूनही त्याचे काव्य रमणीय व आल्हाददायक आहे यात संशय नाहीं. ग्रंथारंभींचे मंगलाचरण, व प्रत्येक पर्वाचा आरंभ काव्यमय आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक अध्यायाचे व पर्वाचे अन्तीं जे पुढील अध्यायाचे वा पर्वाचे अवतरण सुचविले आहे ते अत्यन्त मार्मिक व उत्कण्ठावर्धक असल्यामुळे वाचकास पुढे पुढें सहज खेचून नेते. त्याचप्रमाणे दैवी स्फूर्ति व साक्षात्कार याच्या वर्णनाच्या ओव्याहि मोठ्या हृद्य झाल्या आहेत श्रीधराने जी आपल्या काव्याची प्रशंसा जागोजाग केली आहे तिचे पृथक्करण केल्यास आपणास असे आढळून येते कीं, तींत नवरसाचा व विशेषतः शृंगार, वीर व करुण रसाचा व भक्तीचा त्याने उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें दृष्टान्तादि अलंकार आणि ज्ञान, वैराग्य, लोकनीति व राजनीति याविषयीं तर्कनिष्ठ चतुरालाप माझे काव्यात भरपूर आहेत असही तो सागतो. तेव्हा अशा स्थळाचा नामनिर्देश पुढे केला आहे. प्रथमतः रसाकडे वळूं.

## ७ रसपरिपोष

समुद्रमंथनानन्तर अमृत वाटणाऱ्या मोहिनीचे वर्णन, मेनका व विश्वामित्र याच्या भेटीचे वर्णन, दुष्यन्तशकुंतलाप्रेम, ययाति व शर्मिष्ठा

---

११२ श्रीधर. च आणि का.भा. २, प्र ११. पृ. ३६३-३६४

याचे चोरटे प्रेमालाप, हिडिंबेचें भीमावर भाळणें व सुभद्राहरण इत्यादि प्रसंगींचा शृंगाररस चांगला उठावदार झाला आहे. द्रौपदी, सुभद्रा, सावित्री, दमयन्ती, शकुन्तला, शर्मिष्ठा वगैरे स्त्रियांचीं रूपवर्णनेंही आकर्षक झालीं आहेत. 'भीष्म,' 'द्रोण,' 'कर्ण,' 'शल्य' या पर्वांत वीररस खूपच माजला आहे. याशिवाय हिडिंब, जरासन्ध, बकासुर, कीचक व 'गदा'पर्वांत दुर्योधन यांशीं झालेलीं भीमाचीं द्वंद्वयुद्धें इतकीं उठावदार झालीं आहेत कीं, तीं प्रत्यक्ष आपल्या पुढें होत आहेत कीं काय असें आपणास त्या त्या शब्दचित्रावरून भासतें. खाडववनदाहप्रसंगींचा जरितेचा शोक, अभिमन्युवधप्रसंगीं उत्तरा, सुभद्रा व द्रौपदी यांचा शोक, 'सौप्तिक' पर्वांतील द्रौपदीचा शोक, 'विशोक' पर्वांतील धृतराष्ट्रगान्धारींचा शोक व 'स्त्री'पर्वांतील कौरवस्त्रियांचा मृतपतींबद्दल शोक वगैरे सर्व प्रसंग मोठे हृदयद्रावक झाले आहेत. नवरसांपैकीं हेच तीन रस श्रीधरानें प्रामुख्यानें वर्णिले आहेत व त्यास ते चांगल्या पैकीं साधले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं त्यातल्या त्यात करुणरसाविर्भावांत त्याचा हातखंडा आहे. आरंभींचें 'सरस्वती'वर्णन, सभापर्वांतील 'पाडुरंग'वर्णन, 'अग्नि'स्तवन 'दुर्वास च्छल-प्रसंगींचा व 'वस्त्र'हरणप्रसंगींचा द्रौपदीचा धावा, 'भीष्म'पर्वांतील अर्जुनाचें 'दुर्गा'स्तोत्र, अश्वत्थामाकृत 'शिव' स्तोत्र वगैरे प्रसंगांत भक्तिरस बराच आला आहे. बाकीच्या रसास या ग्रंथास केवळ पङ्क्तिकाराचा मान मिळाला आहे. द्रौपदीची दुर्योधनास क्रोधोक्ति ('सभा'पर्व), पाडवक्षोभवर्णन (सौप्तिकपर्व) व महारुद्रवर्णन (कृष्णाचें विराट स्वरूप) यांत भयानक व रणावरील प्रेतवर्णनांत बीभत्स हे रस आले आहेत. तर 'शान्ति'पर्वांत शान्तरस पहावयास मिळतो. 'अश्वमेध'पर्वांत अद्भुत व हास्य या रसांस स्थान मिळालें आहे. हे झालें रसासंबंधीं.

# ८ अलंकार

आता अलंकाराकडे वळू कारण, साहित्यरत्नात त्याचा समावेश प्रामुख्यानं होतो; आणि काव्याची शोभा अलंकारानों वाढत असल्यामुळे रसोत्पत्तीस ते साहाय्यकत्र होतात. श्रीधरानं स्वतः दृष्टान्ताचा जरी विशेष जोराने उल्लेख केला असला तरी त्याने इतर अनेक ठळक शब्दार्थालंकाराचा जागोजाग उपयोग केला आहे उपमा[११३], रूपक[११४], उत्प्रेक्षा[११५], दृष्टान्त[११६], अपन्हुति[११७], परिसंख्या[११८]. एकावली[११९], [१२०], अनुप्रास, शब्दावर कोट्या[१२१] वगैरे साहित्यरत्नानीं श्रीधराचें काव्य सुशोभित झाले आहे. वरीलपैकी पहिल्या चारावर त्याचा अतिशय भर आहे.काही ठिकाणी नावाची व्युत्पत्ति दिलली आढळत. उदाहरणार्थ–इंद्राने बाधलले म्हणून इंद्रप्रस्थ[१२२], तिलप्रमाण रत्ने जोडून विधीनें निर्मिली म्हणून तिलोत्तमा[१२३], जरेने बाळ जडिला म्हणून जरासन्ध इ. नामान्तरेंही ठिकठिकाणी आढळतात. उदाहरणार्थ–अर्जुन, सूर्य. वरुण, भीष्म. कृष्ण, अग्नि, शंकर, ब्राह्मण यम, ब्रह्मा, चन्द्र, धृतराष्ट्र, विदुर,

---

११३ पां प्र २३, १७७-१७८

११४ पा. प्र. ३६, ३२, ५६. १–६

११५ पा. प्र ४६, २०४, ६४, १

११६ पा. प्र. ३६, ४२-४३; ३६. १६९–१७७

११७ पा. प्र. २८, १९६ ; ११८ पा. प्र. ६०, ३–४

११९ पां. प्र. ५६, ८४ ; १२० पा. प्र. ४८, १, १७, ३९

१२१ पां. प्र. २९, १९१–१९८; १२२ पा. प्र. १३,५६–५७

१२३ पां. प्र. १३, ९५

इद्रप्रस्थ, इद्र, नारद, रावण, कर्ण, हस्तिनापूर वगैरेचे उल्लेख प्रत्येक वेळेस नामान्तराने केलेले आढळनात. हा श्रीधराचा छव्यास त्याच्या सर्व ग्रथात दिसून येतो तो इतक्या थराला गेलेला आढळतो की, 'अमरकोशा'तील प्रतिशब्द सपल्यावर तो मुद्दाम नवीन शब्द बनवितो पुढे एकच उदाहरण दिले आहे: —

**अग्निः**—हव्यवाट्, अनळ, वायुसुत, चित्रभानु, बृहद्भानु, कृशानु; ज्वलन, हुताशन, विभावसु, वीतिहोत्र; वायुनन्दन, वैश्वानर, कृष्णवर्त्मा; भूरितेज, लाहिताश्व, पावक, मेषवाहन, मरुन्मित्र, चत्वारिशृंगा, त्रिपाद; अधोमुख, द्विमूर्धान, सप्तपाणि, जातवेद, ज्वालामाली, सागरजीवनशोषक; त्रिचरण इ.

## ९ साहित्यभाषणें

सुभाषिते म्हणी व वाक्संप्रदाय याची गणनाही साहित्यरत्नात केली पाहिजे, आणि तींही जागोजाग विखुरलेलीं आढळतात.: —

१ ) महागज देखोनि भुकत । श्वान जैसें अनिवार ॥ पा.प्र १९,५०

२ ) कर्माच्या गति तो गहना । आले भगवताचे मना ॥
तेथे कोणाचे चालेना । कल्पातींही सर्वथा ॥ पा. प्र.२०,२३

३ ) न घे म्हणता न सुटे वाहिलें । जे का लिहिलें विधीने ॥
पा. प्र. २२, १५

४ ) एव नळास नारायण । पाठमोरा जाहला ॥ पा.प्र.२५, १३८

५ ) कमलपत्राक्ष कृपाघन । वर्षला स्वातीचा पर्जन्य ॥
परि पालथा घट दुर्योधन । बिंदुमात्र आत न साचे ॥
पा. प्र. ३९, ५०

६ ) अंतर्बाह्य केवळ अंधु । हृदयीं न ठरे ज्ञानबोधु ।
जैसा पालथे घटीं जलबिंदु । सर्वथाही प्रवेशेना ॥
पा. प्र. ५४, ८६

७ ) ऐशी त्रिदशेश्वराची वाणी । श्रवण करोनि ते मेदिनी ॥
गाठी देत पल्लवालागुनी । वाट पाहे समयाची ॥ पा प्र.५४,९७

८ ) पाषाणाखालीं सापडे हस्त । तो युक्तीनें काढावा अकस्मात॥
पा. प्र. ३६, ६०

९ ) शठाप्रति शठपण । करून घ्यावा त्याचा प्राण ॥

१० ) आपले कुमार हातीं धरूनि । धर्मचरणावरी घालीं पै ॥
पां. प्र. २३, १०९

११ ) दुर्योधनादिकास धर्माचे करीं देऊन पदर पसरून प्राणदान मागून घे. भीमाचे पोटात डोई घालून दुःशासन हातीं दे. दुर्योधनाचे मस्तकीं धर्मरायाचा सुखघन हस्त ठेववीं.
पा. प्र. २३, १११–११२

१२ ) हस्तावरी हस्त हाणिती, पूतना उजवी घालून ॥
पा. प्र. ३ , ९

थोर निर्वाण मांडिलें. तुम्हावरून काय ओंवाळीन; त्याचा झाडा दे; बाणें गिरिगिरि आली. पा. प्र. आ. ३५

१३ ) गर्वानें उताणा चालणें; मृत्यूस वाटून प्यायले.
पा. प्र. अ. ३७

१४ ) दुर्योधनाचें एकछत्री राणीव करीन मी ( कर्ण ).
पा. प्र. अ. ३८

१५ ) विघ्ना वरपडा होसील ( पात्र . पा. प्र. अ. ३९

१६ ) दुधाचे आधणीं पाषाण घातला तरी शिजत नाहीं.
पां. प्र., अ. ४०

१७ ) पृथ्वी ठाव लपावयाला देत नाहीं. पा. प्र., अ. ४६

१८ ) सुईचे रंध्राएवढें वदन त्यांत पर्वत कैंवी मावे. पा.प्र.,अ.४७

१९ ) यशाचा तुरा तूं पावशील. पां. प्र., अ. ५०

२० ) नागरिक दीन जाहलीं समस्त। दातीं धरिती तृण तेव्हा ॥
निद्रित श्रीरंग पंचानन । तंव हे जंबुक करिती गर्जना ॥
पा. प्र., १९,६१

२१ ) याचें ठसणें घेईन मी. पा. प्र., अ. ५८

२२ ) पात्यास पातें न लागतां श्यामकर्ण नेला.

२३ ) अनुशाल्वाने धाडी घातली.

२४ ) काळें वदन घेऊन काननात जाऊन रहा.

त्याचप्रमाणे मधून मधून लांब लांब समास व संस्कृत अवतरणें दिल्यानेंही श्रीधराच्या काव्यांत भारदस्तपणा आला आहे.

१ समासः— सनकसनन्दनपंजरकीरा; श्रीधरहृदयशतपत्रभृंगा; (पांडुरंगा); आनकदुन्दुभीतपमहोदया, भक्तमानसउद्यानविहंगा

२ संस्कृत अवतरणः—

१ ) ' न जायते म्रियते ' हें वचन । गीतेमाजि बोलिलो हें जाण॥
पा. प्र. ६४, १५१

२ ) ' वर्णांना ब्राह्मणो गुरुः ' । हा मुख्य शास्त्रविचारु ॥
पा प्र, ३७, १२०

३ ) परित्राणाय साधूना । विनाशाय च दुष्कृता (मराठी टीका)
पा प्र ५१, १०१

४ ) अर्जुनकृत अग्निप्रार्थना बहुतेक सस्कृतमध्येच आहे
प्रा प्र., ५१,१५-१८

५ ) परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥ पा प्र १, १६१

६ ) तेथोंची रचना अद्भुत । न भूतो न भविष्यति ॥
पा. प्र. १५,५८

७ ) जन्मादारभ्य मन्यवंत । प्रा. प्र. २६

हे सस्कृति वळण पुढे ' निरजन माधव ' व ' मोरोपत ' यानीं वाढत्या प्रमाणानें स्वीकारलें.

श्रीधरानें येणेंप्रमाणे साहित्याच्या सर्वांगाचे सौन्दर्य आपल्या काव्यात आणलें आहे.

## १० लोकशिक्षण

कथाप्रसंगानुसार नीति व व्यवहार याचा उपदेश आपल्या ग्रथात जागोजागीं करून श्रीधरानें लोकशिक्षणाचा आपला शेवटचा हेतु साधला आहे. कित्येक ठिकाणीं या उपदेशास पाल्हाळाचें स्वरूप आलें आहे; आणि पाल्हाळासबधी मागे लिहिताना याचे थोडेसें दिग्दर्शन झाले आहे. पुढें आणखीं काहीं स्थळाचा नामनिर्देश केला आहे

१ ) परधन व परस्त्री:–[१२४]परनारी जे मातेसमान मानतात व परद्रव्य जे तृणवत् लखतात आणि परनिन्दा मनानेंही करीत नाहींत ते मत्यलोकाला जातात.

२ ) सुपुत्र–कुपुत्र[१२५] —पितृवचनार्थ वृथा दवडिता तो पुत्र नव्हे. तो प्रत्यक्ष जन्त होय.'हरिविजयात'हीं हेंच आहे. कुपुत्रानें जिणें व्यर्थ. तो भूमीस भार. पितृवचनाचा त्रास मानणारा, मातेस कुशब्द बोलणारा व गुरुद्वेषी अल्पायुषी होतो.

३ ) सज्जन दुर्जन–स्वभाव[१२६]:— मेरुमन्दार वळतील, सूर्य पश्चिमेस उगवेल, पण सज्जन असत्य मार्गानें जाणार नाहींत जो दुरात्मा दुर्जन त्यास अवघे अमंगळ दिसतात. कोणीही निर्मळ दिसत नाहीं हिंसकास दया, मार्गघ्नास माया व पिशुनास उपरति कदाकाळीं घडत नाहीं.[१२७] सन्ताची सुस्थिति ऐकून दुर्जन मनात संतप्त होतात. उलट सन्त दुर्जनासी गोड बोलतात व ते दुसऱ्याचे वर्म काढीत नाहींत, तर दुर्जन सर्वांस दूषण ठेवतात [१२८]

४ ) ब्राह्मण- शूद्रः–[१२९]–ब्राह्मण आदिपुरुषाचे मुखापासून निघाले आहेत म्हणून ते श्रेष्ठ जाणावे ते 'वर्णांना ब्राह्मणो गुरुः' आहेत. गायत्रीमंत्र-पठन व वेदाध्ययन हे ब्राह्मणाचे उत्तमाचरण होय. तें इतर वर्णांनीं करू नये. हे सामान्य व्यवहारातलें झाले. पण जो मज शरण रिघाला तो शूद्र

---

१२४ पा. प्र.२६ ; १२५ पा प्र. ३९, १२५-१३७
१२६ पां. प्र. २१, ५४ . १२७ पा. प्र. २१, २९
१२८ पा. प्र. ३७, ४८ , १२९ पां. प्र. ३७, १२०-१२३

हो अथवा ब्राह्मण हो, तो मजप्रतच येतो.[130] मज भक्तिप्रमाण. ज्ञातीसी काहीं कारण नाहीं. जो ब्राह्मण अभक्त, कपटी व दुष्ट असेल तो अन्त्यजाहूनही पापी, तो भ्रष्ट; त्याचा विटाळही होऊ नये.

याशिवाय भीष्मकृत धर्मोपदेश,[131] आपद्धर्म, विदुराचा धृतराष्ट्रास व दुर्योधनास उपदेश,[132] व्यासाचा धर्मास उपदेश,[133] पतिव्रताधर्म,[134] क्षत्रियधर्म,[135] कलियुगप्रभाव,[136] राजधर्म,[137] राजनीति, इत्यादि स्थळीं जो उपदेश आला आहे त्याने लोकशिक्षणाचें कार्य चांगलेंच साधलें आहे.

## १ तत्त्वज्ञान

वरील प्रकारच्या नीतिव्यवहारशिक्षणाने हा ग्रंथ जसा प्रापंचिकास प्रिय झाला आहे, तसा तो तत्त्वज्ञाननिरूपणानें शास्त्रीपण्डितास व मुमूक्षूंसही समाधान देणारा झाला आहे. अध्याय सतरामध्ये श्रीकृष्णाचे परब्रह्मरूप वर्णन करताना षड्दर्शनाचा उल्लेख मोठ्या खुबीनें श्रीधराने केला आहे. तो म्हणतो:—" '‘त्वं’पद' ‘तत्’पद" व ‘असि’पद याहुन वेगळा जो शुद्ध व बुद्ध तोच हा ‘गोविन्द’ असें अगाध वेदान्तशास्त्र गर्जत आहे.[138] मीमासक ज्यालागीं कर्म स्थापिती तोच हा पूर्ण ब्रह्मसर्वेश आहे. जीवास ज्याचें अपार स्वरूप कळत नाहीं व ज्यास नैय्यायिक ‘कर्ता,’

---

१३० पा. प्र. ३९, ८९–९० ; १३१ पा. प्र. ५७, ४–१०८
१३२ पा. प्र. ५४ ; १३३ पा. प्र. २०, ८–२१
१३४ पा. प्र. २८, ४५–७६ ; १३५ पा. प्र. ३६
१३६ पा. प्र. २९, ११०–१६६ ; १३७ पा. प्र. ५७
१३८ पा. प्र. १८, १२५

ईश्वर' असे म्हणतात तो हाच 'श्रीकृष्ण' होय. व्याकरणशास्त्रात सप्तविभक्तींनीं व नानासूत्रानीं नामें माधतात तो चित्कंसातक यदुपति होय. अष्टांगयोगादि साधनानीं पातजलशास्त्र हेंच कथन करतें. 'शैव ज्यास 'शिव' म्हणतात, वैष्णव ज्यास 'माधव' म्हणतात तो हाच.सौराचा सविता, गाणपत्याचा गणेश, शाक्ताची शक्ति हाच होय. पुनः अध्याय सव्वीसमध्ये 'अष्टावक्र' आणि 'बन्दी' याच्या संवादात षड्दर्शनाच्या कर्त्यांचीं नावे व तत्त्व आलीं आहेत. या सवादावरून त्याची वेदान्तप्रतिपादनाची धाटणी सरळ व सुबोध आहे असे दिसून येतें. त्याचप्रमाणें या विवरणात दिलेले अनेक दृष्टान्त मोठे समर्पक व उद्बोधक आहेत. एकच उदाहरण पहा :— क्षमेवीण वैराग्य म्हणजे नटाने वरवर घेतलेलें सोंग अथवा प्रेतास भोगविलेले भोग होत, व्यर्थ उपहासास ते कारण होतात. पुढें दिलेलीं स्थितप्रज्ञाचीं लक्षणे व स्थितप्रज्ञतेच्या सात पायऱ्या हीं त्याच्या गाढ विद्वत्तेचीं द्योतक आहेत.पुढें अध्याय सत्ताविसमध्यें तर अद्वैत निरूपण केले आहे:—

एकमेवाद्वितीयं नास्ति । ऐसे बोले वेदश्रुति ॥

अशा मोठ्या शास्त्रीय थाटानें वर्णन केलेले आहे.[१३९] पुढें अध्याय सत्तेचाळिसमध्यें वेदान्ताबरोबर चार्वाकाची व मीमासकाबरोबर कौलिकाची[१४०] बरोबरी कशी होईल ? असा दृष्टान्त कर्णार्जुनाच्या तुलनेत आला आहे. पुढे 'शान्ति'पर्वात चार्वाक नामे असुर धर्मराजाच्या सभेंत विक्षेपार्थ आल्याचें सागितलें आहे. [१४१] पण त्याचा चार्वाकदर्शनाशीं सबध दिसत नाहीं. शैव, वैष्णव याचे ऐक्य करण्याचाही त्याने यत्न

---

१३९ पा प्र.२७, ८१–९२

१४० पां. प्र. ४७, १३८ ; १४१ पां. प्र. ५६, १०१–१०२

केल्याचा आढळतो. कारण, शिवनिन्दक व विष्णुनिन्दक हे दोघेही अधः-पतन पावतील असें त्यानें स्पष्ट बजावलें आहे.[१४२] तेव्हां श्रीधरानें अद्वैतप्रतिपादन मोठ्या चातुर्यानें व सुलभतेनें केलें असल्यामुळें त्याची प्रतिज्ञा या दृष्टीनेही परिपूर्ण झाली आहे.

## १२ भाषाशैली व दोषदर्शन

१ साधेपणाः—आता श्रीधराच्या भाषाशैलीकडे व दोषांकडे वळूं. श्रीधराची भाषा अगदी सुलभ,सरळ,सुबोध व सोपी आहे असा त्याचा सर्वत्र लौकिक आहे आणि तो पुष्कळ अंशानीं खराही आहे. त्याच्या पूर्वींचे लोकप्रिय कवि 'मुक्तेश्वर' व नन्तरचे 'मोरोपत' यांच्या तुलनेनें पहातां श्रीधराची भाषा अगदीं सुलभ आहे याविषयीं संदेह नाहीं. मुक्तेश्वराची जुनी भाषा, म्हणजे जुने शब्द, नामाचीं व क्रियापदाचीं जुनीं रूपें व व्याकरणशिथिलता वगैरे रूपकोत्प्रेक्षाची गर्दी व कल्पनेच्या उच्च भराऱ्या यामुळें त्याचे काव्य सामान्य शिक्षितास दुर्बोध वाटते,तर मोरोपताची कविता, संस्कृती वळण, अपरिचित संस्कृत शब्द, प्रदीर्घ समास, अरूढ शब्दयोजना. दूरान्वय वगैरे गोष्टींमुळें फारसे न शिकलेले लोक तिकडे सहसा वळत नाहींत परन्तु,श्रीधराची कविता लिहिना-वाचता येणाऱ्या अठरापगड जातीच्या स्त्री-पुरुषास अत्यन्त प्रिय वाटते; याचें कारण ती समजण्यास अत्यन्त सुलभ हें होय. एकदा आरंभ केला कीं, मध्यन्तरी कोठेंही न अडतां वाचक अध्याय दोन अध्याय सहज संपवितो. या साधेपणात त्याच्या लोक-प्रियतचें बीज आहे. आणि या प्रकारच्या भाषापद्धतीचा अवलंब त्यानें

---

१४२ पा. प्र. १६, ७९–८०

आपल्या सर्व ठळक ग्रंथात केला आहे. पण त्याच बरोबर हेंही खरें आहे की, रसिक वाचकास 'मुक्तेश्वरा'च्या कल्पनाविलासाने अथवा पन्ताच्या पाण्डित्याने जो आनन्द होतो, तो श्रीधराच्या काव्यानें होत नाहीं. आणि श्रीधराचे काव्य सर्व टीकाकार अगदीं सोपें सोपें असे जें एकमताने म्हणतात तें काहीं अक्षरशः खरे नाहीं.

२ जुने शब्दः— 'वीरगुंठी', 'दुसी', 'आहळली', 'झाकोळला' 'आसमास', 'विदान', 'चिदोचिर्दी', 'पालाणिली', 'आरबळे, 'हडपिये' 'मंडपघसणी', 'भाहटणें', 'गोरिया', 'आगवण', 'सवगण' 'वोडणें' व 'हुडे' असे जुने शब्द श्रीधरांत आढळतात.

३ रूपकें व प्रयोगः— श्रवणा (श्रवणाना) तृप्ति जाहली, बोलें (तू); दंशला; अवघीं निजेलीं; आवींचे कोठारा वृक निघे, जयद्रथें देखोनि तीस। मदनज्वरें व्यापिला(कोण?);कौरवीं सुयोधन उचलून नेला,माझेनि न पाहवे, वेगीं ( वेगानें ); सर्व राजे जिंकून शतमख आचरला, पायथा ( सप्तमी ) तळवे तळहातीत ( चुरीत ), खादा पाषाण घेतले ( सप्तमी ), धोंकट ( धीट ); ओसणतो, आनदोन; वनींहून ( पचमी ), तैलकारक; कुंभकर्ता, सोवनी ( सोनार ), चर्मक ( कार ); उसां ( सप्तमी ), खालें, कमलनाभा, सर्वसाक्षा ( संबोधन ) मुक्तकेशी; पद्मनयनी, ध्वनी ऐकिली; भ्रमित ( द्रौपदी होऊन ); पाडवीं नमन करून.

४ संस्कृती वळणः—संस्कृती वळण व क्वचित् लांब समास याचा उल्लेख मागें आलाच आहे. त्याचप्रमाणें अप्रसिद्ध संस्कृत शब्द व रूढ शब्दांऐवजीं मुद्दाम बनवलेले पर्याय शब्द. उदाहरणार्थः—

विनायकशत्रुकन्यारक्षक ( गारोडी ); अत्रिस्नुषा ( रोहिणी ); चक्षुश्रवाची कुमरी ( नागकन्या ); रतिवरशत्रुभूषणकुमरी ( नागकन्या ).

भारद्वाज ( द्रोण ); शारद्वत ( कृप ), पद्मजजातउद्भवात्मज त्याचा तनुज = ब्रह्मा-पुत्र-मरीचि-तत्पुत्र कश्यप-तत्पुत्र इन्द्र–तत्पुत्र=अर्जुन; नागपुर-गजपुर ( हस्तिनापुर ), स्वर्धुनीतनय ( भीष्म ); हरिध्वज ( अर्जुन ); खग वरध्वज ( कृष्ण ); पाकशासनप्रस्थ-शक्रप्रस्थ ( इंद्रप्रस्थ); रणकुंभिनी( रण भूमि ), गौतमकुमारशारद्वत ( कृपाचार्य ); कोटीर ( मुकुट ); पङ्कवगनेला ( पंडु+अगना ); प्रेतनाथपुराविवर्धनयुद्ध, तमकूर्पा; वृत्रारिशत्रुजनक ( रावण ), श्रावणारितनय ( राम ), ऐरावतारूढ संक्रदन तैसा दिसे नरक-नन्दन (भगदत्त); तो हरिवरध्वजाचे रथीं, द्विजवरध्वज जाहला सारथी॥[१४३] शफरीध्वज (मदन), देशावर विद्वानास देऊन प्रीति संपादली.[१४४] पुढील अर्थ लावा[१४५]:—

पद्मनाभात्मज-जातोद्भवोद्भव । तत्सुतसुताचे भय सर्व ॥
न बाधी ऐकतां हे पर्व । ऐसें वचन व्यासाचे ॥

---

## १३ श्रीधर आणि मुक्तेश्वर

आता श्रीधराच्या 'पांडवप्रतापा'वर अलीकडील काहीं विद्वानांनीं जे आक्षेप घेतले आहेत त्याचा विचार करू.

१ ) आक्षेप १ लाः—"मुक्तेश्वराचीं 'आदि', 'सभा', 'वन' 'विराट' अशीं चार पर्वें प्रसिद्ध आहेत. या चार पर्वांतील कथानकानें 'पांडवप्रतापा'चे सुमारें पसतीस अध्याय व्यापिले आहेत; व हे सर्व अध्याय

---

१४३ पा. प्र. ४९, १९०

१४४ पां. प्र. ५७ ६४; १४५ पा. प्र. ६३, १४५

श्रीधरानें मुक्तेश्वरी पर्वांच्याच आधारानें रचिले आहेत. यांत मुक्तेश्वराच्या सर्व चांगल्या कल्पना व अशा कल्पनेच्या सर्व भरान्या यांचा श्रीधराने समावेश केला आहे. अनेक ठिकाणीं शब्दही तेच ठेविले आहेत. किंबहुना मूळ व्यासग्रंथाचे जसें मुक्तेश्वरी ग्रंथ हे सार, तसेंच मुक्तेश्वरी पर्वांचें 'पांडवप्रतापा'तील पसतीस अध्याय हे सार होत."[१४६]

२) आक्षेप २ रा:—"अर्थात् अनाठायीं शृंगार हा मुक्तेश्वराचा दोषही यांत ('पांडवप्रतापांत') आला आहे हें निराळें सांगणे नको. श्रीपांडुरंगानें 'निजधामवृत्त लिहू नको' हे सांगितले त्यापेक्षा 'मुक्तेश्वरी काव्य तूं वाचू नको' असे श्रीधरास सांगितलें असतें तर बरे झाले असते."

३) आक्षेप ३ रा:—"श्रीधराचा 'पांडवप्रताप' हा मुक्तेश्वरी 'भारता'चा केवळ तर्जुमा आहे."

पहिले दोन आक्षेप 'महाराष्ट्र–सारस्वत'कार भावे यांचे आहेत; तर तिसरा मराठी वाङमयाचे इतिहासकार पांगारकर यांचा आहे.[१४७] प्रथमतः भावे यांच्या पहिल्या आक्षेपातील पांच विधानांचा क्रमशः विचार करू.

विधान १ लें:—"मु....या चार पर्वांतील कथानकाने 'पांडवप्रतापा'चे सुमारें पसतीस अध्याय व्यापिले आहेत."

यातील 'सुमारें' हा मोघम शब्द वगळल्यास हें विधान बरोबर आहे. कारण, मुक्तेश्वराच्या त्र्याण्णव अध्यायातील कथाभाग श्रीधराच्या पसतीस अध्यायांत आला आहे. यांत आक्षेपार्ह असें कांहींच नाहीं. तेव्हां यांची चर्चा करण्याचें कारणही नाहीं.

---

१४६ भावे. म. सा. पृ. ३३३ व पादटीप

१४७ पांगारकर. म. वा. इ. खण्ड २ पृ. ४७६

दुसरें विधानः—"हे सर्व अध्याय श्रीधरानें मुक्तेश्वरी पर्वांच्याच आधारानें रचिले आहेत."

याचें परीक्षण करताना हें ध्यानात ठेविलें पाहिजे कीं, दोघानीही मूळ 'भारता'स धरूनच सर्व रचना केल्याची ग्वाही वारंवार आपल्या ग्रथांतून दिली असल्यामुळें पुष्कळसा कथाभाग दोहोंत सारखा असणें अगदीं स्वाभाविक आहे. पण आक्षेपक म्हणतात त्याप्रमाणे श्रीधरानें मुक्तेश्वराचाच एकमेव आधार घेतला असल्यास त्यांच्या कथेंत कोठेही फरक आढळता कामा नये. पण वस्तुस्थिति मात्र तशी नाहीं. त्यांच्या चारही पर्वांत अनेक स्थळीं विसंगति किंवा फरक पुष्कळच दिसून येतो. पुढील काहीं उदाहरणावरून हें सहज सिद्ध होण्यासारखे आहे:—

१ आदिपर्वः— 'भारता'चा लेखक 'गणेश' फार त्वरेनें लिहूं लागला म्हणून व्यासानीं त्यास 'अर्थ समजून लिही' अशी आज्ञा केली. अर्थग्रहणास त्यास वेळ लागावा व आपलें काव्यनिबंधाचे काम सावकाश चालावें म्हणून व्यासानीं 'भारता'त काहीं कूटें घातलीं. यांची संख्या मुक्तेश्वराप्रमाणें अठरा हजार आठशें तर श्रीधराप्रमाणें आठ हजार आठशे आहे.[१४८] उत्तंकास गुरुदक्षिणेनिमित्त यूपभूपालगृहिणीची कुंडलें आणावयास श्रीधरात सांगितलें आहे तर मुक्तेश्वरानें त्या राजाचे नाव "पौष्य" असें दिलें आहे. मुक्तेश्वर म्हणतो कीं, प्रमतीचा पुत्र 'रुरु' त्याची भार्या 'प्रमद्वरा,' तर श्रीधर सांगतो कीं, 'रुरू' ची प्रिया 'प्रवीणपद्मिनी.'[१४९] मुक्तेश्वर अजगराचें नाव 'डुंडुभ' देतो तर श्रीधर त्यासच 'दुदुभी' म्हणतो.[१५०] नारदानें बळीस विश्वजित यज्ञ करून इन्द्रपद मिळविण्याचा उपदेश केला

१४८ मुक्तेश्वर. आदिपर्व. १, १२०; पा. प्र. १, ५४

१४९ पा. प्र. १, १५७ ; १५० पां. प्र. १, १७८

असे श्रीधर लिहितो,[१५१] तर मुक्तेश्वरात हें मुळींच नाहीं. मुक्तेश्वरानें दुष्यन्ताचे मांडलिकांत जावी, जंगी, फिरंगी, इंग्रेज, मलबार, कांबे कावटे, ककमखर, रूमशाम, खोरासान, मुलतान, हबशान, अबस्थान, घोडमुख, धेनुमुख इत्यादिकांचा उल्लेख केला आहे. श्रीधरानें हा काल-विपर्यासदोष केला नाहीं. मुक्तेश्वराप्रमाणें—चित्रांगदेशीं लग्न केल्यावर तिच्याजवळ ' अर्जुन ' एक वर्ष राहिला तर श्रीधराप्रमाणें तो तीन वर्षें राहिला. ' काम्यक ' वनात अर्जुन गेल्यावर शिवाशीं युद्ध झालें व त्यानें प्रसन्न होऊन अर्जुनास किरीटकुंडलें दिलीं. नन्तर, रामेश्वरीं त्याची हनुमन्ताशीं भेट झाली. सेतुभंगाची पैज हरल्यामुळें हनुमन्ताने त्याचे ध्वजस्तभीं राहण्याचे कबूल केलें हा कथाभाग मुक्तेश्वरात नाहीं, श्रीधरांत तो आहे.[१५२] सुभद्राविवाहानन्तर द्रौपदीचा अर्जुनावरील रुसवा मुक्तेश्वरात नाहीं.

२ सभापर्वः—यानन्तर 'सभा'पर्वातील कथाविसंगति पाहूं:—धर्मानें मयसभा पाहाण्यास आलेल्या ब्राह्मणास भोजन दिले. त्याची संख्या श्रीधर एक लक्ष सांगतो,[१५३] तर मुक्तेश्वर दहा हजार देतो. जरासन्धाकडे श्रीकृष्णादिकानीं प्रवेश केला, त्या वर्णनात फरक असून मुक्तेश्वर म्हणतो—येताना जरासन्धानें त्यांस पाहिलें. पण श्रीधर म्हणतो-ते दुर्ग ढांसळून आडमार्गाने गेले.'भीमगर्वमोचन','प्रेत उठवणे' व'जंबूक-भविष्य' या कथा मुक्तेश्वरात नाहींत; पण श्रीधराच्या ' पांडवप्रतापात आहेत.[१५४]जरासन्धानें बावीस हजार राजे बंदींत टाकिले होते. पांडवाच्या पत्रावरून कृष्ण आला.

१५१ पां. प्र. १, २६२ , १५२ पां. प्र.१३, १३९ १६
१५३ पां. प्र १५, १०७ ; १५४ पां.प्र. १७, २००-२३४

'भीमजरासन्ध' युद्धांत कृष्णानें काडी चिरून सकेन दाखवला. नन्तर दुसऱ्यानदा खर्जुरीपत्र चिरून तो दाखविला, इत्यादि कथा श्रीधरानें दिली आहे; ही कथा 'भारतां'त नाहीं म्हणून ती देणाऱ्या पूर्वकवींवर मुक्तेश्वरानें टीका केली आहे.[१५५] सहदेवाने जिंकलेल्या लोकांच्या दोघांच्या यादींत फरक आहे, तर नकुळाने जिंकलेल्या लोकांत श्रीधराच्या यादींत पुढील लोक नाहींत:-[१५६]पल्हव, बर्बर, किरात, यवन शक इत्यादि. द्रौपदीने प्रत्येक पांडवाशीं प्रतिवर्षीं दोन महिने बारा दिवस पत्नीधर्मानें राहावें हा नारदाने घालून दिलेला दण्डक व त्या नियमानुसार "मी सांप्रत भीमाची पत्नी आहें; तेव्हा धर्म मला कसा हारवील !" हें द्रौपदीचें उत्तर हा भाग मुळांत व मुक्तेश्वरात नाहीं; तर "मी एकवस्त्रा व रजस्वला आहें" हें द्रौपदीचें भाषण श्रीधरात नाहीं. [१५७] वस्त्र-हरणप्रसगीं पुरविलेल्या वस्त्राच्या व पेठाच्या नावात पुष्कळच फरक आहे. मुक्तेश्वर नुसतीं छपन्न देशींचीं म्हणतो,तर श्रीधराने चौतीस-पसतीस देशाचीं नावें दिलीं आहेत. त्यात कोंकण, गोकर्ण,चीन, मुलतान, लाहोर,काबूल,पैठण करवीर वगैरे आहेत.[१५८] द्यूताचे दोन डाव राहिले असे श्रीधर म्हणतो,तर मुक्तेश्वर एकच राहिला म्हणतो.[१५९] वनवासास जातेवेळीं इतर मंडळींच्या रवानगींत सुभद्रेच्या पाठविणीचा उल्लेख करण्यास व्यास विसरले, पण

---

१५५ पा. प्र.१६,१८४-२००; मुक्तेश्वर. सभापर्व. ७, ६०-६१

१५६ मुक्तेश्वर सभापर्व. ८, १५५

१५७ पा. प्र. २१, १३-१५; मुक्तेश्वर. सभापर्व. १५ १७।२८

१५८ मुक्तेश्वर. सभापर्व. १५, २२६; पा. प्र. २१, १६२-१७०

१५९ पा. प्र. २२, ५; मुक्तेश्वर. सभापर्व. १६, ८

तिला द्वारकेस धाडलें याचें मी स्मरण देतों असें मुक्तेश्वर मोठ्या तोऱ्यांत सांगतो.[१६०] पण हीं मुक्तेश्वराचीच चूक आहे. श्रीधराने ही चूक टाळली आहे. त्याचप्रमाणे अभिमन्यु–उत्तराविवाहाचा मुक्तेश्वरकृत अस्थानी उल्लेख मुळात व श्रीधरात नाहीं.[१६१]

३ वनपर्वः—आता 'वन'पर्वातील कथेंतील फरक पाहूः—पांडव वनवासास जावयास निघाले असता त्याच्या बरोबर सर्व प्रजाजन जावयास सिद्ध झाले त्यात शिल्पी,सुतार, लोहार, कनकालंकार घडविणारे सुवर्णकार, तांबट, मूर्तिकार, रत्नपारखी, वाणी, कुंभार, तेली, रजक, रंगारी, गौळी, साळी, माळी, भुसारी, नापित, सुगन्धी, व्यापारी, विणकर, किरात, गुरव, धानिक, शेतकरी, खनक, चित्रकार, मातंग, चर्मकार, अतिशूद्र इ. इ. हें जातवारीचें वर्णन मुक्तेश्वरात नाहीं. मुक्तेश्वरानें कान्यकुब्ज, तैलभुक्त, कामरूपी, उत्कल ..गुर्जर, महाराष्ट्र इत्यादि देशपरत्वें झालेले ब्राह्मणाचे पोटभेद निर्देशिले आहेत, तर श्रीधरानें ब्राह्मणाचें साधारणतः गुणवर्णन केलें आहे. पुढें मुक्तेश्वरानें सूर्योपासनेच्या व्यासकृत बारा श्लोकांचा नुसता उल्लेख केला आहे; तर श्रीधरानें "सुन्दर सूर्यस्तोत्र गाईलें आहे.[१६२] सूर्य प्रसन्न होऊन त्यानें थालीपात्र दिल्याचें मूळभारताप्रमाणें श्रीधर सांगतो; तर मुक्तेश्वर या गोष्टीचा निषेध करतो. धर्माची वनांतील दिनचर्या सांगताना श्रीधर विप्रभोजन, पंचमहायज्ञ, पुराणश्रवण, वेदाध्ययन, वेदान्त, न्यायमीमांसा, सांख्य, पातंजल,

---

१६० मुक्तेश्वर. सभापर्व. १६, १३०

१६१ मुक्तेश्वर. सभापर्व. १६

१६२ पा. प्र. २३, ७९–८८

व्याकरण इ. शास्त्रांची चर्चा इत्यादि गोष्टींचा उल्लेख करतो; पण मुक्तेश्वरानें तो केलेला नाहीं. विदुराने धृतराष्ट्रास उपदेश कसा केला हे तो पाडवास सागतो. हें श्रीधरात आहे पण ही गोष्ट मुक्तेश्वरात नाहीं. मैत्रेयाच्या उ.शापाचा उल्लेख मुळात व मुक्तेश्वरात आहे पण श्रीधरात नाहीं. रामकथा मुक्तेश्वरात आहे पण श्रीधरानें 'रामविजया'त ती सागितली असल्यामुळे येथे गाळली आहे. दुर्योधनकृत दुर्वाससेवा मुक्तेश्वराने सविस्तर वर्णिली आहे पण ती मुळात नाहीं व श्रीधरातही नाहीं 'इन्द्रकील' पर्वतावरील अर्जुनाच्या तपश्चर्येच्या क्रमांत व किरात-प्रसगात फार भिन्नता आहे. श्रीधर सागतो, अर्जुनाने प्रतिमासीं अनुक्रमे पर्णभक्षण, मृगजलसेवन, धूम्रपान, वायुभक्षण करून एकागुष्ठावर उभा राहून ऊर्ध्व बाहु करून चार महिने तप केले. तर पहिल्या महिन्यात तिसऱ्या दिवशीं आहार, दुसऱ्यात सहाव्या दिवशीं फलहार, तिसऱ्यात पधरवड्याने फलजलाहार, चवथ्यात निराहारी-निर्जळी असा अगदीं भिन्न प्रकार मुक्तेश्वराने दिला आहे. आता किरात कथा पाहू:—

श्रीधर सागतो:— शकराज्ञेनें 'मूक' राक्षसाने वराहरूप घेऊन अर्जुनावर हल्ला केला. स्वरक्षणार्थ अर्जुनाने शरसन्धान केले. इतक्यात किरात-रूपी शकराने हें माझे सावज तू मारू नकोस म्हणून त्यास वारलें तें न ऐकता त्याचा त्याने वध केला म्हणून द्वंद्वयुद्ध झालें व अर्जुन मूर्च्छित झाला. शंकरानें त्यास दर्शन देऊन सावध केलें. पण मुक्तेश्वर म्हणतो 'मूक'दैत्याने वराहरूपानें येऊन अर्जुनाजवळ किरातापासून अभय मागितले. अर्जुन नको म्हणत असता किराताने त्यास मारलें म्हणून पुढे द्वंद्वयुद्ध झालें व अर्जुन मूर्च्छा पावला ! सावध झाल्यावर अर्जुन पार्थिवपूजा करू लागला व पार्थिवावरील बिल्वपत्र किराताचे मस्तकावर जाऊं लागलें. हें पाहून अर्जुनाने त्यास शंकर म्हणून ओळखिलें. पण हा मजकूर श्रीधरात

नाहीं; आणि मुळात तर असे आहे कीं, वराह दोघाचे बाणाने मेला व अर्जुनानेंच भाडण काढले कीं,मृगयेचे नियमाविरुद्ध हे किराता, तू वराहास मारिलेस इ.

नलदमयन्ती-उपाख्यानात बरेच बारीकसारीक फरक आहेत. कलि-प्रवेशानन्तर नल पुष्करास द्यूतास बोलावितो, पण मुक्तेश्वर उलट सागतो. वनात दमयन्ती मत्स्य धूत असतां तिच्या अगुलींतल्या अमृताने तो जीवन्त होऊन निसटून जातो म्हणून नल रागावतो व तिला'माहेरीं जा'म्हणतो. ही 'मत्स्यकथा' मुळात व मुक्तेश्वरात नाहीं. पुढें श्रीधर कर्कोटकाने नलाच्या हस्तास दश केला असें म्हणतो, तर मुळात व मुक्तेश्वरात "दशमे पादे कर्कोटको नलमदशत्" असे आहे. श्रीधरानुसार स्वप्नातील दमयन्ती विलापांबद्दल नलास 'जविक' नामक राजसेवक विचारतो, तर मुक्तेश्वरात ऋतुपर्णच विचारतो पुढें श्रीधराने मुक्तेश्वरवर्णित तीर्थयात्रा गाळून तेथें मुळात नसलेले अष्टावक्रोपाख्यानातील जनकास सागितलेले दिव्य आत्मज्ञान सविस्तर वर्णिलें आहे. त्याचप्रमाणें याज्ञवल्क्याने जनकास केलेला उपदेश लोमशाने धर्मास सागितला ही गोष्ट ही त्यानें सागितली आहे,पण ती मुळात व मुक्तेश्वरात नाही.पुढील 'सावित्री-आख्यान' श्रीधराप्रमाणें लोमश धर्मास सागतो तर मुळात व मुक्तेश्वरात मार्कण्डेय सागतो.

श्रीधराच्या अठ्ठावीसाव्या व मुक्तेश्वराच्या नवव्या अध्यायातील तीर्थांचा क्रम भिन्न असून काहीं नावेंही भिन्न आहेत. पुढे मार्कण्डेयाने धर्मास सागितलेला 'कलियुग-महिमा, व 'शिबिराजाख्यान' हीं मुळाप्रमाणें श्रीधरात आहेत; पण तीं मुक्तेश्वरात नाहींत. श्रीधरानें 'वन' पर्वातच 'हरिश्चन्द्राख्यान' घातलें आहे. तें तेथे मुळात व मुक्तेश्वरांत नाहीं. घोष-यात्रा-प्रकरणीं अपमानित दुर्योधनाचें कर्णानें सात्वन केले· त्यानीं रात्र

वनांत काढली; त्यास एक स्वप्न पडलें कीं, दैत्यांनी एक कृत्या पाठविली, तिनें त्यास पाताळात नेलें व पाडवास मारू असें त्यांनीं त्यास आश्वासन दिलें. हें स्वप्न त्याने कर्णास सागितले. त्यानें तें शुभसूचक असल्याचें सागितलें. नन्तर दोघे गजपुरास गेले. ही गोष्ट मुक्तेश्वरात नाहीं. जयद्रथ-कृत द्रौपदी-हरणानन्तर त्याचे पाच पाट व अर्धमिशी काढली हें दोहींकडे आहे, पण त्याच्या कपाळास काजळ फासले व नाकास चुना लावून त्यास धर्मापुढे आणिलें; हे मुक्तेश्वरांत अधिक आहे. श्रीधराप्रमाणे कर्ण वेषधारी इन्द्रास म्हणतो, "मागें कवच नेलेस आतां कुडलें नेतोस." पण मुळात व मुक्तेश्वरात हे दोन्ही प्रसंग एकदमच या वेळीं घडले असें आहे. "मृगानीं अरणीपात्र का न्यावीं ?" "आमचे कोणतें पाप यास कारण आहे ? " वगैरे धर्माचे प्रश्न व त्यास त्याच्या बंधूचीं उत्तरें व नकुळाने वृक्षावर चढून सभोवतालचें केलेले वर्णन या गोष्टी मुक्तेश्वर देतो पण या मुळात व श्रीधरात नाहींत. नकुलादि जलप्राशनाने मरून पडल्यावर विषप्रयोगाची शंका मुक्तेश्वराप्रमाणे श्रीधरात नाहीं. मुक्तेश्वराने यक्ष-प्रश्न व उत्तरें मुळा-प्रमाणे दिलीं आहेत; मात्र शेवटचीं कांहीं गाळलीं आहेत; तर श्रीधराचा आरभ मात्र मुळाप्रमाणे असून प्रश्नोत्तरें फारच थोडीं आहेत. एवढेच नव्हे तर काहींचीं उत्तरें स्वतःचींच दिलीं आहेत. उदाहरणार्थः——

(१) पडित कोण ? उत्तर-निर्द्वंद्वी व सदसद्विवेकी ( मुक्तेश्वर )
धर्मज्ञ पुरुषास पडित म्हणावे ( श्रीधर )

(२) विष कोणतें ? उत्तर-आशा हेच विष (मुक्तेश्वर )
गुरु-अवज्ञा हें विष ( श्रीधर )

बाकीचीं प्रश्नोत्तरें श्रीधराचीं स्वकल्पित आहेत.

४ विराटपर्वातील कथाभिन्नता : — मुक्तेश्वरात नामरूपे पालटून आम्हीं कोठ व कसे राहावे असें धर्म धौम्यास विचारतो. मग तो त्यांस सर्व गोष्टी सुचवितो व उपदेश करतो. नन्तर पांडव विराटाकडे कोणकोणत्या तऱ्हेनें राहू हें सांगतात व मार्गास लागतात. श्रीधरात प्रथम धौम्याचे नावही नाहीं. धर्म आपल्या बधूंना प्रश्न करतो व अर्जुन 'विराट' नगरात जावे असे सुचवून धर्मास तू कोणत्या प्रकारें राहाणार असें विचारतो. मग भीम, अर्जुन व द्रौपदी आपापल्या भूमिका सांगतात. नन्तर धौम्याचा उपदेश होतो, हे मुळास धरून आहे; पण श्रीधरानें धौम्योपदेशात "राजसभेंत तांबूल चर्वण करू नये व क्षणोक्षणीं थुंकू नये; राजा आजारी झाल्यास आपण होऊन औषध देऊ नये" वगैरे गोष्टी पदरच्या घातल्या आहेत. उपदेशाचा क्रमही मुक्तेश्वरानुसार नाहीं. मार्गातील देशांचा निर्देश मुळाप्रमाणें श्रीधरात आहे; मात्र द्रौपदी थकली असता अर्जुनाएवजीं तिला भीमाने स्कन्धीं उचलून नेलें असे तो सांगतो; पण मुक्तेश्वरांत हें कांहींच नाहीं. त्याचप्रमाणें शमीवृक्षावर शस्त्रास्त्रें गोप नार्थ त्यावर स्त्रीचे प्रेत कुळधर्म म्हणून पांडवांनीं बांधले असें श्रीधर म्हणतो, पण मुक्तेश्वरात हें नाहीं. पांडव विराटाकडे ज्या क्रमानें गेले तो क्रम श्रीधराचा पुष्कळसा मुळास धरून आहे, पण मुक्तेश्वराचा नाहीं. उलट त्यांत सैरन्ध्रा अर्जुनाबरोबर जाते. अर्जुनाजवळ मीं सारथ्य शिकलें असें बृहन्नडा सांगते व नकुल तर घोड्याच्या मी सर्वेशी करीत असे, असें म्हणतो बृहन्नडाच्या नृत्यगायनकलेतील नैपुण्याचें शास्त्रीय वर्णन श्रीधराचें स्वतंत्र आहे. विराटाकडे बल्लव कुस्त्यात मल्लांस जिंकतो या वार्तेनें दुर्योधनास संशय येऊन त्यानें जीमूतास पांडवांच्या प्रतिमा पायांस बांधून पाठविलें. नन्तर जीमूताच्या वधानें तो संशय दृढावला, विदुरानें तो थोडासा दूर करण्याचा प्रयत्न केला ही मुक्तेश्वराची कथा मुळांत व श्रीधरांतही नाहीं.

त्याचप्रमाणें सुदेष्णेनें सैरन्ध्रीस केलेली अनैतिक सूचना कीं " तुझा तर तारुण्याचा भर दिसतो नी तूं निर्विकार कशी ! वासना असेल तर मना-जोगता पुरुष तुला मिळेल " ही मुक्तेश्वराचीच आहे.

कीचकानें बहिणीजवळ भाउबीजेची देणगी म्हणून सैरन्ध्रीची मागणी केली. कीचकाच्या आगाळिकीबद्दल जेव्हा सैरन्ध्री विराटाजवळ न्याय मागण्यास गेली तेव्हा विराट उत्तरला ' गुप्त सूत्र स्त्रियांचे न कळे.' दुसरे दिवशीं सकाळीं सुदेष्णेनें सैरन्ध्रीस वहिनी होण्याचा आग्रह केला. पुढें भीमाशीं सल्लामसलत झाल्याप्रमाणें सैरन्ध्री कीचकास वश होण्याचें ढोंग करते व त्यास म्हणते, " आज उपास आहे. ताम्बूलभक्षण नाहीं. उद्या मनोरथ पुरवीन. अशा स्थितीत मनूने भोग वर्जिला आहे " हें मुक्तेश्वरी वर्णन श्रीधरात व मुळात नाहीं, तर पुढील श्रीधरी वर्णन मुक्तेश्वरात व मुळात नाहीं :— विराटाला फार अपशकुन झाले, दुष्ट स्वप्नें पडलीं. तेव्हा त्याने कीचकास एकान्तात बोलावून तें त्यास सागून त्याची चागली कानउघाडणी केली आणि तो म्हणाला[163] "तुला शनि जन्मस्थ आहे तर मला बारावा आहे, तेव्हा तुझा अगर माझा मृत्यु घडणार ! असे पण्डित सागतात.तेव्हा तूं हा दुष्ट नाद साड नाहीं तर गन्धर्व तुझा घात करतील" त्यावर कीचक उत्तरला, " रावणानें स्त्रियेपायीं दहा शिरें दिलीं ! मी एक देणार ! मेलो तरी बेहत्तर ! पण आमचें सर्व काहीं जुळलें आहे वगैरे "

कीचक–वधानन्तर सुदेष्णाच सैरन्ध्रीस "चले जाव" करते. तेव्हा ती बृहन्नडेमार्फत उत्तरेकडून तिजजवळ रदबदली करविते. तेव्हा उत्तरा म्हणते, "बृहन्नडा गुरुदक्षिणा मागत आहे. ती तीस देणें उचित आहे.

१६३ पा. प्र. ३३, ११५

तेव्हा तत्प्रीत्यर्थ सैरन्ध्रीस ठेवून घे. कीचक स्वदोषाने मेला ! त्याचा दोष सैरन्ध्रीस लावू नको. तिला ठेवून घे. नाहीतर मी प्राणत्याग करीन. मी आग्रह का करीत आहे त्याचे कारण पुढे समजेल. " तेव्हा सुदेष्णेने तिची विनन्ती मान्य केली. बृहन्नडाला उत्तरेनें हे वर्तमान समजाविल्यावर त्यानें तिचे आभार मानले. आणि अभिमन्यु तुला वरील व तुझे उदरीं परीक्षित् जन्मेल असा वर त्याने तिला दिला. ही मुक्तेश्वरी हकीकत मुळात व श्रीधरात नाहीं.

द्रोण-पार्थांचे युद्ध पहावयास अंतरिक्षात देव, यक्ष, गंधर्व इत्यादिकाची गर्दी झाली. त्याबरोबर अर्यमा, पितृगण, हरिश्चन्द्र, दिलीप, अज व दशरथ हेही आले होते हें श्रीधरी वर्णन मुक्तेश्वरात नाहीं मुक्तेश्वर म्हणतो:- पार्थाने एकशे तेहतीस अक्षरी मंत्राने काळरात्रीं कान्हेश्वरी देवता आव्हानिली व अर्धचन्द्रबाणाने सैनिकाच्या दाढ्यामिशा व डोकीं अर्धी तासलीं. तर श्रीधर सागतो,प्रवापनास्त्र सोडून त्याने पाच पांच पाट काढिले! चार सोडून सर्वांच्या वाम दाढ्या व सव्य मिशा तासल्या आणि नन्तर ते अस्त्र अर्जुनाच्या भात्यात परत आले. मुळात समोहनास्त्र आहे. धर्मराजाच्या जखमेतील रक्त जमिनीवर का पडूं दिलें नाहीं याचे कारण मुक्तेश्वर देतो, श्रीधर देत नाहीं. पाडवशुद्धीची चर्चाही मुक्तेश्वरात आहे, श्रीधरात नाहीं. श्रीधराप्रमाणे पाडव प्रगटल्यानतर सुदेष्णा द्रौपदीची क्षमा मागते, तर मुक्तेश्वरात विराटच तिच्याबद्दल क्षमायाचना करतो. लग्नसोहळा चार दिवस यथासाग झाला असे मुळाप्रमाणें श्रीधर म्हणतो, तर मुक्तेश्वर सविस्तर सर्व विधींसह तें वर्णितो. विराटाकडे एक वर्षभर लग्नसोहळा चालला होता असेही म्हणतो.

या वरील तुलनेवरून श्रीधर व मुक्तेश्वर याच्या चारीही पर्वांतील

कथासूत्रात अव्वलपासून अखेरपर्यन्त एकवाक्यता व संगति नसून अनेक स्थळीं विसंगति व विरोध कसा आहे हें स्पष्ट झालें आहे. म्हणूनच "श्रीधरानें हे सर्व अध्याय मुक्तेश्वरी पर्वांच्याच आधारानें रचले आहेत" हें आक्षेपकांचें विधान अगदीं फोल ठरतें. वरवर उथळ दृष्टीनें अवलोकन करून तें केलेलें आहे. अत एव त भ्रामक आहे एवंच, श्रीधराची या ग्रंथाची रचना तो म्हणतो त्याप्रमाणे केवळ 'महाभारता'-नुसारी नाहीं किंवा भावे म्हणतात त्याप्रमाणे केवळ 'मुक्तेश्वरा' नुसारीही नाहीं; तर काहीं कथाभाग महाभारतात व श्रीधरात आहे तर तो मुक्तेश्वरात नाहीं. उलट, महाभारतात व मुक्तेश्वरात जे कथांश आहेत ते श्रीधरांत नाहींत, आणि त्या दोघात असलेल्या काहीं गोष्टी महाभारतात नाहींत. पण मौज ही कीं, दोघेही उच्च स्वरानें घोषणा करतात कीं, आम्ही व्यासाचाच मागोसा घेत जात आहोत. तात्पर्य हें कीं, 'महाभारत' कथेंत त्यानीं इतरत्र मिळविलेल्या कथासाहित्याची भर ठायीं ठायीं घालून ती रचली सामान्यतः व्यासाचा आधार दोघानीं घेतला आहे हेंही खरें आहे.

विधान ३ रें :— 'यांत मुक्तेश्वराच्या सर्व चागल्या कल्पना व अशा कल्पनेच्या सर्व भराऱ्या यांचा श्रीधरानें समावेश केला अ हे."

वरील विधानाच्या सत्यतेची कसोटी आपण पुढील तीन तऱ्हेने लावून पाहू :—

१ ) श्रीधराच्या अनुकरणाचें सामान्य स्वरूप काय आहे ?

२ ) त्यानें खास मुक्तेश्वरी अशा सर्वच्या सर्व उच्च कल्पना घेतल्या आहेत कीं कांहीं वगळल्या आहेत ?

३ ) त्याच्या स्वतंत्र प्रतिभेचा विलास कोठे दृग्गोचर होतो कीं नाहीं ? आता क्रमानें चारही पर्वांतील काही उदाहरणें यथाक्रम घेऊ.

## अनुकरणाचें सामान्य स्वरूप :-- ( आदिपर्व )

| श्रीधर | मुक्तेश्वर |
| --- | --- |
| १) तो रोदन करीत मातेस सांगे । येरी राजसभे पातली वेगें ॥ म्हणे अनीतिवेश्येसगें । दवडिली नीति-धर्मपत्नी ॥[१६४] | १ )लक्षूनि राजचूडामणी । म्हणे गा! अनीतिवेश्याव्यसनीं । झालासी म्हणोनि स्वधर्मपत्नी। कीर्ति रुसोनि जातसे[१६४] ॥ |

" अनीतिवेश्यासगामुळे नीतिधर्मपत्नीला कायमची घालविलीस " यातील श्रीधराचा अर्थ विरोधामुळें अधिक उठावदार व सुन्दर झाला आहे. मुक्तेश्वरानें कीर्तीवर स्वधर्मपत्नीचा आरोप केल्यामुळें ही स्पष्ट विरोधाची मौज गेली आहे. पुनः रुसवा क्षणिक तर त्याग कायमचा असल्यामुळें ही रुसव्याची कल्पना जरी इतरत्र सुन्दर असली तरी येथें ती अर्थपुष्टि करीत नाहीं.

| श्रीधर | मुक्तेश्वर |
| --- | --- |
| २ ) सर्व त्रिदश दिशाहीन । पद्मोद्भवा गेले शरण [१६५] ॥ | २ ) ऐसे त्रिदश दशाहीन जहाले । ते वेळीं ब्रह्मया शरण गेले॥ [१६५] |
| ३ ) होता पंचशत संवत्सर । सहस्र अंडीं उलोन सत्वर। जन्मले घोर विखार। भयंकर धुंधुकारतीं[१६६]॥ | ३ ) वर्षे क्रमिल्या पंचशतें । सहस्र अंडीं उलोनि तेथे । सहस्र संख्या धुधुवातें। महासर्प निपजले॥ [१६६] |

१६४ पा. प्र. १, ६० मुक्तेश्वर. आदिपर्व. २, ७

१६५ पां. प्र. १, २०४; मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, ५१

१६६ पा. प्र. १, १८९, मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, ३१

४) अन्योक्तीच्या प्रसगेंसीं । धाकुटे काम सागा दैत्यासी । त्यावरी ते गर्वराशी । अवलंबितील थोर कार्य[१६७] ॥ तेथें मी तुमची पाठी । सर्वस्वें रक्षीन जगजेठी । ऐसी ऐकतां गोष्टी । त्रिदशेश्वर चालिला[१६८] ॥

४) अन्योक्तीने प्रसगीं चतुरा । धाकुटे काज सांगे असुरा । त्यावरी अभिमान ये थोरा । कार्य अनुष्ठितील ते ॥[१६७]तेथें तुमची पाठ रक्षिता साह्य असें मी कार्यार्थी । ऐसे शिकवुनी अमरनाथा । सिंधुमथनीं प्रेरिलें ॥[१६८]

५) इद्रें वक्षस्थळ पिटिले । म्हणे नासले काज सर्व[१६९]

५) इद्र हृदय पिटी करीं काज नासलें म्हणोनि ॥[१६९]

६) मजसमान वय ठाण । अल्प काळेच हा कोठून । कैचा जाहला नदन । अमप्राण सर्वही[१७०]॥ ऐसे बोलता मेदिनीनाथ । शकुतला जाहली सतप्त । जैशीप्रलयज्वाला अद्भुत । ग्रासू धावे गगनातें[१७१] ॥

६) माझेनि वये वय समान । तालस्कंध बलसपन्न । अल्पकाळे हा नंदन । कै प्रसवलीस मद्रेते॥[१७०] ऐसे बोलता मेदिनीपाळ । क्रोधे सतप्त शकुंतला । जेवी प्रळयशिखाग्नीच्या ज्वाळा । स्पर्शों धावती गगनातें ॥[१७१]

---

१६७ पा. प्र. १, २०६; मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, ६५
१६८ पा. प्र. १, २०७; मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, ६६
१६९ पा. प्र. १, २३०;मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, १२५
१७० पां. प्र. ४, ६१; मुक्तेश्वर. आदिपर्व. १६, १२१
१७१ पां. प्र. ४, ६५; मुक्तेश्वर. आदिपर्व १६, १२७

वरीलपैकीं दुसऱ्यात केवळ एका शब्दाच्या पर्यायशब्दाशिवाय बाकी सर्व रचना सारखीच आहे. तिसऱ्यात श्रीधराने "महासर्पां" बद्दल "भयकर विखार" हे शब्द घालून अर्थ अधिक जोरदार केला आहे. चौथ्यात व पाचव्यात केवळ शब्दाची थोडी फिरवाफिरव आहे. सहाव्यात "अद्‌भुत" व "प्रासू" या शब्दानीं श्रीधराचा अर्थ अधिक उठावदार झाला आहे.

आता 'सभा'पर्वातील काहीं उदाहरणें पाहू:—

| श्रीधर | मुक्तेश्वर |
|---|---|
| १ ) पुढे सभापर्व अति अपूर्व । चातुर्याचा अभिनव । जलार्णव भरला हा॥[१७२] | १ ) आता अपूर्वापूर्व सभापर्व । बुद्धियुक्तींचा सागर ॥[१७२] |
| २ ) ऊर्णनाभीच्या ततूभीतरी । महागज कैसा गुतेल[१७३] ॥ | २ ) ऊर्णनाभीच्या स्नततुसूत्रीं । पृथ्वी झाकीन म्हणे वस्त्रीं ॥[१७३] |
| ३ ) पूर्वीं जाहला राजसूययज्ञ । शेवटीं जाहलें अवभृथस्नान । तेव्हा केश मोकळे करून । वीरगुठी बाधिली[१७४] ॥ | ३ ) राजसूययज्ञाच्या शेवटीं । अवभृथस्नाने जे वीरगुंठी । सिंचिली ते पापमुष्टी । दुःशासनें धरिलीसे ॥[१७४] |

१७२ पा. प्र. १५, ९. मुक्तेश्वर. सभापर्व. १, १३।१६

१७३ पा. प्र १६. १६७; मुक्तेश्वर. सभापर्व ६, १६०

१७४ पा. प्र. २१, ६७, मुक्तेश्वर. सभापर्व. १५, ७६

| | |
|---|---|
| ४ ) बंदीं पडलां समस्त । ते स्त्री-प्रयत्नें जाइला मुक्त । जारकर्मे करूनि पाळित । पति जैसी स्वैरिणी [१७५] ॥ | ४ ) पुरुष झालिया निर्व्यापारी । जार-कर्मी प्रवर्ते नारी । तेणें पुरुषातें पोसी घरीं । हेंही तैसें दिसताहे ॥ [१७५] |
| ५ ) नपुसक दरिद्री समस्त । पाडव दूरी करीं पैं [१७६] ॥ | ५ ) क्लीब दरिद्री प्रेतासरीं । पाडव त्यागीं परौते ॥ [१७६] |

'पाडवप्रताप' अध्याय १५ 'मयसभा'वर्णन, भीष्मकृत 'कृष्ण'वर्णन (अ. १८);शिशुपालकृत कृष्णनिंदा(अ. १९)वगैरे प्रकरणें मुक्तेश्वरानुसार इकडे तिकडे शब्द पालटून किंवा फिरवून केलेलीं आहेत. गंगाप्रतीपभेट व गगा-रूपवर्णनातही साम्य आहे.

आतां वनपर्वाकडे वळूः–[१७७]

| श्रीधर | मुक्तेश्वर |
|---|---|
| (१) विदुर म्हणे पुढतपुढती । किती सांगों आता तुज नीती । आपुले कुमार धरूनी हातीं।धर्मचरणावरी घालीं पैं ॥ करुणा भाकोन क्षमा मागावी । तुम्हीं मागें निंदा केली | (१) विदुर म्हणे पुढत पुढतीं । तेंचि तें तुज सागिजे किती । हित विचारून तुझे चित्तीं । संचरेना सर्वथा ॥ |
| | .................... ...... |

१७५ पा. प्र. २१, १९६; मुक्तेश्वर. सभापर्व. १५, २७३

१७६ पा. प्र. २२, ३२; मुक्तेश्वर. सभापर्व. १६, ५४

१७७ पां. प्र. २३, १०९-११७, मुक्तेश्वर. वनपर्व. १, ७३-८५

आघवी । आतां स्तुती करूनि बरवी । ते विरवावी शुद्ध मनें ॥ दुर्योधन शकुनि कर्ण । यास धर्माचे करीं देऊन । पदर पसरूनि प्राणदान । घ्यावे मागोन सत्वर ॥ भीमाचे पोटात डोई घालून । देई हातीं दुःशासन । दुर्योधनाचे मस्तकीं हरत सुखघन। धर्मरायाचा ठेववीं ॥ पार्थाचीं पदाब्जें निर्मल । तेथे स्पर्शवी कर्णाचे भाल । शकुनि हा कुटिल खल । सहदेवचरणावरी घालीं·गा॥

........................

तुझें न ऐकतां पुत्र वचन । तरी गारुडी सर्पास करी दीन । तेवीं भीष्म द्रोणास सांगोन । आकळोनि घालीं बंदींत ॥

........................

नासिकद्वारें गुण ओवून । महावृषभ करिती दीन । कीं मत्त द्विरद आकळोन । आकर्षून ठेविती ॥ कुपुत्र पोटांतील रोग । कुमार धरोनियां करीं । घाली धर्माच्या चरणांवरी । पल्लव पसरोनि करुणोत्तरीं । क्षमा करावी मागील ॥ दुर्योधन आणि दुःशासन । शकुनि आणि चवथा कर्ण । धर्माहस्तीं वोपुनी प्राण । दान मागें तयातें ॥ मस्तक घालूनि भीमाउदरीं । दुःशासन निवेदी करीं । दुर्योधनाचे शिरीं । हस्त स्थापीं धर्माचे ॥ अर्जुनाचीं चरणकमळें । स्पर्शवी कर्णाच्या कपाळें । सहदेवाच्या क्रोधविटाळें । शकुनीस शुभ लक्षिजे ॥

........................

जरी नायकती दुर्जन । तरी भीष्म कृपाचार्य द्रोण । प्रेरूनिया चौघे-जण । निग्रहूनि रक्षावे ॥ गारुडी सर्प घाली बंदी । व्याघ्र समुदाय बांधिजे व्याधीं । तैसे सर्वही दुर्बुद्धी। तुवां बुद्धिवतें रक्षावे ॥ काळजी उदेला जो व्रण । तो स्वहस्तें

| | |
|---|---|
| छेदोनि काढावा सवेग। हनन रक्षण त्याग। यातील एक करी वेगे। | छेदीं शस्त्रें करून। तेवि सस्नेह करूनि प्राण। दुष्टदंडन करावे॥ हनन रक्षण अथवा त्यागु। त्यातें स्वीकरीं येक मार्गु। तरीच खंडेल चितारोगु॥ येऱ्हवीं अनर्थ रोकडा॥ |

या ठिकाणीं मुद्दामच मोठा उतारा दिला आहे. हेतु हा कीं, दोहों-मधील बिंबप्रतिबिंबभाव स्पष्ट व्हावा. पण मौज ही कीं, यास मुळात मुळींच आधार नाहीं. ओंवी एकशें सोळावी मात्र श्रीधराची स्वतःची आहे. बाकी येथील सर्व कल्पना व शब्द याचा त्यानें अनुवाद केला आहे. त्याचप्रमाणें 'दुष्यन्तशकुंतला-संवाद, शुक्रकच-संवाद, शर्मिष्ठादेव-यानी-कलह शुक्राचार्य-वृषपर्वा-संवाद, यात शाब्दिक साम्य फार आहे. फक्त शब्दांची आलटापालट दिसते.

| | |
|---|---|
| २) तिच्या स्वरूपाची दुजी प्राती। नाहीं नाहीं त्रिजगतीं। ऐसी साक्ष देत सरस्वती। विश्वतोमुखीं शचीवरा[१७८]॥ | २) दमयतीसमसमान। भुवनत्रयीं आन रत्न। नाहीं नाहीं ऐसी आण। सरस्वती वाहतसे॥[१७८] |
| ३) भूमंडळीं विख्यात होईल। त्रिभुवनीं महिमा वाढेल[१७९]॥ | ३) जिचें आख्यान भूमंडळीं वाखा-णितील ऋषिमुखें[१७९]॥ संतोष |

१७८ पा. प्र. २५, ५४; मुक्तेश्वर. वनपर्व. ११, १

१७९ पां. प्र. २८, ११-१२; मुक्तेश्वर. वनपर्व २१, १२-१३

हर्षखेद दोन्ही पावोनि।राव आला स्वनगरा ........ .. .. .. सावित्री ऐसें. ललाम । राव लाधला परम तरे[१८०] ॥ तिजयोग्य वर न दिसे क्षितीं । मग तो नृप म्हणे कन्येप्रती । तू पुरुषरत्न शोधून निश्चिती । वर वरीं मानेल तो [१८१] ॥

.. ....................

येरी म्हणे प्राण जावो निर्धार । मनें वरिला तो न सांडीं भ्रतार । प्रत्यक्ष घडतो व्यभिचार । पतिव्रताधर्म बुडे[१८२] ॥ शुद्ध कृष्ण पक्ष निश्चित । तैसें दारिद्य ऐश्वर्य येत जात । भाग्याभ्र कालीं वितळत । परि निश्चयध्रुव न ढळे पैं[१८३]॥सुकृत पदरीं असेल असंतोष चित्तीं ।............

सावित्रीनें दिधलें ललाम । तीसमान सर्वोपरी । ऐसा गुणी दिसेना[१८०] ॥ पिता म्हणे चातुर्यखाणी । पृथ्वी शोधूनि सर्वगुणी । पुरुषरत्न आपुल्या नयनीं । परीक्षूनि तुवा यावें[१८१]॥ येरी म्हणे न घडे ऐसें ।एकदा वरिला जो मानसें।ते मन आणिका स्पर्शे ।तो व्यभिचार स्वधर्मी[१८२] ॥ अभाग्यभाग्याचीं आभाळे । येती जाती आपुल्या काळें । निश्चयाचा ध्रुव अचळ चळत्व सर्वथा न पाविजे [१८३] ॥ सुकृत असल्या आपुल्या पदरीं । सर्व अरिष्टे नाशती[१८४] ॥

---

१८० पा. प्र. २८, २०, मुक्तेश्वर. वनपर्व. २१, १६-१७

१८१ पा. प्र. २८, २१; मुक्तेश्वर. वनपर्व. २१, १८

१८२ पां. प्र. २८, २९, मुक्तेश्वर. वनपर्व. २१, २९

१८३ पां. प्र. २८, ३१; मुक्तेश्वर. वनपर्व. २१, ३०

निश्चय । तरी विष तेंचि अमृत होय । मृत्तिका जेथें खणों जाय । तेथें निधान लागेल[१८४] ॥

४ ) गोधनें पहावया नयनीं । घोषयात्रेचें मिष करूनी । गोष्टी न फुटता द्वैतवनीं । रजनीमाजीं बधावे[१८५] ॥

४ ) धृतराष्ट्रा बोलिजे ऐसें । गोक्षीर पहाणें असे। घोषयात्रेचेनि मिषे । अद्वैतवना निघावे[१८५] ॥

५ ) याचा प्राण विष घेऊनि । जरी गंधर्व नेते बाधोन । आमुचीं शिरें टाकिते छेदोन ।तरी बरें होतें जाण । त्याहून अपमान हा वाटे[१८६] ॥

५ ) गंधर्व स्वस्थळातें नेते । अथवा रणीं प्राण घेते । तें बरें परतु पाडवहस्तें । सुटका जघन्य त्रिलोकीं[१८६]॥

६ ) लाभ मृत्यु आणि भय । काळें करून होत जाय । त्याचा खेद मानून काय । धैर्य पुढतीं धरावें[१८७] ॥

६ )जय अपजय मृत्य साग । हा क्षात्रवृत्तीचा विभाग ।यावेगळा तिसरा मार्ग । त्रिभुवनीं असेना[१८७] ॥

भीम–बकासुरयुद्ध, द्रौपदीवर्णन इ. कथाभाग मुक्तेश्वरानुकारी आहेत.

---

१८४ पा. प्र. २८, ३४; मुक्तेश्वर, वनपर्व. २१, ३५

१८५ पा. प्र. ३१, १०; मुक्तेश्वर. वनपर्व. १७, १४

१८६ पां. प्र. ३१, १७; मुक्तेश्वर. वनपर्व. १७, १७६

१८७ पां. प्र. ३१, १०२; मुक्तेश्वर. वनपर्व. १८, ८

आता शेवटले विराटपर्व पाहू :—

| श्रीधर | मुक्तेश्वर |
| --- | --- |
| १) विराटनगराजवळी । पाडव आले ते वेळीं । विशाल शमीवृक्षातळीं । स्थिरावले नावेक ॥ गांडीवचाप विशाळ । कल्पात विजेहूनि तेजाळ । कीं उगवले सूर्यमडळ । तैसी प्रभा तयाची[१८८]॥ | १) पुढे चालता जगजेठी ।विराटनगराचिया पाठीं श्मशानभूमिकेच्या निकटीं । विशाल वृक्ष शमीचा ॥ खड्गवल्ली तूणीर चापे । प्रलय पावकाचीं रूपे । पाहता सूर्याचिये वोपे । झाकुळती स्वप्रभा[१८८]॥ |
| २) मी दासी नव्हे निर्धार । माझे पंच गंधर्व भ्रतार । माझा अभिलाष धरी जो पामर । त्यास ते मारिती क्षणार्धें ॥ भीम आणि हनुमत । मी जिकीन एके क्षणात । तुझे पाच गधर्व दावीं त्वरित । मारून टाकीन क्षणार्धें[१८९] ॥ | २) मग म्हणे रे मंदमती । पाच गधर्व माझे पती । तुझी रक्षा करूनी हातीं । गंगोदकीं टाकितील ॥ ........................... पाच गधर्व सागशी गोष्टी । ते दाखवी माझे दृष्टीं । त्याचेनिरक्तें पृथ्वीतटीं । समार्जन मी कर्तां[१८९]॥ |
| ३) विराटाचे पाठिराखे बहुत । बाणघायें केले प्रेत । मग रथाखालीं उतरत । सुशर्मा गदा | ३) सायक विंधोन बनदाट । विकळ पाडिला विराट । अगें धावूनिया बाळिष्ठ । दोहीं बाहीं कवळिला ॥ |

१८८ पा. प्र. ३२, ७४।७७, मुक्तेश्वर. विराटपर्व. १, ६१।६४

१८९ पा. प्र. ३३, ४।११, मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, २७।३३

घेउनी ॥ रथावरी चढोन । विराटास हातीं धरून । सुशर्मा गेला घेऊन ।क्षणमात्र न लागता॥ घालूनिया रथावरी । सुशर्मा परतला झडकरी । विराटसैन्य ते अवसरीं । चौपारीं फुटियेलें[१९०]॥

आणोनि घातला आपले रथीं । चालिले हास्तिनापुराप्रती । दळे भयभीते पळती । विराटाचीं दशदिशा ॥ पृष्ठभागीं बाधिले हस्त । मोकळे केशीं विराटनाथ । नेता देखोनि अत्यद्भुत । हाहाःकार माजला[१९०] ॥

४ ) गायी घेऊन सकळा । महाद्वाराजवळ आला । तों कक म्हणे ते वेळा । नवल काय या गोष्टीचे ॥ बृहन्नडा सारथी जेथे । काळ उभा न राहे तेथे । रायें गौरविलें गोरक्षकातें । वस्त्रालङ्कारीं तेधवा ॥ [१९१]

४ ) कक म्हणे धरित्रीपाळा । संगी असता बृहन्नळा । कौरवजयाचा आगळा । प्रताप वाया बोलसी॥ विराट म्हणे एकले बाळ । तेणे भंगिलें कौरवदळ । येरू म्हणे अमृतफळ ॥ हातीं असता अक्षई । कायसी मरणभयाची वार्ता॥ तेवीं बृहन्नळा सगीं असता । कौरवजयाची हे कथा । बाळखेळासारखी[१९१] ॥

वरील उतारे परस्पराहून अगदीं भिन्न आहेत, हे सांगण्याचे कारण

१९० पां. प्र. ३४, ३५-३७, मुक्तेश्वर. विराटपर्व. ५, ८८-९०
१९१ पा. प्र ३५, १३७-१३८, मुक्तेश्वर. विराटपर्व. ६,१५९-१६१

नाहीं. त्यांतील शब्द, कल्पना व कल्पनेच्या भराऱ्या एवढेंच नव्हे तर सर्व गोष्टींची माडणी दोघांची अगदीं निराळी आहे हा प्रकार सर्व 'विराट' पर्वभर दिसून येतो. कितीही सूक्ष्म तुलना केली तरी उभयतात पहिल्या तीन पर्वात साम्य सहज आढळतें, त्याचा या पर्वात मागमूसही आढळत नाहीं. तेव्हा आक्षेपकाचा आक्षेप 'विराट' पर्वास मुळींच लागू पडत नाहीं.

आता श्रीधराने मुक्तेश्वराच्या सर्व चागल्या कल्पना व कल्पनेच्या सर्व भराऱ्या याचा समावेश आपल्या ग्रथात केला आहे कीं त्यापैकीं काहीं वगळल्या आहेत, वगळल्या असल्यास त्या कोणत्या याचा विचार करू. मागें दर्शविल्याप्रमाणे श्रीधराने पहिल्या तीन पर्वात मुक्तेश्वराच्या बहुतेक सर्व कल्पना घेतल्या आहेत; पण त्या अगदीं सामान्य स्वरूपाच्या आहेत, त्यात मुक्तेश्वराचे वैशिष्ट्य नाहीं, उलट खऱ्या मुक्तेश्वरी छापाच्या उच्च व सुन्दर कल्पना व वर्णनें त्यानें बुद्धिपुरस्सर वगळलीं आहेत, हें पुढील काहीं ठळक उदाहरणे व स्थलनिर्देश यावरून सहज लक्षात येईल.

१ ] श्रीधराने व मुक्तेश्वराने मोहिनीचे वर्णन[१९२] केले आहे;त्यात श्रीधराने पुढील सुन्दर मुक्तेश्वरी कल्पना वगळल्या आहेतः—

अ ) सुरासुर देखतां नयनीं । पतंगप्राय दीसले[१९३] ॥

ब ) त्रैलोक्यलावण्याची पेटी । देवा दैवे उघडिली[१९४] ॥

---

१९२ पा. प्र. १, २३३-२३९, मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, १२८-१३८

१९३ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, १३१

१९४ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, १३२

क ) शृंगारकासारमराळिका ।[१९५]

ड ) नाना कटाक्षाचे जाळीं । असुरसमुदावो सागरजळीं ।
मनोमत्स्य एक काळीं । वेधून पाशीं गोविले ॥[१९६]

२ ] उत्तककृत इंद्रस्तवन[१९७] मेरुपर्वताचे सुन्दर वर्णन[१९८] तसेच विष्णुलोकवर्णन[१९९] हीं मुक्तेश्वराचीं उत्कृष्ट वर्णनें श्रीधरानें घेतलीं नाहींत. समुद्रमथनातून निघालेल्या विषाचे वर्णनात जरी काहीं शब्दसाम्य असलें तरी मुक्तेश्वराचा थाट त्यानें उचलला नाहीं.

३ ] 'शकुंतला'ख्यानातील मुक्तेश्वराच्या पुढील उत्कृष्ट कल्पना श्रीधरात नाहींत:–[२००]

चंद्रमंडळीं पिकली धरणी । तैशा श्वेतछत्राच्या उभारणीं ।
रत्नकळसाचिया किरणीं । कविगुरु दोन्ही लोपले ॥
क्षीरसमुद्रीं तरंग उठती । तैसीं दिव्यचामरे झळकतीं ।
वीरश्रीसीं राजनृपती । नक्षत्रीं चंद्र अवगमे ॥

४ ]'सत्यापरता नाहीं धर्म[*]'वगैरे शकुन्तलेचें प्रत्युत्तर श्रीधरात नाहीं

---

१९५ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, १३५
१९६ मुक्तेश्वर. आदिपर्व ४, १३८
१९७ मुक्तेश्वर. आदिपर्व. २. १२५-१३२
१९८ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, ४१, ५४
१९९ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४, ५१-६०
२०० मुक्तेश्वर. आदिपर्व. १५, ३४, ३५
* मुक्तेश्वर. आदिपर्व. १६, २११

५ ] शर्मिष्ठारूपवर्णन मुक्तेश्वरानें फारच सुन्दर सविस्तर वर्णिलें आहे.:–[२०१]

जैसी सुवर्णचंपककळी । कीं वोतिली मन्मथपुतळी ॥
अत्यंत तारुण्यभरे लवली । परी विनत सुकुमार ॥
विराजे राजवदनचंद्रिका । भाळीं रेखिला कस्तुरी टिका ।
आकर्णपर्यंत कज्जल रेखा । नयन तेजें शोभती ॥
दृढ बिल्व पीनस्तन । वरी मुक्ताजाळी विराजमान ।
हृदयीं पदक देदीप्यमान । तेज फांके हृदयाब्जीं ॥
करिशावकशुंडादंड । तैसे सरळ भुजदंड ॥
कंकणे रुणझुणती प्रचंड । मदनातें चेतवावया ॥

आतां श्रीधर पहा [२०२].—

शर्मिष्ठेस आनंद बहुत । बाहेर आली अचळ रुळत ॥
तिचे सौंदर्य पाहतां रतिकांत । भुलोन वेडा होय पैं ॥

६ ] भीमरूपवर्णन:–[२०३]

| श्रीधर | मुक्तेश्वर |
| --- | --- |
| देखून स्वरूप सुंदर । मदने व्यापिलें तिचें शरीर । म्हणे याचे | जाबूनदाचा सोज्वळ पुतळा । कनकमेरूचा भव्य मुसळा । रत्न- |

२०१ मुक्तेश्वर. आदिपर्व. १९, १९–२२

२०२ पां. प्र.५, २०६

२०३ पा. प्र.११, १९; मुक्तेश्वर. आदिपर्व. ३७, २

| | |
|---|---|
| पाडें रतिवर । तुलने उणा वाटतसे ॥ | शिखरें तैशा सरळा । भुजा वर्तुळ शोभतां ॥ प्रथम वयसीची रिघवणी । श्मश्रुरेखा श्यामवर्णी । विशाळ भाळ नयन दशनीं । तेज फाके बोलता ॥ |

मुक्तेश्वराचे शब्दचित्र किती रेखीव व उठावदार आहे व श्रीधराचें किती त्रोटक, भिन्न आणि सामान्य आहे हें काय रसिकास सागावयास पाहिजे ?

७ ] मुक्तेश्वराचे इद्रप्रस्थवर्णन सविस्तर व झोकदार आहे, तर श्रीधराचें दोन ओव्यात संक्षिप्त आहे, उलट धर्मराजाचे राज्यस्थिति–वर्णन मुक्तेश्वराने दोनतीन दृष्टान्तात आटोपलें आहे तर श्रीधरानें पाल्हाळानें वर्णिले आहे.

८ ] बलरामक्रोधवर्णनांत श्रीधरानें मुक्तेश्वराचे अनुकरन न करता स्वतःचे सुन्दर दोन तीन दृष्टान्त दिले आहेत. उदाहरणार्थ, डोळस परीक्षक टाकून जन्माधाहातीं रत्न द्यावे अथवा सत्पात्र पडित दवडून शतमूर्खाला अनर्घ्य रत्न द्यावे, वगैरे.

९ ] 'सभा'पर्वांत मुक्तेश्वरकृत मराठीचा गौरव सुन्दर आहे.[२०४] पण तो श्रीधरानें उचलला नाहीं.

१० ] आतां सात्विकभाव पाडवपत्नी इत्यादि उत्कृष्ट रूपक तसेंच मयासुराच्या भाषणातील, अर्कपुष्प, हस्तोदक इ. उपमा श्रीधरानें घेतल्या नाहींत.

---

२०४ मुक्तेश्वर. सभापर्व. १, १९–२०

११ ] श्रीकृष्ण, अर्जुन व भीम हे जरासन्धवधार्थ निघाले तेव्हां त्यांचे वर्णन एकावर एक चार उपमानीं मुक्तेश्वराने केलें आहे.[२०५] पण श्रीधरानें "चंद्रसूर्यहुताशन" या आपल्या एकाच उपमेनें केले आहे.

१२ ] मागध मागे महेशाते । शत्रुयाचका माझेनि मृत्ये ।
यश भिक्षा लाधो मज[२०६]॥

या विलक्षण रूपकानें मुक्तेश्वराने करवलेली विलक्षण वरयाचना श्रीधरानें टाळली आहे.

१३ ] मुक्तेश्वरकृत भीमजरासन्धयुद्धवर्णनात अतिशयोक्ति, स्वभावोक्ति, रूपक, उत्प्रेक्षा इत्यादिकांची उडालेली गर्दी व उठावदार वीररसपरिपोष श्रीधरात आढळत नाहीं.[२०७] श्रीधरानें ते फक्त सात ओव्यात आणले आहे.[२०८] मात्र वीरगुंठी बाधणे, थडका देणें वगैरे कांहीं शब्दप्रयोग त्यानें उचलले आहेत.

१४ ] भीमक्रोधाचें मुक्तेश्वरी रौद्र वर्णन श्रीधराने अनुकरले नाहीं.

१५ ] अभिमन्युउत्तराविवाहाचा मुक्तेश्वरकृत अगाऊ उल्लेख मुळात व श्रीधरातही नाहीं.

१६ ] वनपर्व गाळलेला भाग:—

द्रौपदीनें धर्माची केलेली जोरदार कानउघाडणी व धर्माची नीति हा भाग श्रीधरानें घेतला नाहीं.

---

२०५ मुक्तेश्वर. सभापर्व. ६, ७७–८०

२०६ मुक्तेश्वर. सभापर्व. ७, २०

२०७ मुक्तेश्वर. सभापर्व. ७, २७–७०

२०८ पां. प्र. १६, १८५–१९२

१७ ] मुक्तेश्वरानें दमयन्तीविरहवर्णनात ज्या सुन्दर कल्पना घातल्या आहेत त्या श्रीधरानें गाळल्या आहेत. त्याच प्रमाणें नळराजाच्या वैभवाचें श्लेषात्मक उत्कृष्ट वर्णन श्रीधरानें उचलले नाहीं.

१८ ] मुक्तेश्वर अध्याय दहामधील उठावदार अजगरवर्णन व शापवर्णन श्रीधरानें अनुकरलें नाहीं. तसेंच वर्षाकाळाचे अत्यन्त काव्यमय वर्णन श्रीधरानें घेतलें नाहीं.

१९ ] मुक्तेश्वर अध्याय दहा ते पधरा "स्पर्शले अपमानाचें श्वान" इत्यादि अपमानित दुर्योधनाचें शब्दचित्र श्रीधरानें वगळले आहे.

२० ] विराटपर्व :—

मुक्तेश्वराने पहिल्या अध्यायांत पाडव गुप्त राहिले पण झाकले गेले नाहींत या गोष्टीस दिलेले सुन्दर दृष्टान्त श्रीधरानें घेतले नाहींत.

२१ ] जीमूतयुद्धातील "काडणे कुटणें परिघाटणें। पाटा पसरोनि परिलाटणें" इत्यादि सुप्रसिद्ध वर्णन श्रीधरात नाहीं.

२२ ] 'अयोग्य स्थळीं कल्पलतिका । वृंदावनात कर्दळीं पाहून म्हैसा धडका मारतो', इ. मुक्तेश्वरी दृष्टान्त श्रीधरात नाहींत.

२३ ] जैसा किरात शस्त्रघातें । चारी पाद ग्रीवा होते । छेदूनिया कुरगातें । भिन्न करी भक्षावया[२०९] ॥ ही मुक्तेश्वरी उपमा श्रीधरात व मुळांतही नाहीं.

२४ ] विराटाच्या गाई सुशर्म्यानें वळल्या ते स्वभावोक्तिपूर्ण उत्कृष्ट वर्णन श्रीधरात दिसत नाहीं.

२०९ मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, १५६

(२५) उत्तरगोग्रहणार्थ कौरवसैन्यानें कूच केलें त्याचें उत्कृष्ट शब्दचित्र श्रीधरात आढळत नाहीं.[२१०]

(२६) मुक्तेश्वरातील अभिमन्युउत्तराविवाहांतील समग्र सोहळ्याचे, मेजवान्याचें वगैरेंचीं थाटाचीं वर्णनें श्रीधरात नाहींत

अशीं आणखीं किती तरी उदाहरणे दाखविता येतील कीं त्यात मुक्तेश्वरी कल्पनाच्या उच्च भराऱ्याची उसनवारी श्रीधराने बुद्धिपुरःसर टाळली आहे. तरी पण "मुक्तेश्वराच्या सर्व चांगल्या कल्पना व कल्पनेच्या सर्व भराऱ्या श्रीधराने घेतल्या आहेत" हें आक्षेपकाचे विधान फोल ठरण्यास वर दिलेलीं उदाहरणे पुरेशीं आहेत असे वाचकास खास वाटेल असे वाटते.

या विधानाचा फोलपणा आणखीही अन्य तऱ्हेनें सिद्ध करता येण्यासारखा आहे. तो असा कीं, श्रीधरानें मुक्तेश्वराच्या सर्व चांगल्या कल्पना न घेताही उलट आपल्या स्वतंत्र कल्पनाविलासाने आपल्या काव्यास रमणीयत्व आणले आहे कारण, वरील आक्षेपात असे ध्वनित होते कीं, श्रीधराच्या 'पाडवप्रतापा'स जे काय काव्य-सौन्दर्य लाभलें आहे तें मुक्तेश्वराच्या उसनवारीनें. त्याचे स्वतःचें असे त्यात कांहींच नाहीं, तेव्हां असें ध्वनित होणारें अनुमानही कसें चुकीचें आहे हेंही पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल.

सामान्यतः प्रत्येक अध्यायाचा व पर्वाचा उपक्रमोपसंहार, वाचकाची उत्कण्ठा उद्दीपित करणारी पुढील कथेची सूचना हीं इतकीं स्वतंत्र व आकर्षक झालीं आहेत कीं, त्यामुळे वाचकाचे मन इकडे तिकडे जाऊच

२१० मुक्तेश्वर. विराटपर्व. ६, ४२-४६

शकत नाहीं आणि हीच त्याच्या लोकप्रियतेची एक गुरुकिल्ली आहे. असो आता त्याच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाचीं उदाहरणें यथाक्रम पुढें देऊन वरील मुद्यास पुष्टि देऊं.

## श्रीधराच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाचीं उदाहरणें

आता या प्रदीर्घ विवेचनाचा थोडक्यात निष्कर्ष हा कीं, श्रीधराने ' आदि ' ' सभा ' ' वन ' या तीन पर्वांत मुक्तेश्वरी शब्द, पदसमूह व पुष्कळशा कल्पना थोडेशी फिरवाफिरव करून घेतल्या आहेत हें खरें. पण या सर्व गोष्टी इतक्या मोघ्या व सामान्य आहेत कीं, त्या श्रीधराहून कमी योग्यतेच्या कोणाही कवीस सहज सुचण्यासारख्या आहेत. त्यानन्तर दुसरी गोष्ट अशी कीं, मुक्तेश्वराचा जो जो खास कल्पनाविलास त्याची उसनवारी त्याने केली नाहीं तर ती बुद्धिपुरःसर टाळली आहे इतकेच नव्हे तर त्याच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाची अशीं अनेक रम्य स्थळें जागोजाग विखुरलेलीं आहेत. ' विराट ' पर्व तर दोघांचें स्वतंत्र आहे दोघांच्या कथासूत्रातही अनेक बारीकसारीक व मोठेही भेद असल्यामुळे दोघाने कथातंत्रीं स्वतंत्र आहे. पण मूळ भारताचाच दोघे अनुवाद करीत असल्यामुळे मुख्य कथाभाग दोघांचाहि बराचसा जुळता असणें अपरिहार्य आहे. परन्तु, वरील भेदामुळेच जरी मुक्तेश्वरी त्र्याणव अध्यायाची व तेरा हजार पाचशे एकुणऐंशी ओंव्याची कथा श्रीधरानें पसतीस अध्यायात व सात हजार आठशे बावीस ओंव्यात आणली असली तरी एकीचा दुसरा साराश आहे असे म्हणणे वाजवी होणार नाहीं. कारण, साराशात कथासूत्राचे सर्वस्वीं ऐक्य असणें अवश्य आहे. तेव्हां मुक्तेश्वरी चार पर्वांचे'पांडवप्रतापा'चे पसतीस अध्याय हे सार होत'हें भावे यांचें शेवटचे विधानही बरोबर नाहीं.

आता असा सहज प्रश्न उद्भवतो कीं, श्रीधरास वर निर्देशिल्या प्रमाणें अगदीं सामान्य गोष्टींची इतकी मोठी उसनवारी तरी करण्याचे प्रयोजन काय ? हें कार्य त्याला जर सहज करता येण्यासारखे होते तर ते त्याने का केलें नाहीं ? त्याला उत्तर एवढेंच कीं, ते त्याने करावयास नको होतें. पण असे त्याने का केले याचे कारण शोधावयास फार लाब जावयास नको. त्याने 'पाडवप्रताप' ग्रंथ लेखनास सुरवात केल्यापासूनच हे प्रचड काम आपल्या हातून कसें पार पडेल याबद्दलची भीति वारवार प्रगट केली आहे. कित्येक वेळा तर अगदीं हताश होऊन लेखनकार्य सोडून दिल्या-चेही त्यानें अनेकवार आपणास सागितले आहे. परन्तु, केवळ पाडुरग-प्रसादानें आपल्यास वेळोवेळीं उत्साह मिळाला व हे कार्य शेवटास गेलें असेही तो आपणास सागतो. यावेळीं काहीं शारीरिक वा मानसिक अस्वास्थ्यानेही त्याचा आत्मविश्वास डळमळीत झाला असण्याचा सभव आहे. अशा दुहेरी दुर्बलतेत त्याने मुक्तेश्वरी 'भारता'चा आयताच तयार असलेला सागाडा वापरला, मात्र खास मुक्तेश्वरी वाग्वैभवाची उचल करण्याचा मोह त्यानें आवरला आहे आणि जी जी सामुग्री त्याने घेतली ती ती स्वतःच्या प्रतिभेच्या कुचल्याने कुचलून कातिमान् केली आहे. पहिल्या तीन पर्वानन्तर त्यानें हा आधार टाकून बाकीची सर्व ग्रथरचना स्वतत्रपणे केली आहे. परन्तु, मौज ही कीं, या सर्व उच पर्तींत त्याने मुक्ते-श्वराचें ऋण सर्व 'पाडवप्रतापा'त नाममात्रानें सुद्धा कोठेही कबूल केले नाहीं. आरंभीं इतर सस्कृत कवींबरोबर सर्व पूर्वकालीन मराठी सन्तकवींस त्याने जरी 'दडवत' घातलें आहे व 'भीष्म'पर्वात गीताटीकाप्रसंगीं " तरी ज्ञानेश्वराहून निश्चितीं । माझी नव्हे कीं, आगळी मती[२११]।। असे

२११ पा. प्र. ४१, १६५

म्हणून त्यानें ज्ञानेश्वराची मुक्तकण्ठानें स्तुति करून आपला विनय दर्शविला आहे हे खरे, तरी पण मुक्तेश्वराचे नावही त्यानें काठे कसे काढले नाहीं याचे आश्चर्य वाटतें. त्याच्या ठिकाणीं कृतज्ञता वसत नव्हती असे म्हणवत नाहीं. एवढी मोठी उसनवारी अबोधपूर्व सहजासहजा झाली असल्याचा संभवही फार कमी! त्याच्या सर्वतोपरी उज्ज्वल असलेल्या चारित्र्यात हे एक न्यून राहिले खास.

पांगारकराच्या आक्षेपाचे उत्तर वरील विवेचनातच येऊन गेले असल्यामुळे त्याचें निराळे विवेचन देण्याचे प्रयोजन नाहीं. मात्र त्यानीं ' तर्जुमा " हा शब्द 'नक्कल' या अर्थी चुकीनें वापरलेला दिसतो हे सांगणे अवश्य आहे. 'पांडवप्रतापा'चे पसतीस अध्याय हा जसा मुक्तेश्वरी पर्वांचा सारांश नाहीं त्याचप्रमाणें तो त्याची नक्कलही नाहीं.

" अर्थात् अनाठायीं शृंगार हा मुक्तेश्वराचा दोषही यात (' पांडव प्रतापा'त ) आला आहे." इत्यादि जो याचा दुसरा आक्षेप त्याकडे वळू.

प्रथमत: हे लक्ष्यात ठेविलें पाहिजे कीं, मूळ'भारता'तच अनेक ठिकाणीं शृंगारवर्णने आहेत व तेथेही तीं क्वचित् स्थळी विस्तृत व उत्तान झालीं आहेत. अशा प्रसंगीं मुक्तेश्वराची प्रतिभा इतकी रंगते कीं, तो कित्येक स्थळीं मुळावरही ताण करतो. परन्तु श्रीधराने सामान्यत: पुष्कळच संयम दाखविला असल्यामुळे त्याच्याकडून शिष्टमर्यादेचें उल्लंघन फारच क्वचित् झालेलें आढळते. ही गोष्ट पुढील काहीं उदाहरणांवरून स्पष्ट होण्यासारखी आहे.

## आदिपर्व

१ ) मुक्तेश्वरानें 'जरत्कारू'च्या तोंडीं जें अश्लील व बीभत्स [२१२]

---

२१२ मुक्तेश्वर. आदिपर्व० १, ५०–५५

वर्णन घातले आहे ते श्रीधरानें अनुकरलें नाहीं :—

कुच पय:पात्र देखोनि नयने । पुरुष मार्जार मियो म्हणे ॥
हृदयीं हाणितल्या चरणें । बळे संघटे पादसंधीं ॥
वर्मीं ताडिता कठिण वचनीं । लिंगमुख दाटले भगभाजनीं ॥
ओठ चावीत रोमस्थानीं । पुच्छ उभारित पुढारें ॥
की विषयविष्ठेलागीं टोकती । मूत्रमोरिये नित्य रमती ॥
नग्नस्त्रियेभोंवतेंभोंवती । ते शूकरव्यक्ति नरदेहा ॥

................ ...... ..... ...... ...

हस्तदड टेकोनि शुनी । श्रमल्या विसावा मानिती मनीं ॥
तृषानिवृत्ति मृगजलपानीं । तेवि चुंबनीं परितोष ॥

२ ) पराशरमत्स्यगंधाभेट[२१३]

**श्रीधर**

मध्यभागीं नौका जात । देखून परम एकात । मन्मथे व्यापिला शक्तिसुत । विलोकि तियेतें ॥

म्हणे पद्मनेत्रे सुदरी । मजशीं सुरतानदें क्रीडा करीं । मग बोले दाशकुमारी । विपरीत कर्म केवीं करूं ॥ अगनादेह विक्रीत यथार्थ । पुढे वरग्राहक न ये कीं सत्य । भगिता

**मुक्तेश्वर**

लाधला असता एकात । हृदयीं अवतरला काममन्मथ । होऊनिया सगासक्त । केशपादात विलोकी ॥

इंदिरावरश्यामागना । आकर्णांत विशालनयना । बिंबाधरा चद्रवदना । कोमलागीं रंभोरु ॥ जाणीतली वासुकीकन्या । होईल सर्व लोकांत मान्या । माझिया पवित्र रेतधान्या ।

---

२१३ पा. प्र. ३, १३५–१४३; मुक्तेश्वर. आदिपर्व. १३, ९९–१०९

माझें कुमारित्व पुढें अनर्थ जन्मवरी ॥ दिवस प्रथम प्रहर देख । उभयतटीं पाहती लोक । रहस्य प्रकटेल तात्कालिक । उपहास जन्मवरी ॥ मजशीं करिता सुरत । तुझे न मोडे कुमारित्व । पुढें राव वरील यथार्थ । वचन सत्य जाण पा ॥ मनात म्हणे सुंदरी । हा केवल ईश्वर निर्धारी । सुरतयुद्धा ते अवसरीं । प्रवर्तलीं दोघेजणे ॥

होय सुभूमि निर्धारें॥१०१॥हृदय भेदलें पंचबाणें । म्हणे अभुक्त अबले ! देणें । भोगभिक्षा ये काळीं ॥ १०२ ॥

................... ......

स्मरे विस्मरणाच्या डोहीं । माते बुडविलें ये'समर्थी । अकारूढ करून नेईं । रेतपाता परपारा ॥१०६॥.......

अंगनादेहाची विक्रेयवस्तु । हा श्रेष्ठाचार अनादि पशु । आह्निक न लावी हातु । कुमारित्व भगता ॥ वरी दिवसा प्रथम प्रहर । उभय तटाकीं नारीनर । रहस्य होता दृष्टिगोचर महा अनर्थ आदळे ॥

येथे १०१, १०२ व १०६ या ओव्यातील रूपकातर्गत मुक्तेश्वरी कल्पना अगदीं अश्लील आहेत. श्रीधराने इतर शब्दरचना व वर्णन याचें अनुकरण केलें असलें तरी त्यानें या अश्लील कल्पना टाळण्यात पुष्कळच सयम दाखविला आहे.

३ ) विश्वामित्राचे मेनकेनें केलेले प्रलोभन मुक्तेश्वराचे फारच उत्तान व पाल्हाळिक झालेंले आहे व ते सर्व शकुन्तलेच्या तोंडी घातल्यामुळें औचित्यहानिही झालीं आहे. [२१४] परन्तु वरतीं मुक्तेश्वर म्हणतोः–

---

२१४ मुक्तेश्वर. आदिपर्व. १५, १३६–१५८;
पा. प्र. ३, १०५–११८

• गुणग्राही श्रोते चतुर । अन्यादरें परिसनु ॥

पण श्रीधरानें संयम दाखवल्यामुळें हे दोन्ही दोष टळले आहेत.

४ ) तैसींच पुरुषाचींही मनें । सुंदर परस्त्रीअवलोकनें ॥
देखताक्षणीं तत्क्षणें । मनें भागोनि जाइजे ॥
माता, कन्या अथवा भगिनी । त्याचे मैथुनी अंत:करणीं ॥
न स्मरे ऐसा न दिसे कोणी । तो अव्यभिचारी मनाचा ॥

हे मुक्तेश्वरी हीन वृत्तीचे लैंगिक विचार श्रीधराने टाळले आहेत.[२१५]

५ ) मेनका दूषणातील दुष्यन्ताच्या भाषणात जरी उभयत्र बरेच सारखे दृष्टान्त आहेत तरी पुढील मुक्तेश्वरी अश्लील वर्णन श्रीधराने बुद्धि-पुर:सर टाळलेले दिसते[२१६] :—

६ ) अनेक लिंगोदकाचे लोट । जीमाजी होती एकवट ॥
कदर्प-चर्म निकृष्ट । चर्मसौंदणी निर्मिली ॥

बृहस्पति आपल्या वडील बंधूची भार्या 'ममता' इजवर ती गरोदर असता व निषेध करीत असता जो बलात्कार करतो तें मुक्तेश्वरी अश्लील वर्णनाचें नियोगाबद्दलचे उदाहरण श्रीधराने गाळले आहे.[२१७]

७ ) पांडवजन्म, कर्णजन्म, पंडुशाप इत्यादि कथावर्णनात उभयत्र शब्दसाम्य असूनही श्रीधराने फारच संयम राखला आहे. पांडुमाद्री संभोग-

---

२१५ मुक्तेश्वर. आदिपर्व. १५; १४४-१४५

२१६ मुक्तेश्वर. आदिपर्व. १६, १७१

२१७ मुक्तेश्वर. आदिपर्व. २४; पा. प्र. ६

वर्णन त्याने केवळ दोन ओव्यात अगदीं मर्यादित केले आहे, तर मुक्तेश्वराचें पाल्हाळिक व अश्लील झाले आहे.[218]

८) पांडवप्रताप पुरुष तरणा[219] ॥ इत्यादि सुप्रसिद्ध साङ्ग व परंपरित रूपक मुक्तेश्वरानें फार सविस्तर केले आहे व ते अश्लील झाले आहे तर श्रीधरानें ते दोन ओव्यातच आटोपलें असल्यामुळें तें मर्यादित आहे.

## सभापर्व

१) तिवुकीं कामशास्त्राचीं आसनें । योगी भोगीं प्रेरिती ।

हे मुक्तेश्वरकृत 'मयसभा'वर्णन श्रीधरात नाहीं.[220]

२) मुक्तेश्वरकृत कुपुत्रनिंदेतील ग्राम्यता व अश्लीलता[221] 'नपुसकलिंग घोडशागुळ'[222] इ. श्रीधरात नाहीं.

३) द्रौपदी वाढीत असताना कौरवानीं केलेला पाचट विनोद श्रीधराचा संक्षिप्त आहे, तर मुक्तेश्वराचा पाल्हाळयुक्त व अतिपाचट आहे.[223] शिवाय श्रीधराच्या विनोदाचा शेवटचा भाग स्वतंत्र आहे व त्याचें पर्यवसान पुढे द्रौपदीच्या कृष्णभक्तींत झाले असल्यामुळे त्याच्या

२१८ मुक्तेश्वर. आदिपर्व. २४, ४–२१, पा. प्र. ८, १८-१९

२१९ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४४, ११४–११७;
पा. प्र. १२, १४७-१४८

२२० मुक्तेश्वर. सभापर्व. २, ५०

२२१ मुक्तेश्वर. सभापर्व. ५, ५२–९२

२२२ मुक्तेश्वर. सभापर्व. ५, ५९

२२३ मुक्तेश्वर. सभापर्व. ९, ७६-८१; पा. प्र.१८, ४९-५६

पूर्वीच्या पांचटपणावर पांघरूण पडलें आहे. पण मुक्तेश्वराचें अगदी असभ्य व उपहासात्मक झाले आहे.

४) शरीर ओढवी पांचाळजणा । म्हणवी पवित्र कुलांगना[२२४] ॥

इत्यादि मुक्तेश्वरी ग्राम्यता श्रीधरानें टाळली आहे.

५) रजस्वला हो एकांबरा । ढळता वक्ष.स्थळींच्या पदरा ॥
पाणितळें पयोधरा । आच्छादून आक्रंदे[२२५]॥

हें द्रौपदीचे वर्णन श्रीधराने टाळले आहे.

६) अंगीं चंदन सुपरिमळे । तळवा लेपूनि पाणितळें ॥
मर्दन करिता कुचयुगुळें । सुखानें पै सेवितसे ॥[२२६]

हें अप्रासंगिक शृंगारवर्णन श्रीधरात नाहीं.

## वनपर्व

वनपर्वात शृंगारिक स्थळे अगदींच कमी आहेत. उर्वशी-अर्जुनभेट, नळ–दमयन्ती–भेट व जयद्रथकृत द्रौपदीहरण इत्यादि प्रसंगीं शृंगारिक वर्णनाचा संभव; पण येथें मुक्तेश्वर व श्रीधर या दोघांनींही मर्यादातिक्रम केलेला नाहीं. उलट उर्वशीचा अभिसारिका–वेश, स्तन, जघन, ओटीपोट इत्यादि मुळातील प्रत्यंगवर्णन श्रीधराने गाळले आहे.

## विराटपर्व

(१) सुदेष्णेचा सैरन्ध्रीस भोग भोगण्याचा अनीतिमान उपदेश.[२२७]

---

२२४ मुक्तेश्वर. सभापर्व. १५, २२

२२५ मुक्तेश्वर. सभापर्व. १५, ७५

२२६ मुक्तेश्वर. सभापर्व. १५, १७४

२२७ मुक्तेश्वर. विराटपर्व. २, २५-३५

२ ) कर्दळीवनात म्हैसा थडका मारतो इ. ग्राम्य विनोद.[२२८]

३ ) भाऊबिजेची देणगी म्हणून सुदेष्णेजवळ सैरन्ध्रीची कीचकानें केलेली मागणी.[२२९]

या तिन्ही गोष्टी मुळात नसूनही मुक्तेश्वरानें वर्णिल्या आहेत. पण श्रीधरानें त्या अनुकरल्या नाहींत.

४ ) चित्रविचित्र सुरतासनानीं मजबरोबर अनंगसुखभोग ही कीचकाची अश्लील सूचना.[२३०]

५ ) 'गुप्तसूत्र स्त्रियाचे न कळे' हें विराटाचे द्रौपदीस भाषण.[२३१]

६ ) "कसले गंधर्व आणि कसले गुप्तपति ! तारुण्य आहे तों चैन कर" हा सुदेष्णेचा सैरन्ध्रीस केलेला उपदेश.[२३२]

७ ) बैस माझ्या अंकासनीं । गाढालिंगनचुंबनीं । ताप शमवी वल्लभे ।।[२३३]

८ ) वक्षस्थळीं टाकिला हात । कठिण लागतो निभ्रान्त ।
कामसोहें नोळखे ।।

वरील चार ते आठ अश्लील व अनितिमान् गोष्टी श्रीधरानें गाळल्या आहेत.

अशीं आणखी किती तरी उदाहरणें दाखवितां येतील. तरी पण वर दिलेल्या बीसबावीस उदाहरणावरून हें निःसदेह सिद्ध होत आहे कीं,

२२८ मुक्तेश्वर. विराटपर्व. ३ ; २२९ मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, ११
२३० मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, २१
२३१ मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, ५३; २३२ मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, ९१
२३३ मुक्तेश्वर. विराटपर्व. ३, १०६

श्रीधरानें जरी शृंगारवर्णनें पुष्कळ केलीं असलीं तरी त्यानें त्यात मुक्तेश्वराची अश्लीलता, उत्तानता, ग्राम्यता, बीभत्सता व अनीतिमत्ता वगैरे दोष प्रयत्नपूर्वक टाळले आहेत, आणि म्हणूनच (भावे सुचवितात त्याप्रमाणे) "पढरीनाथानें त्यास मुक्तेश्वरी महाभारत वाचू नको असें स्वप्नांत सागितले नाहीं" हें एका अर्थी बरेच झाले. का कीं, त्यामुळेच त्याला मुक्तेश्वराचे दोष टाळता आले.

हें श्रीधर–मुक्तेश्वर प्रकरण फार लाबलें खरें. परन्तु भावे–पागारकरासारख्या प्रथितयश साहित्यिकाच्या आक्षेपाचें निरसन होण्यास तसाच सबळ पुरावा पाहिजे; तो वाचकास यात मिळेल व श्रीधराच्या ठिकाणीं स्वतंत्र प्रज्ञा व प्रतिभा होती; त्यानें औचित्य व विवेचकताही आपल्या या ग्रंथांत दर्शविली आहे याची खात्री त्यास पटेल असे वाटतें.

## १४ श्रीधराची स्वतंत्र रचना

मुक्तेश्वराच्या काव्यातील काहीं शब्द, पदें व काहीं कल्पना यांचें अनुकरण करूनही श्रीधराच्या स्वतंत्र प्रतिभेला व कल्पनाविलासाला 'पांडवप्रतापा'त पुष्कळ स्थान मिळालेले आहे हें सूक्ष्म विचाराअंतीं दिसून येतें. पुढील काहीं उदाहरणावरून या विधानाची सत्यता सहज पटेल.

### आदिपर्व

१) मुक्तेश्वराच्या आदिपर्वातील पहिल्या अध्यायांतील 'महाभारतमाहात्म्य' व 'भारतश्रवणफल' हीं 'पांडवप्रतापा'त श्रीधरानें अनुकरलीं नाहींत. त्यानें प्रत्येक अध्यायाचा प्रारभ, मागील अध्यायाचें अनुसंधान, व पुढील अध्यायाचें कुतूहलजनक अवतरण ही पद्धति अगदीं

स्वतंत्रतेने सर्व ग्रंथभर स्वीकारली आहे. प्रारंभींच्या गजानन-नमनातील पुढील ओंव्या स्वतंत्र आहेत.[२३४]:—

उगवले दोन्ही वासरमणी । तैसीं मकराकार कुंडलें श्रवणीं ॥
नक्षत्रपुंज ओंविले गुणीं । मुक्तामाला तेवीं दिसती ॥
नक्षत्रीं वेष्टिला रोहिणीकांत । तैसे पदक हृदयीं विराजित ॥
सौदामिनीविषें झळकत । शुभ्र वस्त्र गणपतीचें ॥

येथील कल्पना किती सुन्दर आहेत हें काय रसिकास सांगावयास पाहिजे ?

२ ) माहेरवाशिणी फार काल माहेरीं राहिल्यास लोकनिंदेस कशा पात्र होतात हें व पतिव्रतास्तुति व कुलटानिंदा नीतिबोध श्रीधरानें विस्तारानें वर्णिलीं आहेत.[२३५] मुक्तेश्वराचा आधार येथे नाहीं. तो स्वतंत्र आहे.

असो हा पाल्हाळ बहुत । लोकचर्या सांगितली किंचित ॥[२३६]
असें त्याचें श्रीधरानें समर्थन केले आहे.

३ ) शर्मिष्ठेचें ययातीशीं झालेलें भाषण स्वतंत्र आहे.[२३७]
तिचे मन राखिशी सुशीला । माझी उपेक्षा करूनिया ॥
एकचि सुधारस पूर्ण । प्राशन करिती दोघेजण ॥
एकाचे चुकले मरण । एका मृत्यु न सोडी ॥
भागीरथींत स्नान । सप्रेमें करिती दोघेजण ॥
एकाचे पाप गेले जळोन । एक तैसाचि राहिला ॥

---

२३४ पां. प्र. १, ७-८ ; २३५ पां. प्र. ४, २०-४६
२३६ पां. प्र. ४, ४७ ; २३७ पां. प्र. ५, २१२-२१४

यानन्तर परिस व लोह, सुरद्रुम व दोन लतिकाः एक डोळा मिटून पहाणें इत्यादि समर्पक दृष्टान्त देऊन श्रीधरानें अर्थाची सूचकता व सौन्दर्य साधलें आहे.

४ ) गंगेच्या रूपवर्णनांत दोघांत शब्द व कल्पना यांचें पुष्कळ साम्य असूनही श्रीधराच्या घडणींत एक प्रकारची स्वतंत्र चमक मारते, व संक्षेपानें अधिक ठसकेदार दिसते.[२३८]

५ ) इंद्रप्रस्थांतील धर्माचें राज्यस्थितिवर्णन सविस्तर स्वतःचे दिले आहे.[२३९] हेंच मुक्तेश्वरांत दोन ओव्यांत आहे.

६ ) पुष्पवृक्षास एक बंधन । दंड छत्रासचि जाणिजे ॥ [२४०]

स्वतःचा अलंकार.

७ ) सुभद्रेचें स्वरूपवर्णन मुक्तेश्वराचें अगदीं अल्प आहे.[२४१]

तिचें लावण्य नर वाणी । केवीं वर्णावें सांगा पा ॥
सौंदर्याची राशी अमुप । सरस्वतीचें वदनमाप ।
थिटे म्हणोनि सांडे आपोआप । सत्य लोकापरौतें ॥

आता श्रीधर पहाः—

सुभद्रादेवी लावण्यखाणी । देवांगना नागिणी पद्मिणी ॥
स्वरूपावरूनि ओंवाळिजे । दमयंती सुलोचना पंचशरदारा ।

---

२३८ मुक्तेश्वर. आदिपर्व. २२, ४०-६२ पां. प्र. ६, ३७-३९
२३९ पां. प्र. १३, ६१-६६; मुक्तेश्वर. आदिपर्व.४६, २३-२४
२४० पां. प्र. १३, ७२
२४१ मुक्तेश्वर. आदिपर्व. ४७, ८७-८८; पां. प्र. १३, १९८-२०३

मयकन्या रूपवती तारा । जिच्या विलोकितां वदनचंद्रा ।।
लाजोनि जाति तत्काल । नक्षत्रें निर्मल नभमंडळीं ।।
तैशी झळके मस्तकीं मुक्ताजाळी । बिजवरा मिरवे भाळीं ।।
आकर्णनेत्री सुभद्रा । कवि गुरु तेजासी उणें आणिती ॥
तेंवीं मुक्ताघोष कर्णीं डोलती । उघडली दिव्य रत्नखाणी ती ।।
तैशी दशनीं प्रभा फाके । नेत्रीं सोगयाचें अंजन ॥
नाचे शाफरीध्वज देखोन । चपलेपरी झळके दिव्य वसन ।।
पायीं पैंजण नेपुरें ।।

८ ) स्वतत्र उपमा:-फुटे प्रलयीं जलराशी । तैसे यादव धावले[२४२] ।।

९ ) बलरामक्रोधवर्णन श्रीधराचें स्वतत्र आहे.

१० ) सुभद्रेसह अर्जुन द्रौपदीस भेटला तेव्हाचा तिचा कृतककोप श्रीधराचा स्वतंत्र आहे[२४३]:—

वरीवरी रुसोन द्रौपदी बोलत । आता इकडे यावयाचा कार्यार्थ ।।
नाहीं काहींच जाणिजे ।।
सद्यस्तप्त घृत साडून । मग जुनियाचें काय कारण ।।
नूतन वस्त्र केलें प्रावरण । राहिलें जीर्ण सहजची ।।

११ ) तसाच खांडववनदाहानन्तर लपितेसहित परत आलेल्या मंद पालावरील जरितेचा व तिच्या बाळाचा रुसवा मोठा हृद्य स्वतत्र आहे.[२४४]

## सभापर्व

१ ) श्रीधराचीं मंगलाचरणें अगदीं भिन्न असून 'सभा'पर्वीत पाडु-

---

२४२ पा. प्र. १३, २१५ ; २४३ पा. प्र. १३, २४३-२४६
२४४ पां. प्र. १४, ८६-९०

रंगाचें नमन फार भव्य व उदात्त झालें आहे. सुन्दर विशेषणाच्या मालिकेनें त्यास फारच शोभा आली आहे. उदा.विद्वज्जनहृत्पद्ममिलिंदा इ.[२४५]

२ ) भारतसाराश वटबीजवत् अणुमात्र सांगतो हें श्रीधराचें संक्षेपवर्णन स्वतंत्र आहे.[२४६]

३ ) स्नेहवृद्धीवरील श्रीधराचें–शुक्लपक्षीं चद्रकला; इ. स्वतंत्र दृष्टान्त आहेत.

४ ) 'बिन्दुसरोवर'वर्णन श्रीधराचें अगदीं भिन्न आहे.[२४७]

५ ) श्रीधराचा पधराव्या अध्यायाचा समारोप फार गोड असून स्वतत्र आहे.

६ ) नारदाचें वर्णन श्रीधराचें सुन्दर आहे.[२४८]

७ ) कुपुत्रनिंदा स्वतंत्र आहे.[२४९]

८ ) जरासन्धाचें भाषण -मज सिंहाचिये दरीआंत । तिघे करी आले अकस्मात ।। हे वर्णन मुक्तेश्वरात नाहीं.[२५०]

९ ) सहदेवकृत अग्निस्तवनात मुक्तेश्वरानें अग्नीचीं एकोणीस नावे दिलीं तर श्रीधरानें चोवीस दिलीं आहेत.[२५१]

---

२४५ पां. प्र. १५, १-७ ; २४६ पा. प्र. १५, १५-२०
२४७ मुक्तेश्वर. सभापर्व. १, ४७-४९; पां. प्र. १५, ४४-४६
२४८ पां प्र. १६, ६१-६३ ; २४९ पा. प्र. १६, ७०-८५
२५० पां. प्र. १६, १७२ ; २५१, पां. प्र. १७, ४६-५९

१० ) कृष्णास अग्रपूजा दिली म्हणून दुर्जनास संताप झाला त्या वर्णनात श्रीधराचे स्वतंत्र दृष्टान्त आहेत.[२५२]

११ ) श्रीधरानें भीष्माच्या तोंडीं शिशुपालाच्या कृष्णद्वेषासंबंधीं अनेक स्वतंत्र दृष्टान्त घातले आहेत.[२५३]

१२ ) अध्याय समारोप–"पांडवप्रतापग्रंथसत्र"स्वतत्र रूपक[२५४]आहे.

१३ ) द्रौपदीस दुर्योधनाचा निरोप हेर सागतो त्यावेळीं श्रीधराचें वर्णन स्वतत्र आहे.[२५५]

वाटे काळजीं घातलीं सुरी । कीं सौदामिनी पडली शिरीं ॥
कीं सुकुमार कमलिनीवरी । वज्रघाय पडियेला ॥

१४ ) दुःशासनास–द्रौपदीचें भाषण स्वतत्र व अधिक कळवळ्याचें आहेः-[२५६] "देवरा, तूंच माझा कैवारी हो, तू माझी माउली हो, तूच माझी लाज राख, तूच द्रुपद हो किंवा माझा वध तरी कर आणि यश जोड" इ. इ. पण याचा उपयोग होत नाहींसें पाहून ती म्हणतेः—

हिंसकास कैंची दया । मार्गघ्नास कैंची माया ।[२५७] इ. अनेक दृष्टान्त स्वतंत्र आहेत. पुन्हा द्रौपदीची मार्गोतील विनवणी फार हृदय-स्पर्शी आहे तीही स्वतंत्रच आहे. 'पाडवप्रतापा'त अध्याय एकवीस–अकरा ते एकेचाळीस ओंव्या फारच कारुण्यपूर्ण आहेत.

---

२५२ पां. प्र. १९, ७-११ ; २५३ पां. प्र. १९, ३९–५०
२५४ पा प्र. १९, १७०–१७१ ; २५५ पा. प्र. २१, ११
२५६ पा. प्र. २१, २३-४१ ; २५७ पा. प्र. २१, २९

पुढें कर्णभाषणान्तर द्रौपदी भीमाकडे पाहते ते वर्णन—[२५८]
पांडव कसें दिसले—

परी पक्षहीन अध पक्षी । तैसे दीन दिसती ते ।।[२५९]

१५ ) द्रौपदी–क्रोधवर्णनांत श्रीधरानें जरी मुक्तेश्वरातील "भीमकरीं जे कळवली । गदानोवरी सगुणाथली" इ. सुप्रसिद्ध रूपकाचा थोडासा अनुकार केला आहे तरी त्याने आपल्या स्वतंत्र माडणीनें त्यास निराळीच खुमारी आणली आहे.[२६०]

१६ ) श्रीधरकृत द्रौपदीचा धावा औचित्य व गोडी या दृष्टींनीं अधिक सरस झाला आहे. मुक्तेश्वराचा लाब व कटाळवाणा वाटतो; अनेक पौराणिक व दशावतार उल्लेखानीं तो अस्वाभाविकही आहे व शेवटीं तर औचित्यभग झाल्यामुळें त्याचे कारुण्य नष्ट झालें आहे[२६१]:—

| श्रीधर | मुक्तेश्वर |
|---|---|
| द्रौपदीचे करुणाशब्द । हेचि उडाले प्रेममिलिंद । श्रीकृष्ण–कमलीं सद्गद । गुंजारव जाणविती[२६२] ॥ | ऐसा दौपदीमुखयत्रींचा । यत्र-गोळ उसळला साचा । करुणातेज सुतेजाचा । बाळभानु ज्यापरी ॥ तो झगटोनी कृष्णश्रवणीं । आद-ळला हृदयभुवनीं । तेणें सुख-निद्रेचे सदनीं । जागरोनी खड-तरला[२६२] ॥ |

---

२५८ पा. प. २१, ४९-५१ . २५९ पा. प्र. २१, ९

२६० पा. प्र. २१, ९१-९८, मुक्तेश्वर. सभापर्व. १५,११०-११७

२६१ पा.प्र.२१,१०१-१३८,मुक्तेश्वर. सभापर्व.१५.११९-१७४

२६२ पा. प्र. २१, १२८,मुक्तेश्वर. सभापर्व. १५, १६३-१६४

दोहोंच्या तुलनेनें कोठे माधुर्य व औचित्य आहे हें काय रसज्ञास सांगितले पाहिजे ?

१७ ) द्रौपदीवस्त्रहरणसमयीं पुढील सुंदर ओंवी स्वतत्र आहे:—

रुई राहाट चिवट माग । काहीं न घालिता श्रीरंग ॥
अचाट पटसृष्टी सुरंग । पुरवीतसे ते काळीं [२६३] ॥

श्रीधराचे कलाज्ञानही व्यक्त होते.

१८ ) सभापर्व–शवट फार ह्रस्व आहे स्वतत्र आहे [२६४]

## वनपर्व

१ ) वनपर्व–प्रारभींचें नमन स्वतंत्र आहे [२६५] श्रीकृष्णाचें ते एक उत्तम भारदस्त स्तोत्रच आहे. यातच वनपर्वावरील रूपक व महाभारतावर अनेक सुन्दर रूपके आहेत. मुक्तेश्वराने मागील सन्दर्भ न देताच एकदम सुरवात केली आहे.

२ ) राजाचे सद्गुण वर्णन करून तेरा वर्षें वनवास व अज्ञातवासात जाणाऱ्या पाडवावरील रूपक फारच मनोज्ञ आहे:– [२६६]

निष्कलंक तू शशाक शीतल । वियोगराहु मध्यें सबळ ॥
त्रयोदशवर्षीं शुद्ध मडळ । वदनेदु कधीं विलोकू ॥
कापट्यद्यूत–केतूने पूर्ण । धर्म झाकला चडकिरण ॥
तेरावे वर्षीं मुक्तिस्नान । तोंवरी उपोषण पडियले

२६३ पा प्र. २१,१८१ ; २६४ पां. प्र. २२, १५०–१६२
२६५ पां. प्र. २३, १-१३ ; २६६ पा. प्र. २३, ४९–५०

पुढे अशींच सुन्दर रूपकें केलीं आहेत.

३ ) संजयानें धर्मास कसे पाहिलें याचे वर्णन मुळातील दोन दृष्टान्त देऊन आपल्या स्वतःच्या अनेक दृष्टान्तानीं केले आहे तसेच मैत्रेयाचे दुर्योधनस्वभावावरील दृष्टान्त स्वतंत्र आहेत. उदाहरणार्थः–मत्त वृषभ, पिसाळलेला श्वान, इ.

४ ) विदुरकृत 'किर्मीर' वर्णन स्वतंत्र आहे.

महाविशाल रजनीचर । कज्जलवर्ण पर्वताकार ॥
भाळीं चर्चिला सेंदूर । दाढा शुभ्र भयानक ॥

५ ) द्वैतवनांतील ब्राह्मणकर्मांचे वर्णन[२६७].—

यथासुखें राहिले ब्राह्मण । कुंड वेदिका शास्त्रप्रमाण ॥
सायंकाळीं देदीप्यमान । तिन्ही अग्नि शोभती ॥

६ ) द्वैतवनवर्णन मूळ व मुक्तेश्वराहून निराळे असून भव्य आहे व शेवटची ओंवी फार सरस आहे.[२६८]:—

वनपर्वकमल सुरस । पंडितमिलिंद घेती सुवास ॥
कुटिल निंदक दर्दुरास । कुतर्कपंक प्राप्त सदा ॥

७ ) पांडव वनात सुखानें आहेत ही वार्ता ऐकून दुर्योधनास दुःख झालें. या वर्णनातील दृष्टान्त व द्रौपदीचा धावा हे स्वतःचे आहेत.[२६९] मुक्तेश्वराचा द्रौपदीचा धावा अगदीं निराळा आहे ( मुळापेक्षाही निराळा आहे ).

२६७ पा. प्र. २३, २२४ ; २६८ पा. प्र. २३, २३८
२६९ पा. प्र. २४, ८९–, २४, ३४–४५; मुक्तेश्वर. वनपर्व. १६, ७०-९६

८) दुर्वास–भोजनवर्णन मुळांत नाहीं. श्रीधर मुक्तेश्वरानीं खूप थाटाचे केलें आहे. त्यात थोडेफार साम्य असलें तरी एकन्दर मांडणी भिन्न आहे. दुर्वासाच्या आशीर्वादातील तीन रूपकें अगदीं श्रीधराचीं आहेत.[२७०]

९) उर्वशीरूपवर्णन स्वतत्र आहे.[२७१]

ते शृंगारसरोवरमराळिका । जे सकल प्रमदाची नायिका ॥
नयनकटाक्षे देखा । मूर्छित तापसा पाडित ॥
द्विजराजमुखी परमसगुण । मृगराजकटी विराजमान ॥
करिराजसम जिचें गमन । पार्थापाशीं त्वरें आली ॥

१०) नलदमयन्तीरूपवर्णनांत श्रीधरमुक्तेश्वरानीं मुळातील शब्दशः भाषान्तर केलें नाहीं. पण गोषवारा आहे. माडणी स्वतंत्र आहे.[२७२]

११) दमयन्तीत्यागवर्णन स्वतत्र असून अधिक उठावदार आहे[२७३] व मुक्तेश्वराच्यापेक्षा दमयन्तीशोकवर्णन श्रीधराचें थोडें आहे, पण चागलें करुणपूर्ण आहे.

१२) सुदेव ब्राह्मणानें दमयती पाहिली ते वेळचे वर्णन स्वतत्र आहे.[२७४]

---

२७० पा. प्र. २४, ६०-७०, २४, ७२-८०

२७१ पा. प्र. २४, १६०-१६१

२७२ पा. प्र. २५, १-२४; मुक्तेश्वर. वनपर्व. ११, १–३०

२७३ पा. प्र. २५, १५९-१६८; २५, १६९-२००, मुक्तेश्वर. वनपर्व. १२, १०६-१६५

२७४ पा. प्र. २५, २२८-२२९

१३ ) द्रोणाचलावरील उत्प्रेक्षा व हनुमानाचे उग्रस्वरूपवर्णन स्वतत्र आहे.[२७५]

१४ ) अर्जुन तपश्चर्या व तीर्थाटन करून परतल्यावर बंधुभेटीचे वर्णन सुन्दर आहे.[२७६]

१५ ) अर्जुन–निवातकवचयुद्धवर्णन स्वतत्र आहे.[२७७]

१६ ) शिबिराजाच्या प्रधानाचे नाव 'सुबुद्धि' होतें त्यावर श्लेषयुक्त कोट्या केल्या आहेत त्या स्वतंत्र आहेत.[२७८]

१७ ) अर्जुनाने अस्त्राचे प्रयोगात संहरण केलें ती उपमाः—

जैसा सर्प गारुड्याअधीन । पेटारा घालिती मागुतेन ॥
तैसा अस्त्रें आवरी कृष्ण । चमत्कार दावोनिया[२७९]॥

१८ ) घोषयात्रा–गंधर्वांनीं दुर्योधनाच्या दूतास मारले व त्याचे पलायन, त्यावेळच्या उपमा.[२८०]

१९) द्वैतवनवर्णनानन्तरचे श्रीधरी दृष्टान्त[२८१]:—
जेथे वसे सदा धर्म । धर्म तेथें परमसुख ॥

---

२७५ पा. प्र. २८, १९६-१९७, २८, २०२-२०४
२७६ पा. प्र. २९, ६८-८१ , २७७ पा. प्र. २९, ५५-७०
२७८ पां. प्र. २९, १९०-१९८ , २७९ पा. प्र.२९, २२७
२८० पा. प्र. ३१, ४१-५१
२८१ पा. प्र. ३१, ३३

२० ) जयद्रथकृत द्रौपदीरूपवर्णन उभयतात भिन्न आहे.[२८२] त्याचप्रमाणें कोटिकाचे भाषण व द्रौपदीचें उत्तर हीं स्वतंत्र आहेत.[२८३]

## विराटपर्व

१ ) भवानीस्तोत्र[२८४] व श्यामकर्णवर्णन[२८५] हीं स्वतंत्र आहेत. बृहन्नडेचें नृत्यगायनवर्णन संगीतशास्त्रानुसार आहे.[२८६]

२ ) नीतिबोध[२८७]:—जेथे वसत असेल धर्म। धर्म तेथें आनंद परम ॥

विराटपर्वाची सर्वत्र रचना व मांडणी श्रीधराची स्वतंत्र आहे. मुक्तेश्वराच्या कृतीशीं तिचें साम्य त्यात मुळींच आढळत नाहीं हें मागे आलेंच आहे.

आता 'पांडवप्रतापा' तील काहीं उत्कृष्ट उतारे देऊन हें बरेंच लांबलेलें प्रकरण संपवूं.

---

## १५ पांडवप्रतापांतील कांहीं उत्कृष्ट उतारे

### १ मोहिनीरूपवर्णन[२८८]

मग तो परमपुरुष कैवल्यदानी । प्रकटला मोहिनीरूप धरूनी ॥
जिच्या स्वरूपावरूनी । ब्रह्मांडचि ओवाळिजे ॥ २३२ ॥

---

२८२ पां. प्र. ३१, १२९-१३२; मुक्तेश्वर. वनपर्व. १९, १२-१३
२८३ पां. प्र. ३१, १३५-१४०; २८४ पा. प्र. ३२, ८७-१०५
२८५ पां. प्र. ३२, १७८-१८०; २८६ पा. प्र. ३२, १९५-१९७
२८७ पां. प्र. ३३, १९४
२८८ पां. प्र. १, २३२-२३९

आदिमाया प्रणवरूपिणी । तेही लागे इच्र चरणीं ॥
अनंत शक्तींची स्वामिणी । वेदपुराणीं वद्य जे ॥ २३३ ॥
ब्रह्मा विष्णु शिव तिन्ही । गर्भी पाळी बाळें तिन्हीं ॥
दततेज झळकताक्षणीं । महा मणी पाषाण होती ॥ २३४ ॥
कोट्यनुकोटि मीनकेतन । साडणें होत नखावरून ॥
आगींचा सुवास सपूर्ण । ब्रह्मांड भेदून वर जाय ॥ २३५ ॥
सहज बोलतां क्षितीं । वाटे रत्नराशी विखुरती ॥
पदमुद्रा जेथें उमटती । कमळे उगवती दिव्य तेथें ॥ २३६ ॥
त्या सुवासास वेधून वसत । भोंवता गडबडा लोळत ॥
असो कैवल्यकनकलता अद्भुत । वैकुंठाहून उतरली ॥ २३७ ॥
नयनकटाक्षबाण । सोडी असुराकडे पाहून ॥
दैत्य ओंवाळू पाहती प्राण । वचनावरून तियेच्या ॥ २३८ ॥
देवीं दैत्यीं युद्ध साडिले । पाहावया भोवतीं मिळाले ॥
समस्ताचे मनोमृग पडिले । नयनकटाक्षबाणेंचि ॥ २३९ ॥

## २ दुष्यन्त-शकुन्तलाख्यान[२८९]

दुष्यन्तराव मृगयेसी । निघाला एकदा दलभारेशीं ॥
कीं समुद्र फुटे तैशी । सेना चाले सागातें ॥ १६९ ॥
चतुरगदल अद्भुत । मिरवत जातसे दुष्यन्त ॥
नारी नर गोपुरींहूनि पाहत । म्हणती मन्मथ दुसरा हा ॥१७०॥
तत वितत घन सुस्वर । वाद्ये वाजती अपार ॥
चंड पर्वत नद्या थोर । उल्लंघून जातसे ॥ १७१ ॥

२८९ पां. प्र. ३, १६९-१७७; २०४-२२९
४, ५१-५८; १२९-१३१

दुष्ट श्वापदे अपार वधित । येता जाहला कश्यपारण्यात ॥
कण्वऋषीचे आश्रमात । प्रवेशला राजेंद्र तो ॥ १७३ ॥
तों कोणी न दिसे समोर । मग गंभीर गर्जे नृपवर ॥
म्हणे आश्रमीं आहे काय ऋषीश्वर । प्रत्युत्तर कोणी नेदी ॥१७४॥
तों लावण्यामृतसरिता । बाहेर आली ऋषिदुहिता ॥
कीं शातकुंभदिव्यलता । सुगंधखाणी पद्माक्षी ॥ १७५ ॥
कीं वैकुंठवनिता रमा । तिची दुसरी हे अपार प्रतिमा ॥
किं सरस्वती आणि उमा । द्यावी उपमा तयांची ॥ १७६ ॥
रूपयौवनचातुर्यखाणी । मंडित दिव्य कनकाभरणीं ॥
राजेंद्रासि सन्मानूनी । आसन देत बैसावया ॥ १७७ ॥

.........................................

मनीं म्हणे दुष्यंत । हे स्वर्गीची अप्राप्त वस्त ॥
मज होईल तरी प्राप्त । नाहीं अंत भाग्यासी ॥ २०४ ॥

..... ... ........ ........................

अष्टविवाहामाजी जाण । उत्तम असे गांधर्व लग्न ॥
जरी घेईल तुझें मन । तरी माळ घालीं का ॥ २०८ ॥
मग म्हणे शकुंतला । यथार्थ बोलसी चतुर भूपाला ॥
परि पितयास न सांगता ये वेळा । व्यभिचारकर्म दिसें हें ॥२०९॥

...... .................................

अकस्मात झळके सौदामिनी । तैसी रायापुढें कुमार घेऊनी ॥
उभी ठाकली येऊनी । पाहती नयनीं सभाजन ॥ ५१ ॥

................................... .....

रम सुंदर बाळ अद्भुत । तयाप्रति शकुंतला बोलत ॥
मस्कार करीं त्वरित । पितयालागीं सुपुत्रा ॥ ५३ ॥

ारत लागे तत्काळ चरणीं । ती म्हणे राजेंद्रा सद्‌गुणखाणी ॥
ुत्रासि माडिवरी घेऊनी । अवघ्राणीं मस्तकीं ॥५४॥

ाट पाहिली बहुत दिवस । परि निष्ठुर समर्थाचे मानस ॥
माता गृहस्वामी आला गृहास । जैसा चंडांशु प्रतापी ॥ ५५ ॥

कण्वाश्रमीं येऊन । सुमुहूर्ती लाविलें गांधर्व लग्न ॥
ाचन भाष प्रमाण । दिधलें कीं मजलागीं ॥ ५६ ॥

ऐसें शकुंतला बोलत । रायें ओळखिली स्त्रीसुत ॥
रि जाणून नेणतपण घेत । क्रोधयुक्त बोलतसे ॥ ५७ ॥

ार चोर कपटी धूर्त । हिंसक पातकी नीच बहुत ॥
करोनि नाहीं म्हणती लोकांत । तैसा नृपनाथही जाहला ॥ ५८ ॥

हणे तू कैची कोण । आलीस कैचा पुत्र घेऊन ॥
कैचें लग्न संभाषण । कोणें प्रमाण कोठे दिलें ॥ ५९ ॥

.. ............................ ........... ..

ऐसें ऐकतां उत्तर । जाहला एकचि जयजयकार ॥
मग बोले दुष्यंत नृपवर । ऐका समस्त सभाजनहो ॥ १२९ ॥

हे स्त्री माझीच सत्य । पुत्र ओळखिला म्या भरत ॥
परि लोक मानिती असत्य । यालागीं कृत्रिम बोलिलों ॥ १३० ॥

प्रथम अंगीकार करितां जाण । लोक ठेविती दूषण ॥
आतां ईश्वरसाक्षी प्रमाण । अंगिकारिलीं माझीं मीं ॥ १३१ ॥

## ३ जरासन्धवध[२९०]

आयुष्यतैल सरलें पूर्ण। भीम म्या हातीं धरिला व्यजन ॥
प्राणज्योति जाईल विझोन। समय जवळीं पातला ॥१७८॥
देह दीपपात्र रितें। पडेल एथेंचि पालथें ॥
हें फल रोकडेंच एथें। पावसील तूं आता ॥१७९॥
वाचावें ऐसें असेल मनात। तरी बंदीचे राजे करी मुक्त ॥
द्वेष साडोनि समस्त। सुखें राज्यीं वर्ते तू ॥१८०॥
आतां नृप सोडी झडकरी। नाहीं तरी युद्ध करीं ॥
जरासन्ध म्हणे निर्धारीं। किती बोलसी गोवळ्या ॥ १८१ ॥

........................................

मग जरासन्धें राज्य देखा। पुत्रा सहदेवा दिधलें ॥१८४॥
मग भीम म्हणे ऊठ मशका। कळेल आता तुझा आवाका ॥

........................................

कृतांताची बैसे दातखिळी। ऐसी दोघांही फोडिली आरोळी ॥
जरासन्ध आणि भीम बळी। मिसळले तेव्हा मल्लयुद्धा ॥१८७॥
परस्पर बळें थडाका देती। वर्मकला नगडोनि धरिती ॥
वज्रमुष्टि गुडघे हाणिती। भिरकाविती एकमेका ॥१८८॥
झिंजा धरून पाडिती। आसडोनि बळें आपटिती ॥
कोपरघाये हाणिती। न्याहो उमटे अंबरी ॥ (प्रतिशब्द) ॥१८९॥

........................................

काडी चिरून अच्युत। भीमास दावी संकेत ॥
सांधा चिरीं त्वरित। जरेनें जो सांधिला ॥१९५॥

---

२९० पा. प्र. १६, १७८–२००

चीर चिरिजे जेवीं करे । तैसा उभा चिरिला वृकोदरें ॥
दोन्ही खडें एकसरें । भिरकावूनि दीधलीं ॥१९६॥
परि पुन: होऊनि साधासाध । उभा ठाकला जरासन्ध ॥
भीमार्जुन आणि मुकुंद । आश्चर्य करिती देखोनि ॥१९७॥
मग वैकुंठपुरविलासी । संकेत दावी भीमासी ॥
खडे विषम टाकीं वेगेंशीं । न जुळती पुढती कदाही ॥१९८॥
घेऊनि खर्जुरिकापत्र । चिरून दाखवी शतपत्रनेत्र ॥
भीमें युद्ध केले एक प्रहर । पुढति तैसाचि चिरियेला ॥१९९॥
विषम खंडें टाकिता जाणा । जरासन्ध मुकला प्राणा ॥
सुमनसभार तेचि क्षणां । सुरवर आनदे वर्षती॥२००॥

## ४ द्रौपदीवस्त्रहरण [२९१]

एक स्त्री भ्रतार पांचजण । कोणे शास्त्रीं केले लेखन ॥
हे दोषखाणी जारीण । करा नग्न एथें आता ॥ ८५ ॥
वस्त्रे भूषणें सपूर्ण । आधीं घ्या पाडवाचि हिरोन ॥
ऐसें एकता पांचहीजण । वल्कलें वेष्टून बैसले ॥ ८६ ॥
जानु उघडी करून । द्रौपदीस दावी दुर्योधन ॥
म्हणे बैस अर्धांगीं येऊन । पट्टराणी होई माझी ॥ ८७ ॥

..............................................

चळें खवळिला भुजग । किं शुडे पिळिला मत्त मातग ॥
निद्रित व्याघ्र सवेग । नासिकेवरी ताडिला ॥ ९२ ॥
तैशी ते पाडवललना । म्हणे चाडाळा दुर्योधना ॥
गळित कुष्ठ भरोनि रसना । झडो दे तुझी पापिया ॥ ९३ ॥

२९१ पा. प्र. २१, ८५-८७; ९२-१०१; १४०-१५३

महाप्रलयसौदामिनी । हिंसका पडो तुजवरी येऊनी ॥
तुझे दृष्टीचे कोळसे होऊनि । भस्म होऊ दे दुर्जना ॥ ९४ ॥
भीमें गदा नेमिली नोवरी । रणचत्वरीं घेई मांडीवरी ॥
पचप्राण घालोनि बाहेरी । प्रलयाग्नि लावीं पैं ॥ ९५ ॥
तुझ्या स्त्रिया हृदय पिटूनी । वाद्यें वाजविती भयकर वदनीं ॥
रक्तमृत्तिका मिळोनि । हळदी सहजचि लागेल ॥ ९६ ॥
मग जे गदा हृदयीं धरून । समरमचकीं करीं शयन ॥
बधुंसमवेत यमसदन । पावोनि करीं साडे तेथें ॥ ९७ ॥
शब्दशस्त्राचे घाय तीक्ष्ण । लागता खवळला दुर्योधन ॥
म्हणे इचे तुकडे करून । सर्षपप्राय टाका रे ॥ ९८ ॥
( मोहरीएवढाले )
जिव्हा नासिक आणि कर्ण । हस्त शस्त्रें टाका छेदून ॥
दुःशासना फेडीं वसन । दावीं नग्न सभेंत ॥ ९९ ॥
वामहस्तें केश कवळून । सव्यहस्तें फेडीं वसन ॥
नगरलोक सभाजन । झाकिती नयन अतिदुःखे ॥ १०० ॥
कृष्णास करावया श्रुत । वेगें पिटिला मनोदूत ॥
म्हणे माडिला थोर आकांत । धावें त्वरित कैवारिया ॥ १०१ ॥
... ....... .... ......................... ...
धावा केला हे भक्तिलक्षण । परि तो हृदयींच नादे नारायण ॥
सर्वव्यापक जगन्मोहन । गमनागमन नसेचि ॥ १४० ॥
नारद पुसे रुक्मिणीलागून । कां धावरेपणें गेले जगजीवन ॥
ते म्हणे द्रौपदी गांजिली म्हणऊन । न सावरत धांवले ॥ १४१ ॥
इकडे द्रौपदीचें वसन । फेडूं पहात दुःशासन ॥
तंव तो पाठीशीं येऊन । उभा ठाकला कैवारी ॥ १४२ ॥

जो पीतांबर आपुला । तेणे झाकिली द्रौपदी बाला ॥
प्रकाश असंभाव्य झळकला । कौरवसभा चमकली ॥ १४३॥

....... .. ........ .........................

आल्हादली पांचाळी । म्हणे कैवारिया वनमाळी ॥
मज गांजिले दुर्जनीं सकळीं । हरिमाउली नसतां तूं ॥ १४५ ॥

..... .. ........... ......................

क्रोध नावरे दुर्योधना । म्हणे रे मंदा दुःशासना ॥
भीड कायशी धरिसी वसना । फेडी पाहु दे सभेंत ॥ १४९ ॥
तेणें जों आसुडिलें चीर । तो आंत क्षीरोदक सुंदर ॥
म्हणती अद्‌भुत स्त्रीचरित्र । वस्त्रांत वस्त्र नेसली ॥
तेंहीं ओढिता दुर्जन । तो आत देखे सुवर्णवर्ण ॥
द्रौपदी झाकली संपूर्ण । चरणांगुष्ठही दिसेना ॥ १५१ ॥
सभा जाहली तटस्थ । म्हणती वस्त्रभार असंख्यात ॥
अमोलिक तेजाद्भुत । कोण पुरवी न कळे हें ॥ १५२ ॥
हावे चढोनि दुःशासने । दोहीं हातीं फेडिलीं वसनें ॥
गणती दशशतवदने । करिता ठयीं पडेना ॥ १५३ ॥

## ९ कीचकवध[२९२]

ते मी विराट सभेंत । कीचकाची साहिली लात ॥
माझा न जाहला देहपात । कासया व्यर्थ वांचलें ॥ ८३ ॥
विलाप करिता द्रुपदपुत्री । अश्रु आले भीमाचे नेत्रीं ॥
म्हणे चतुर्वक्त्रा संसारीं । व्यर्थ कासया घातलें ॥ ८४ ॥

२९२ पा. प्र. ३३, ८३-१४३

जळो माझ्या भुजाचें बळ । जळो सदा गाडीव सबळ ॥
ईश्वरी क्षोभचि केवळ । आम्हावरी जाहला ॥ ८५ ॥

............ ........ ........ ....... ...... ..

कौरवीं राज्य हरिलें समस्त । ते दुःख वाटे किंचित ॥
परि तुज कीचकें मारिली लात । तेणें हृदय उन्मळतें ॥ ९७ ॥
हे नीलोत्पलदलवर्णे । हरिमध्ये सुहास्यवदने ॥
पचदश दिन कुरंगनयने । आता उरले असती पै ॥ ९८ ॥
खेद न करीं सहसाही । द्रौपदी भीमे धरिली हृदयीं ॥
तिचे नेत्रोदकें ते समयीं । अंग भिजलें भीमाचें ॥ ९९ ॥
भीम म्हणे न करीं शोक । क्षणात मारितो कीचक ॥
चित्रशाळा सुरेख । रात्रीं शून्य असते पैं ॥ १०० ॥
मी तये शाळेंत जाऊन । गुप्तरूपें करितों शयन ॥
कीचकास साग जाऊन । चित्रशाळे येइजे ॥ १०१ ॥
तुझा माझा समागम । तेथें होईल मोठा सभ्रम ॥
जाण माझा हाच नेम । एकटा येई अधारीं ॥ १०२ ॥
ऐकोनि भीमाचें वचन । द्रोपदी बोले हास्यवदन ॥
तुह्मीं आधीं सत्वर जाऊन । तेथे शयन करावें ॥ १०३ ॥
मग उठून लावण्यसुदरी । सहज आली बाहेरी ॥
तों कीचक ते अवसरीं । सन्मुख येऊन बोलत ॥ १०४ ॥
म्हणे मजपासून अतर । सैरंध्रि पडलें साचार ॥
तुजप्र्या केला लत्ताप्रहार । अपराधक्षमा करीं पै ॥ १०५ ॥
मी तुझा शरणागत पाहीं । एकदा अगसग तुझा देई ॥
हें राज्य माझेंच सर्वही । विराट काय मशक पै ॥ १०६ ॥

.......... .... ..... ........ ..............

द्रौपदी म्हणे कीचकास । तू कळों नेदी कोणास ॥
मी जाऊन चित्रशाळेंत । निद्रा करितें अंधारीं ॥१०९॥
तूं न धरी दुजयाची चाड । तेथें तुझें पुरेल कोड ॥
भोगिशी सुख उदंड । सांडोन भीड सर्वही ॥११०॥

... ....................................

इकडे चित्रशाळेंत । भीमसेन निजलासे गुप्त ॥
कीचकाची वाट पाहत । तव तो तेथे पातला ॥ १२६ ॥
शून्य अवघें नर्तनागार । पडला असे अंधकार ॥
हळू हळू कीचक पामर । चाचपीत जवळी आला ॥ १२७ ॥
कीचक कामें व्यापिला जाण । क्रोधें सतप्त भीमसेन ॥
कौंतेय तो केवळ पंचानन । कीचकवारण तेथे आला ॥ १२८ ॥
कीचक बोले मंजूळ । सैरन्ध्रि तूं धन्य वेल्हाळ ॥
तुजलागीं मी उतावीळ । सर्व.सांडोन पातलो ॥ १२९ ॥
दास दासी बहुत मंदिरे । तुजला सिद्ध केलीं सुकुमारे ॥
दिव्यालंकार दिव्य चीरे । सिद्ध करून ठेविली ॥ १३० ॥
प्रथम देई एथें भोग । मग मंदिरा जाऊ सवेग ॥
तू मज वरिलिया मग । भय नसें कोणाचे ॥ १३१ ॥
तुझे पंच गंधर्वाचा निःपात । करून टाकीन क्षणात ॥
म्या शृंगार केला बहूत । अंधारात दिसेना ॥ १३२ ॥
माझे सौंदर्य देखोन । सकळ स्त्रिया करिती स्तवन ॥
तूं न बोलसी एकही वचन । काठिण मन कैसे तुझे ॥ १३३ ॥
तू न बोल्सिसी जरी वचन । तरी मी देईन आपुला प्राण ॥
हें शरीर ओंवाळून । तुजवरून टाकीन मी ॥ १३४ ॥

मग हळूच बोले भीमसेन । जवळी येई दे आलिंगन ॥
कीचक तें ऐकोन । अग स्पर्शीत हळूहळू ॥ १३५ ॥
भीमें धरिला तयाचा हस्त । भूमिवरी बळें आपटिता ॥
कीचक म्हणे सैरन्ध्रि विघात । करू इच्छिसी माझा तूं ॥ १३६ ॥
मग मल्लयुद्ध अद्‌भुत । जाहले दोन घटिका तेथ ॥
पर्वत पर्वतावरी आदळत । तैसे ताडिती एकमेका ॥ १३८ ॥
मग भीमें बळें करून । भूमीवरी पालथा पाडून ॥
ग्रीवाचरण धरून । मध्यभागीं मोडिला ॥ १४१ ॥
कीचकें घोरं घोष करून । तत्काल तेथें सोडिला प्राण ॥
भीमें करचरण मोडून । पोटात त्याच्या खोविले ॥ १४२ ॥
शिर मोडून ते अवसरीं । तेंही खोविले तयाचें उदरीं ॥
ज्वाला करूनि झडकरी । पांचाळीस दावित ॥ १४३ ॥

* * *

— १६ —

# जैमिनिअश्वमेध

समग्रं भारत तेन श्रुत भवति भारत । यश्चाश्वमेधिक सर्वं शृणुयाद्भावपूर्वकम्[1] ॥

## १. प्रास्ताविक

ज्ञानदेवापासून तो मोरोपंतापर्यंतचें सर्व जुने मराठी वाङ्मय परमार्थपर व पौराणिक आहे. म्हणूनच तें एकांगी, एकतारी व वैचित्र्य-विहीन आहे अशा आधुनिक चिकित्सकाच्या आक्षेपाचा तें विषय होऊन बसलें आहे. तरी पण त्याची गोडी व आवड अजूनही कांहीं धर्मप्रवण व पुराणवाङ्मयप्रेमी वाचकांस आहे. वारकरीपंथीयास तर "ज्ञानेश्वरी" मातृदैवताप्रमाणें पूज्य असून ते तिला "आई" असे संबोधितात. हरि-पाठाचे अभंग, नामदेव–तुकारामाचे अभंग, यास तर त्याच्या नित्यपाठात कायमचें स्थान मिळाले आहे. पण त्याबाहेर त्याची आवड कमीच आहे हें कबूल केलें पाहिजे. पुनः ज्ञानेश्वरीसारख्या अत्यन्त श्रेष्ठ, गहन व काव्यमय ग्रंथाचा आस्वाद घेण्याची ऐपत व रसज्ञता थोडक्यांच्याच अंगीं

---

१ जै. अ. ६८, १०–११ (मूळ संस्कृत)

असणार. म्हणून तिचे वाचकही थोडेच विद्वान् सापडणार. पण श्रीधराच्या ग्रंथांची गोष्ट मात्र फार वेगळी आहे. महाराष्ट्रावर त्याच्या रसाळ ग्रथाची छाप कांहीं वेगळीच आहे. 'हरिविजय', 'रामविजय', व 'पांडवप्रताप' इत्यादि त्याच्या ग्रंथास मोरोपंताच्या[२] काळापासून तो आजतागायत जी मान्यता व लोकप्रियता लाभली आहे, तितकी कोणत्याही मराठी ग्रंथास लाभली नाहीं. महाराष्ट्रातील असंख्य साक्षर स्त्री-पुरुषांच्या व आबाल-वृद्धाच्या परिचयाचा श्रीधर आहे. चातुर्मासात तर खेड्यापाड्यांतसुद्धा आपल्या शेतीभातीचें कामकाज करून थकून भागून आलेला साक्षर शेतकरी रात्रीं घटका दोन घटका श्रीधराचे ग्रथ वाचून आपला दिवसभर झालेला शीण विसरतो व आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यासहि आपल्याबरोबर परमार्थाचा लाभ करून देतो.

" पाडवांच्या वंशवनीं । का दावाग्नि लाविसी ॥ "

अशा ओंव्या आपल्या गावढळ सुरात व उच्चारात वाचणारा एखादा कुणबी व आपल्या गावढळ भाषेत त्या समजावून सांगणारा दुसरा अर्थकार व तो श्रवण करून माना डोलविणारे अनेक श्रोते; असा देखावा अजूनही पुष्कळ खेड्यातून दृष्टीस पडतो. श्रावण महिन्यात तर सोमवारीं शिवालयात "शिवलीलामृता"चें पारायण करणाऱ्या चातुर्वर्णिकाचे थवेच्या थवे दृष्टीस पडतात. आणि त्यातला " कुक्कुट–मर्कटाचा " अकरावा अध्याय रोज म्हटल्याशिवाय अन्नग्रहण न करणाऱ्या आमच्या भाविक भगिनी अद्यापिही पुष्कळ आढळतात. अशा लोकप्रिय श्रीधराच्या " जैमिनिअश्वमेधाचा " अल्प परिचय आज वाचकास करून द्यावयाचा

---

२ 'हरिविजय' ग्रथातें आधीं मग श्रीधरास वंदीन ॥ पागारकर. मोरो. वेंचे. पृ. ४३, ४. सन्मणिमाला. ३१

आहे. 'हरिविजयां'त गोपीप्रेम व कृष्णलीला यांच्या सुरस वर्णनांत भक्तिरस भरला आहे. 'पांडवप्रताप' नवरसांनीं आकर्षक झाला आहे. धीरोदात्तनायकवर्णनानें 'रामविजय' गंभीर व प्रौढ झाला आहे. 'शिवलीलामृत' ग्रंथ भक्ति, श्रद्धा, व उपासना याचा वर्धक झाला आहे, तर ' जैमिनिअश्वमेध ' नानाप्रकारच्या रसानीं व चमत्कारिक कथांनीं चित्ताकर्षक झाला आहे. श्रीधराच्या इतर ग्रंथांपेक्षा तो जरी कमी लोकप्रिय व प्रसिद्ध असला, तरी योग्यतेंत तो कोणत्याही दृष्टीनें कमी नाहीं. असो. आता आपण 'अश्वमेध' म्हणजे काय व त्या यज्ञसंस्थेचा इतिहास काय आहे हें पाहू.

## २ अश्वमेध व त्याचा इतिहास

' अश्वमेध ' या नांवाचा एक संवत्सरपर्यंत चालणारा एक यज्ञ आहे. हा बहुधा सार्वभौम राजानें करावयाचा असतो. शास्त्रोक्त लक्षणानीं युक्त असा अश्व संरक्षकासह एक वर्षभर सोडावयाचा, व तो परत आल्यावर त्याचे यथाविधि हवन करावयाचे. ब्रह्महत्यापातकनाशार्थ व क्वचित् पुत्रप्राप्त्यर्थ हा केला जात असे. ही यज्ञसंस्था फार पुरातन आहे. 'ऋग्वेदा'त अश्वमेधात सोडावयाच्या घोड्याचें वर्णन आलें आहे. [३] तैत्तिरीय [४] संहितेंत व ऐतरेय[५] ब्राह्मणात याचा उल्लेख आढळतो. त्यांत सुमारें आठ—नऊ राजांनीं हा यज्ञ करून पृथ्वी जिंकिल्याचें वर्णन केलें आहे. याचा प्रयोगविधि यजुर्वेदाच्या सूत्रात आला आहे.'महाभारता'तील आश्वमेधिक पर्वातील, व 'वाल्मीकिरामायणा'तील दशरथानें पुत्रप्राप्त्यर्थ केलेले

३ ऋ. वे. १, १३२ ; ४ तै. सं. ५, ४, १२
५. ऐ. ब्रा. ८. २१, २३

अश्वमेधांतील विधि सूत्रोक्त श्रौत धर्मांशीं जुळणारे आहेत.[६] परंतु जैमिनि-वर्णित कांहीं विधि तसे जुळणारे नाहींत. उदाहरणार्थः—

(१) धर्म आधींच दीक्षित होतो.[७]

(२) चौसष्ट जोडप्यानीं आणलेल्या तीर्थोदकानें अश्वाला मंगल-स्नान घातलें जातें

(३) यूपबद्ध अश्वास तरवारीनें मारलें जातें.

(४) अश्वशरीरांतून निघालेल्या (मांसाऐवजीं) कापराचें हवन केले जातें. या गोष्टी श्रौत धर्मांशीं विसंगत दिसतात. श्रीधरानें आपला ग्रंथ जैमिनीवरूनच लिहिला असल्यामुळें त्यांतही साहजिकपणे या सर्व गोष्टी सांगितल्या आहेत, तेव्हा या विसंगतीकडे श्रीधराचें लक्ष गेलें नाहींसें वाटतें.

## ३ जैमिनि कोण ?

जैमिनि हा एक महर्षि व्यासांचा शिष्य होता. अशी एक दंतकथा प्रचलित आहे कीं, त्यानें आपल्या गुरुप्रमाणें संपूर्ण भारत तयार केलें होतें. परंतु गुरूच्या शापामुळें तें नष्ट झालें. पण त्यांतील "अश्वमेधपर्व" फारच उत्कृष्ट झालें असल्यामुळें तें व्यासासही आवडलें; म्हणून त्यांनीं तेवढें मात्र रक्षिलें. त्यांतील मनोरंजक उपकथा आबालवृद्धास प्रिय झाल्या आहेत.

## ४ मराठी अश्वमेध[८]

विष्णुदासनामा, नरहरी, मालुनाथ, मुद्गल, गोपाळ, शुभानंत,

---

६ केतकर. ज्ञानकोश. 'सत्याषाढसूत्रें'

७ जै. अ. १४, ५१ ; ८ भावे. म. सा. पृ. ८३, पादटीप

मुक्तेश्वर, वगैरे अनेक कवींनीं जशी भारतीय कथावर मराठींत काव्यरचना केली आहे, तशी अश्वमेधावरही नामा पाठक, कृष्णदास, दासोसुत मुद्गल, नारायण विप्र, जगजीवन, विष्णुदास, माधवस्वामी, विठ्ठलस्वामी व शिव-कल्याण याचीही रचना आहे; परन्तु श्रीधराच्या ग्रंथाइतका कोणाचाही ग्रंथ रसाळ नसल्यामुळे त्यास त्याच्याइतकी प्रसिद्धि मिळाली नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यापैकीं बहुतेक स्मृतिशेष झाले आहेत. सामान्य वाचकांस तर त्याची ओळखही नाहीं.

## ५ ग्रंथलेखनकाल

कवींचें इतिवृत्त व काल या गोष्टी संस्कृत वाङ्मयास अगदींच पारख्या आहेत. कालिदासाचा कालनिर्णय अद्यापि विद्वानांचा कल्पना-विषयच असून तत्संबंधीं तर्क चालूच आहेत. तितकी अडचण जरी मराठी कवींसंबधीं सुदैवानें नाहीं तरी मुकुंदराज, वामनपंडित यासारख्या अनेक थोर कवींच्या जीवनवृत्तान्ताचा व कालाचा शोध संशोधकास अजून निश्चयानें लागलेला नाहीं. कवींची तटस्थता व समकालीनांचें औदासीन्य यामुळेंच अशा अडचणी प्राप्त झाल्या आहेत. या बाबतींत श्रीधरानें मात्र थोडीशी खबरदारी घेतली असल्यामुळें त्याच्या ग्रंथाचे काल व लेखनस्थळें हीं निश्चयानें त्याच्या त्या त्या ग्रंथावरून सांगतां येतात. त्यानें ग्रंथलेखनास सुरवात केल्यावर 'हरिविजय' शके १६२४ मार्गशीर्ष शु. द्वितीयेस संपविला. त्यानन्तर शके १६२५त 'रामविजय' व शके १६३४त 'पांडवप्रताप' लिहिला, शके १६३७ त 'अश्वमेध' व १६४० 'शिवलीलामृत' ग्रंथ त्यानें लिहिले. प्रस्तुत ग्रंथाविषयीं तो अखेरीस लिहितो[१]: --

१ जै. अ. ९६, ९८-९९

शके सोळाशें सदतीस। दुर्मुखनाम संवत्सरास ॥
ग्रंथ समाप्त केला पाथरीस। पंढरीनाथें दयाळे ॥
शाहाण्णव अध्यायीं करविला ग्रंथ। त्याचा भोक्ता पंढरीनाथ ॥
पौष मास शुक्लपक्षात। सप्तमीतिथी सोमवारीं ॥

'पाथरी' हें गांव मोंगलाईत परभणीजवळ आहे. श्रीधराचे इतर ग्रंथ पंढरपुरास लिहिले गेले, हाच ग्रंथ पाथरीस लिहिण्याचें प्रयोजन काय झालें असावें व त्या गावाशीं त्याचा काय संबंध होता वगैरे गोष्टी कळण्यास काहीं मार्ग नाहीं. एक तपाच्या व्यासंगानें परिणतप्रज्ञ झाल्यावर हा सुन्दर ग्रंथ त्यानें लिहिला हें मात्र अगदीं स्पष्ट दिसत आहे.

## ६ एक शंका[१०]

प्रो. श्रीधर विष्णु परांजपे यांनीं मोरोपंत केकावली, भाग २, यात "हा ग्रन्थ याचे नावें मोडतो, परन्तु अंतःस्थ प्रमाणावरून तो त्याच्या कोणी तरी शिष्यानें केलेला असावा, असें वाटतें," अशी श्रीधराच्या अश्वमेध ग्रंथासंबंधीं शंका प्रदर्शित केली आहे; पण त्यांनीं तीं प्रमाणें दिलीं नसल्यामुळें व श्रीधरानें केलेला आपल्या मातापितरांचा व आनंदसांप्रदायातील आपल्या गुरुपरंपरेचा उल्लेख स्पष्ट केला असल्यामुळें व इतर पुरावाही बळकट असल्यामुळे ही शंका विचाराईच नाहीं असें म्हणून ती सोडून देतों.

## ७ ग्रंथाधार

ज्ञानेश्वरानें 'ज्ञानेश्वरी'त "भाष्यकारातें वाट पुसत" व "झाडा

१० भावे. म. सा. पृ. २३२ (१९२५)

देईन प्रतिपदीं ग्रंथार्थेंसी" अशी ग्वाही आपल्या श्रोत्यांस दिली आहे, तशीच श्रीधरानेंही दिली आहे. तो म्हणतो[११]:—

" नारायणावतार व्यासमुनी । तयाचा मुख्य शिष्य जो जैमिनी ॥
तेणें अश्वमेध कृतकथा । ती महाराष्ट्र भाषेंत वर्णीन आता ॥
मूळ पदीं ठेऊनि चित्ता । सागेन श्रोतया यथामति ॥ "

तेव्हां ज्ञानेश्वराप्रमाणें तोही आपल्या प्रतिज्ञेतून उत्तम तऱ्हेने उत्तीर्ण झाला असेल असेंच कोणासही वाटेल, पण ज्याप्रमाणे ज्ञानेश्वराने या प्रतिज्ञे-पलीकडे जाऊन आणखीही किती तरी विविधज्ञान मोठ्या मनोरंजकतेनें आपल्या वाचकापुढें सादर केलें आहे, तसेंच श्रीधरानेंही केलें आहे. उदार-चरित थोर व्यक्तींचा अंगीकृत कार्यासंबधींचा क्रम असाच असतो. मारुति-रायानें सीताशुद्धि करून स्वपराक्रम गाजविला. अगदानें शिष्टाईंत साग-काम्यापेक्षा अधिक कामगिरी बजावली. उत्तम वक्ता निरनिराळ्या ठिकाणची माहिती संकलित करून आपला विषय परिपूर्ण व चित्तवेधक करतो. तसेंच श्रीधरानेही केलें आहे. मूळ ग्रंथ पुढे ठेवून व मूळ पदाकडे लक्ष देऊनच त्याने ही कथा मराठींत आणिली आहे. मुळात अडुसष्ट अध्याय असून त्यातील श्लोकसख्या पाच हजार एकशें एकुणसत्तर आहे. पण श्रीधराच्या ग्रंथाचे शहाण्णव अध्याय झाले असून ओवीसंख्या नऊ हजार आठशें शहात्तर झाली आहे. श्रीधराचे अध्याय वाढण्याचें कारण असे कीं, आरंभापासून साठ अध्यायापर्यन्त मुळाबरहुकुम ग्रंथ लिहिल्या-वर आपल्या श्रोत्यास याच विषयावरील पुराणातरींच्या कथा सागून रंजवावें असें त्याच्या मनात आले व त्याने आपली दृष्टि इतर पुराणाकडे वळविली. दुसरें कारण असे कीं—

११ जै. अ. १, २५

"संस्कृत अमृतोदककूपपरम । तेथें गुणपात्र नसता उत्तम ॥
पाथिक तृषार्तांचा श्रम । सर्वथा न जाय कूपदर्शी[१२] ॥ "

हें मनात आणून त्यानें संस्कृतानभिज्ञ वाचकासाठीं सर्व माहिती एकत्र आणून ठेविली आहे. म्हणून "ही तो भविष्यपुराणींची कथा" असे सागून दुन्दुभि–आख्यानास त्यानें सुरवात केली आहे. त्यानन्तर एकापुढें एक अग्निपुराणातील सैन्यपाळाचें, पद्मपुराणातील सिंहध्वजाचें, शक्तिपुराणातील बाणासुराचे, स्कन्दपुराणातील सुग्रीवसुताचें, ब्रह्माण्डपुराणातील चद्रमौळीचें अशीं एकन्दर सहा आख्यानें घेतलीं आहेत. यावर त्याचे अठ्ठावीस अध्याय झाले असून त्यांत दोन हजार नऊशें सेहेचाळीस ओव्या आल्या आहेत. या अतिक्रमणाबद्दल श्रीधराने श्रोत्याची मागितलेली क्षमा ज्ञानेश्वरी थाटाची व मोठी हृद्य आहे. तो म्हणतो[१३]:—

तें व्यासवाक्य रसाळ । बोलिला सकळ पुराणीं ॥
तुम्ही कृपाळू कीं संत । दोष न ठेवावा याकरिता ॥

आणखी मोठ्या चतुरस्रतेनें तो त्यास बजावतो कीं, यात मीं आपलीच सेवा केली आहे. कां कीं,

अनेक पुष्पांचा रससार । जैसा घेतो मधुकर ॥
तैसा सर्व पुराणोद्धार । काढोनि कथा कथिली म्या ॥
दुंदुर्भापासोनि हिमालयापर्यंत । जे म्या चरित्र वर्णिलें येथ ॥
हे व्यासकृत पुराणोक्त । मम कृत्य नव्हे कीं ॥
म्हणोनि त्या ग्रथाहूनि भिन्न । म्या हें केलें वर्णन ॥
सद्भावे कर जोडून । श्रीधर विनवी श्रोतया[१४] ॥

---

१२ जै. अ. १, २९ ; १३ जै. अ. १६, ७४–७५
१४ जै. अ. ८८, ८०–८२

या प्रार्थनेनें दुराराध्य चिकित्सकही निःसंशय निवेल पण ही पद्धति श्रीधरानें नव्यानेच या ग्रंथापुरती स्वीकारली नसून तिचा अवलंब त्यानें आरंभापासूनच केलेला दिसतो. कारण तो आपल्या पहिल्या ' हरिविजय ' ग्रंथात म्हणतोः—[१५]

भागवत दशम आणि हरिवंश ।
अनेक पुराणींच्या कथा विशेष ॥
बोलले कवि महापुरुष । ............ ॥
तितुकियांचा जो मथितार्थ । तो हरिविजय ग्रंथ ॥
दुजा नाहीं विपरीतार्थ । सत्य सत्य त्रिवाचा ॥
हरिवंश भागवतीं पाहीं । महाबळ विप्राची कथा नाहीं ॥
शोध करितां सर्वा ठायीं । नारदपुराणीं देखिली[१६] ॥
तेथें ही कथा लिहिली जाण । श्रोतीं न धरावा अनुमान ॥
मुळावेगळी कथा पूर्ण । सहसाही वाढेना[१७] ॥
नाना पुराणींचे इतिहास । बोलिला स्वामी वेदव्यास ॥
यालागीं कदापि दोष । न ठेवावा ग्रथातें ॥ " असो.[१८]

तेव्हा हे वाढलेले अध्याय अठ्ठावीस व त्यातील दोन हजार नऊशे सेहेचाळीस ओंव्या एकन्दर ग्रथातून वजा जातां, मूळ अडुसष्ट अध्यायास

---

१५ ह० वि. १, ११३-११४ ; १६ ह. वि. ४, १२०–१२२

१७ " नामूल लिख्यते किंचित् "

१८ दोन्ही उताऱ्यातील साम्यावरून दोन्ही ग्रंथ श्रीधराचेच आहेत हेंही सहज पटण्यासारखें आहे.

मराठी [१९] अडुसष्ट अध्याय होऊन पांच हजार एकशें एकुणसत्तर संस्कृत श्लोकावर सहा हजार नऊशें तीस ओव्या झाल्या आहेत असे स्पष्ट होते हें प्रमाण सर्वाहून थोडेसे जास्त आहे व ते गैरवाजवी आहे असें कोणी म्हणणार नाहीं. एकन्दरींत आपल्या बहुश्रुतपणानें श्रोत्यास बहुश्रुत करावे व औचित्यभंग न करितां त्यास रजवावें हेंच ध्येय श्रीधरानें आपल्यापुढें ठेविलें होतें असे दिसते.

## ८ कथासार

परीक्षितिनन्दन जनमेजय यानें विचारल्यावरून जैमिनीनें ही कथा सांगितली आहे. "गोत्रजवधानें धर्मराज अगदीं विषण्ण झाला, व "आतां राज्य करो भीमसेन । मी करीन तीर्थाटन ॥" असे म्हणून राज्यत्याग करून जावयास निघाला. एवढ्यांत त्यास व्यासांनीं दर्शन देऊन सांगितलें कीं, अश्वमेध कर; म्हणजे तुझ्या सर्व पातकाचा क्षय होऊन तुला मनःशांति मिळेल. त्याप्रमाणें त्यानें तो आरंभिला. यौवनाश्वाकडून अश्व हरण करून आणल्यावर यज्ञाची तयारी झाली. यज्ञदर्शनार्थ भीमानें श्रीकृष्णास सह-कुटुंब सहपरिवार बोलावून आणले होतें. त्याच्या स्वागताच्या गडबडींत अनुशाल्वानें अश्वहरण केलें. तो वृषकेतूनें सोडवून आणल्यावर अर्जुनास संरक्षक नेमून अश्वास विधिपूर्वक सोडला. पुढे त्यास माहिष्मतीच्या नील-ध्वजराजानें पकडले. त्यापासून तो घेऊन तुरगरक्षक पुढे गेले तव्हा एका

१९ मुळातल्या अध्याय अडतीस बरोबर मराठी अडतीस अध्याय होऊन एकूणचाळीसांतही अडतीसाव्याचा थोडा भाग असल्यामुळे मराठी अध्याय एक एक वाढला आहे. व साटात एकूणसाठावा आला आहे. पुढें एकूणनव्वद ते शहाण्णवमध्ये साठ ते अडुसष्ट अध्याय आले आहेत.

शिलेला तो अश्व चिकटला. सौभरि ऋषीच्या कृपेने तो सुटल्यावर हंसध्वजाच्या राज्यात धरला गेला. कृष्णाने सुधन्व्याचा व सुरथाचा वध करून घोडा मिळविला ! सुधन्व्याचें एकपत्नीव्रत व हरिभक्ति हीं फारच मनोवेधक रीतीने वर्णिलीं आहेत पुढे प्रमिलेशीं विवाह करून स्त्रीराज्यांतून गेलेला अश्व अर्जुनानें मिळविला. त्यानन्तर अर्जुन व बभ्रुवाहन या पितापुत्राचा दारुण संग्राम फार लोमहर्षण झाला आहे. या वेळीं पुनः श्रीकृष्णकृपेनें अर्जुन जिवन्त झाला मध्यन्तरीं कुशलवोपाख्यान आलें आहे. पुढें ताम्रध्वज व मयूरध्वज यांशीं कपटयुक्ति करून कृष्णार्जुनानीं घोडा मिळविला. त्यानन्तर वीरवर्म्यानें युद्धात अर्जुनास हतबल करून सोडिलें आणि मग घोडा दिला. तदनन्तर चन्द्रहासोपाख्यान आलें आहे. चन्द्रहासानें कृष्णभक्तीमुळे पांडवाबरोबर युद्ध केले नाहीं. उलट त्याच्याबरोबर अश्वरक्षणास आपण निघाला. पुढें बकदाल्भ्यमुनींची भेट व दुःशीलासांत्वन हीं प्रकरणें आलीं आहेत. इतकें झाल्यानन्तर एक वर्षभर पृथ्वीभ्रमण करून घोडा परत हस्तिनापुरीं आला. त्यानन्तर यज्ञाला सुरवात झाली. जलाभरण, अश्ववध, त्याचें हवन, अवभृथस्नान पुरोडाशभक्षण वगैरे विधि होऊन यज्ञसमाप्ति झाली. पुढें भोजनप्रसंग, नकुलाख्यान व धर्मगर्वहरण आणि नकुलपूर्वकथाकथन या गोष्टींचें वर्णन करून श्रीधरानें ग्रंथ संपविला आहे.[२०] ”

एकन्दर कथेंत एक मुख्य गोष्ट जी दिसून येते ती ही कीं, पांडवांच्या पराक्रमापेक्षा त्याच्या शत्रूंचेंच शौर्य व कृष्णभक्ति हीं अधिक दिसून येतात व त्याबद्दल त्यांचेंच कौतुक करावेसे वाटतें. प्रत्येक वेळीं श्रीकृष्णाच्या साहाय्यानें व युक्तीनेंच पांडवास यश मिळालें आहे. असो.

---

२० अवान्तर अठ्ठावीस अध्यायातील कथाभाग पूर्वी सांगितला असल्यामुळें येथें पुनरुक्ति केली नाहीं.

## ९ हा ग्रंथ निवळ भाषान्तर आहे काय ?

जुनी मराठी कविता म्हणजे संस्कृताची छाया. सन्तकाव्य भिकार व उष्टें, म्हणून टाकाऊ. त्यात स्वतंत्र प्रतिभेचा विलास नाहीं व म्हणूनच त्यांत हृदयंगमत्व नाहीं; असे आक्षेप पाश्चात्य वाङ्मयविशारदाकडून नेहमीं घेतले जातात. त्यात थोडासा जरी तथ्यांश असला तरी या दूषकाकडून या बाबतींत पुष्कळसा अविवेक व अतिरेक होतो हेंहीं तितकेंच खरें आहे. मोरोपंताच्या कवितेसंबधीं असा वाद बराच माजला होता. परन्तु काव्य-संग्रहात विद्वान् संपादकांनीं मोरोपंतीं भारताची मुळाशीं तुलना करून जें सत्य पुढे आणिले, त्याने वरील भ्रमांचा बराचसा निरास झाला आहे. ह. भ. प. पांगारकर वगैरे विद्वानांनींही या बाबतींत बरीच चांगली कामगिरी केली आहे. मोरोपंतांचे आर्याभारत भाषान्तर नव्हे तर पंतानीं सामान्यतः पांडवकथा आर्येच्या पूर्वार्धात गोवून उत्तरार्धात अर्थान्तरन्यास, सुभाषितें, लोकिकोक्ति, व इतर सुन्दर शब्दार्थालंकार योजून जागजागीं त्यास मंडित केले आहे व यात दिसून येणारे त्याचे कल्पनाचातुर्य, बहुश्रुतता व बुद्धिमत्ता याच्या योगेंकरून त्याच्या ग्रंथास स्वतंत्र रचनेचा मान आज विद्वानात मिळू लागला आहे. भर्तृहरीच्या शतकत्रयाचें वामनपंडिताचें रूपान्तर हे निवळ भाषान्तर होय.तसे त्याची समश्लोकी हेंही भाषान्तर आहे. पण आर्याभारत जसे निवळ भाषान्तर नव्हे तसेंच श्रीधराचे ग्रंथही निवळ भाषांतररूप नाहींत. मुळांतील कल्पना येऊन तिला आपल्या बुद्धिचातुर्याने व प्रतिभाविलासानें मण्डित करून व खुलवून वाचकांपुढें मांडण्याची त्यास उत्तम हातोटी साधली आहे. त्यामुळे मूळ कथानक जरी तेंच असलें तरी त्यास नवीन रुचि येते. त्यास नवीन स्वरूप

प्राप्त होऊन त्याचा मोहकपणा वाढतो. आतां प्रस्तुत ग्रंथात हें कार्य श्रीध-रानें कसें साधलें आहे हें थोडक्यांत पाहू या.

## (अ) ग्रंथप्रारंभ व शेवट

श्रीधराच्या ग्रंथाचे आरंभ व शेवट हे अगदीं स्वतंत्र आहेत. प्रारं-भींचें मंगलाचरण गणपति, सरस्वती, कुलदेवता व गुरु यांस केलेलें नमन स्वतःचें आहे. यांत योजलेलीं रूपकें खरोखर उत्कृष्ट आहेत. त्यानन्तर " श्रोते व्हावें सावधान " असें म्हणून त्याच्यासंबंधीं एकावर एक योज-लेले दृष्टान्त फारच मनोहर असून ते ज्ञानेश्वरी थाटाचे झाले आहेत, एवढें त्यासंबंधीं सांगितलें म्हणजे पुरें आहे. त्याचप्रमाणें अध्याय व ग्रंथ यांच्या समाप्तीच्या वेळीं प्रकट केलेल्या त्याच्या कल्पना सुन्दर व स्वतंत्र आहेत. संस्कृत प्राकृतासंबंधींचे त्याचे विचार मोठे कौतुकावह असून व्याह्याचा दृष्टान्त मोठा खुमारीचा आहे.

## (आ) मुळांत जागोजाग भर

पहिलाच अध्याय पाहिला तर मुळात ज्या कल्पना नाहींत, अशा सुन्दर कल्पना जनमेजय-जैमिनि-संवादांत, व्यासवर्णनात, व्यासोपदेशातील वेदान्तात आल्या आहेत. "तों गोत्रजवधाची चिंता अंतरीं । सर्पिणीरूपें प्रसवली ॥ " ही एकच स्वतंत्र कल्पना आम्ही नमुन्याकरिता येथें देतों. अशा वैचित्र्यानें सर्व ग्रंथ भरला आहे. तेव्हा तो केवळ भाषान्तरित असें कसें म्हणावें ? पुढे आठवा अध्याय घेतला तर त्यांतही अशीच भर दिसून येते. मुळांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचीं कर्मे अगदीं संक्षिप्त आहेत, तीं श्रीधरानें स्वतःच्या शास्त्रज्ञानाने पूर्णतेनें दिलीं आहेत. तसेंच विधवेच्या धर्मांत मुळाहून अधिक असे पुढील धर्म सांगितले आहेत :— तिनें वपन

करावें व वलयकंचुकीधारण, ताबूलभक्षण, द्विवार भोजन वगैरे गोष्टी वर्ज कराव्या. मुळातील श्लोकावरील पुढील टीका कवीची स्वतंत्रता व बहु-श्रुतता व्यक्त करिते—

"असूयकोऽथ पिशुनो नास्तिको धूर्तको नरः। समीपे संस्थितो राज्ञां प्रजानां दुर्लभ सुखम्[२१] ॥ यावर अधिक टीका[२२];—

"भुजगमुखीं काळकूट असे। तोच वृश्चिकपुच्छाग्रीं वसे ॥
खळ जनाचे सर्वांगीं असतसे। म्हणूनी सर्वथा दवडावें ॥
खळसर्पाचा वध विपरीत" इ. ("अहो खलभुजगस्य" इ.)
"परि सर्पविष उतरावया जाण। धन्वंतरी आहे विचक्षण।
खळविष हरावया लागुन। वैद्य त्रिभुवनीं असेना ॥"

अध्याय नऊमध्यें नऊ प्रकारच्या वड्याची कल्पना मुळात नाहीं.

"स्नेहकढईमाजि दिव्य जाहले। अनुताप अग्नीनें जे पचले ॥
मग अनुराग दशेस जे आले। ऐसे वटक नवविध ॥[२३]

त्याचप्रमाणें भोजनावर केलेलें रूपक फारच अपूर्व आहे, तें मुळांत नाहीं :—[२४]

"रत्नखचित ताट स्यंदन। त्यावरी बैसला भूप ओदन ॥
तप्तकनकवर्ण वरान्न (वरण)। शिरीं आतपत्र साजिरे ॥
शाका सेवक पंक्ति शोभत। बरवा प्रधान तें घृत ॥
कथिका वाद्य शोभत। चामरें करपल्लवाचीं ॥
ऐशिया परिवारें शृंगारिला ओदन। भूपति तो निघाला ॥
तेणें जठराग्नि संहारिला। घडी न लगता निजबळें ॥"

पुढें सतराव्या अध्यायातील प्रभावतीचे स्वरूपवर्णन कोणत्याही

२१ जै. अ, ८, ३२ ; २२ जै. अ. ८, ६३–६५
२३ जै. अ. ९, ३४ ; २४ जै. अ. ४४–४६

प्रतिभाशाली कवीस शोभेल असेंच आहे. हें वर्णन बहात्तर ते ब्यायशी ओंव्यात आलें आहे. विस्तारभयास्तव त्यातील फक्त एक-दोनच कल्पना नमुन्यादाखल देतों:–[२४] (अ)

" पतनभयें शुकबिंब । कनक शलाकेचा करोनि अवलंब ॥
मुक्तमिषें नासिकीं राहोनि अधरबिंब । चुबावया धाविन्नला ॥
मुक्तावळी ती भीष्ममाता । उदरीं रोमावली रविसुता ॥
कुंकुमरेखा सरस्वतीसरिता । गुप्त जाणा येथुनी ॥
हा देखोनिया प्रयाग । तेथे बैसोनिया अनग ॥
अनुष्ठान करीतसे साग । दिव्य अंग पावावया ॥

अशीं स्वतंत्र वर्णनें सर्व ग्रंथभर पसरलेलीं आहेत. सर्वांचा निर्देश करणेंही अशक्य असल्यामुळे पुढे काहींचाच तेवढा केला आहे. मयूरध्वजनगरी-वर्णन मुळात नाहीं. तें फार सुन्दर झाले आहे.[२५] मयूरध्वजकृत पुत्रधिक्कार-वर्णन मुळापेक्षा जोरदार वठलें आहे. वाल्मीकीचे सीताविषयींचे तर्क नावीन्यपूर्ण आहेत [२६] कुश लढण्यास जात असताना त्यावर केलेल्या उत्प्रेक्षा फार सरस आहेत.[२७]

उत्प्रेक्षारूपकाप्रमाणेंच इतर अलंकारानीं, म्हणी–सुभाषितानीं व भर्तृहरि वगैरेसारख्याच्या श्लोकाच्या भाषान्तरानेही श्रीधरानें आपल्या ग्रंथाचें सौन्दर्य वाढविलें आहे. त्याचीं एक दोन उदाहरणें पुढे देतो:—

(अ) कश पुष्पास जेथे बंधन । द्यूत सारीस असे मरण ॥
छत्रालागीं असे दंडधारण । सुरतीं हारी पुरुषाते [२८] ॥
मुख नव्हे हा रोहिणीधव । अधर नव्हती अमृतस्राव[२९] ॥

---

२४ (अ) जै.अ. १७, ७४–७९ ; २५ जै. अ. ४५, ४६–५६
२६ जै. अ २९, १–५ ; २७ जै. अ. ३०, ४–६
२८ जै. अ. २२, १३५ ; २९ जै. अ. ५२, १४

हस्तकंकणाचा भाव । दर्पण कासया पाहावा [30] ॥
कठिण दुःख पाठीचे । त्याहूनि विशेष पोटींचें [31] ॥
जैसें श्वानपुच्छ नलिके घालिता जाण । नीट नव्हे कल्पांतीं ॥[32]
उदंड केलिया प्रयत्न । होणार तें न चुकेचि ॥[33]

पुढील प्रसिद्ध संस्कृत श्लोकांचीं भाषान्तरे आलीं आहेत:—

(ब) प्रसह्य मणिमुद्धरेन्मकरवक्त्रदंष्ट्रांकुरात्[34] ।
अजानन्दाहार्ति पतति शलभो दीपदहन[35] ।
हस्तिस्थूलतरः स चाङ्कुशवश.[36] ।
न मूर्खजनसंपर्कः सुरेन्द्रभुवनेष्वपि[37] ।
नान्तो गुणेषु न च कीर्तिषु रन्ध्रशेषो[38] ॥
प्रांशुलभ्ये फले चाहं उद्बाहुरिव वामनः[39] ।

स्वभावलेखनातही श्रीधराचें स्वातंत्र्य व चातुर्य दिसून येतें. उदाहरणार्थ–राम, लव, कुश यांच्या स्वभावाचें रेखन व वीरोचित संवाद हीं फार मार्मिक झालीं आहेत.[40]

नीतिबोध, व्यवहारज्ञान, गृहस्थधर्म, अतिथिमाहात्म्य वगैरेसंबंधीं

---

३० जै. अ. ७५, ४३ , ३१ जै अ. ७७, १९
३२ जै. अ. ७३, ३५ ; ३३ जै. अ. ७८, ७६
३४ जै. अ. १५, ११७ ; ३५ जै. अ. ५८, ९
३६ जै. अ. ३०, ६ ; ३७ जै. अ. ३९, १५७
३८ जै. अ. ५१, २६ ; ३९ जै. अ. ७७, ४४
४० जै. अ. ३१, ३६

जागोजाग विखुरलेले विचार श्रीधराच्या स्वतःच्या बहुश्रुततेचे द्योतक आहेत.[४१]

ज्याप्रमाणे श्रीधरानें ग्रंथात पदरची उत्तम भर घातली आहे, त्याप्रमाणे त्यानें कांहीं स्थळे मुळातलीं गाळलींही आहेत व यावरून त्याने सरसहा भाषान्तर केलेलें नाहीं हें उघड होते. याचा थोडक्यात निर्देश पुढे केला आहे.

(अ) आशा बलवती भीम काचिदाश्चर्यशृंखला ।
यया बद्धाः प्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति पगुवत् ॥
जीर्यन्ति जीर्यतः केशाः[४२]॥ इ. ॥

(ब) बालत्वे रक्षति पिता.. न स्वतंत्रा हि योषितः[४३] ॥

(क) मुजभोजवर्णन मुळात सविस्तर आहे. श्रीधरानें गाळलें आहे.[४४]

(ड) भीमाच्या मार्गाचे वर्णन, द्वारकावर्णन, भोजनातील मासमय पदार्थांचें वर्णन हीं श्रीधराने गाळलीं आहेत.[४५]

(इ) 'आज्ञाभंग नरेंद्राणाम्' इ. गाळलें आहे.[४६]

(फ) पाताळवर्णन गाळले आहे.[४७] असो. हा मुद्दा थोडासा लांबला खरा, तरी पण तो वाचकास कंटाळवाणा कदाचित् वाटेल. या भीतीनें आम्ही फारच आवरते घेतले आहे. वरील प्रकारचीं

---

४१ जै. अ. ४०,४२,५२,७१,७३ ७७,८३,८९,९५,९६
४२ जै. अ. ६, ५५–५६ ( मूळ संस्कृत )
४३ जै. अ. ८, १९–२० ( मूळ संस्कृत )
४४ जै. अ. २९ ; ४५ जै. अ. ९
४६ जै. अ. १७, ४२–४४: ४७ जै. अ. ३९

आणखी शेंकडों उदाहरणें वाचकास दोन्ही ग्रंथ ताडून पाहिल्यास सहज सापडतील, तरी पण वर जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यावरून श्रीधराचा हा ग्रंथ केवळ भाषान्तर नसून त्यात त्याने विद्वत्तेची भर घालून व कोठें छाटाछाट करून त्यास पुष्कळ नावीन्य व मनोरमत्व आणिलें आहे ही गोष्ट स्पष्ट होईल, असें वाटतें

## १० या ग्रंथाचा दर्जा

श्रीजैमिनिकृत अश्वमेध । श्रीकृष्णलीलामृत अगाध ।।
श्रवण करिता होय चित्तशुद्ध । म्हणे श्रीधर श्रोतया ।।

संस्कृतातील गूढ व गहन परमार्थज्ञान साध्या मराठी बोलीत आणून प्राकृत जनास परमार्थाचा मार्ग मुक्त व सुलभ करून द्यावयाचा, हेंच ध्येय प्रामुख्यानें सर्व संतकवींपुढें असल्यामुळे प्राकृत काव्याचा उदय धार्मिक विषयविवेचनात झाला. एवढेंच नव्हे तर परमार्थाव्यतिरिक्त काव्य म्हणजे अल्वद,निरस व त्याज्य याच मताची घोषणा आद्य सन्तकवि मुकुन्दराज-ज्ञानेश्वरापासून तो पंडितकवि वामन–मोरोपतादिकापर्यन्त सर्वांनीं केली आहे. भगवद्भक्तीशिवाय अन्य विषयावर केलेले काव्य हीन दर्जाचे होय. भगवद्गुणसंकीर्तनाने संसाराविषयीं विरक्ति उत्पन्न करून मोक्ष मिळवणे हें एकच ध्येय जुन्या मराठी कवींचे आहे. तव्हां त्याच्या काव्याचे परीक्षण करणे ते त्याच कसोटीने केलें पाहिजे. पाश्चात्य वाङ्मय-परिचयाने काव्याचें जें विशाल, उदार, ललित व उदात्त स्वरूप आपणास ज्ञात झालें आहे, त्याच्या तुलनेनें जुन्या काव्याकडे आपण पाहतां कामा नये. म्हणजे निराशा न होतां ज्ञानकोशकारांप्रमाणें उगाच शिव्याशाप

देण्याचा प्रसंग आपणावर येणार नाहीं.[४८] तेव्हां काव्याच्या जुन्या ध्येयानुरूप श्रीधराच्या या ग्रंथाकडे आपण पाहिल्यास त्याचें काव्य बऱ्याच वरच्या दर्जाचें आहे असें आपणाला खास दिसून येईल

## १.२ काव्यस्फूर्ति

त्याचप्रमाणें दुसरी गोष्ट म्हणजे काव्यस्फूर्तीची. काव्यस्फूर्ति ही तर ईश्वरी देणगी खरीच; परन्तु याच भावनेचा जुन्या कवींत अतिरेक होऊन प्रत्यक्ष परमेश्वरच कवीच्या हस्तें काव्य लिहितो असें म्हणण्यापर्यन्त त्या सर्वांची मजल गेली होती आणि ही समजूत ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, वामन, महिपति या सर्वांची जशी होती तशीच श्रीधराचीही होती. त्यानें इतराप्रमाणें आपल्या प्रत्येक काव्यात असे स्पष्ट म्हटलें आहे. या काव्यात वरील गोष्टीसंबंधीं श्रीधर काय सांगतो तें आपण पाहूं या.

### गणपति[४९]

तुझे चरणारविंद मकरंद । वर्षो मन्मुखक्षेत्रीं स्वानंद ।।
तेणें वाग्वल्ली मूळकद । विस्तारा जाईल पुष्पफळें ।।
तंव प्रसन्न जाहला गौरीकुमर । माथा ठेविला अभयकर ।।
म्हणे बोल कथारससागर । सादर श्रोते देखोनि ।।

---

४८ "एकन्दरीने पाहता मराठींतील काव्यवाङ्मय म्हणजेच उष्टें आणि भिकार होय, यात शंका नाहीं." ज्ञानकोश. पृ.४४३

४९ जै. अ. १, ३–५

## सरस्वती[५०]

ऐशी विधितनया वर्णिता । तिणे अभयकर ठेविला माथा ॥
तियेची होतां प्रसन्नता । वाग्वल्ली सफळ होय ॥

असें प्रारंभीच्या अध्यायांत सांगून शेवटच्या अध्यायांत तो हेंच अधिक स्पष्ट करून सांगतो कीं[५१]:—

तुमचे अवधाने श्रीहरी । प्रेरक झाला निजांतरीं ॥
तेणें वदविली जैसी वैखरी । तैशी येथे वदलों मी ॥
शुद्ध अशुद्धाचा धनी । चराचरीं असे चक्रपाणी ॥
तेणे जैसी वदविली वाणी । तैसी वदलो मी येथे ॥

पण आपला पिता व गुरु ब्रह्मानंद हाच हरिरूप आहे असें श्रीधर मानीत असल्यामुळे " ब्रह्मानंद करविता होय मम मुखे " असे त्यानें वरती म्हटलें आहे.[५२] या भोळसट अगर अतिशयोक्तीच्या विचारांबद्दल जुन्या कवींसच नावे ठेवण्याचे कारण नाहीं. कारण, नव्यामध्येही रेंदाळकर, रे. टिळक व केशवसुत याच्यासारख्या प्रमुख कवींनीही असे विचार अधिक ठासून व उद्दामपणानेंही प्रगट केले आहेत. पहिला म्हणतो:-"ब्रह्मा दुजा मी रचित अभिनवा सृष्टि अव्याज रम्या ॥ " तर दुसरा सांगतो:— " कीं हीं निश्वसिते । कोण सोडितें । मम हृदयीं ते । विचारुनी भिउनी त्याला । पुढें करा मग कर अपुला ॥ " तर तिसरा बजावतो:— ' आम्ही कोण ? ' " आम्हीं कोण " म्हणून काय पुसता ? आम्हीं असू लाडके देवाचे ॥ आम्हाला वगळा विकेल कवडीमोलावरी हें जिण. " या

५० जै. अ १, ८

५१ जै. अ. १६, ७७–८१; ५२ जै. अ. १६, ७३

बाबतींत जुन्यांच्या तर्फेनें एवढें मात्र निःसंशय सांगतां येईल कीं, ते असे गर्वानें कधीं फुगले नाहींत, व अशी आत्मश्लाघाही त्यांनीं कधीं केली नाहीं. उलट सर्वांनीं अत्यन्त विनयाची व विनम्रतेची भूमिका घेतली आहे. पाहा, श्रीधर म्हणतोः—" श्रोत्यांस सावधान व्हा असे कसे म्हणावे ? तसें म्हटलें तर माझ्याच पदरीं मूर्खपणा येईल कारण, सन्तश्रोते हे स्वरूपीं सदाच लीन असतात, त्यांस ही प्रार्थना केवीं करावी ? पण लोहचुंबक जड लोहास सचेतन करितो, त्याप्रमाणें तुमचे अवधान मज जडाते बोलविते. म्हणून विनती." तोंच श्रोते म्हणतात, " अरे बाबा ! तुझी ही स्तुति पुरे कर. तुजवर आमची अक्षय प्रीति आहे." " आता कथामृत श्रोत्रपात्रीं । वाढोनि तृप्त करीं आम्हा." तसेंच शेवटीही तो म्हणतो[५३]:—

येथे शब्द असतील जे अबद्ध । तरी संतीं करावेत शुद्ध ॥
तेणें कृपा अगाध । होईल कीं मजवरी ॥
म्हणोनि श्रीधरें चरणीं । मस्तक ठेविला भावें करोनि ॥
जन्ममरणापासोनि । मुक्त झालों सन्तकृपे ॥

ज्या मराठी भाषेचा आश्रय प्राकृत जनाच्या उद्धारासाठीं इतर सन्तकवींप्रमाणे श्रीधरानें केला, तिजबद्दल अत्यन्त गौरवपर उद्गार त्यानेही त्याच्याप्रमाणेंच काढले आहेत:–[५४]

संस्कृत आणि प्राकृत । विवेकें पहाता तो एक अर्थ ।
रत्नवाटींत आणि पर्णपुटकात । असे गोघृत सारिखें ॥
जैमिनिवाक्यरसायन । समर्थे कनकपात्रीं केलें प्राशन ॥
तेंचि दुर्बळें पत्रें करिता पान । सौख्य कारण समान कीं ॥

५३ जै. अ. ९६, ८२।८८ ; ५४ जै. अ. १, २६-३०

आदरें व्याही पाचारून । तया वाढलीं नाना पक्वान्न ।।
तीं दुर्बळ अन्नार्थी भक्षिना जाण । परी समान तृप्ति उभयतांस ॥
प्राकृत मोकळें प्रवाहोदक । येथे गुण पात्र नल्गे अवश्यक ॥
सस्कृत अमृतोदक कूप परम । तेथे गुणपात्र नसतां उत्तम ।।
पाथिक तृषार्तांचा श्रम । सर्वथा न जाय कूपदृष्टीं ॥
कर पात्रें प्राशिता देख । तृषा समूळ बोळवते ॥
" ती महाराष्ट्र भाषेंत वर्णीन आता " व
" हें जैमानिवाक्य अगाध । त्यावरी देशभाषाप्रबंध " ॥

असे इतरत्र या ग्रंथांत श्रीधराने मराठीविषयीं केवळ एकदोन किरकोळ उल्लेख केले आहेत. पण वरील उल्लेख अत्यन्त धार्मिक व चातुर्यदर्शक आहेत. रत्नवाटी व पर्णपुटकाचा दृष्टान्त मोरोपताच्या मंत्ररामायणाच्या उपसंहारात पहावयास सापडतो, तर कूपोदक व प्रवाहोदक याचा दृष्टान्त ज्ञानदेव-नामदेवाच्या तीर्थटनातील एका दन्तकथेची आठवण करून देतो. तरी पण येथील समर्पक व श्लिष्ट शब्दयोजना व व्याह्याचा दृष्टान्त व एकन्दर अर्थसौष्ठव हीं चमत्कृतिजनक नाहींत असें कसे म्हणवेल ! मराठी काव्याचे जेवढे म्हणून कैवारी आहेत त्याच्या उद्गारात यास अवश्य प्रधान स्थान मिळालें पाहिजे, असे आम्हास वाटतें.

श्रीधरानें इतर मराठी कवींपेक्षा आपल्या ग्रंथाची, त्यांच्या चरनेच्या स्थलकालाची व आपली स्वतःविषयींची माहिती जरी पूर्ण नाहीं तरी अधिक दिली आहे. प्रस्तुत ग्रथाच्या रचनेच्या स्थलकालाविषयीं उल्लेख मागें येऊन गेलाच आहे. या ग्रथात आरभींच तो आपलें कुळदैवत कवित्थ ( कवठे गावीं ) नगरीं असलेला सिद्धनाथ होय असे

सांगतो. नन्तर शेवटीं [५५] " ज्याचे पोटीं मी झालों तोचि 'ब्रह्मानंद' माझा पिता व मोक्षगुरु होय व माझी आई 'सावित्री' होय. त्याचप्रमाणे त्याने आपली दत्तसंप्रदायातील गुरुपरंपराही दिली आहे ही इतरत्र छापील पुस्तकात आढळते, तशीच असल्यामुळे येथे आम्ही पुनरुक्ति करीत नाहीं. मात्र श्रीधराचा पितामह दत्तानंद याची समाधि, यांचे मूळ गांव नाझरे(पंढरी पासून सोळा कोसावर एक खेडे)येथे आहे व पिता ब्रह्मानंद याची समाधि पंढरपुरात चंद्रभागेच्या वाळवंटात आहे अशी माहिती आणखी त्याने दिली आहे. ही माहिती बहुधा श्रीधरानें आपल्या प्रत्येक ग्रंथात दिली आहे.

## १२ वैचित्र्य विपुलता

श्रीधराच्या जैमिनिअश्वमेधात वैचित्र्य विपुल आहे. चमत्कृतिजनक रचनाही जागोजाग आढळते. कथासूत्र रेखींव दिसतें. त्याचप्रमाणें कल्पनावल्लीचा चेतोहर विस्तारही मधून मधून दृग्गोचर होतो. उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, अपन्हुति, श्लेष, अर्थान्तरन्यास,इत्यादि सुन्दर अलंकारानीं त्याची कवितासुता नटलेली दिसते वाक्प्रचार, भाषासंप्रदाय, सुभाषिते, कोट्या, विनोद व सुश्लिष्ट शब्दयोजना वगैरे गुणानीं तो भाषाप्रभु याची साक्ष जागोजाग पटवितो. संस्कृत महाकवींच्या वचनाचा अनुवाद त्याची बहुश्रुतता सिद्ध करितो रम्य कल्पनानीं आरंभ करून आख्यानाची मांडण तो इतकी खुबीदार करितो कीं वाचक आपोआपच पुढे पुढें सरकत जातो. आणि पुढील अध्यायाचे अवतरण इतक्या सूचकतेनें व कौशल्यानें करितो कीं, वाचकाचें जागृत झालेलें कुतूहल त्यास ग्रंथ खाली ठेवूं देत

---

५५ जै. अ. १६, १०

नाहीं. या कार्यात त्याचा इतका हातखण्डा आहे कीं, तो त्यात एखाद्या सराईत कादंबरीकारासही हार जाणार नाहीं. मूर्खसंगति, दुर्जनसहवास, परोपकार, सुपुत्र, कुपुत्र, कीर्ति, प्रताप, खलोपकार, परदारहरण, परस्त्रीसंग यत्न, दैव, स्वधर्म, गृहस्थधर्म, कुलस्त्रिया, पतिव्रताधर्म, विधवाधर्म, अतिथिसत्कार, संपत्ति, विपत्ति, मित्रपरीक्षा इत्यादि अनेक विषयाचे प्रसंगोपात्त विवेचन करून तो नीति, व्यवहार व धर्म याच्या बोधामृताचे घुटके वाचकास यथारुचि मधून मधून पाजतो. भक्ति, ज्ञान, वैराग्य, वेदशास्त्रपठण, दंभ, मिथ्याभ्रम वगैरे विषयाच्या विवेचनात वाचकास आपलें पाण्डित्यप्रदर्शन करून रूक्ष व तर्ककर्कश खडे न चारतां तो तें ज्ञान त्यांस रुचेल व पचेल अशाच लघु, पथ्य, तथ्य व सुलभ रीतीनें सहज जाता जाता सांगतो. श्रीधरानें आपलें काव्य मुख्यतः जरी "श्रोतृहृत्–ताप हरावया" साठीं लिहिलें आहे, तरी ते वाचकास मनोरंजक झालें पाहिजे याची जाणीव तो कधींच विसरला नाहीं. म्हणूनच त्यानें प्रत्येक अध्यायात "अतिरसाळ निरूपण, कथामृत, अतिसुरस अमृताहून, अगाध रससागर, पीयूषसरिता कथा, अति मधुर पैं असे" अशी साभिप्राय घोषणा केली आहे. त्याचप्रमाणें वनश्रीवर्णन, सह्याद्रिवर्णन, नदीवर्णन, हस्तिनापुरप्रवेशवर्णन, नगरवर्णन, पार्थस्वागतवर्णन, स्त्रीसौन्दर्यवर्णन, पुरुषसौन्दर्यवर्णन, भोजनसमारंभवर्णन, उत्सववर्णन, व युद्धवर्णन इत्यादि विविध वर्णनांत त्याची सूक्ष्म दृष्टि व नैपुण्य हीं चांगलींच प्रतीत होतात. अर्थानुसार शब्दयोजना, शब्दचमत्कृति व शब्दचित्रें पाहून त्याच्या वाग्विलासाचें कौतुक वाटतें. त्याचप्रमाणे धर्म, भीम, श्रीकृष्ण, सत्यभामा, रुक्मिणी वगैरे व्यक्तींचीं स्वभावचित्रेंही फार झोंकदार व अनुरूप अशीं त्यानें चित्रिलीं आहेत. पण हें सगळें उत्तम असले तरी "रसात्मकं वाक्य काव्य" या कसोटीस त्याचें काव्य कितपत उतरतें हें पाहणें जरूर आहे; आणि या दृष्टीनें त्याचें काव्य पाहिल्यास त्यानें नवरसाचा परिपोष फार चांगल्या

रीतीनें केला आहे, असेंच आढळून येईल. 'जैमिनिअश्वमेध' हे काव्य मुख्यतः वीररसप्रधान असल्यामुळें वीररसाचे नद युद्धवर्णनात सर्वत्र दुथडी भरून वाहताना दिसतात. पण प्रसगानुरूप करुण, वत्सल, शृंगार, बीभत्स, भयानक व रौद्र याचींही सुरस वर्णनें त्यात आलीं आहेत. भक्तिज्ञाननिरूपणात शान्तरसाची छटाही क्वचित आढळते.

एवढें सर्व वैभव जर श्रीधरात आहे, तर त्याच्यात नाहीं काय? असा साहजिकच प्रश्न उत्पन्न होतो. कारण, एवढ्या वाग्वैभवाने विराजमान होणारा कवि कविराजाच्या पहिल्या मालिकेत चमकला पाहिजे. परन्तु, तें स्थान त्याच्या निःसीम भक्तास किंवा चाहत्यालाही त्याला देणें दुर्घट वाटेल. याची कारणे आमच्या मते पुढें दिल्याप्रमाणें आहेत. पहिलें कारण हें कीं, त्याच्या काव्यात प्रतिभेचा उच्च प्रतीचा विलास पाहण्यास सापडत नाहीं. त्याच्या ठिकाणीं तिचा निवास निःसंशय आहे. पण तिच्या भराऱ्या फार उच्च नसतात. तिचें क्षेत्र मर्यादित आहे. एवढेच नव्हे तर तिला आपल्या पखावर फार वेळ टिकाव धरवत नाहीं. त्यामुळें कोणत्याही भावनेचा आविष्कार उत्कटत्वाने प्रतीत होत नाहीं. त्याच्या तरल भावनेपेक्षा तरल व तीक्ष्ण बुद्धीचाच प्रभाव सर्वत्र अधिक दिसतो. त्यामुळें शृंगार वीर-करुण रसाचा परिपोष भावनेच्या तन्मयत्वानें न होता बुद्धीच्या प्राधान्यानें झालेला दिसतो. बुद्धीचे चमत्कार व पाण्डित्याचा प्रकर्ष यानें वाचक चकित होतो खरा, पण त्यामुळेच कुण्ठित झालेला रसप्रवाह हृदयाप्रत जाऊन पोहोचत नाहीं. तो मन डोलवितो, पण हृदय हालवूं शकत नाहीं सर्व अलकारात त्याला रूपक अतिशय प्रिय आणि निरवयव साग रूपक व परपरित रूपक याची योजना करण्यात कवीचें प्रतिभाचातुर्य खरोखर कसाला लागतें यात सशय नाहीं. आणि याच गुणानें मुक्तेश्वरानें

सर्व मराठी कवींत अग्रेसरत्व पटकावलें आहे, हेंही खरें, परन्तु श्रीधरानें या बाबतींत अतिरेक केल्यामुळें पुष्कळशीं रूपकें अगदीं नीरस, क्लिष्ट, दुर्बोध व चमत्कृतिविहीन अशीं झालीं आहेत. बहुधा रूपकाशिवाय तो पाऊलच टाकीत नाहीं. आणि हा शोक पुरविण्यासाठीं त्याला कधीं आड मार्गांत जावे लागलें, तर कधीं कधीं हास्यास्पद द्राविडी प्राणायामही करावा लागतो. याच्याच अनुषंगाने त्याला जडलेली अनिवार सवय म्हटली म्हणजे व्यक्तींचीं अगर स्थलाचीं नावें देण्यांत अपार वैचित्र्य दाखविण्याची होय. चन्द्र, सूर्य हनुमान, हस्तिनापुर, अर्जुन, इन्द्र, यम, अग्नि इत्यादिकाचीं नावे योजताना तो तेच नाव हेतुपुरस्सर टाळतो, आणि प्रत्येक खेपेला काहीं तरी नवीन प्रतिशब्द धुडाळून काढतो. असें करिताना, अमरकोश, मेदिनीकोश व इतर कोश जरी केव्हाच रिते होत तरी त्याचा शोधक क्लृप्ति-कोश नेहमीं अक्षयच असतो. त्यातून तो दरखेपेस नवीन सांचा बनवून नवीन नामाभिधान तयार करतो. या नादामुळे सामान्यतः सोपे, साधे व सुबोध समजलें जाणारे श्रीधराचे काव्य थोडेसे दुर्बोध व नीरस झालें आहे. शब्दावर व नावावर श्लेषमूलक कोट्या करण्याची हौसही त्यानें अनेकदा पुरवून घेतली आहे. शब्दचमत्कृतींच्या भरीसही पडण्याची सवय त्याला असल्यामुळे अप्रसिद्ध संस्कृत शब्द, दीर्घसमासघटितपदें यांचाही अवलंब त्याला करावा लागला आहे. त्यामुळें ही क्लिष्टता व दुर्बोधता वाढली आहे. वर्णनाच्या बाबतींतही त्याला ठराविक मर्यादेच्या पलीकडे उड्डाण करिता येत नाहीं. स्वतः प्रत्यक्ष सृष्टिनिरीक्षण करून निसर्गश्रीचीं केलेलीं वर्णने जुन्या मराठी काव्यात फारच क्वचित् आढळतात. बहुतेक वर्णनें एका कायम ठराविक ठशाचीं असतात. त्यांची वनश्री सर्वत्र त्याच त्याच प्रकारच्या वृक्षलतांनीं व फलपुष्पभारानीं नट-

ऱेली दिसावयाची. हीच गोष्ट श्रीधरालाही लागू आहे. एखाद दोन पहिलीं पहिलीं वर्णनें चटकदार व मनोहर वाटतात. परन्तु पुढें पुढें पुनरुक्तींनें व नावीन्याच्या अभावाने तीं नीरस व कंटाळवाणीं वाटतात. मुक्तेश्वराचें नावीन्य व कलाकुसरी, त्याची सूक्ष्मदृष्टि किंवा तडफ हें गुण श्रीधराच्या काव्यात प्रतीत होत नाहींत. त्याचे अस्फुट अनुकरण करण्याचा प्रयत्न श्रीधराने केला आहे खरा, पण तो फारसा यशस्वी झालेला नाहीं. श्रीधरासारखा एवढा भाविक कवि, आणि स्वोद्धारार्थ व परोद्धारार्थ म्हणून ज्यानें आपली समग्र ग्रथरचना केली,तोही उत्तान शृंगारात, ग्राम्य व अश्लील विनोदात आणि किळसवाण्या बीभत्सरसास बुड्या मारताना पाहून मोठें सखेदाश्चर्य वाटते !!

वरील एकन्दर सामान्य विवेचनावरून हे सहज लक्षात येईल कीं, श्रीधर मराठी कवींच्या पहिल्या श्रेणींत बसण्यास पात्र नाहीं. तरी पण त्याच्या दुसऱ्या श्रेणींत त्याला बरेच वरचे स्थान मिळण्यास हरकत नाहीं, असें आम्हांस वाटतें.

कवीच्या वर सागितलेल्या गुणदोषाचीं थोडींशीं उदाहरणें दिलीं असतां वरील विधानाची सत्यता पटण्यास सुलभ जाईल, म्हणून तीं यथाक्रम पूढे दिलीं आहेतः—

## ( अ ) वैचित्र्य

श्रीधराने नुसत्या केवळ जैमिनीच्या ग्रंथावर न विसंबता व नुसते त्याचे पदशः भाषान्तर न करिता भाविष्य, अग्नि, पद्म, शाक्ति स्कन्द, व ब्रह्माण्ड अशा सहा अन्य पुराणातील अश्वमेधकथा सांगून आपल्या ग्रंथास वैचित्र्य कसें आणिले आहे हे " ग्रथाधार " या सदराच्या विवेचनात पूर्वी सागितलेंच असल्यामुळे त्याची पुनरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. मात्र त्यावरून श्रीधर आपले कथानक कंटाळवाणें होऊ नये

याविषयी कसा जपत असे हें स्पष्ट होतें. त्याचप्रमाणें कालिदास, भर्तृहरि, व संस्कृत सुभाषितें यांच्या साह्यानें विषयास विविधता आणून श्रोत्यांचे व वाचकांचें मनोरंजन करणे व त्यास आवल्याप्रमाणे बहुश्रुत करून सन्मार्गप्रवण करावे हा कवीचा हेतुही सिद्ध होतो. अशा प्रकारचें वैचित्र्य इतर मराठी कवींत दिसत नाहीं.

## ( ब ) चमत्कृति :—

मुख्य कथानकाचा धागा त्रुटित होऊं न देता चमत्कारिक उपकथांच्या परिणामकारक कथनाने कवीने जागोजाग विलक्षण चमत्कृति उत्पन्न केली आहे, व अशीं उपाख्याने खुलवून सांगण्याची त्याची हातोटी इतकी अपूर्व आहे कीं, वाचक नुसता मंत्रमुग्ध व आश्चर्यचकित होऊन जातो. या गोष्टीचे आम्ही एकच उदाहरण पुढें देतों :— पधराव्या अध्यायात यज्ञीय अश्व माहिष्मती नगरीत धरला गेला म्हणून तेथील राजा नीलध्वज यांच्याशीं अर्जुनास लढावे लागले. त्या राजाबरोबर त्याचा घरजावई अग्निही लढावयास आला असल्यामुळे अर्जुनास त्याला शरण जाणें भाग पडलें हें मुख्य कथानक. पण पुढ अग्नि हा नीलध्वजाचा घरजावई कसा झाला ? अशी शंका उत्थापित करून तिच्या समाधानार्थ ते उपाख्यान फारच मनोवेधक रीतीने सांगितलें आहे:—

नीलध्वजाला त्याची पत्नी "ज्वाला" हिजपासून "स्वाहा" नांवाची कन्या झाली होती. ती उपवर झाली, तेव्हां पित्यानें तिला त्रिभुवनातील सुन्दर पुरुषाचा चित्रपट दाखवून वर पसन्त करण्यास सांगितले परन्तु तिला मानवांपैकीं कोणीही मनास येईना. तेव्हा बापानें तिला विचारले, "तुला अमरनाथ आवडतो काय ? काय त्याचे वैभव ! ऐरावताचें वाहन ! अमृताचें सेवन, व अप्सरांचें नृत्यगायन वगैरे सुखें तुला मिळतील. पुन्हा तो कामुक

असल्यामुळें तुझ्या अगदीं मुठींत राहील.'' तो मुलीनें उत्तर दिलें, ''वा! बाबा, काय पण ठिकाण शोधून काढलेत! अहो, तो म्हणजे पापतह, परोत्कर्षासहिष्णु, अहल्याजार, सहस्रभगवान्, कृष्णालाही ज्यानें उपेन्द्र-कनिष्ठ केलें जो पारिजातकासाठीं त्याशीं लढला, वैर धरून सात दिवस ज्यानें गोवर्धनावर वृष्टि केली, असा कृतघ्न, तो शचीरमण मला नाहीं मुळींच पसन्त मानवाला न वरण्याचें कारण असें कीं, पति जीवमान असता अथवा मृत असता पराशीं-सतीप्रसंगीं अग्नीबरोबर का होईना, शयन करणें म्हणजे व्यभिचारच होय म्हणून मला अग्नीलाच द्या, म्हणजे असा प्रसंग कधींच येणार नाहीं.'' हे मुलीचे भाषण ऐकून राजा म्हणाला, ''त्यानें समक्ष येऊन जर मागणी घातली तर मी त्याला देण्यास तयार आहे.'' मात्र तिच्या मैत्रिणींनीं तिची फारच थट्टा केली. त्या म्हणाल्या, ''चांगला देवराज इन्द्र टाकून, सर्वभक्षक, मलिनमार्ग, सप्तजिव्ह, चतुःशृंग, धूम्रमुख, विरूपांग, कृतघ्न, मेषवाहन, स्पर्शाबरोबरच जाळून टाकणारा, तूं काय पसन्त करतेस! अशाशीं तुझा एकान्त कसा होणार! तुझें आपलें सर्वच विचित्र!'' परन्तु तिने आपला दुराग्रह न सोडता शास्त्रोक्त विधीनें व्रत करून अग्नीस सन्तुष्ट केलें, व तो द्विजरूप धरून राजाकडे ''स्वाहा'' ला मागणी घालण्याकरता आला व म्हणाला, 'मी शांडिल्य गोत्री असून संपूर्ण वेदाध्ययन केलें आहे. तेव्हा मला कन्यादान कर. तुझ्या मुलीनें ज्याविषयीं हट्ट धरला आहे, तोच मी अग्नि आहे.'' परन्तु हें त्या द्विजरूपि अग्नीचे भाषण ऐकून सर्व सभासद हसले व म्हणाले, '' हा नव्हे हुताशन; लटिका हा याची परीक्षा घ्या, मग यास मुलगी द्या.'' प्रधान परीक्षा घेऊं लागले. तो ते अर्धेमुर्धे जळून गेले आणि हाहाःकार झाला! तेव्हा सभासदास सत्यता पटली. परन्तु राणीवशांत खात्री पटेना. तेव्हा नीलध्वजानें त्याला अंतःपुरात नेऊन त्याची परीक्षा घेऊन खात्री करून घ्या' असें आपल्या वहिनीस सांगितलें,

तेथे भावी जामातास नेल्यावर प्रत्यन्तर पुरावा दाखवा असा वहिनींनीं प्रश्न केला, तो ऐकल्याबरोबर अग्नीने त्यांच्या वस्त्रावरच प्रयोग करून दाखविला. तेव्हा—[५६] " नग्न धावे म्हणे कर्म । कैसे माझे उदेलें ॥

राजा म्हणे का वहिनी । बरवी परीक्षा घेतली सदनीं ॥
प्रचीत आणिली कीं नाहीं मनीं । किंवा आणिक राहिली असे ॥
ती धरणीपतीस म्हणत । राया कैचा आणिला जामात ॥
तेणे केला माझा घात । तो तुम्हातें काय सागो ॥

तें ऐकून जावईबुवा जरा वरमले आणि ' कायमचे घरजावई होऊन राहात असाल तर कन्या देतो,' असे त्यास राजाने जेव्हा सागितले, तेव्हा त्याने ते कबूल केलें, तरी पण प्रधानजींना एकदा सूचना दिल्याशिवाय राहवेना. ते म्हणाले[५७]:—

घरीं ठेविता जामात । हा नित्य करील आकात ॥
कृतोपकाराचा घात । जामातस्वभाव ऐसा कीं ॥ .. ॥
संगे पत्नी घेऊन । जाऊ दे आपल्या नगरासी ॥

तरी तिचा काहीं उपयोग झाला नाहीं, शेवटीं अशा चमत्कारिक रीतीने झालेल्या घरजावयानीं अर्जुनसैन्याचा दाह करून आणीबाणीच्या वेळीं आपल्या सासऱ्याची लाज राखिली. असो. अशारीतीनें श्रीधराने आपले काव्य फार मनोरम केले आहे.

## १३ कथासूत्राचा रेखीवपणा

हा तिसरा गुण श्रीधराच्या काव्याचा होय. कथानक नेहमी आटोपशीर ठेवून ते मनोवेधक होईल इतकाच विस्तार तो नेहमीं करतो.

५६ जै. अ. १५, १००-१०२
५७ जै. अ. १५, १०५-१०७

कटाळवाणा पाल्हाळ तो बहुश: करीत नाहीं. इतकेच नव्हे तर कथा-सूत्राचें अनुसन्धान सुटू नये म्हणून प्रसगोपात्त आलेलीं वर्णनेही तो टाळतो, व तसें करिताना मोठी गमतीचीं कारणें देतो. अध्याय एकोणतीसमध्ये, कुशलवाचे व्रतबन्ध झाले. कामधेनूने चतुर्विध अन्न दिले. प्रतिदिनीं लक्ष भोजन मुनीने आनन्दानें चालविले होतें, असें सागून कवि मोठ्या खुबीनें म्हणतो।—

अन्नवर्णना करू सविस्तर । तरी ग्रंथ होईल थोर ॥
कामधेनुप्रसाद रुचिकर । कोण वर्णू शके तया ॥ ३९ ॥

तसेच पुढे एकोणचाळीसाव्यात पातालवर्णनाचा प्रसंग आला असता कवि म्हणतो:-—

जरी पाताळ वर्णू सविस्तर । तरी रणीं पडिलासे धनुर्धर ॥
यालागीं वाणीस न करी प्रसर । उठवावया सत्वर पार्थातें ॥८६॥

व याचे समर्थन असे करतो कीं, लग्नघटका भरत आल्यावर उगीच मगळाष्टकाची लाबण कशाला ? किंवा राजा प्रसन्न होऊन वस्त्रें देऊं लागला तर मुहूर्त कशास पाहावा ? किवा पर्वकाळ संपत आला असता संकल्पात वेळ का घालवावा ? इ.

तसेंच द्वारकावर्णन अध्याय एकाहत्तरमध्ये पुढील कारण देऊन गाळलें आहे. "जरी करू द्वारकावर्णन । तरी वर्णावया नसे समाधान । का
मत्स्यानर्नी पडले श्रीकृष्णार्जुन । म्हणोनि त्वरा कथेची ॥८॥
नारद म्हणे तातास्वामी (ब्रह्मदेव) ।.........
महा अनर्थ झाला कर्मभूमीं ॥ ७२ ॥
तो सांगता सविस्तर । तरी कार्यास होईल उशीर ॥
म्हणोनि तुम्हां संक्षेपकर । सागतो आता परिसावे ॥७३॥

पुढें अध्याय अठ्ठाहात्तरमध्ये :—सविस्तर सांगू अमृतहरण ।
तरी सकळा द्यावया जीवदान ।।
रंगीं उत्कंठित जगज्जीवन । यास्तव संक्षेपे कथिलें जी ।।३७।।

अध्याय पच्याऐंशींमध्यें :—जरी कैलास वर्णू सविस्तर ।
तरी ग्रंथ होईल पसर ।। आणि वाट पाहात असे चक्रधर ।
म्हणोनि संक्षेप हा केला ।। ४० ।।

अध्याय चवऱ्याण्णवमध्यें :- सविस्तर जरी वर्णू अन्न ।
तरी ग्रंथ होईल विस्तीर्ण ।। ४५ ।।
ऐसा युगधर्म दुस्तर । कोण वर्णील सविस्तर ।।
संक्षेपाने उत्तर । तुज सांगितलें हें धर्मा ।। ११७ ।।

## १४ उपक्रमोपसंहार

या ग्रंथाच्या उपक्रमोपसंहाराची मांडणी श्रीधराने मोठ्या कौशल्यानें आटोपशीर व मनात भरणारी अशी केली आहे. प्रारंभी विघ्नहर्ता गणपति स्फूर्तिदायी सरस्वती, सिद्धिदाता सिद्धनाथ, मोक्षदाता गुरु व पिता ब्रह्मानंद यासीं नमन करून श्रोत्यास मोठ्या आदराने प्रार्थना केली आहे. त्यानन्तर संस्कृत-प्राकृत-महत्त्व तरतमभावानें सांगून आपला विनम्र भाव मोठ्या चातुर्याने प्रकट केला आहे. या ग्रंथात पूर्वगामी कोणत्याही कवीचा व्यक्तिशः उल्लेख न करिता [५८]

"कविवर घेऊन गेले गोडी । परि कांहीं राहिली असे थोडी ।
ती मी घेऊन मधुर परवडी । सांगेन आवडीं तुम्हाप्रति ।।

असा मोघम उल्लेख करून पुढे—[५९]

---

५८ जै. अ. १ ३३ ; ५९ जै. अ. १, ३४

" वाळवेमाजी सांडली शर्करा । ती केवी प्राप्त होईल कुंजरा ॥
तरी तो पिपीलिकेस होय चारा। तो न्याय जाहला मज प्राप्त ॥

कुंजरपिपीलिकान्यायानें आपला विनम्र भाव व रसज्ञताही मोठ्या खुबीनें प्रकट केली आहेत. दुसऱ्या अध्यायापासून नमनाचा प्रकार न लांबविता नुसत्या " श्रीगणेशाय नमः": एवढ्या शब्दानींच तें काम उरकलें आहे. त्यामुळें श्रोते व वक्ते यांचें कथानुसन्धान न तुटता पुढील अध्यायावतार करितांना जागृत केलेल्या त्यांच्या कुतूहलास निष्कारण अडथळा उत्पन्न होत नाहीं. त्याचे ग्रथ लोकप्रिय होण्यास हेंही एक कारण आहे. आतां प्रत्येक अध्यायाचा उपसहार अथवा दुसऱ्या अध्यायाचा अवतार याकडे लक्ष दिल्यास आपणांस असें आढळून येतें कीं, श्रीधरानें वाचकाचें लक्ष वेधण्यास पुढील विषयाची कुतूहलजागृति व मोक्षसाधनाचे आश्वासन अशा जोडगोळींचा उपयोग केला आहे व तो इतका यशस्वी झाला आहे कीं, त्याच्या ग्रंथाइतकी लोकप्रियता इतर कोणत्याही सन्तग्रंथास लाभली नाहीं. ज्ञानेश्वरादि पूर्वगामी सन्तांनीं आपली ग्रंथरचना लोकाना मोक्ष प्राप्त व्हावा याच हेतूने केली आहे खरी, तरी पण त्यांनीं या बाबतींत केलेले उल्लेख अगदीं किरकोळ आहेत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं अशा प्रकारची घोषणा तारस्वरानें करण्याची पद्धति प्रथम श्रीधरानेंच पाडली असें आम्हास वाटतें. आणि भोळेभाळे लोक या फलश्रुतीस भाळले व त्याच्या ग्रंथांचीं पारायणें फलश्रुति सांगणाऱ्या स्तोत्राप्रमाणें घरोघर नित्यनैमित्तिकपणें होऊं लागलीं. श्रीधराच्या ग्रंथाच्या अलौकिक लोकप्रियतेचें हें खरें इंगित आहे असें आम्हास वाटते. या दुहेरी योजनेचीं पुढें एकदोन उदाहरणें देऊं:—

(अ) व्यास भीमाला म्हणालें[६०]:–बा भीमा, त्या यौवनाश्वराजानें

६० जै. अ. १, ११३-११७

आपल्या भद्रावती नगरींत श्यामकर्ण अगदीं कडेकोट बंदोबस्तांत ठेवला आहे. "तेथे वाऱ्यासही नाहीं गमन । कैंवा कवण मानवाचा ॥" कृपण धनाचे रक्षण करतो तसें तो अश्वाचें रक्षण करीत आहे. " तो अलभ्य असे तुम्हातें. " अर्थात् यावर भीमसेन हंसून आपल्या स्वभावानुरूप म्हणतात, 'कसा नाहीं मिळत तें आता पाहतो.' अशा रीतीनें उत्कण्ठा वाढवून पुढें "त्याने तो कसा आणिला ॥ तें पुढील प्रसंगीं निरूपण । अति रसाळ अवधारा ॥" श्रोत्यानो, जैमिनिकथामृतसार आपल्या श्रोत्रपात्रीं भरावयास तयार व्हा. श्रोत्रहृत्ताप यानें दूर होतो हें अगोदरच सांगून ठेवलें आहे.

ब ) येथेही श्रीकृष्णानीं भीमाची थट्टा करून हा कमला तुझा अश्वमेध पार पडतो, असे म्हणून धर्मास अश्वमेध करू नको म्हणून सांगितलें. तें चतुर भीमाने ऐकून काय उत्तर दिले ते पुढे ऐका. –[६१]

धान्यांकुर सोडिता सृष्टिं । जेवीं कृषीवल इच्छि जलवृष्टि ॥
तेवीं भीमवचनाची पुष्टी । स्वयें जगजेठी वांछित ॥

पण खुद्द श्रीकृष्णच याप्रमाणे ते ऐकण्यास आतुर आहेत, मग श्रोत्याची काय कथा ! ' तें रसाळ आहे अमृतासमान । " असें सुचवून पुनः त्याचे चित्त उत्सुक केलें आहे त्याच्यावरोबर फलश्रुतीचा बार पाहा[६२]:–

जैमिनीअश्वमेधकथामृत । जीवतत्वें घेऊनि अमर करित ।
जन्ममरणातें निरसित । ही प्रचीत श्रीधराची असे ॥

आणि त्यांत स्वतःच्या अनुभवाची ग्वाही. मग कोण भाविक श्रोता

---

६१ जै. अ. २, १११ ; ६२ जै. अ. २,११३

पुढील अध्याय वाचल्याशिवाय राहील ? पुढें[६३]:—

"अतिसुरस अमृताहून । भवबंधन हरावया सावधान। ऐका.[६४]युद्ध करतील दारुण। ते पुढले प्रसगीं निरूपण । अतिरसाळ अवधारा" या युद्धश्रवणानेही अन्तर शुद्ध होईल,"पातकें जातील अगाध" असे आश्वासन दिले आहे. याच्यापुढें यौवनाश्व व वृषकेतु हे धर्मनगरास जातील, तो पुढले प्रसगीचा रससागर ऐकण्यास तयार व्हा. ही कथा "श्रवणें हरी भवरोगव्यथा ।" कोणत्या धर्मानें लक्ष्मी स्थिर होईल असा प्रश्न पुढे धर्म विचारणार आहे, ती कथा "अति मधुर पैं असे," पण—

"जैमिनी-अश्वमेधकथेचा काढा । वारवार घ्यावा धडफुडा । येणें जाईल भवरोग गाढा ।" असें श्रीधराचें आश्वासन त्याबरोबरच आहे.[६५] याप्रमाणे उत्तरोत्तर प्रत्येक अध्यायांत श्रीधरानें या दुहेरी मंत्राने श्रोत्या-वक्त्यास अगदीं अशरण करून टाकलें आहे.

क ) ही झाली हकीकत व्यक्तिशः अध्यायाची. आतां एकन्दर सर्व ग्रंथफलश्रुति काय आहे ती पाहा.[६६] सकळ पातकसन्तति श्रवणमात्रे दग्ध होतें; सर्व सिद्धी प्राप्त होतात,

विद्यार्थी पावतो विद्येते । धनार्थी पावतो धनातें
पुत्रार्थी पावतो पुत्रातें । निष्कामें मोक्ष पाविजे ॥

हा ग्रंथ लिहून दान करील त्यास यांत जितके अध्याय,श्लोक व अक्षरें आहेत तितकीं वर्षे स्वर्गवाससुख मिळेल हें खुद्द व्यासाचें वचन आहे.ब्राह्मणास विद्या, क्षत्रियास राज्य, वैश्यास धन, शूद्रांस शुद्धि असे लाभ जातिपरत्वें होतील. वृद्ध स्त्रिया, कुमार या सर्वांस श्रवणफळ मिळेल. भारतश्रवणानें

६३ जै. अ. ३, ८५; ५, ५९ ; ६४ जै. अ. ४, १५१
६५ जै. अ. ८, ६९–७० ; ६६ जै. अ. ६६, ५२

अठरा पुराणें श्रवण केल्याचें पुण्य लाभतें, तर अश्वमेध-श्रवणानें सकळ भारतश्रवणाचें मिळतें, अशी फलश्रुति सांगून व्रतोद्यापन कसे करावें, हें पुढें सांगितलें आहे. दहा पल सोन्याचा अश्व करून वस्त्रांनीं त्याची पूजा करावी; मग तो पुराणिकास त्याची यथासांग पूजा करून दान द्यावा.व मग ग्रंथपूजा यथाविधान करावी. श्रोत्याचाही बहुमान करावा; पुराणिकास यथाशक्ति दक्षिणा द्यावी. वित्तशाठ्य केल्यास वैकुण्ठपीठ दुरावेल. त्यानन्तर अन्नसन्तर्पण करून ब्राह्मणास तुष्ट करावें, म्हणजे सर्व फलप्राप्ति होते. एवढें मोठें आमिष व्यासाच्या हवाल्यावर भाविकापुढें ठेवल्यावर श्रीधराचे ग्रंथ लोकप्रिय होऊन नित्यपाठात का न जाऊन बसावे ? श्रीधराचे ग्रंथ सुलभ व सोपे म्हणून त लोकप्रिय हें मत खरें नसून त्याच्या लोकप्रियतेचें वरील कारणच खरें होय असें आम्हास वाटतें.

## १.९ नीति-व्यवहारबोध

श्रीधराच्या काव्याचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यात आढळणारा नीतिबोध व व्यावहारिक शिकवण हें होय. हा उपदेश सर्व ग्रंथभर विखुरलेला आढळतो. जुन्या काव्याचें अंतिम ध्येय जसें संसारबन्धविमोचन मानलें जाई, तसें त्याचें साधन सदाचरण म्हणून त्यालाही काव्यात महत्त्व दिलें जाई. त्यामुळें हल्लींच्या नीति-कलावादास त्यावेळीं स्थानच नसे. सर्व जुन्या काव्यात ईश्वरप्राप्त्यर्थ जसा भक्तिमार्गाचा उपदेश केला आहे, तसाच चित्तशुद्धीसाठीं सदाचरणाचा व नीतिचा उपदेश त्यांत केला आहे, अर्थात् हा उपदेश त्या वेळच्या परिस्थित्यनुरूप आहे हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. तेव्हां या ग्रंथातील नीत्युपदेशाचा थोडासा मासला पुढे दिला आहे:—

(अ) खळासी खळत्व करावें, शठासीं शठत्व करावें, नाहीं तर

जगांत निभाव लागणार नाहीं.[६७] वाळू गाळितां स्नेह सांपडेल, पण दुर्जनचित्त बोधलें जात नाहीं.[६८] नीच जरी हीनवचन बोलला तरी त्याकडे दुर्लक्ष करावें. महाजन काय म्हणतात तें पाहावें. देशीं, नगरीं, मंदिरीं, मार्गीं मूर्खसंगति धरूं नये, "न मूर्खजनसंपर्को सुरेंद्रभुवनेष्वपि" ज्यावर भगवन्ताची कृपा असते, त्यासच परोपकाराची गोडी लागते. दुर्जन स्वतः तर उपकार करीत नाहींच, उलट दुसऱ्यास करूं देत नाहीं.

आ) एकच विष्णुभक्त पुत्र पुरे. इतर अनेक पुत्र झाले तरी काय उपयोग ? श्वानसूकरास विपुल सन्तति होते, पण सिंहिणीला एकच पराक्रमी छावा होतो.[६९]

इ) परदाराहरण व परांगनासंग केवळ आत्मघातक आहेत.[७०]

ई) स्त्रियांचे वाग्बाण फार तीक्ष्ण असतात. ज्याला देहाभिमान नाहीं; मानापमानाची चाड नाहीं, त्याला सुद्धां ते तात्काळ साभिमान करतात.

साध्य यत्न करावा; असाध्य यत्न करूं नये. म्हणजे हंसें होत नाहीं. पण उदण्ड यत्न केला तरी होणार तें कांहीं चुकत नाहीं.

ऊ) धर्मत्यागानें नरकीं पतन होतें. क्षात्रधर्मास सुहृद्भाव ठाऊक नाहीं.

ए) अतिथि आला असता गृहस्थानें यथाशक्ति त्याचें आदरातिथ्य करावें. कांहींच देण्यास नसेल तर मधुर भाषण करावें; त्यास

६७ जै. अ. ६९, १३-१४ ; ६८ जै. अ. १५, ११८
६९ जै. अ. ५२, ७१ , ७० जै. अ. ७४, ६१-७३

काहीं खर्च लागत नाहीं.[७१] अतिथि ज्यांच्या घरून विन्मुख व अतृप्त जातो, त्याचें जिणे व्यर्थ होय. काय अशाच्या संपत्तीला जाळायचें ! तो पाप देऊन पुण्य घेऊन जातो.[७२]

ऐ ) स्त्रियेस नेहमीं सुखी व संतुष्ट ठेवावें. कुलाचार, धन, धर्म, सर्व काहीं तिच्या अधीन आहे. पतिमतानुवर्ती स्त्री मिळणें ही ईश्वरी कृपाच होय. ती ज्यास मिळते, त्याचा संसार सुखाचा होतो. पण जो भार्येवर प्रेम करीत नाहीं, तो अधम जाणावा.[७३] "भार्ये एवढा मित्र संसारीं । दुजा नसे अकृत्रिम ॥ "

ओ ) पतीहून अन्य दैवत । स्त्रियेसी नसे कीं निश्चित ॥
धर्म अर्थ काम मोक्ष प्राप्त । पती प्रसन्न झालिया ॥
काया वाचा मने करून । जी स्त्री पतीशीं शरण ।
ती त्रिलोकीं संपन्न । पूजनार्ह जाणावी[७४] ॥ "

## १६ श्रीधराचें तत्त्वज्ञान

मुकुन्दराजानीं विवेकसिन्धूंत, ज्ञानदेवानीं अमृतानुभवात अथवा एकनाथांनीं भागवतात ज्याप्रमाणें तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन मुख्यतः अगदीं स्वतंत्रतेनें केलें आहे, त्याप्रमाणे श्रीधरानें आपल्या 'जैमिनिअश्वमेधां'त व इतर ग्रंथांत तें सांगण्याचें ध्येय आपणांपुढें कधींच ठेविलें नव्हते, श्रोत्यांस व वाचकास अखेर मोक्षप्राप्तीचा लाभ व्हावा, हा हेतु उभयतांस साधला होता खरा, तथापि तत्साधनाचे त्याचे मार्ग मात्र अगदीं भिन्न होते, असें स्पष्ट दिसतें. वेदान्तप्रतिपादन सुबोध व्हावें म्हणून पहिली मंडळी

७१ जै. अ. ९५, ३५-३७ ; ७२ जै. अ. ९५, ६५-६६
७३ जै. अ. ९५, ५१ ; ७४ जै. अ. ९५, ५४-५७

व्यवहार व नीति यांतील दृष्टान्तोपमांचा अवलंब करीत असत, तर श्रीधर व्यवहारनीतीचे सिद्धान्त कथाद्वारे सांगता सागतां हळूच तात्त्विक दृष्टान्तोपमानीं त्यास पुष्टि देई. पहिल्या मडळीचे प्रतिपादन विद्वानासाठीं व पण्डितासाठीं असे, तर श्रीधराचें अविद्वानासही समजावें असें असे. म्हणूनच श्रीधराने हेतुपुरःसर आपल्या या अगर इतर ग्रंथात तत्त्वप्रतिपादन स्वतत्रतेनें अगर प्रत्यक्ष रीत्या कोठेंही केले नाहीं. युद्धवर्णनें, भोजनवर्णनें अगर इतर प्रसग साधून तो हळूंच मधून मधून एखादें तत्त्व एखाद्या योग्य दृष्टान्ताने अगर उपमेने श्रोत्याक्त्याच्या मनावर ठसवीत असे. त्यांनीं हरिगुणकथाश्रवणाने सन्मार्गप्रवण व्हावे व आपला मोक्षमार्ग चोखाळावा असा त्याचा हेतु होता. तेव्हा त्याच्या या इतस्ततः विखुरलेल्या दृष्टान्तोपमावरून कोणत्या प्रकारचें तत्त्वज्ञान त्याला अभिप्रेत होते हें पाहू याः—

महद्भाग्याने नरदेह मिळतो. नहदेहाची प्राप्ति फार दुर्लभ आहे. तो वारवार मिळत नाहीं. नरदेहींचा अर्धक्षण कोटिसुवर्ण देताही मिळणार नाहीं; म्हणून आपलें आयुष्य सार्थकीं लावलें पाहिजे. नाहीं तर काळ ते क्षणक्षणी चोरून नेत असतो. ते सार्थकीं लावण्याचा मार्ग एकच. तो हा कीं, सर्व इंद्रियास ईश्वरसेवेकडे वळवावें. जे कान हरिगुण ऐकत नाहींत तीं मूषकबिळें आहेत. कमलजा–धवाचें गुण जी रसना वर्णीत नाहीं ती विषवल्ली होय. हरिकथाविरहित वदन म्हणजे मद्याचे भाडें होय. हरिकथासेवनाने भवव्यथा दूर होते.[७५] वेदशास्त्रपठण करणें वाईट नाहीं; पण बहुधा त्यामुळें अहन्ता उत्पन्न होते. विद्वत्ता अंगीं आली कीं वाद करून जयाची आकांक्षा उत्पन्न होते, आणि शेवटीं ते फसतात. सकळ चराचर

७५ जै. अ. ४२, ७

गुणमय पाशानीं बद्ध झालें आहे. त्यांत देहात्मवादी जे नर असतात, ते परमेश्वर मानीत नाहींत. पण ते अगाध अविद्यासागरात व स्त्री-पुत्र बंधु-मोहांत पडतात. संसार शाश्वत आहे असें मानतात व स्वेच्छाचरण करू लागतात.[७६] त्यामुळें त्यांचा नाश होतो. असे ते भगवन्ताला विसरले कीं, जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडतात. अज्ञानी माणसाचे कर्माचरण देहाभिमानानें व्यर्थ होते. पण ज्ञानयुक्त कर्में व तीर्थस्नानें यानीं देहशुद्धि व चित्तशुद्धि लाभते. उत्तम कर्मांनीं पुण्यप्राप्ति होईल, पण तें संपले कीं मृत्युलोकीं पुनः यावे लागतें.[७७] म्हणून सद्गुरु अवश्य आहे. त्याच्या वाक्यानें सच्छिष्याचें अज्ञान दूर होतें. सर्वसंगानिर्मुक्त व्हावें, विषय वमनाप्रमाणें मानावे; असे वैराग्य प्राप्त करून घेतल्यावर साधक आपल्या साधनाने अनेक विघ्नें विसरून दृश्य पावून द्रष्टेपणे पाहत असतो. योगानें चित्तनिरोध होतो. व योगी निर्मळचित्त होऊन विषय जिंकतो.[७८] भक्तिमाहात्म्यही श्रीधरानें फार गायिलें आहे. भक्तिरहित जें जें केलें ते सर्व वायां जातें. भक्तीने जरी अल्प कर्म घडलें तरी ते फार महत्त्वाचे आहे. भक्ति करणारी व्यक्ति बाल, वृद्ध, तरुण असो अगर ब्राह्मण, क्षत्रिय, शूद्र यापैकीं कोणीही असो, जो वासुदेवस्मरण करील त्याचें रक्षण नारायण करील. नारायण प्रसन्न करून घेण्यास उत्तम याति अथवा शास्त्रज्ञानव्युत्पत्ति न लगे. निजचित्तात त्याचे सद्भावानें चिंतन केले[७९] कीं तो पावतो—म्हणूनच ज्ञानी द्वैताद्वैत मारून हरीचें भजन करतात.[८०] आतां थोडीं प्रत्यक्ष उदाहरणें देऊन हें प्रकरण आटोपते घेऊं.

---

७६ जै. अ. ५७, ४
७७ जै. अ. ४३, ४५ ; ७८ जै. अ. ४८, १६
७९ जै. अ. ५२, ३-४ , ८० जै. अ. ४५, ५३

## १ ) युद्धांत वेदान्त

अ ) जें जें सज्ज करी संधान । तें तें व्यर्थ करी हनुमान ।।
जेविं अज्ञानाचें कर्माचरण । देहाभिमानें व्यर्थ होय[८१] ।।
ऐशा येरझरा करिता । फार कष्ट झाले दैत्यनाथा ।। (दुन्दुभी)
प्राणी धरोनि अहंता । फिरे जैसा भवचक्रीं[८२] ।।

ब ) ईशमायेनें जग भ्रमित । स्यामाजि योगी जैसे
निभ्रम फिरत ।।
तेवीं पार्थात्मज आणि वृषकेत । दोघे फिरती रणांगणीं[८३]।।
[ सिंहध्वजानें मोहिनीअस्त्रानें सर्व मोहित झाले तेव्हा– ]

क ) मदांध झालिया नयन । निजस्वरूप होय आदर्शन ।।
तेविं नृपें ( वीरवर्मा ) सोडूनि मार्गण । नरनारायण
झाकिले[८४] ।।

## २ ) भोजनवर्णनांत वेदान्त

अ ) स्नेह कढेमाजी दिव्य झाले । अनुतापवैराग्यें पचले ।।
मग अनुरागदशेतें आले । ऐसे वडे ते नवविध [८५] ।।

ब ) सांगणें पूर्ण आलें अनुभवास । बरवा केला कर्मनाश ।।
निर्मळ केलें संसारास । वाटे त्रास विषयाचा [८६] ।।

---

८१ जै. अ. ७०, १७ ; ८२ जै. अ. ७०, ८२
८३ जै. अ. ८०, ५५ ; ८४ जै. अ. ५०, ३०
८५ जै. अ. १४, ५३ ; ८६ जै. अ. ९, ६१

मायबापांची आस तुटली । प्रपंचसुखमरिता आटली ॥
जन्ममरणलता समूळ उपडिली । हा वनमाळी पाहताची[८७] ॥

[ कृष्ण जेवतांना रुक्मिणी-भामा इत्यादिकाचा विनोद वेदान्त-पूर्ण आहे ]

## ३ ) शृंगारमिश्र करुणांत वेदान्त[८८]

पार्थ बलार्णव अतिगहन । त्याचें केलें याणे मंथन ॥
मुक्तिरमा निघाली त्यातून । तिणे नदन तुझा वरिला ॥
बऱ्हाडी मिळालीं दोनीं दळे । नयेतें याणे वरिलें ॥
तीसवें सुखशयन केलें । जेथें विस्मरण प्रपचाचें ॥

( सुधन्व्याच्या मृत्युसमयीं सुरथ हंसध्वजाचे–आपल्या बापाचे समाधान करतो )

४ ) शृंगारात वेदान्त[८९]:— [मयूरध्वजनगरींत कृष्णार्जुन वृद्ध ब्राह्मण व शिष्यरूपाने फिरत असता केलेलें वर्णन ]

तंव कांता बोले चतुरा । मी कृष्णरूपाचि सुदरा ॥
माझ्या दर्शने अवधारा । काममोक्ष होईल ॥
तंव रमणी बोले कामलपटा । सोडी सोडी माझ्या ओठा ॥
जे उच्चारिती वैकुंठपाठा । क्षतें त्याते कां करिसी ॥
ऐसें ऐकतां तयाचें वचन । ऐकोनिया नरनारायण ॥
कृष्ण नामे पावन मैथुन । आसनशयन कृष्णनामें ॥

---

८७ जै. अ. ९, ६२ ; ८८ जै. अ. २०, २५-२६
८९ जै. अ. ४५, ६६-७७

कृष्ण म्हणे अर्जुनास । पहा दपत्याचा ज्ञानप्रकाश ।।
ज्याच्या ब्रह्ममय विलास । श्रवणपुटीं ऐकिला कीं ।।

## ९) गोत्रजवधाविषण्ण धर्मास व्यासोपदेश[१०]:—

मुळीं जन्मलेंच नाहीं । तेथें पापाश कैचा पाहीं ।।
पापपुण्य भ्रांतीचे ठायीं । भासे पाही अज्ञान ।।
का स्वप्नींचे अत्यंत सुकृत । किंवा महापातकाचे पर्वत ।।
ते जाग्रतीमाजी मिथ्याभूत । तेवीं पापपुण्य आत्म्यासी ।।
मरता आणि मारता । हे मूळ मायेची कर्तव्यता ।।
ते तूं घेऊन आपुल्या माथा । दोषी म्हणविशी आपणातें ।।
तूं मायाभ्रमें भुललासी । मी पापपुण्यकर्ता म्हणविसी ।।
तरी तूं करी का अश्वमेधासी । तेणें होसी निष्पाप ।।

अश्वमेधाचे प्रयोजनच यात विशद केलें असल्यामुळें येथें तत्त्वज्ञानाचे सर्व सार आलें आहे. विषण्ण झालेल्या अर्जुनाला भारतयुद्धप्रसंगीं जो श्रीकृष्णानें उपदेश केला त्याचेंच सार येथें व्यासानीं सागितलें आहे. तें असें:-आत्म्याला मुळीं जन्मच नाहीं. जन्म-मृत्यु-जरा इत्यादि अवस्था देहास आहेत, आत्म्यास नाहींत. मग त्याच्याकडून पापपुण्य होतें ही कल्पनाच संभवत नाहीं. तशी कल्पना करणें हा भ्रम आहे. स्वप्नातील पापपुण्य जसें जागृतींत मिथ्या, तसें पापपुण्याची कल्पना आत्म्यासंबधीं मिथ्या होय. मरणारा आणि मारणारा हें द्वैत मायेनें भासतं. तें खरें कल्पून तूं आपल्या डोक्यावर पापपुण्याचें ओझें उगीच घेत आहेस. मायेने तू मोह पावला

---

१० जै. अ. १, ६७-७०

आहेस, म्हणून तूं आपल्या ठिकाणीं पापपुण्याचें कर्तव्य स्थापीत आहेस. तर तूं अश्वमेध कर म्हणजे हा तुझा भ्रम जाईल व तूं निष्पाप होशील.

## १६ श्रीधराचा विनोद

तात्त्विक ग्रंथांतील रूक्षपणा कमी करण्यास अथवा पुराणांतील एकमार्गी कंटाळवाणीं आख्यानें सुश्राव्य करण्यास विनोदाचें साधन फार यशस्वी ठरतें. श्रीधराच्या पूर्वीं होऊन गेलेल्या कवींनीं विनोदाचा अवलंब थोडाफार आपापल्या ग्रंथात केला आहे. महानुभावीय शिशुपालवधास त्यानें मनोरमता आली आहे व ज्ञानदेवींतील तत्त्वप्रतिपादनास त्यामुळें ओलावा आला आहे; तर एकनाथाचा "रुक्मिणीस्वयंवर" ग्रथ त्यायोगें फारच खुमासदार झाला आहे. श्रीधरानें कोणत्याही जुन्या कवीपेक्षा विनोदाचा मसाला आपल्या काव्यात अधिक पेरला आहे. यामुळें त्याचें काव्य अधिक चुरचुरीत व लोकप्रिय झाले आहे यांत सशय नाहीं. आपल्या ग्रंथाच्या वाचनापासून वाचकाची चित्तशुद्धि होईल व त्याचें पापक्षालन होऊन त्यांस अन्तीं मुक्ति मिळेल अशी फलश्रुति जरी त्यानें मुख्यतः जाहीर केली आहे, तरी आपलें काव्य मनोरजकही व्हावें या हेतूनें त्यानें विनोदाचा उपयोगही जागोजाग केला आहे एवढेंच नव्हे, तर त्यानें विनोदाच्या निरनिराळ्या नाजुक छटा मोठ्या कौशल्यानें कुचलून त्यांत विपुल वैचित्र्यही प्रकट केलें आहे. मातापितराचा वात्सल्यदर्शक विनोद, वत्सांचा लडिवाळ विनोद, देवभक्तांचा भक्तियुक्त विनोद, परस्पर उत्साहवर्धक वीरांचा विनोद, तसाच तरुण पतिपत्नींचा, प्रौढ दांपत्याचा, बन्धुभगिनींचा, शत्रुमित्रांचा, तरुणींचा व वृद्धांचा व भोजनप्रिय भटजीबोवांचा, असे नानाप्रकारचे विनोद त्याच काव्यांत आपणांस पाहावयास मिळतात. आणि त्यांत उपरोध, उपहास, परिहास, विहास, नर्मोक्ति, वक्रोक्ति, व्याजस्तुति,

व्याजनिन्दा वगैरे सर्व छटांचा अन्तर्भाव झालेला आढळतो. शृंगार,वीर,करुण, भक्ति, भयानक वगैरे रसांतही त्यांचें मिश्रण केलें असल्यामुळे सामान्यतः त्या त्या रसाची खुमारी वाढली आहे या विनोदाप्रमाणेंच त्यानें कोट्यां- वरही बराच भर दिला आहे. म्हणून श्लेषद्वारा नांवावर व शब्दावर त्यानें केलेल्या अनेक कोट्या आढळतात. या दोन्हीं प्रकारांचीं कांहीं उदाहरणें अश्वमेधग्रंथामधून मासल्याकरिता पुढें दिलीं आहेतः—

१ ) अश्वमेधांत मुख्य भूमिका श्रीकृष्णाचीच दिसते. भीम, नारद, देवकी, सत्यभामा, रुक्मिणी, सुभद्रा, चन्द्रहास, संन्यासी इत्यादि उच्च पात्रांशीं, त्याचप्रमाणे दास दासी, गोप-गोपी, वेश्या, सैनिक वगैरे सर्वांशीं तो विनोद करतो व उलट त्याच्याशीं ही सर्व मडळी निःशंकपणें विनोद करतात, तरी पण त्याच्याबद्दल कोठेंही अनादर उत्पन्न न होता त्याचें समदृष्टित्व, भक्तप्रेम, दयालुत्व, अलौकिकत्व हे गुण वाचकाच्या मनांवर ठसल्याशिवाय राहात नाहींत, व त्यायोगें त्याजबद्दलची त्याची पूज्यबुद्धि वाढते. तेव्हां प्रथम त्यांच्याकडेच वळूं.

भीम विनोदवचनांत मोठा दक्ष आहे, या गोष्टीकडे कटाक्ष ठेवून श्रीकृष्ण धर्मास म्हणतो—"धर्मा, तू काय आता भीमास प्रधान केलेंस, तेव्हा तुझा याग सिद्धि पावलाच म्हणावयचा ! माझा भार भीमानें घेतला. फार बरें झालें ! आतां मी येथून निश्चित झालों ! अरे, शास्त्र असें सागतें कीं, जो खादाड, स्थूलोदर, अवर्णस्त्रीचा स्वीकार करणारा, श्वशु- रगृहीं वास करणारा, कुयोनिरत, स्त्रीजित, अशा पुरुषाचा शब्द कधीं मानूं नये. तुला भीमसेन बुद्धि सागणार, आणि तू त्याच्यावर विश्वासणार. मग काय ! तुझा भाग सिद्धि पावलाच. त्यांत तिळमात्र सदेह नाहीं. अरे वेड्या, काय तुला सांगावें ! यःकश्चित् कौरवांस जिंकण्यास कोण सायास

पडले ! आणि आतां तर यौवनाश्वादि काळासमान एकापेक्षां एक अनन्त वीर जिंकावयाचे आहेत. "तेथे भीम किती बापुडें !" त्याना जिकील, अश्व परत आणील, तुझा याग होईल आणि मग तुझी गोत्रहत्या जाईल. वा! काय पण उत्तम बेत ! "मज तों बरवे न दिसे आतां." तू या भीमाच्या गप्पाना भुलल्लास ! राजा, तुला आता काय म्हणावे ! बरें —

> जे आले ईश्वराच्या चित्ता । ते कोण निवारूं शके आतां ।।
> ललाटीं लिहितो जें विधाता । ते सर्वथा न चुकेची[११]

अशी सहज ठिणगी टाकून दिल्यावर भीमाचा सडेतोड तोफखाना कसा उडाला पाहा:–"देवा, धर्मराजास तूं असे बोललास त्याचें इंगित आले माझ्या ध्यानांत. आपल्या गुणाचा पाढा मीं वाचावा म्हणून ही सगळी खटपट दिसत आहे. बाकी माझ्या मुखे ते तुला गोड लागतात हें खरें. कारण, आन भीड धरून बोलतात. पण भीम तुझ्या तोडावर तें धडाधड व निःशंक बोलणार. ह, माधवा, सावध हो. ऐक जे जे गुण माझ्या अंगीं तूं चिकटवू पाहातोस, ते तुझ्याच ठायीं मात्र खरेखुरे वसत आहेत. पाहाः तू क्षुधाकाळीं सगळें चराचर खाऊन टाकूनहीं उपवासी म्हणवितोस. तूं अभिनव खादाड खरा ! बरें, देवा, तुझ्याहून स्थूलोदर त्रिभुवनांत नाहीं ! कोटिब्रह्मांडें सहज राहातात असें तें तुझें पोट अपरिमित आहे. तुझे हें अचाट पोट बिचारी मायादेवी कशानें भरीत असेल याचें मला मोठें कौतुक वाटतें ! बरें, रुक्मिणीसारखी सुन्दर कान्ता असतां दुसरीची कांहीं गरज ! पण तुम्ही जांबुवन्तीलाही उजवलीत. हो. पण तिच्याशीं एकान्त करतांना भीतिबीति वाटली, तर धर्मरायाचें स्मरण करा, बरें का.

११ जै, अ. २. ११०

अरे ! क्षीरसागरात नित्य राहून घरजावई तूंच झाला आहेस पण कुंभोद्भव जेव्हा त्याला ग्रासायला आला, तेव्हा मात्र त्यापासून त्याचे रक्षणही तू केले नाहींस. वडील बधूशीं लढून स्त्रीप्रीत्यर्थ पारिजात आणणाऱ्या तुझ्याहून दुसरा स्त्रीजित कोण सापडणार ! वामनावतारीं बळीद्वारीं याचना करून वक्रोक्तिसग्रह बराच केला आहेस म्हणावयाचा ! अरे, तुझ्या एक एक अवताराच्या लीला सागता सहस्रवदनही भागेल !

तेथें मी काय अल्प एकवदन । समर्थ होईल वदावया[१२] ॥

तुझा बुद्धिविचार जो ऐकतो, त्याचा संसार निर्मळ होतो त्याच्या सर्व कर्मांचा संहार होतो. म्हणून तुझें कोणी ऐकत नाहींत. हेच ठीकं. पाहा:—तू भीष्मास निःसन्तान केलेस. ध्रुवाला अंतरिक्षात फेकलेंस, नारदाला लंगोटी लाविलीस, अशा तुझ्या किती गोष्टी सागाव्या ? पण देवा ! तुझ्याच कृपेनें मी धर्मप्रधान झालों, तुझ्या स्मरणानें विघ्ने पळतात. तुझ्यामुळेंच जन्ममरण तुटते, आणि आम्ही तर तुझे दास व सखे. आमचें चिंतित जर होणार नाहीं "तर श्रुति पुराणें बुडलीं कीं !" हें भीमाचे भाषण ऐकून "देव हासे खदखदा स्वानद".[१३] हा विनोद किती सुन्दर व उच्च दर्जाचा आहे, याची साक्ष प्रत्यक्ष श्रीकृष्णाच्या खदाखदा हासण्यानेच पटण्यासारखी आहे. पुढें भीम म्हणतोः "देवा ! तुझ्या नामाच्या बळानें मी काळालासुद्धा सगळाचे सगळा उचलून तोंडात टाकीन. मग या मशकासारख्या राजांची गोष्ट कशाला ? अलबत् ! मी धर्मराजाचा याग पुरा करीन. आणि तुझ्या वचनाला उणीव आणीन. तुझें महिमान् लटकें करावें हें तर आमचें कुलव्रत; तुला भीष्माने प्रतिज्ञाभंग करावयाला

१२ जै. अ. ३, २४; १३ जैं. अ. ३, ३४

लावलें. आहे का आठवण ? त्याचाच मी नातू बरें का. आणि मला तुझ लटिकें करावयाची हातवटी सापडली आहे." असे भीमसेन जों जों बोलू लागला तों तों कृष्णाला उल्हास चढला. त्याचा आनन्द पोटांत मावेना. त्यानें त्याला आलिंगन देऊन[१४]—

त्या प्रेमाश्रूंचिया जीवनें । त्या भक्तनिधाना न्हाणिलें ॥"

असें भक्तिरसाच्या उत्कर्षांत याचें गोड पर्यवसान झालें आहे.

२ ) पुढें दहाव्या अध्यायात भीम श्रीकृष्णास यागदर्शनार्थ बोलावण्यास गेला तेव्हा तो भोजनास बसला होता. तेव्हा भीम बाहेरूनच त्यास विनोदाने बोलतोः–"देवा ! द्वारीं अतिथीस टाकून तू स्वतःएकटाच भोजन करीत बसला आहेस. कितीरे आत्मपोटी तूं ! लोकांना मात्र अतिथिसत्कार असा करावा, तसा करावा,अशा गप्पा मारितोस.एकन्दर तुझें परोपदेशे पाण्डित्य उत्तम खरें ! आत्याबाई कोठें गेल्या ? का पाठविल्यात त्यांना निजभुवनाला ( वैकुण्ठाला ) ? राजसुता ! माझ्या भगिनी कोठें गेल्या ? का दुष्काळ पडला म्हणून सर्व मंडळी धर्मनगरीस रवाना केलीस ? का ही काटकसर आहे ? आहे तरी काय ? कृष्णानें हे शब्द ऐकून[१५]—"मग फेणिका पापड करी चूर्ण । चटचट शब्दासहवर्तमान । लाघवी कृष्ण वाजवी" पुढें भीमाला ऐकूं जाईल असा मोठा घटघट आवाज करून तो दूध पिऊं लागला. तें ऐकून भीम ओरडून म्हणाला, " काय हो हा याचा राजस कण्ठ ! सुईणीनें काय त्याच्या घशात मुसळ घातलें होतें कीं काय नकळे ! भेटूं तर द्या तिला, म्हणजे तिचें नाकच छाटून टाकितों. " यानें तर कृष्णाला परम हास्य आलें !

---

१४ जै. अ. ३, ४३ ; १५ जै. अ. १०, ७

भीमाचें टीकास्त्र चालूच होतें. तो म्हणतो.— " का घशात एखादा बडा अगर लाडूबिडू, तर नाहीं ना अडकला ? असेल तर आता एका बुक्कीनें अथवा गदाघातानें तो खालीं ढकलावयास येतों. पण काय हो मूर्ख मी ! सगळा भूगोलही जो सहज मुखीं टाकणारा, त्याच्या घशांत अन्नकवळ अडकेल हा काय माझा कुतर्क !! पण देवा, मी अतिथि बाहेर उभा आहें. चुकून मला पण टाकाल हो तोंडात ! परंतु, तसें केलें तर मग कुती, धर्म, याना काय जाऊन सागाल, कीं :" भीम मी खाल्ला म्हणून? " पण तसे केले तर तुम्हाला मात्र मी सुख देईन. कारण, तुम्हीं खाल्ल्यावर मला अधोगति मिळणें शक्य नाहीं; तर ऊर्ध्वगतिच मिळाली पाहिजे. म्हणून मी तुझ मस्तक फोडून वरून निघेन. दुसरें असें कीं, तुझी बहीण सुभद्रा, तुझ्या कान्ता तुला नरभक्षक राक्षस म्हणून भिऊन तुझ्यापासून पळून जातील. मग तुला एकलकोंडे राहावें लागेल ! पण सर्वभक्षण करून पुन्हा तें उत्पन्न करणारा या नात्यानें जर तू मला भक्षणार असशील, तर कृपा करून मला पुनः सृजू नको; कारण तसें केल्याने तुझी थोर अपकीर्ति होईल असो, जाऊ द्या तें सारें! पण पाहुणयाला सोडून एकटे एकटे जेवणें, देवा, तुला शोभते काय ?" कृष्ण त्यावर म्हणाला, "अरे ! कोण, भीम का ? भीमा, मीं खरेंच गड्या, तुला पाहिलें नाहीं. चल झटकर. ये, बस बघू भोजनाला !" पण भीम म्हणाला, "आपलें यथास्थित जेवण झाल्यावर आता मला ये म्हणतोस. समजलें तुझें प्रेम !" इतक्यात कुतीची आण घालून त्याला हात धरून देवाने बसविलें. मग पुन. नाना गोष्टी सागत दोघे जेवले ! पुढे या विनोदाचेंही पर्यवसान भक्तिरसांतच झालें आहे.

जैसी भक्तविनोद स्तुती । (मज) अंतरीं होत असे तृमी ।
तैसी नव्हे सुधापानें[९६] ॥

---

९६ जै. अ. १०, २७

अशी कृष्णानें कबुली दिली आहे. या दोन्ही वर्णनात जसें श्रीकृष्णाचे उत्कृष्ट स्वभाववर्णन आले आहे, तसेंच साधा-भाबडा सडेतोड, व रोखठोक जबाब देणारा, आडमुठ्या पण अत्यन्त प्रेमळ व प्रामाणिक असा भीमसेनही आपल्यापुढें उभा केला आहे.

असो; या दोन उदाहरणानींच पुष्कळ जागा अडविली. सर्व प्रकारची अशीं उदाहरणे अशा रीतीनें देणें जागेच्या संकोचास्तव अशक्य असल्यामुळे त्याचा थोडक्यात नामनिर्देश करणेंच भाग आहे. पहिल्याच अध्यायात व्यासानीं भीमाची थट्टा करून विनोदास सुरवात करून दिली आहे. दुसऱ्यात भिम, वृषकेतु व मेघवर्ण याचा विनोद वीररसपोषक असा झाला आहे. तिसऱ्यातील उल्लेख वर आलाच आहे.चौथ्यात पुन: मेघवर्ण, वृषकेतु याचा विनोद चालला असून तो शत्रूंची निन्दा व उपहास यानीं युक्त आहे. सहाव्यात यौवनाश्वाच्या आईचे हास्यचित्र फारच मजेदार उठलें आहे संसारप्रेमी, परमेश्वर व परलोक ठाऊक नसलेली अत्यन्त कृपण व लोभी म्हातारी, कजाग सासू, व आकास्ताळी आई अशा स्वभावाची वृद्ध बाई आपणापुढे प्रत्यक्ष उभी आहे असे वाटतें. तिचा न जाण्याचा हट्ट व मुलाची तिला कृष्णदर्शनास नेण्याची चिकाटी, या लढाईत जेव्हां मुलगा शेवटीं आईची उचलबागडी करून तिला नेतो, तेव्हा हसता हसता पोट दुखते नवव्यात श्रीकृष्णभोजनप्रसगीं सत्यभामेचा तिच्या स्वभावानुरूप किंचत् राजस तामस व रुक्मिणीचा राजस सात्त्विक विनोद, व देवकीचा वात्सल्ययुक्त विनोद आपणास पाहावयास मिळतो यात एकीची वक्रोक्ति तर दुसरीची व्याजनिन्दा फार चागली साधला आहे. अकराव्यात श्रीकृष्ण लव्याजम्यासह यागदर्शनार्थ चालले असतां वाटेत उष्ट्रादि वाहनांवरून पडणाऱ्या नापिती, बुरुडणी, तेलणी, सूतिका इत्यादिकासंबधीं

भीमाने केलेली कृष्णाची थट्टा जरी थोडेशी नीरस वाटली, तरी तिचें पर्यवसान वेदान्तांत झालें आहे. पुढे स्त्रिया या पद्मिनीसारख्या चंचल असतात, असा नर्मविनोद करून चिडविणाऱ्या कृष्णावरच जेव्हा रुक्मिणी बाजू उलटविते, व तिचे पातिव्रत्य प्रस्थापित करते, तेव्हा तिच्या चाणाक्षपणाचें कौतुक वाटते. तुम्हाला बहुत स्त्रिया, तुम्हीं मला नसाल लक्षित; पण मी मात्र तुम्हांस लक्षितें. तशीच ती पद्मिनी (कमलिनी) हरीस (सूर्यास) लक्षिते. याने श्रीकृष्णही इतका संतोषला कीं, तो तिला आलिंगन देण्यास धावला.

"परी जन देखोन शकला[१७]" ॥

पुढे व बाराव्यात वेश्या, नट, नर्तक, भाट, व बन्दी जनाचा विनोद अगदीं सामान्य प्रतीचा व वेदान्तात गुरफटलेला असा आहे. खरा चटकदार विनोद आपणाला सतराव्या अध्यायात दिसतो सुधन्वा युद्धाला जावयास निघाला असता आपली बहीण 'कुवला' हिचा निरोप घेण्यास गेला. तेव्हां ती म्हणते, "बन्धुराया, तूं रण करावयाला चाललास हें ठीक: पण पार्थाला पाठ दाखवू नकोहो ! नाहीं तर तुझ्या पलायनाची वार्ता माझ्या श्वशुरगृहीं जाईल आणि अपकीर्ति माझ्या माथा येईल. बाबा, श्वशुरगृहनिवास फार दारुण ! मला नणंदा, जावा, भावेदीर बहुवस आहेत, ते माझा उपहास करतील. मग या जीवास उरीं कैची ? तेव्हा वाटेल ते कर, पण धनजयाला जिंक आणि तूं धन्य हो. आणि मलाही उच्च नाके श्वशुरागारीं वागता येईल असें कर." हे संसारचित्र किती ठसकेबाज झाले आहे ! सुधन्वा-प्रभावती या दांपत्याचा विनोद, वक्रोक्ति, शृंगार व वेदान्त यानीं

१७ जै. अ. ११, ७२

भरलेला आहे. पुढें एकविसाव्यांत शंकरपार्वती-विनोदांत दरिद्री नवऱ्याचा ती उपहास कसा होतो हें दिसून येतें. पुढें श्वासोच्छ्वासाबरोबर नन्दीच्या नाकांत व बाहेर येरझारा करणारा गर्वहत गरुड पाहून हसू कोसळते तिसाव्यांत रामसैन्य पाहून गर्भगलित व भयभीत झालेल्या पण निरागस ऋषिकुमाराचें चित्र बरेच हास्य-रसोत्पादक झाले आहे. चौतीसाव्यात निष्कवच केलेला कुशवीर जेव्हा लक्ष्मणाला सांगतो कीं, ' लक्ष्मणा, तू शत्रुभाव सोडून माझा कवचभार उतरलास, हे तुझे मजवर फार उपकार झाले. मीही तुझा सैन्याचा भार लौकरच दूर करून तुझा उतराई होतो. " हा वाग्बाण किती तीक्ष्ण व मर्मभेदी झाला आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. अध्याय पस्तीस मध्यें रणांगणात मूर्छित पडलेल्या भरतलक्ष्मणास पाहून—हे, सीताद्रोही म्हणून त्यास कर धरणी, ते जणू काय हात जोडून दे माय धरणी ठाय अशी तिची प्रार्थना करीत असताही, त्यास पोटात ठाव देत नाहीं—हा सीताभक्त मारुतीचा टोमणा मोठा खोंचदार व साभिप्राय आहे. अध्याय अडतीसमधील वृषकेतूबद्दल अर्जुनानें केलेला शोक आत्मनिन्दा व उपरोध यानीं तीव्रतर झाला आहे. पण अर्जुन-मृत्यूची वार्ता ऐकून शोकविव्हल झालेल्या चित्रांगदा व उलूपी यांनीं केलेली बभ्रुवाहनाची उपरोधपूर्ण निर्भर्त्सना तर अधिकच तीक्ष्ण झाली आहे. या स्थळीं शोकरस अत्यन्त दाहक भासतो. एकसष्टाव्यात " तुझ्या पदींच गंगा आहे, मग तूं बरोबर असतां पुढील मार्ग तूं भेवडवितोस तसा जरी निर्जल व निर्जन असला, तरी आम्ही भिऊन बरोबर जलसंग्रह नेण्याचा खटाटोप कशास करावा ! " असें म्हणणारा चन्द्रहास जसा स्वतःच्या एकनिष्ठेबद्दल, तसाच श्रीकृष्णाच्या विभूतिमत्वाबद्दल आपला आदर वाढवितो. बासष्टाव्यात विघ्नसन्तोषी नारदानें अश्वाच्या पुढील मार्गाचें भयानक वर्णन करुन श्रीकृष्ण व इतर

सैनिक यांस भेवडविण्याचा वृथा प्रयत्न केलेला पाहून हसूं येते एक्याहत्तरा-व्यात पुनः कळलाव्या नारदानें कृष्णार्जुन मत्स्योदरात बुडन मेले ही बातमी कृष्णस्त्रियास सांगितली, व द्रौपदीसह त्यास तत्स्थळीं नेले. त्या वेळीं शोकग्रस्त होऊन त्यानीं द्रौपदीवर चढविलेला क्रूर हल्ला फारच जहाल झाला आहे. तो पाहून जशी निरागस द्रौपदीची आपणास कींव येते, तशीच नारदाबद्दल चीडही येते. तरी पण कळीच्या नारदाची करामत पाहून एकीकडे हसूंही येतें. अध्याय एक्याण्णव मध्ये यज्ञीय अश्वाबरोबर परत आलेल्या श्रीकृष्णाचें सत्यभामेनें केलेलें स्वागत तिच्यासारख्या संशयी व मत्सरी स्त्रीस शोभण्यासारखेंच झालें आहे. ती विचारते की—अश्व-संचारात जशी आपल्या पार्थानें प्रेमळेची पैदास केली, तशी आपणही कांहीं कमाई करून आला की नाहीं? तेव्हा वरमलेला कृष्ण तिला प्रत्यक्ष उत्तर न देता भीमाला नेत्रसंकेत करून म्हणतो—"काय भीमा! तुला हें हिचें बोलणें फार फार आवडलें असेल, नाहीं का? कमाल केली हिनें बोवा! कांहीं स्थळकाळ पाहून तरी थट्टा करावी! अरे! येथें सर्व थोर वडीलधारी माणसे जमलीं असता त्यासमक्ष ही सत्यभामा माझें वर्म काढून मला असें टोंचून बोलते आहे. हें बरे का! लहानपणच्या त्या गोष्टी लहान-पणीं गेल्या! आतां म्हातारपणीं त्या कशाला? पण नाहीं. ही वारंवार माझी अशी कुचेष्टा करिते."—यातील प्रौढ पण प्रणयी दांपत्याचा नर्म-विनोद फारच चटकदार झाला आहे. तसेच या त्रिकुटाचें स्वभावरेखनही येथें मोठे मजेदार दिसून येतें. ब्याण्णवाव्या अध्यायात साठ जाडपीं सुवर्ण-कलश घेऊन पाणी आणण्याकरिता निघालीं आहेत. त्यात श्रीकृष्ण-रुक्मिणीच्या पदरास गाठ मारलेली दिसताच कलहप्रिय नारदास कलागत लावण्याची एकदम ऊर्मि आली. झालें; तो लगेच तेथून निघाला, व कृष्ण-पत्नींच्या घरोघर जाऊन कलहाग्नि चेतवण्याचा प्रयत्न करूं लागला. पण

जिथें तिथें आपला श्रीकृष्ण आहेच, असे त्याला आढळलें, तेव्हा आपणासच तर दृष्टिभ्रम झाला नाहीं, अशी शंका घेऊन तो पूर्व-स्थळीं गेला! तेथेही पूर्ववत् जेव्हा त्याने श्रीकृष्ण–रुक्मिणीचें जोडपें पाहिलें, तेव्हा मात्र हिरमुष्टी झालेलें त्याचे तोंड पाहण्यासारखें असतें. हें एकन्दर प्रकरण फारच गमतीचे झाले आहे. या अध्यायांतील एकन्दर वातावरणच इतके आनन्दमय झालेले दिसते कीं, अरुन्धतीसारख्या वनौकस ऋषिपत्नीसही रुक्मिणीची थट्टा करण्याची स्फूर्ति होते, व त्या कामात तिला सुभद्रावत्सलाचेही सहज साहाय्य मिळतें, हें पाहून आश्चर्य वाटते. सरतेशेवटीं यज्ञसमाप्तीनन्तर झालेल्या भोजनसमारंभाच्या वर्णनानें विनोदाच्या बाबतींतही चौऱ्याण्णवावा अध्याय सार्थकलशाध्याय झाला आहे. दिव्यान्नदर्शनाने अरण्यवासी भटजीबोवाची उडालेली धांदल पाहून व त्याचे एक एक तर्कवितर्क ऐकून आपण पोट धरधरून हसूं लागतो. तो थाटमाट पाहताच काहीं चकित झाले, काहीं तर अन्न परब्रह्म आहे याची सत्यता पटल्यामुळे ध्यानस्थच बसले. काहींनीं भाज्यांच्या परवडी पाहून त्याच आधीं चट्ट करून टाकण्याचा उपक्रम चालविला. मोठमोठे वडे पाहून एकजण विचारू लागला कीं, "काय हो! कसलीं हो हीं वर्तुळें?" लगेच दुसऱ्यानें उत्तर दिलें, "हा मूर्खा! एवढेसुद्धां नाहीं कळत! अरे, हे चद्रबिंब एवढ्या उंचावरून पडले म्हणून तें सच्छिद्र." "अहो, तुम्ही दोघेही वेडे दिसता. अहो, तें रथचक्र आहे, रथचक्र! समजलात का आता तरी?" असे त्या दोघांस निषेधून तिसरा ओरडला. एक तारफेण्या पाहून, ते पक्षीच पानात वाढले आहेत कीं काय, अशी शंका येऊन "अन्न विटाळलें, आता काय करावे?" असे म्हणत हात आखडून बसला. दुसऱ्याला मोदक पाहून उलूकाची भ्रान्ति झाली व तो जेवता जेवतांच उठून भीतीने पळू लागला. कोणी द्राक्षारस भातात

कालवला, कोणी खिरींत ताक घातलें. काहींनीं केळीं कढींत कुसकुरलीं तर काहींनीं आंबे सालींसकट मटकावले. येणेप्रमाणे विश्वरूपदर्शनात वर्णिल्याप्रमाणें —

"आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेन। आश्चर्यवत् वदति तथैव चान्यः॥"

अशी सर्वांची त्रेधा उडालेली पाहून मोठी मौज वाटते. अशा रीतीने सर्व ग्रंथभर विनोदपूर्ण हास्यरसाचे पाट जोराने वाहताना दिसतात येथें त्यातील केवळ एक चुटका नमुन्यादाखल दाखविला आहे. तरी पण तो श्रीधराच्या विनोदसागराची नीटशी कल्पना करून देण्यास पुरेसा आहे असे वाटतें.

आता विनोदाकडून आपण कोट्याकडे वळू.

## १८ श्रीधराच्या कोट्या

कोटिः—विनोद कल्पनानिविष्ट असतो, तर कोटी शब्दनिविष्ट असते. विनोदाचा प्रकाश चान्दण्यासारखा विस्तृत व आल्हादकारक असतो तर कोटी एकदेशीय व संकुचित असून विजेसारखी चमकून चमत्कार दाखविते, अशा कोट्याचा चमचमाट या ग्रथांत जिकडे तिकडे पाहावयास मिळतो. श्रीधर बहुधा कोट्या, श्लेष, तुलना, विरोध अथवा शब्दाची व्युत्पत्ति याच्या साह्यानें करतो, हें पुढील उदाहरणावरून दिसून येईलः—

१ ) पयःप्राशनीं करितो विष। ऐसा द्विजिव्हाचा विशेष।
मग हा जिव्हेचा विशेष। महिमा कोण वर्णील॥[१८]
त्याचा मार्ग असे मलिन॥

---

१८ जै. अ. ११, १२१

या ठिकाणीं द्विजिह्व म्हणजे 'सर्प' व सप्तजिह्व म्हणजे अग्नि' हा एक अर्थ; दुसरा-दुतोंड्या, लबाड असतो, तर साततोंड्या किती तरी लबाड असेल असा ध्वनि. त्याचा मार्ग मलिन म्हणजे अग्नीचा मार्ग धूम्रमय, पक्षीं पापमय असा अर्थ श्लेषाने सुचविला आहे.

२ ) हा तव वृद्ध असे साम्प्रत । पुराणपुरुष ऐसे म्हणवित ॥[९९]

वृद्ध म्हणजे म्हातारा, पक्षीं सन्त, साधु. पुराणपुरुष म्हणजे म्हातारा पक्षीं विष्णु:

३ ) चतुष्पद जो (सो ?) डोनिया हरी । सहस्रपदाचा धरी हरी ॥[१००]

चतुष्पद-सहस्रपद- ( पशु विराट् पुरुष ) सोडोनियां-धरी-यातील विरोध. हरी घोडा पक्षीं कृष्ण.

४ ) तूं तो षंढ वीर खरा ।
विमुख झालासी हरी (कृष्ण) आणि नरा (अर्जुन) ॥
प्राकृत हरी (घोडा) आणिला घरा । मूर्ख पुत्रा कृतघ्ना रे[१०१] ॥

५ ) सहस्रवदनशयन हरी सोडिला । चतुष्पद हरी (घोडा) आदरिला[१०२] ॥

६ ) सकळ पुऱ्यांमाजी हें रत्न । म्हणोनि रत्नपुरी अभिधान[१०३] ॥

---

९९ जै. अ. ११, १३५ ; १०० जै. अ. १२
१०१ जै. अ. ४५, २९ ; १०२ जै. अ. ४५, ३७
१०३ जै. अ. ४५, ५६

७ ) नामें असें बाळ लव । परी रणीं करील शत्रूचे रव ।।

( रलयोरभेदः रव=रडावयास, आरडावयास लावील.[१०४] रव= तुकडे करील !

८ ) तुझे अभिधान म्हणती कुश (दर्भ) । तरी तो योजितो रणयज्ञास [१०५]

अति सूक्ष्माते बोलिजे लव (लघु) । आणि तृणातें नामही लव (लव्हाळा) ।।

म्हणोनि नांव ठेविले लव । तू तंव तृण कुशशब्दे [१०६] ।।

हें ऐकून कुश रागावून काळजितास उत्तर देतो, "तुझेंही नाव व्यर्थ आहे[१०७]:--

किवा धोतऱ्यालागुन । कनकवृक्ष बोलती ।।
ना तरी विजयादशमीस । सुवर्ण बोलती शमीसी ।।
नातरी महाराष्ट्रदेशीं विभूती । म्हणती राखोंडीतें ॥
नातरी भौम नाम मंगळ । परी सर्व कर्मीं अमगळ ।।
ना तरी कल्याणी नामें केवळ । परि वर्जे सर्व कार्यीं ॥
वृषभा नाम ठेविलें वजिर । परी तो दिवसभर वाहे नीर ।।
उत्तम नामाचा बडिवार । पराक्रम नसतां कां ॥
नाम असे कमलनयन परी । काहीं त्यातें न दिसे पूर्ण ।।
तेवीं काळजित् अभिधान । कोणी तुज ठेविलें ।।
९ ) म्हणे याचें नाम धनंजय । सर्वदा यासी जय [१०८] ।।

१०४ जै. अ. ३०, ८
१०५ जै. अ. ३४, २३ ; १०६ जै. अ. ३४, ४
१०७ जै. अ. ३४, २८-३२ ; १०८ जै. अ. ३८, ४९

अशा प्रकारच्या विनोद व कोट्या यांच्या योगानें श्रीधराच्या काव्यास फार चटकदारपणा आला आहे, व या गुणामुळें वाचकांचें मन पुढें पुढें वाचण्यास धांव घेतें.

## १९ अलकार

रसांच्या दृष्टीनें पाहतां अलंकार जरी गौण मानले गेले असलें तरी त्यांच्या योगानें काव्यास शोभा येतें, त्याचें चारुत्व वाढतें, व रसांचा परिपोषहो त्याशिवाय नीटसा होत नाहीं, हें विसरतां कामा नये. श्रीधरानें ' अश्वमेधा 'त यमकानुप्रासादि शब्दालंकार व उपमारूपकादि अर्थालकार पुष्कळ उपयोजिले आहेत. प्रथम शब्दालंकारांकडे वळू. श्रीधरानें या ग्रंथात सर्वत्र ओंवीछद स्वीकारला असल्यामुळें त्याला तीन चरणांत अन्त्य-यमक साधणे अवश्यच पडलें आहे. हें अन्त्ययमक बहुधा एकाक्षरीच असतें, व हीं साधताना " न–ण "," न–र्ण " श स; ज–ज्य; टी–ष्टी; ट–त, ल-ळ, मी–म्ही; न–ज्ञ ( संपादून ); न–ण्य ( पुण्य ); ण–र्णे " अशीं यमकें जुळविलेलीं आढळतात. यांपैकीं कांहीं अक्षराचे, उ. श–स, न–ण, ल–ळ असे यमक जुळविण्याचा प्रघात पुष्कळ असून कविमान्य आहे. परन्तु, इतर प्रकार श्रीधरानें अडीअडचणीच्या प्रसगीं नाइलाज म्हणून उपयोजिलेले असावे. तरी पण ते ( नंदन–कर्ण, लंगोटी–गोष्टी; गाय- हे; भूमी–आम्ही; नंदन–यज्ञ इ. ) कर्णकटु लागतात यात संशय नाहीं व त्याची वरच्यावर होणारी पुनरावृत्ति शब्दप्रभुत्वास उणेपणाच आणणारी आहे. ज्ञानेश्वरी ओंवी साडेतीन चरणीं असते. म्हणजे शेवटला चरण आंखूड असतो. जसें:—

ऐसें मृत्यूहूनी तिख । कां घोट कढत विख ॥
डोंगर गिळतां मुख । न फाटे काई ॥

पण एकनाथी ओंवी साडेचार चरणीं मानतात. उ.

तरी काय वर्णाश्रम जाती । भक्ति निःशेष माझिती ॥
त्यांत असोनि नाहीं अहकृती । ते हे उपपोत्त बोलिलों ॥

या ठिकाणीं पहिल्या चार चरणांअतीं यमक आहे, आणि शेवटला अर्धा किंवा आखूड आहे. अशा प्रकारच्या यमकांच्या ओव्या श्रीधरानें मधून मधून या ग्रंथभर उपयोजिलेल्या आढळतातः–[१०९]

जैमिनी म्हणे जनमेजया । ऐक राया गुणनिलया ॥
पूर्वजकथा जन्हुतनया । नेई हृदयालया कर्णविवरें ॥
मग देवाप्रती बोले भीमसेन । आपले गुण माझ्या मुखेंकरून ॥
ऐकावे सकळ म्हणोन । रायाप्रति वचन बोलिलाषी ॥

मात्र ही गोष्ट खरी कीं, एकनाथी ओंव्या किंवा श्रीधरी ओंव्या वर लिहिल्याप्रमाणें साडेचार चरणी पृथक छापलेल्या नाहींत, तर चार चरणीच छापलेल्या आढळतात. असो; आता अनुप्रासाकडे वळूं.

एक किंवा अधिक वर्णाची आवृत्ति तीन तीन चार चार वेळ झाल्य चीं उदाहरणें या ग्रथात सर्वत्र आढळतात. त्यामुळें ओव्या वाचतांना व ऐकतांना मोठ्या मधुर लागतात व त्यात एक प्रकारची तालबद्धताही प्रतीत होते. पुढील उदाहरणें मुद्दाम निवडून काढलेली नसून यदृच्छेनें सापडलीं तीं घेतलीं आहेत !

१ ) जनकजननीसीं होईल । दुःखकल्लोळ तयाचे ॥
२ ) लवें वाहिनीचे केले लव.
३ ) तूं बंधुदुःखें दुःखित.

---

१०९ जै. अ. ३, ४-५

४ ) शंकरशेखरीं भूषण.

५ ) मग तो लीलालाघवी लवलाहें.

६ ) कौतु  केलें कुशवीरें.

७ ) तरी हा पितामह तपन । पतन पावेल मत्पापें ॥

८ ) खळबळविला दळसागर । अष्ट कुळाचल डळमळविले ॥

९ ) पुराणपुरुषा आद्यरूपा ।

१० ) पुत्रोत्पादनीं परमसक्त ।

११ ) जे कां कुडें कपट करिती ।

१२ ) कष्टे साधून साधन । साधक पावती स्वर्गभुवन ।

१३ ) चरणीं धरोन शतवार फिरविला.

१४ ) पूर्वज पतन पावती.

१५ ) जयाचे कोपारुण दृक्कोण । देखोण कोण ( कोपरा ) न सेवी कोण ॥

करीं घेता कोदंड जाण । कोण दंडी तयासी[११०] ॥

या श्रुतिमधुर शब्दचमत्कारानें होणारा आनन्द क्षणिकच असतो. तेव्हां यानन्तर अर्थालंकारांकडे वळूं. अर्थालंकारांमध्यें वामन, विश्वनाथ, मम्मट इत्यादिकानीं उपमेलाच अग्रस्थान दिलें आहे. तेव्हां उपमेपासूनच आपण सुरवात करूं. उपमेचा उपयोग कवि बहुधा दोन प्रकारें करतात. एक अर्थ स्पष्ट करण्यासाठीं व दुसरा सौन्दर्यवर्णनासाठीं. वेदान्तासारखे कठिण व रूक्ष विषय सहज लक्षांत यावे व ते चागले मनात ठसावे म्हणून कवि सुवर्ण व अलंकार, मृत्तिका व घट-भांडें, तन्तु व पट, रज्जु व सर्प,

---

११० जै. अ. ५१, २४

शुक्ति व रजत, जल व लंवण-वगैरे उपमा योजितात, व दुसऱ्या उपमा कविकल्पनानिर्मित किंवा कविसंकेतनिर्मित असतात. यात मुख-चंद्र, कमल नयन,चन्द्र-चकोर चन्द्र-चन्द्रकात,वगैरे सौन्दर्यपोषक उपमा येतात.पहिल्या प्रकारच्या उपमा श्रीधराने वेदान्तप्रतिपादनात जागोजाग उपयोजिल्या आहेत. त्यांत वैशिष्ट्य किंवा चारुता हीं प्रतीत होत नाहींत व त्या नित्य परिचयाच्या आहेत, म्हणून दुसऱ्या प्रकारचींच उदाहरणें पुढें दिलीं आहेतः—

१ रक्तमय दोघे शोभत । जैसे सपुष्प किंशुक ते[१११] ॥

२) अनुशाल्वीं कोंडिला असे त्यातें । बाणजाळीं न दिसे निरुतें ॥
जेवीं मेघमंडळीं रविबिंब [११२]॥

३) घोडा शिळेला चिकटलाः–दृढ शिळेसी जडला पूर्ण ।
जेवीं टंकणखार सुवर्णेसीं ॥ अश्व तेथोनि न हाले ।
जेवी कामी स्त्रीसगें[११३] ॥

४) भक्त-देवः-डांक कनकी जडे निश्चितीं ।
तैसा तवागीं जडेन मीं[११४] ॥

५) जेवीं अशक्त झालिया शरीर । कफादि रोग रोहिती ॥

६) जैसें कुलालचक्र फिरत । तैसा पार्थरथ गगनीं भ्रमत[११५] ॥

---

१११ जै. अ. १८, १०१ ; ११२ जै. अ. १५, १८
११३ जै. अ. १६, १६-१९ ; ११४ जै. अ. ४५, ५.
११५ जै. अ. ३९, ७०

७) जैसी सुवर्ण-अंगें असतां लाख। तयेसी पूजिती सर्व लोक ॥
(श्रीकृष्ण-अर्जुन)

८) जशी पतिव्रता भ्रतारचरण लाक्षिते, तसा यौवनाश्व घोडा रक्षीत होता.

९) रथीं पताका फडफडती। जेवीं रसना काळाच्या ॥

१०) स्वामी चालिला तारकावरी। कीं राम दशाननावरी ॥
कीं अंधकावरी त्रिपुरारी। तेवीं कुशेंद्र चालिला[116] ॥

११) जेवीं पतंग धांवे दीपावरी। कीं मत्स्य धांवे बाडिशावरी।
तेवीं राजा सपरिवारीं। सैन्यपाळावरी धांवला[117] ॥

१२) जेवीं अचल चित्रस्थ देवता। तेवीं झाले सातेतें[118] ॥
जेवीं विद्युल्लताध्वनि ऐकोनी। भय पाविजे निस्तेजपणीं।
ना तरी सर्व हारिलिया नृपगणीं। धानिक जैसा तटस्थ[119] ॥
वातें पडे जैसी केळी। तैसी पडली जनकबाळी ॥

१३) कवचापासोनि मुक्त झाला। तेव्हां कुश वीर कैसा शोभला ॥
जीर्णकाती सोडोनि वहिला। शोभे जैसा सर्पराज[120] ॥

वरील थोड्याशाच उदाहरणावरून श्रीधराच्या उपमांचे वैचित्र्य दिसून येईल. टंकणखार–सुवर्ण, डाक–कनक, लाख–सुवर्ण, कुलालचक्र

---

११६ जै. अ. ३१, ४०

११७ जै. अ. ७४, ९२ ; ११८ जै. अ. ३१, १०

११९ जै. अ. ३१, ११ ; १२० जै. अ. ३४, ८

वगैरे व्यवहारांतील उपमांनीं त्याचें सूक्ष्म निरीक्षण प्रतीत होतें त्याच-प्रमाणें रथपताकाना काळरसनेची दिलेली उपमा त्याची उत्कृष्ट कल्पकता सुचविते व पुढें होणारा सैन्यघात तिच्यावरून चांगला ध्वनित होतो. दहाव्या व अकराव्या उदाहरणावरून एकच गोष्ट अनेक उपमानीं उठाव-दार करून दाखविण्याची कवीची हातोटी चागलीच प्रत्ययास येते. पतंग व दीप, मत्स्य व बडिश या जोड उपमानीं निश्चयाने होणारा पण अपरि-हार्य भावी नाश मोठ्या खुबीनें त्यानें सूचित केला आहे. निष्कवच झालेल्या कुशास दिलेली निर्मोक सर्पाची कालिदासीय उपमा अर्थपूर्ण व चमत्कृतिपूर्ण आहे. बाराव्या उदाहरणात लवास युद्धात लक्ष्मणाने घायाळ करून बाधून नेलें ही बातमी ऐकताच सीतेची झालेली अवस्था फारच कौशल्यानें वर्णिली आहे. आकस्मिक वार्तेनें एकदम तिच्या गात्राचे चलन-वलन थाबून त्यास स्तिमितता आली. संकटाची किंचित् जाणीव होते न होते तो ती एकाएकीं अगावर वीज कडकडून पडल्याप्रमाणें भीतीनें ग्रस्त होऊन निष्प्रभ झाली. पुढें काय करावे हे सुचेना म्हणून सरते शेवटीं अशरण होत्साती धाडकन् धरणीवर पडली. हें चित्र हृदयस्पर्शी नाहीं असें कोण म्हणेल ?

रूपकः—रूपक हा प्रकार जरी उपमेवरच आधारलेला असला, तरी तें योजण्यास अधिक चातुर्य लागतें. म्हणूनच उत्कृष्ट रूपकें अधिक काव्यमय वाटतात, हें पुष्कळसें खरें आहे. पूर्वीच सागितल्याप्रमाणें रूपकें योजण्याची श्रीधरास अनिवार आवड दिसते. पदोपदीं रूपक योजिलेलें आढळतें त्यामुळें सांग, निरंग, समस्तवस्तुविष, परंपरित, मालारूपक वगैरे सर्व प्रकार त्याच्या काव्यांत विपुल आढळतात. पुढे कांहीं उदाहरणें दिलीं आहेतः—

१ ) निरंगरूपकः—यास शुद्ध रूपकही म्हणतात. यांत एकास दुसऱ्याची अपेक्षा नसतेः–

हरिपदांबुजे नमिलीं ॥ कळिकाळा न मानी ॥
संसारवृक्ष कथानिधान बोलावी ॥ ऐक कथासुरतरंगिणी ।
म्हणे बोले कथारससागर ॥ इ.

२ ) समासविरहित रूपकें:—धर्म भगवत्–प्रेमाचा अगाध सिंधु ।
आगमनिगमाचा कल्पद्रुम ।
सकळ विद्यावल्लीचा आराम । अनुभवाचा अक्षय सोम ॥
महापातकाचे पर्वत । कां स्वप्नींचें सुकृत ।
दिल्हें मंदिर मुक्तीचें ॥ ऐसा धर्ममुखयंत्रींचा शब्दगोळ ॥
तूं आमुची आधारभूमि ॥ जी अविश्वासवनींची लता ।
कीं अर्गळा स्वर्गकपाटाची[१२१]॥कीं साहसकर्मांचें नगर विस्तृत॥
(स्त्रीवर्णन).

३ ) सांगः—-(अ) एकदेशविवर्ती–यात उपमानांचा उल्लेख स्पष्ट नसतो, पण उपमेयांचा असतो.—

जी पाडी पुरुषधैर्य पर्वत । दर्शनवज्रें करूनिया ॥[१२२]
[पर्वत, वज्र हीं उपमानें उक्त आहेत, पण इन्द्र हें अनुक्त आहे]
कामिनीराहूचें ग्रहण लागलें होतें वीरदशेसि पूर्ण ॥
पार्थें मुक्तिधन देऊन । तें मुक्त केलें निजबळें ॥[१२३]
[राहु व धन हीं उपमाने उक्त पण चंद्र हे अनुक्त ] (मुक्तिधन कीं भुक्तिधन ?)

---

१२१ जै. अ. २२, ३९-४० ; १२२ जै. अ २२, ४०
१२३ जै. अ. २२, ६८

(ब) समस्तवस्तुविषयः —परस्पर सापेक्ष, व ज्यात उपमेयाप्रमाणें सर्व उपमानेही उक्त आहेत, अशीं अनेक रूपकें एकत्र होऊन एक समग्र रूपक तयार होतें:—

१) श्रोत्या हृदयीं संशय झाड । अविश्वासें वाढलें दृढ ॥
विकल्प डाहाळ्या होत प्रचंड । भ्रांति पल्लव लसलसिती ॥
अहंफळें जे सदा फळत । ममताकुसुमीं जे पुष्पित ॥
ऐसियाचीं जे फळें भक्षित । स्वसुख तयातें असेना[१२४] ॥

२) रत्नखचित तट स्यंदन । त्यावरी बैसला भूप ओदन ॥
तप्तकनकवर्ण वरान्न । शिरीं आतपत्र साजिरें ॥
शाका सेवकपंक्ती शोभत । बरवा प्रधान ते घृत ॥
कथिका वाद्य शोभत । चामरें करपल्लवाचीं ।
ऐशिया परिवारें शृंगारिला । ओदनभूपति तो निघाला ॥
तेणें जठराग्नि संहारिला । घडी न लागतां निजबळें[१२५] ॥

३) ऐक पूर्वजकथा भागीरथी ॥...॥
व्यास स्वर्गींहून जन्मली । सूत गंगाद्वारीं प्रगटली ॥
श्रोता भगीरथें आणिली ॥ निजपूर्वज तारावया ॥
क्रोधकपिलें जाळिले । विषयविषें सगर झाले ॥
ते ये गंगेनें उद्धारिले ॥ नाहीं आणिलें जन्ममरणा ॥
ओष्ठपुटें दोन्ही तटें । मध्यें कथामृतजळ गोमटें ॥
प्रेमतरंग उठती नेटें । आवर्त तेथें असतीच ना ॥

---

१२४ जै. अ. ८१, ७–८ ; १२५ जै. अ. ९, ४४–४६

४) ही अनंतवदना झाली । अद्वयसागरा मिळाली ॥
उत्तम मध्यमें उच्चारिली । यापरी व्यापिली त्रिभुवनीं ॥
ये नदींतलि जळचर थोर । ध्रुवप्रल्हाद विधिपुत्र ॥
येथील अनंत एक कर्णधार । आवली ( वल्हवी ) कृपादृष्टीनें ॥
तीरीं स्वधर्मतरु शोभती । भक्तिलतावेष्टित दिसती ॥
ज्ञानविज्ञानफळें लवती । देखता हरिती भवश्रम ॥
त्यावरी मुमुक्षुनर विहंगम ॥ फळे सेविता जाय भवभ्रम ॥
अखंड परम आनंद आराम । होय सद्भावें सेविता ॥

४ परंपरित रूपकः—एक रूपक केल्याने जें दुसरे कराबे लागते ते

१ ) भारतवंशसगितारमण । त्यामाजी जन्मला चंद्र परीक्षितीनंदन ॥
जेणें जैमिनि चंद्रकांत द्रवोन । शीतळ त्रिभुवन तेणे केलें[१२६] ॥

२ ) गोत्रजवनवैश्वानरा । वाक्यामृतें विज्ञवी तू[१२७] ॥

३ ) जैमिनिवाक्य जलधर । वर्षेल कथामृतसार ॥
तें भरावें श्रोत्रपात्रीं सादर ॥ म्हणे श्रीधर श्रोतयांतें[१२८] ॥

४ ) हरिकथामृत बलाहका । माझ्या कर्णयुगुलचातका ॥
वचनामृतें तृप्त करी[१२९] ॥

५ ) पुढें तुरंगारूढ ज्या नारी । तिहीं भ्रूचाप ओढोनि सत्वरीं ॥
नयनकटाक्षांच्या शरधारीं । सकळ वीर विंधिले[१३०] ॥

---

१२६ जै. अ. १, ३६ ; १२७ जै. अ. १, ५५
१२८ जै. अ. १, १२० ; १२९ जै. अ. ३, २
१३० जै अ. २२, १३

अशीं रूपकाच्या सर्व प्रकारचीं अनेक उदाहरणे ग्रंथभर आहेत. पण विस्तारभयास्तव अधिक देता येत नाहींत. वरील अवतरणातील पुष्कळ कल्पना नवीन चमत्कृतिजनक आहेत. त्यातल्या त्यान भृ यआदनाचं रूपक इतके खुबीदार व कुतूहलकारक झाले आहे कीं, ते मुक्तेश्वरासारख्या प्रतिभावान कवीलाही शोभावे.

उत्प्रेक्षा: —सुंदर उत्प्रेक्षाही जिकडे तिकडे विखुरलेल्या आढळतात. काहीं उदाहरणे पुढे दिलीं आहेत:—

१ ) अंगीं उठले घर्मतरंग । तेणे गलित वीरांग राग ॥
नेणों उमटला संध्याराग । दिवस असतां रणभूमी [१३१] ॥

२ ) नेणों तयाचें भये करून । कर्णे सर्प झाले कर्णहीन ॥
किंवा तेंचि भय पोटीं धरून । चरण पोटांत निघाले ॥

रणातील भयंकर आवाजानें सर्वांची स्थिति नावीन्यपूर्ण वर्णिली आहे.

३ ) बाणवस्त्रें सेनासुंदरी । नग्न म्हणोनि झाकिलीसे [१३२] ॥

४ ) वनीं सीताशोक श्रवणोत्तरें । गहिंवरलीं वनचरें ॥
नेत्रापासूनी सोडिती नीरें । नेणों गळत्या भूलिंगा [१३३] ॥

५ ) मनोजवें अश्व धावती । किंकाट शब्दे गर्जती ॥
रथचक्रें जीं घडघडती । नेणों प्रळयींचे मेघ काय [१३४] ॥

---

१३१ जै. अ. १८, २८ ; १३२ जै. अ. १८, ८८
१३३ जै अ. २८, ८१ ; १३४ जै. अ. ५१, ५-६, ११

चंद्रबिंबाकार विचित्रें । आकाशीं दाटलीं तीं छत्रे ।।
माजी चामरें उडती पवित्रें । नेणो गगांबुकल्लोळ ।।
रजें न दिसे अंशुमाळी । कीं ते न दिसे किरणावळी ।।
धुळीवस्त्रे तनु झांकिली । लज्जायमान म्हणोनि ।।

६ ) व्यासागमनः--तव यदृच्छया पातला बादरायण ।।
कीं तो तापेवीण सहस्रकिरण । गगनींहून उतरला[135] ।।

७ ) भद्रावती वर्णन. -प्रासाद सौध गृहगोपुरें ।।
नेणों हिमालयाचीं शिखरें ।।

८ ) शामकर्ण अश्वाचे चालणें:--
नेणो काय अतरिक्ष चालत । भूमीस पाय तो न लावित ।।
म्हणे व्यभिचारिणी नृपभुक्त । इयेमीं पादस्पर्श न करावा ।।
चालता चुकविता मान । नेणों पाचारितो मघवागालागुन ।।
म्हणे मज जाई घेऊन । धर्मसदन पहावया[136] ।।

९ ) अश्ववर्णनः -दो भार्गी केला दळभार ।।
मधून चालविला अश्ववर ।
नेणों काय लावण्यसागर । तेथेंचि आटिला विधानें[137] ।।

१०) घोड्याचे वर्णनः--कीं तें चातुर्यवन फुलले । कीं भूमंडळीं शशिमंडळ उदेलें[138] ।।

११) तो देवभक्तांचा सोहळा । नेणों ब्रह्मानद गोठला[139] ।।

---

१३५ जै. अ. १, ५६.
१३६ जै. अ. ४, ४०-४१ ; १३७ जै. अ. १२, ८१
१३८ जै. अ. २४, ११० ; १३९ जै अ. ७, ४६

१२) माहिष्मतीवर्णन —
दुर्गप्राकारें गगना । टेकणीं दिधली वाटतसे[१४०]॥
१३) तियेचे रूप अति सुदर । मदनवधूगर्वाचळशिखर ॥
समूळ करावया चूर । नेणों वज्र गमताहे[१४१] ॥
(मदनमजरीचे वर्णन)
१४) वृषकेतावर वीराचा हल्ला–त्यावरी सैन्य लोटलें अपार ॥
नेणो धावले ते गिरिवर । अमरनाथ जिंकावया[१४२] ॥
किंवा जिकावया कुभसभव। नेणो धाविन्नला तो जळार्णव[१४३]॥
१५) नेणो धरेवरी चद्रमंडळ । छत्रमिषें पीत केलें सकळ ॥
कळसमुखें भृगुगुरु केवळ । आले वाटत धरेवरी[१४४] ॥

सर्पाचे कर्णपदहीनत्व स्वाभाविक असता तें त्यास जणुं भयकर रण धुमाळीनें आले अशी दुसऱ्या उदाहरणात केलेली कल्पना; चौथ्यातील अश्रुरूपानें जणू काय भूलिंगावर गळत्याच लाविल्या आहेत कीं काय ही मुक्तेश्वरी उत्प्रेक्षा, पाचव्यातील रथाच्या घडघडाटावर मेघाच्या गडगडाटाची केलेली सार्थ संभावना; त्यातीलच पुढील छत्रांवर गंगाबुकल्लोळांची व पुनः पधराव्यात छत्रास चद्रमडळ कल्पून व त्याच्या कलशास शुक्र-गुरु मानून प्रकट केलेली अभिनव कल्पना; पाचव्यांतील बाणकादंबरीची आठवण करून देणारें "रेणुवर्णन"; आठव्यांतील, नवव्यातील व दहाव्यांतील अभूतपूर्व अश्ववर्णन; व तेराव्यातील मदनवधूगर्वाचळशिखर भेदणाऱ्या मदन-

---

१४० जै. अ. १४, ९४ ; १४१ जै. अ. १४, १०२
१४२ जै. अ. ४, २६ ; १४३ जै. अ. ४, १२०
१४४ जै. अ. १२, ४०

मंजरीरूप वज्राची कल्पना ;–सर्व ठिकाणीं कवीच्या सपूर्ण कल्पनावैभवाचा विलास पाहावयास मिळतो. अशीं स्थळे ग्रंथात किती तरी आहेत. या थोड्याशा वानगीनें वाचकाचा क्षुद्बोध होऊन त्याचा आस्वाद त्यानीं मुळातच घ्यावा.

अतिशयोक्तिः–ज्याप्रमाणें उपमेचा आधार अनेक अलंकारास घ्यावा लागतो, त्य प्रमाणें अतिशयोक्तीची मदतही त्याच्या उठावदारपणास उपयोगी पडते; म्हणून या अलंकाराचें महत्त्व मोठे आहे. अतिशयोक्तीचे बहुतेक सर्व प्रकार श्रीधरानें या ग्रंथात उपयोजिलेले दिसतात

"कार्यकारणयोर्यश्च पौर्वापर्यविपर्ययः ।"

असा मम्मटानें जो एक भेद या अलंकाराचा मानिला आहे, त्याचें उदाहरण पाहाः—

आधीं पुष्प मग फळ । ऐसा याचा विचार सकळ ॥
तुझे ठायीं विपरीत केवळ । पुष्पावीण फळें उरीं[१४५] ॥

त्याचप्रमाणें जगन्नाथानें "असबंधे संबधः" व "संबंधेऽपि असंबंधः" असे दोन भेद मानिले आहेत. त्याचीं पुढील उदाहरणें पाहाः —

कीर्ति हासिनी गेली सत्यलोका । ती विधि वाहनासी रमली देखा ॥
येतां नभीं अडखळे ऐका ॥ तो चंद्र झाला या लोकीं[१४६] ॥
माझा सैन्यरेणु जो उडाला । तेणे सागरीं चिखल केला ॥
येता त्या पके चंद्र माखला । तो पंक म्हणती कलक[१४६] (अ)॥

---

१४५ जै. अ. ५४, ७२ ; १४६ जै. अ.६५, ९,
२४६ (अ) ६५, २१६

त्याचप्रमाणे "यदि शब्देन चेत् शब्देन वा उक्तौ यत् असंभाविन' अर्थस्य कल्पनम्" असा जो एक भेद मम्मटानें सांगितला आहे, त्याचीं तर पुष्कळच उदाहरणें या ग्रंथांत सापडतात:—

सागरोदरीं पडलिया मुक्ताफळा । ते जरी काढील आंधळा ॥
तरीच हा हरी (अश्व) तुम्हाला । प्राप्त होईल निर्धारे ॥
काळवदनीं पडलिया जीवित्व । जरी पुनः होईल हस्तगत ॥
तरीच हा हरि तुम्हास प्राप्त । होईल ऐसे जाणावे[१४७] ॥
जरी मूषक बळें माजला । तरी उचलोनी पाडील काय कनकाचला ॥
कीं प्रलयकाळींच्या घनमंडळा । व्यजनपवन उडवील[१४८] ॥

अशा प्रकारचीं उदाहरणे अनेक सापडतात. यात श्रीधराचा विशेष हा कीं, तीं तो एकावर एक पुष्कळ मालारूपाने देतो. त्यामुळे इष्टार्थव्यक्ति फारच परिणामकारक रीतीने होते.

निदर्शना—'उपमा परिकल्पक अभवन् वस्तुसंबन्ध' दाखवून निदर्शनालंकारही श्रीधरानें जागोजाग केलेला आढळतो. स्त्रीनिंदावर्णनांत तो म्हणतो:—

"सुमनमाळेचिये परी । कुपित सर्पिणी धरवेल करीं ॥
परी कोण्याही मंत्रें न आवरी । चित्तवृत्ती स्त्रियाची[१४९] ॥

तर दुष्टांबद्दल तो असें सांगतो कीं[१५०]:—

---

१४७ जै. अ. ४, ८६-८७ ; १४८ जै. अ. २२. ५५
१४९ जै. अ. ११, ५२ ; १५० जै. अ. ४०, १४

मकरव्रक्त्रींचें घेइजे मुक्ताफळ । वहातां सांपडेल सागर मेळ ।
हेंही घडेल एक वेळ । परि दुष्टचित्त न शोधवे ॥

व्याजस्तुतिः—वरून स्तुति पण आतून निंदा, किंवा वरून निंदा परंतु आतून स्तुति, अशा प्रकारचीं वर्णनें तर मागील अलंकाराहून अधिक सापडतात. त्यातल्या त्यात या अलकाराच्या दुसऱ्या प्रकाराचा उपयोग श्रीधराने या ग्रथात फारच विस्तृत प्रमाणावर केला आहे आणि त्याच्या विनोदाची उभारणी बहुधा यावरच कशी झाली आहे हे मागे दाखविलेच आहे. पहिल्याचे उदाहरण पाहाः—प्रद्युम्न युद्धात मूर्च्छित झालेला पाहून त्याची निर्भर्त्सना करणाऱ्या श्रीकृष्णास भीम म्हणतो[१५१]: –

तुम्ही तों बलाढ्य गहन । कधीं केले नाहीं पलायन ॥
पाठीं लागतां काळयवन । मुचकुंद झाला प्राणदाता ॥

दुसरें[१५२]:—अश्वहरणाच्या वेळी यौवनाश्वाशीं लढण्यास जेव्हा भीम चवताळून जाऊं लागला, तेव्हा त्याला अडवून वृषकेतु म्हणतो:—

स्वामी तुम्ही मज अतिप्रीतीं । पूर्वीं दिधली सेना युवती ।
तिचा अभिलाष धरिता चित्तीं । तुम्हा दिनपति हसेल ॥
दोघांसी बिघडावयाप्रती । ही तुमची नव्हे वडिलनीती ।
मजवरी तिची अति प्रीती । समान वयातें पाहुनी[१५३] ॥

या ठळक अलंकाराशिवाय इतर अलंकारही कुठें कुठें आढळतात, त्यांचीं पुढे कांहीं उदाहरणें देऊं:—

१५१ जै. अ. १३, ५०
१५२ जै. अ. ४, १२३ ; १५३ जै. अ. ४, १२७

कारण पुरें नसतां कार्योत्पत्ति झाली असें वर्णन केलें असता " विभावना " अलंकार होतो. पाहा[१५४]:--

घटीं जन्मला जो अगस्ती । तेणे सर्व गिळिला सरितापति॥

ज्या साधनाने एखादा एखादें कार्य साधतो, त्याच साधनानें दुसरा त्याचा विघात करतो. अशा प्रकारे होणाऱ्या 'व्याघात' अलंकाराचे उदाहरण पाहाः--

ऐकिली धनुर्धराची ख्याति । ते शरेंकरूनि द्विधा करिती ॥
परी या कामबाणाची स्थिती । लागता ऐक्य उभयता[१५५] ॥

उपमेयाचा निषेध करून ते उपमानच आहे असे विधान केलें असता अपन्हुति अलकार होतो तोही क्वचित दृष्टीस पडतो: —लवा-संबंधाने शत्रुसैनिक म्हणतातः —

हा नव्हे बाळ । आम्हास भासतो कृतात काळ ॥
मुख नव्हे हा रोहिणीधव । अश्रु नव्हती अमृतस्राव[१५६] ।

गुणसंबंधाने उपमेयाचे उपमानापेक्षां ज्यांत आधिक्य वर्णिलें असतें असा व्यतिरेक अलकार पाहाः-

तरी ब्रह्मस्वाएवढें कालकूट । नाहीं त्रैलोक्यामाजीं वरिष्ठ ॥
जें मूळवशाचा भरी घोट । तें विष मारी एकातें ॥[१५७]
बहुतकाळ तृषाक्रांत चातक । होता ऊर्ध्व करूनिया मुख ॥

---

१५४ जै. अ. २, २८ ; १५५ जै. अ. ७८, ५५
१५६ जै. अ. ५२, १४ ; १५७ जै. अ. १, ८२



६५

तों भाग्ये पातला चलाहक । तो मुखीं खादिरांगार वर्षला[१५८] ॥
आणि नाना बुद्धीनें बोधिला । परी ममता नयेचि खळाला ॥
बहुकाल दुग्धीं शिजविला । परि गोटा नये पक्वते[१५९] ॥

अशा रीतीनें साधलेले अनुक्रमे विषम व विशेषोक्ति हेही अलंकार पाहावयास मिळतात

हिरांनि घेतला काचमणी । हातीं दिधला चिंतामणि ॥
कनकतरू (धोत्रा) उपडोनी अगणीं । लाविला चळे सुरतरू ॥[१६०]
आता माझा सुमन मज देई तू मुक्तिधन[१६१] ॥

अशा ध्वनिमयानीं केलेला सुंदर परिवृत्ति अलंकार, त्याचप्रमाणें साभिप्राय विशेषणाविशेष्यानीं घडणारे पुढीलप्रमाणे परिकर व परिकरांकुरालंकारही आहेत:—

तू दानशूराचा नन्दन । हा प्रत्यय आला मजलागून ॥
आपलें अपार पुण्य वेचून । प्राणदान मज दीधलें[१६२] ॥
वर्षती बाणांचे पूर । तेणे पडला अंधकार ॥
काठे न दिसे दिनकर ( कर्णपिता ) । म्हणोनि रविनातु कर्णपुत्र ( वृषकेतु ) उठावला[१६३] ॥

तसेच एका हेतूनें कार्यसिद्धि होण्यासारखी असतां तो सांगून दुसरेही हेतु ज्यात सांगितले असतात अशा "समुच्चय" अलंकाराचें सुंदर उदाहरण पाहा:—

---

१५८ जै. अ. ३, ४९ ; १५९ जै. अ. ४, १०
१६० जै अ. २, १९ , १६१ जै. अ. १०, ५७
१६२ जै. अ. ५, ५४ ; १६३ जै. अ ४, १०६

आधींच क्षीरनिधीचें जीवन । तयावरी पडिले चंद्राकिरण ।
कुसुमगंधीचा मलय पवन । मिळता काय नाप उरे [१६४]॥

आधाराधेयापैकीं एकाचा अतिविस्तृतपणा दाखविण्यासाठीं दुसऱ्याला न्यूनत्व दिलेलें असते तेव्हा अधिक अलंकार होतो. याचेही उदाहरण सापडते.

अनंत ब्रह्मांडाच्या कोटी । उदरीं वसता न होय दाटी ।
भीमवचनानन्द त्या पोटीं । न माय हर्ष उचंबळला [१६५] ॥

कोशपुष्पास जेथें बंधन । द्यूत सारीस असे मरण ॥
छत्रालागीं असे दंडधारण । सुरतीं हारी पुरुषातें ॥

याप्रमाणे " परिसंख्या " अलंकार मधून मधून त्याच्या काव्यास शोभा देतो. हें अलंकारप्रकरण एकन्दरींत अगोदरच अजमासाबाहेर लांबलें आहे, तरी पण आता " मीलित " अलंकाराचें एक अत्यंत हृदयगम उदाहरण देऊन तें आटोपतें घेऊ दुन्दुभी आपल्या कीर्तीचें वर्णन करीत असताना म्हणतो [१६६].--

माझी कीर्ति दाटोनि प्रबळ । तेणें विश्व केलें धवळ ॥
जवळीं असता भूतपाळ । न दिसे तो गौरीशीं ॥
इंद्र शोधीतसे ऐरावत । कीं हिमगिरी शोधी भूतनाथ ।
कीं क्षीरनिधि पाहे रमाकात । कोठें हरपला म्हणोनि ॥

भ्रांतिमान. ससंदेह, प्रतीप, असंगति, अर्थान्तरन्यास, सम, लोकोक्ति, वगैरे इतर अनेक अलंकारही आढळतात; परतु स्थलावकाश

१६४ जै अ. ४२, २ ; १६५ जै. अ. ३, ४२
१६६ जै. अ. ६५, ६–८

नसल्यामुळें क्वचित् त्यांचा नुसता नामनिर्देशच करणे भाग आहे. तरी पण इतके अलकार सागूनही आम्ही एक मुख्य अलंकार जो श्लेष त्याचीं उदाहरणे दिलीं नाहींत हें रसिक वाचकांच्या लक्षांत सहज आलें असेल. त्याचे कारण स्थलावकाश नाहीं हें तर एक आहेच, पण दुसरें असे कीं, दण्डीनें म्हटल्याप्रमाणें:—

" श्लेष: सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम् " ।

तो पुष्कळशा अलंकाराना आधारभूत असल्यामुळे वर दिलेल्या उदाहरणात त्या त्या अलकारासमवेत त्याचाही या शिष्ट पक्तींचा लाभ झालाच आहे. शिवाय विनोद व कोटि याच्या उदाहरणांत तर याचे दर्शन प्रामुख्याने जागोजाग होण्यासारखे आहेच. तेव्हा या न्यूनतेबद्दल रसिक रुष्ट होणार नाहींत असें खास वाटते. एकन्दरींत श्रीधराचा—

" अलकाररत्नाकर । गमे अतीव दुस्तर ॥
तो वर्णावया सविस्तर । कोण असे समर्थ ॥ "

असे खरे. म्हणून त्यातील महार्ह अशीं रत्ने यथामति वेंचून त्याची दुकानातील दर्शनीय वस्तुसग्रहाप्रमाणे एक लहानशी अलकार-मंजुषा बनाविली आहे, व तीं रसिक रत्नपारख्यापुढें ठेविली आहे. हेतु हा कीं, त्याना तिजवरून श्रीधराच्या वाग्विलासाची, त्याच्या काव्यलावण्याची कल्पना व्हावी व त्याच्या अलंकाररत्नाकराचा ठाव घेता यावा. पण तसें करताना त्या त्या अलंकाराची यथायोग्य माडणीत अगर त्यांवर नामाभिधानाच्या उचित चिठ्या डकविण्यात लेखकाकडून जर कांहीं प्रमाद घडले असतील, तर ते सुधारून घ्यावे अशी रसिकास विनंती.

## २० रसपरिपोष

काव्यदेहावर कितीही अलंकार घातले, तरी काव्यात्मा जो रस

त्याशिवाय त्यास शोभा नाहीं; तेव्हां आता याकडे वळूं. ज्याप्रमाणें ज्ञानदेवानें गीतेसारख्या तात्त्विक ग्रंथावर टीका लिहिताना अलंकार व रस यांजकडे मुद्दाम लक्ष पुरविले आहे, तसें त्यानें—

उपमा श्लेष कोदाकोंदी । झाडा देईन प्रतिपदीं ।
प्रथार्थासि[167] ॥ व
जेथें शाताचिया घरा । अद्भुत आलासे पाहुणेरा ।
अणि येराही रसा पांतिकरा । जाहला मानु[168]

असें त्यासबधीं स्पष्ट सागितलेंही आहे. त्याचप्रमाणे श्रीधरानें जरी अश्वमेधकथेचें—

"जयें नाश होय भवशोका । परम पदाते पाववीं[169] ॥"
असें मुख्यतः वर्णन केलें आहे, तरी—
"नवरसयुक्त हरिकथा । सांगावया आनंद[170] ॥"

असे म्हणून ती नवरसांनीं युक्त आहे असेंही सुचविलें आहे. मागें सांगितल्याप्रमाणें या ग्रथांत वीररसालाच मुख्य स्थान मिळालें असून बाकीच्यांस प्रसंगानुरूप पांतिकरांचा लाभ झाला आहे, असें आम्हांस वाटतें. तरी पण रसाचा विचार नेहमींच्या अनुक्रमानेंच पुढें करण्याचें योजिलें आहे. तेव्हां प्रथम शृंगाराकडे वळूं.

१) शृंगाररसः—जैमिनीच्या 'अश्वमेधांत' पुष्कळ स्थळीं शृंगारवर्णने आलीं आहेत. श्रीधराच्यापुढे तो ग्रंथ असल्यामुळें त्यानेंही त्या त्या

१६७ ज्ञानेश्वरी. १३, ११६४ ; १६८ ज्ञानेश्वरी. ११, २
१६९ जै. अ. ९४, १ ; १७० जै. अ. ९०, ४

ठिकाणीं तीं आपल्या ग्रंथात आणिलीं आहेत. परंतु त्याचें शब्दशः भाषांतर न करितां स्वतच्या प्रतिभेनें त्यात पदरचा मालमसाला घालून तीं फार चटकदार केलीं आहेत. चौथ्या अध्यायात वृषकेतावर जेव्हा यौवनाश्वाच्या सैन्याचा एकदम जोराचा हल्ला झाला, तेव्हां भीम क्रोधाविष्ट होऊन त्याच्या मदतीस जाऊं लागला, तेव्हा वृषकेतूने त्यास वारिलें. त्या वेळच्या सेनायुवतीरूपकात आपणास प्रथमच शृंगाररस आढळून येतो तो म्हणतो.—

"मजवरी तिचा अनुराग । आतांचि खवळला युद्धानंग ।
आनंद देत असे अंगसंग । तरी तुम्ही सवेग परतावे[१७१] ॥"

मात्र या ठिकाणीं तो वीररसाच्या अंगभूत असल्यामुळें गौण आहे. पुढें नवव्या अध्यायात श्रीकृष्ण भोजनास बसले असता सत्यभामेनें केलेल्या विनोदात किंचित् शृंगाराची छटा आहे. पुढे अकराव्या अध्यायात नापिती, बुरुडी, तेलिणा व कुटणीविषयीं भीमाने केलेल्या कृष्णाच्या थट्टेत शृंगार नसून शृंगाराभास आहे. चौदाव्यात अखेरीस नीलध्वज व मदनमंजरी याचें वनक्रीडेचें वर्णन मोठें सुरस झालें आहे. शृंगाराचा उत्कृष्ट परिपोष झाल्याचें उदाहरण आपणास सतराव्या अध्यायात सापडतें. युद्धास जाण्यापूर्वी सुधन्वा आपली प्रिय पत्नी जी प्रभावती तिला भेटावयास जातो, त्या प्रसंगाचें तें वर्णन आहे. पुढें नमुन्यासाठीं म्हणून लहानसाच उतारा दिला आहे[१७२]:—

वीर निघे तेथूनी । तंव मार्गीं उभीं देखे रमणी ॥
कराबुजीं कनकपात्र घेउनी । पंचदीपें शोभलीं ॥

---

१७१ जै. अ. ४, १२५ ; १७२ जै. अ. १७, ७०–८४

सुगंध तैलाभ्यंग करून । कनकवस्त्र करून परिधान ।।
रत्नखचित कचुकी लेऊन । लेइली भूषणें यथास्थानीं ।।
भुजंगशिरीं दीर्घवेणी । मौळीं शीसमणि कृष्णा फणी ।।
प्रभावती चंदनतरु जाणोनी । सुवासलोभे गुंतला ।।
आकर्णनयन शुकनासिक । सस्मित शोभे मुखमृगांक ।।
माजी कस्तूरीबिंदु कलंक । धवाक्षिचकोरतृप्ती करी ।।
पतनभयें शुकबिंब । कनकशलाकेचा करोनि अवलंब ।।
मुक्तमिषें नासिकीं राहोनि अधरबिंब । चुंबावया धाविन्नला ।।
तेणें केलें सबळ मन । म्हणोनि झाला काय एक नयन ।।
मग करूनिया अनुष्ठान । गगनमडळीं प्रकाशे ।।
आधीं अधर जिंकिनी प्रवाळ । वरी घेतले सुगंध तांबूल ।।
बोलता दंतपक्तीचे झळाळ । उठती कल्लोळ प्रभेचे ।।
वक्षस्थळीं कुचमंडळ । मदनाचें भेरीयुगळ ।।
त्रिभुवन जिंकोनिया सकळ । न्युब्ज[१७३] करोनि तो गेला ।।
मुक्तावळीं ती भीष्ममाता । उदरीं रोमावळी ती रविसुता ।।
कुंकुमरेखा सरस्वती सरिता । गुप्त जाणा येथुनी ।।
हा देखोनिया प्रयाग । तेथें बैसोनिया अनग ।।
अनुष्ठान करीतसे सांग । दिव्य अंग पावावया ।।

.....................  ..................

तिचें देखोनि लावण्यरूप । वातवेगें करदीप ।।
आनंदें करती शिरकप । धन्य निर्मिता तो विधी ।।

---

१७३ Turned or bent downwards; lying on the face Sk. Dictionary–Vaidya

जिनें देखोनि रूपवैभव । दुःखित होईल मनोभव ॥
होता रतीस लावण्यगर्व । तो निःशेष गेला तियेचा ॥

पुढें दोघांचा झालेला प्रेमसंवाद बराच लांबला आहे तो मोठा हृद्य आहे. पण तो द्यावा—

तरी विस्तारेल ग्रंथरचना म्हणोनि किंचित स्वरूपसूचना ॥
केली श्रोतिया लागोनी ॥

असें श्रीधरासारखें म्हणून हात आंखडणे अवश्य आहे. पण एवढ्या-वरून श्रीधराच्या उच्च प्रतिभेची, त्याच्या कल्पनाच्या भराऱ्याची, पद-लालित्याची, अर्थसौंदर्याची व कोमल भावना प्रकट करण्याच्या कौशल्याची खात्री खास पटेल असें आम्हास वाटते. स्थलसंकोचास्तव पुढील कांहीं शृंगारिक स्थळाचा केवळ नामनिर्देश करणेंच भाग आहे.

श्रीधरानें अध्याय एकविसमध्यें अखेरीस स्त्रीराज्यात अश्वानें प्रवेश केला असें सांगतां सांगताच शृंगारास प्रारंभ करून पुढील अध्या-यात स्त्रियांच्या रूपप्रभाववर्णनात त्याला चांगला परिपोष केला आहे. स्त्रीसैनिकानीं कटाक्षबाण सोडतांच अर्जुनाचे वीर म्हणू लागले कीं,—

"बरवें झालें । कामराजें वैभव दिधलें ॥
विषयसुखामाजी बुडविलें । धन्य केलें संसारीं[१७४] ॥

तर तिकडे प्रेमळ अर्जुनास आपलें रूपयौवन भोगावयास बोलावताच
बरवें बोलोनिया बोल । येरू म्हणे निघे तात्काळ ॥ "

---

१७४ जै. अ. २२, १८

असें म्हणून व तिच्याशीं लग्न करण्याचे कबूल करून तिला हस्तिनापुरास त्यानें पाठवून दिलें. पुढे पचेचाळिसाव्यात मयूरध्वजाच्या रत्नपुरातील नागरिक स्त्री-पुरुषाच्या विलासवर्णनात शृंगार बराच आला आहे. त्यात भक्तिरसाचें मिश्रण मोठ्या खुबीनें केलेलें आढळते. पुढे चोपन्नाव्यात अखेरीस कुंतलेशाची कन्या' 'चंपकमाला' व त्याच्या प्रधानाची 'विषया' अशा दोघी क्रीडावनात सख्यासह क्रीडार्थ निघाल्या आहेत.

मुक्ताढ्य कुचकुंभ हृदयावरी । अत्यंत शोभती तुझे सुंदरी ॥
येथें मिळालिया नरकेसरी । विदारण करील ॥[१७५]

असा विनोद करीत त्या सख्या क्रीडावनात संचार करीत आहेत. त्या दोघी मैत्रिणींचा शृंगारपूर्ण विनोद मोठा बहारीचा झाला आहे. पुढें त्या जलक्रीडा करूं लागल्या, त्या वेळीं—

अतिसूक्ष्म मृदु अंबरे । उडवावया सामर्थ्य नाहीं समीरें ॥
देखोनिया लावण्य शरीरें । वात निश्चल जाहला [१७६] ॥

हे केलेलें वर्णन फारच मार्मिक झालें आहे. पुढें चंद्रहासाविषयीं विषयेची प्रेमोत्पत्ति वर्णिली असून विवाहोत्सवापर्यन्तच्या तिच्या विरहज्वरवर्णनात विप्रलम्भशृंगाराचा परिपोष उत्तम झाला आहे. पुढें चौऱ्याहत्तराव्यात सिंदुरगिरीचा राजा भानुकांत याची कन्या व चंद्रसेनाची पत्नी 'मालिनी' ही सख्यासह उपवनक्रीडा करीत होती तेथें हिरापट्टणचा राजा 'सैन्यपाळ' हा सहज मृगया करतां करता आला. त्यानें तिला पाहिलें, व तो मोहित झाला. पुढें त्यानें युद्ध करून तिला तिच्या इच्छेविरुद्ध नेलें.

---

१७५ जै. अ. ५४, ६७ ; १७६ जै. अ. ५४, ९०

या ठिकाणींही शृंगार नसून शृंगाराभास झाला आहे. 'सुमित्र' ऋषि व 'मेधावती' याचा शृंगार अभ्याहृत्तराव्यात आला असून त्यात मदनप्रभाव किती बलवत्तर आहे हें दाखविले आहे. असो. येथपर्यंन्त श्रीधराच्या या ग्रंथातील मुख्य मुख्य शृंगारिक स्थलाचा निर्देश केला. सामग्रयाने म्हणावयाचें तर या रसाचा परिपोष त्याने बराच चांगल्या रीतीनें केला आहे असे आम्हास वाटते.

२) वीररसः—श्रीधरानें या ग्रंथात रसपरिपोष करीत असता वीररसाशिवाय इतर कोणत्याहि रसाचा त्याच्या नामाभिधानाने प्रत्यक्ष उल्लेख केल्ेला आढळत नाहीं. मात्र वीररसासंबधीं तो मोठ्या प्रौढीने असे म्हणतो कीं:—

"जैमिनी म्हणे परीक्षितीसुता । पुढे कैशी वर्तली कथा ।।
जी वीररसाची दुस्तर सरिता । ती सावधान परिसावी[१७७] ।।

वीररस या ग्रंथात ओतप्रोत भरलेला आढळतो. त्याकडे सूक्ष्म दृष्टीने पाहिले असता या रसाचा आविर्भाव व परिपोष करण्याची श्रीधराची एक विशिष्ट पद्धति दिसून येते. (१) प्रथमतः उभय पक्षांचे वीर समोरासमोर सज्ज होऊन आले, कीं ते आपापला वंश, आपापलें कुळ व प्रौढी सागून वीरसंभाषणे करतात. (२) मग एकमेकाच्या उखाळ्यापाखाळ्यास सुरुवात होऊन ते वर्दळीवर येतात. उपरोध, उपहास, निंदा, इत्यादिकानीं अघोरत्तर झाल्यावर ते क्षुब्ध होतात. (३) पुढे वाग्बाणानीं झालेला मर्मभेद सहन न होऊन एकदम ते हातघाईवर येतात. प्रथमतः एक एक; दोन दोन बाणास सुरवात होऊन ती संख्या हजारों कोटी

१७७ जै. अ. ४३, १

पर्यन्त वाढत जाते. ( ४ ) मग जो तो आपले शिलीमुख, वत्सदत, क्षुरप्र, चद्राकार, कर्णिनालीक असे विशिष्ट बाण काढतो. मग अनेक अस्त्रें प्रति-अस्त्रें टाकण्यास सुरवात होते. रथ, रथाचे घोडे, सारथी, धनुष्यें, रक्षक इत्यादिकाचा नाश करतात. अशी रणधुमाळी माजून एका पक्षाचा वीर मूर्छित पडला किंवा मेला, कीं नाना जयवाद्याचे ध्वनि होतात. ( ५ ) मग रणाचे भयानक व बीभत्स वर्णन येते. नतर पराभूत पक्षाच्या पळापळीचे व जित पक्षाने केलेल्या लुटीचे वर्णन येते. या वर्णनात श्रीधराने केलेली शब्दांची निवड फारच मार्मिक दिसते. पद–पदावलींचा अर्थ व ध्वनि याचा फारच उत्कृष्ट मेळ बसलेला आढळतो दीर्घ समासघटित पदे व कठोर वर्णरचना यानीं वर्णनास ओजस्विता येते. आणि या सर्वामुळें वीररसाचा परिपोष इतका उत्तम रीतीने होतो कीं, वाचकास ते युद्ध दृष्टिगोचर किंवा निदान श्रुतिगोचर होत आहे असा भास होतो. इतर कोणत्याही रसापेक्षा वीररसवर्णन श्रीधरास फारच चांगलें साधतें असें आम्हास वाटते. या ग्रथाचे कोठलेही युद्धवर्णन चाळले, तरी या म्हणण्याची सत्यता पटण्यासारखी आहे.

आता वर सागितलेल्या श्रीधराच्या युद्धवर्णनपद्धतीचीं थोडेशीं उदाहरणें पाहूं :—चौथ्या अध्यायात मेघवर्णाने अश्वहरण केल्याबरोबर यौवनाश्व लढण्यास आला. तो वृषकेतूला विचारतो–[१७८]

" तूं कवण कवणाचा वश । कवण नाम कवण देश ॥ "

त्यावर वृषकेतु उत्तर देतो— " मी कश्यप वंशातला असून ज्याने दानोदकानें सरितेश रिते केले, तो कर्ण माझा जनक व त्याचा पुत्र मी

१७८ जै. अ. ४, १४१

वृषकेतु आहे. मी दानशूराचा नंदन आहे. तुझें रथदान मी कसें घेईन ? मी तुझ्याशीं भूमिस्थ होऊनच रणकंदन करणार. " असें ऐकून यौवनाश्व पुनः त्याला म्हणाला, " तूं बाळ आहेस, तर तूं मजवर प्रथम बाण टाक. " पण हेंही वृषकेतास अपमानकारक वाटलें व त्यानें त्यास प्रत्युत्तर दिलें : " अरे, मी तर अत्यंत तरुण असून कृष्णदर्शनानें बलाढ्य झालों आहें. तू मात्र बहुपुत्राचा पिता झाला असल्यामुळे वृद्ध व बलहीन आहेस. एवढेंच नव्हे, तर—

' तूं तरी केवळ कामासक्त । पुत्रोत्पादनीं परमासक्त ।
विषयसंगी लोलुप्त । म्हणोनि होसी मज वश्य ॥ १७९॥ "

अर्थात् हा तीक्ष्ण वाग्बाण यौवनाश्वास सहन न होऊन दोघांची खरोखरीची बाणाबाणी सुरू झाली. त्यानंतर अग्नि–वरुण–वायु–पर्वत–वज्र–वगैरे अस्त्रप्रत्यस्त्रांचे वर्षाव उभयतांनीं केले वृषकेतु मूर्छित होऊन पडला. नंतर दुसरे वीर युद्धास आले. पुढें अठराव्यांत सुधन्वा-वृषकेतूचें युद्ध अशाच थाटानें सुरू झालें आहे. पण युद्धारंभींचें रणरंगवर्णनही वीर-रसाचा आविर्भाव करण्यास अत्यंत अनुकूल व समर्पक असें करण्याची हातोटी श्रीधरांत दिसून येते. पाहा:—

" रणांगणांत सैन्यांची इतकी दाटी झाली, कीं निष्पंक रणभूमि गजदानोदकानें सपंक झाली, हयखुरें जें रज उडालें, त्यानें विषमभूमि सम झाली. रथशब्द ऐकून परमवाचाळ व गर्जना करणारे सागर व मेघ मुके झाले. मग ढोल, दुंदुभी, शंख, भेरी, शृंगें, डिमडिमी, काहळ, मोहरी, झल्लरी, मृदंग, ताल वगैरे नाना वाद्यांचा घोष सुरू झाला.[१८०]

---

१७९ जै. अ. ५, ६ ; १८० जै. अ. १८, ३९

त्याणें पतनशंका झाली आकाशा । तळीं भय उपजले शेषा ।।
भूमंडळ पडेल म्हणोनी ।।

नतर उभय वीर सैन्यात मिसळू लागले कीं—
स्वारावरीं स्वार लोटती । कुजरावरी कुंजर ।
रहंवरावरी रहंवर । द्वंद्वसंग्राम होतसे [१८१] ।।

अशाचें युद्ध सुरू झाल्यावर—[१८२]

" बाण सुटती सणसणा । वीर पडती दणादणा ॥
शस्त्रें वाजवी खणाखणा । अशुद्धपूर लोटले ।।

मग पराभूत सैन्याची तारांबळ मोठ्या कौशल्यानें वर्णिलेली आढळते.

पराभूत सैनिक विजयी सैनिकापुढे मृतप्राय नेत्र झांकून पडले, कित्येक पलायन करूं लागले, कोणी आपलीं वाहनें सोडून प्राणरक्षणासाठीं प्रेतामार्जीं दडून राहिले, सर्वत्र रण हुवो लागलें, सर्व पळ काढू लागले, कोणी कोणास ओळखीना, असें घोरान्दर युद्ध झालें.

"कोणी शस्त्रें त्यजिती । कोणी वस्त्रें टाकिती ।।
थरथरां ते वीर कापती । ऐसे घेतलें भय सैन्यें ।।
कोणी रक्तीं बुड्या देती । कोणी मीनाकृती पोहती ।।
कोणी मृतमिषें दडती । शर सोडील म्हणूनिया [१८३] ।।"

३ ) बीभत्सरस :— रणमद चढून, वीरावीरांची झोंटधरणी होई, घ्या घ्या मार मारा अशा आरोळ्या मारीत, रक्तांचे पूर वाहत असें वर्णन करतां करतां त्याचें पर्यवसान बीभत्स-

---

१८१ जै. अ. १८

१८२ जै. अ. ८८, २१ ; १८३ जै. अ. १८

रसात होतें. पाहा :— अध्याय तेवीसमध्ये पार्थ–अनुशाल्वाचे युद्ध संपता संपता झालेल्या भयकर रणस्थितीचें वर्णन करून श्रीधर म्हणतो:—तेथे भूत वेताळ क्रीडू लागले. चतुःषष्ठि योगिनी, झोटिग यांनीं खेळ माडला. गजकुंभाचीं ताटे करून त्यात त्यानीं वीरमास वाढले व ती नरशिररक्तपान घटाघटा करू लागलीं. एकमेकाना मास वाटू लागली. गजकुंभस्थळे विदारून त्यानीं आतील मोत्ये काढलीं व परस्पराना वाणे दिलीं; मग हस्तिदत हातीं घेऊन योगिनी नरशिरे फोडू लागल्या. अशा रीतीनें कुष्माड, भैरव, कंकाळ, महाभुते, यक्ष, वेताळ सर्व मिळूनच चामुडेचा गोंधळ घातला. ती मडळी गाती, नाचती, हासती, गजशुडा-विणें वाजविती, गजकोथळ्याचे मृदग करिती, टाळ करिती गजकर्ण, पायीं नरशिरांच्या घागरीया घालून, नरवक्त्रे वाजवून योगिनी नाचू लागल्या. शृगाल, वृक हे तेथींचे सभानायक झाले.

"नरशिरें कमळें वाहती । ढाला कूर्मरूपे पोहती ।।
पंचफणीफणाप्रति हस्त धावती । काय ते वीरवैतरणी ।।
ऐसें रण माडिले कृष्णसुते । नदी वाहों लागली शोणितें ।।
नरमस्तके वाहती अमितें । केशशेवाळें व्यापिलीं[१८४] ।।

या उदाहरणावरून श्रीधराने वीररस व तदनुषंगानें बीभत्सरस याचा किती उत्तम प्रकारें परिपोष केला आहे व त्या त्या प्रसगाचें शब्दचित्र किती हुबेहुब काढिले आहे याची कल्पना वाचकास सहज येईल. सुधन्वा-अर्जुन (अ. १९), सुरथ अर्जुन अ. २०), बभ्रुवाहन-प्रद्युम्न, लवकुश व राम, भरतादि वीर, (३६), अर्जुन बभ्रुवाहन (३८), दुदुभी-आख्यान,

१८४ जै. अ. २३, १५२–१५३

वगैरे अनेक स्थळीं या रसाचे पूर वाहताना पाहून "वीररसाची दुस्तर सरिता" ही श्रीधराची उक्ति यथार्थ वाटते. त्याचप्रमाणें शृंगारराजा-ऐवजीं "वीराजास" या ग्रथात मीं सिंहासनाधिष्ठित केले आहे हेही त्याचे शब्द सार्थ वाटतात.

४) रौद्ररस या ग्रथात वीररसाच्या अनुषगानेंच येणारे दुसरे रस म्हणजे रौद्र, अद्भुत, व भयानक होत. त्यांचें आतां क्रमानें वर्णन करूं. अध्याय सत्तावनमध्ये सूत, मागध, बंदिजन वस्त्रभूषणांनीं भूषित झालेले पाहून सकेताप्रमाणेच चंद्रहास मारला गेला असे त्यास पाहिल्यानेच वाटलें, परंतु खरे कारण समजताच तो क्रोधें तप्त झाला. जो चद्रहासाचे नाव उच्चारील त्याचा शिरछेद करीन असें जो म्हणत आहे, तोंच ब्राह्मणानीं चद्रहास जामात झाला म्हणून त्याचे पुन तसेच अभिनंदन केले तेव्हा—

द्विजवचनें तो कोपला । जेवीं अनळ घृतें शिंपिला ॥
कीं पुच्छीं भुजग ताडिला । किंवा पेटला दावाग्नी ॥
ऐसा झाला क्रोधें दीप्त । ब्राह्मणातें दड उगारित ॥
तुम्हासि मारीन रे निश्चित । कोठें पळाल मजपुढे ॥
वस्त्रालकार सर्व धन । टाकोन पळती ते ब्राह्मण ॥
पदोपदीं पावती पतन । शिरीं शिखा मुक्त झाल्या[१८५] ॥
परिधानवस्त्रे फिटली । धावता यज्ञोपवीते गळालीं ॥
धापा भरतां पोटें चोळिलीं । श्वासोच्छ्वासें मूर्छित ॥

---

१८५ जै.अ. ५७, ४४-५०

तों पुढें गायक देखिले .. । तयांचा दंडें फोडिला वीणा ।।
मृदंग टाळ वंश जाणा । चूर्ण केलें तयांचें ।।

पुढें सुवासिनी पंचारति घेऊन आल्या त्यावर त्यानें अशीच आग पाखडली. तों पुढें प्रत्यक्ष वधूवरेंच दृष्टीस पडलीं. तेव्हां—

सर्वांगीं पेटला क्रोधाग्नी । घर्म कंप आला त्यालागुनी ।।
सुकोनि गेले ओष्ठ ते[१८६] ।।

अशा स्थितींत त्यानीं नमस्कार केला तेव्हां तर—

गारोडियें विषदंत करोनि भंग । पेटारींत घातला भुजग ।।
त्याचा कांहीं क्रोधतरंग । न चले तैसा तो झाला[१८७] ।।

तो त्याचा मुलगा मदनच धांवून आला. त्याला नानापरी त्रासिलें. त्यानें उत्तर दिलें, "आपल्या आज्ञेप्रमाणें मीं सर्व केलें; मजवर वृथा राग का करिता ?"

तेव्हां—आधींच क्रोधाग्नी पेटला । त्यामाजी कर्पूर टाकिला ।।
आणि घृततैलघटें शिंपिला । तेवीं झाला दुष्टबुद्धि ।।
ऐकोनि बोले कटकटा । हस्तें पिटीत ललाटा ।।
तूं कीटक आलासि माझिया पोटा । म्हणूनि रागें कापत[१८८] ।।

आतां तूं संन्यास घेऊन वनांत जा अगर भिक्षाटनास जा. तो मदनानें आणलेलें पत्र पाहून चकित झाला व म्हणाला:—

---

१८६ जै. अ. ५७, ६६

१८७ जै. अ. ५७, ६९ ; १८८ जै. अ. ५७, ७६-७७

मी तों बुद्धीचा सागर । आणीक विचारीन घात थोर ।।
सर्वोपायें कुळिंदकुमार । निश्चयेंसी मारीन[१८९] ।।

असें आपल्या मनाशीं ठरवून त्यानें एकदम "क्रोधाग्नि विझविला." या वर्णनात रौद्ररसाचा आविर्भाव झाल्यावर क्रमाक्रमानें वाढत जाणाऱ्या क्रोधवर्णनानें त्याचा झालेला परिपोष फारच उठावदार झाला आहे व सर्व शब्दचित्र एखाद्या कुशल कलोपासकास साजावें असेच झालें आहे. हें इतकें चटकदार झाले आहे कीं, तें रौद्ररसाच्या वर्णनाचें, या ग्रंथात तरी अत्यंत उत्कृष्ट स्थळ आहे असें आम्हास वाटते.

५) अद्‌भुतरसः——अद्‌भुतरसाचें आविष्करण वीररसाच्या अनुषंगानेंच कवीनें केलेलें आढळतें. श्रीकृष्ण, अर्जुन व हनुमंत हे तिघे दुदुंभीशीं लढत असताना, त्यांच्या पराक्रमवर्णनात वीररसाचा प्रकर्ष झालेला दिसतो. आणि या प्रकर्षांतूनच अद्भुताचा जन्म झाल्याचें कवीनें मोठ्या खुबीनें दाखविलें आहे. अर्थात् हा रसही वीररसाचा अंगभूतच झाला आहे. दुदुंभीच्या तीन सहस्र गदांचा एकच बाणानें अर्जुनानें चूर केलेला पाहून दुंदुभीस आश्चर्य वाटले आणि त्यानें "बाप योद्धा धनुर्धर" अशी त्याची स्तुति केली आणि तो म्हणाला, "आता तुमचें आयुष्य सपलें, कुटुंब-माया सोडा, कुळदेवताचें स्मरण करा; सद्‌गुरूचे चरण आठवा. चोवीससहस्र वर्षें समुद्रोदरांत मत्स्य भाइत आहेत त्याचा पेटलेला जठराग्नि आता तुमच्या ग्रासानें हरैल असें करितों, सावधान व्हा." असे त्यास सागून त्याचा रथ त्यानें एकदम

१८९ जै. अ. ५७, ९०

उचलला व तो शत वेळा भोवूडून आकाशपोकळीमाजीं उडविला. तेथें तो एकसारखा चक्राप्रमाणे फिरत फिरत सूर्यमंडळापर्यंत गेला. तेथून मग अकस्मात् जेथे ते मत्स्य भाडत होते त्या समुद्रात तो पडला. त्यातील एकाने त्यास आमिष समजून तो मुखामाजीं टाकला. तेव्हा नरनारायण व हनुमत रथासह मीनोदरात जाऊन बसले. इकड —

"विजयी झाला दैत्यनाथ। बळे भुजा बाहु पिटीत[१९०]" व बळे माझ्यासारखा त्रिभुवनात दुजा नाहीं असे म्हणत स्वनगरात गेला. तेथे भाटबंदिजन त्याचे पवाडे गाऊ लागले. तिकड नारदानीं बलराम व कृष्ण-स्त्रिया यास ही बातमी सागून आणिलें, पण बलरामही पराभूत होऊन मूर्च्छित होऊन पडला. तेव्हा नारदाने कृष्णस्त्रियास जेथे नरनारायण मत्स्योदरांत सात दिवस पडून राहिले होते. तेथे आणिलें. त्याचा आक्रोश ऐकून श्रीकृष्ण मत्स्योदरात उठून बसला; नतर त्याने मूर्च्छित झालेल्या अर्जुनहनुमंतास सावध करून आपली निजशक्ति चेतविली व तिच्या प्रभावानें रथासह सर्वजण सुखरूप बाहेर आले. तेव्हा सर्वांचा आनद गगनात मावेना[१९१] पण अद्भुतरसाचें दुसरे उदाहरण 'अश्वमेध'यज्ञाच्या वेळीं आलें असून तेथे तो वीररसाचा अगभूत नसून स्वतत्र आहे वाज-त्र्याच्या ध्वनि लागल्या. तेणें प्रतिशब्द गगनीं उठला. भीमानें कृष्णस्मरण करून अश्वमस्तक छेदिलें. तों ते सूयमंडळात जाऊन तेजोमय झाले, व त्याच्या शरीरातून दुग्धधारा लोटल्या. सर्व ब्राह्मण आनदले. इतक्यात अश्वाच्या मुखातून निघालें तेज कृष्णमुखांबुजात शिरले. मग—

---

१९० जै. अ. ७०, ९८

१९१ जै. अ ७१, ४१–४८ ; अ. ७२, २–७

' अश्वभड पडलें धरणीं । तों कर्पूरपुंज झाला तत्क्षणीं ॥
मुनि सकळ नृपचूडामणी । आश्चर्य करूं लागले [१९२] ॥

पुढें धर्माचा यज्ञगर्वपरिहार करण्यासाठीं श्रीकृष्णानें सुवर्णवर्ण नकुळ उत्पन्न केला व मनुष्यवाणीनें त्याजकडून धर्माची कानउघाडणी करविली. तोही प्रसंग असाच मोठा अद्‌भुत व चमत्कृतिजनक आहे.[१९३] या तिन्ही वर्णनावरून याही रसाचा परिपोष श्रीधराने निपुणतेनें केला आहे अशी खात्री पटते.

६) भयानकरस —भयानकरसाचे उत्कृष्ट उदाहरण श्रीकृष्ण अर्जुनासह गुरुशिष्यरूपाने येऊन मयूरध्वजाचें अर्धशरीर कर्वतून मागतो त्या स्थळीं पाहावयास मिळते.[१९४] या ठिकाणचे वर्णन प्रसंगास उचित असें धीरगंभीर झालें आहे. शब्दचित्र फारच ठसकेबाज व उदात्त झालें आहे. परंतु ती कथा सर्वांच्या परिचयाची असल्यामुळें येथें सांगण्याचें प्रयोजन [illegible] नाहीं. पुढे नारदानें उत्तरसागराचे केलेलें वर्णन असेंच भयानक आहे. तें तितकें परिचित नसल्यामुळे थोडक्यात पुढे दिलें आहे [१९५]:—

"नारद सांगेल सुखकल्लोळ । म्हणोनि ऐकों बैसले भूपाळ ॥
तों तेणें केलें दुःखाकुळ । महद्भय पोटीं घालोनी ॥

नारद म्हणे जी वैकुंठपीठा । तुवां आरंभिल्या बाळचेष्टा ॥
कां रे लागलासि मृत्यूच्या वाटा । असतां आयुष्य अमोलिक ॥

---

१९२ जै. अ. १३, ३१ ; १९३ जै. अ. १५, १०–१२६
१९४ जै. अ. ४७ ; १९५ जै. अ. ६२, २–१३

...॥आधीं तो हा उत्तर सागर । स्वरूपें दिसे भयकर ॥
त्याचिया तरगाचा पसर । पाहता सुरनर कापती ॥

तेथें असती दोन मगर । नेणो काजळाचे गिरिवर ॥
चौवीस हजार वर्षे परिकर । दोघेही क्रोधें भाडती ॥

बारा योजनें तुटला कडा । भोंवता असे समुद्राचा वेढा ॥
ऐकतां नर होतसे वेडा । जो देखताचि भय वाटे ॥

पुढें दुदुभीच्या भोजकोट शहराचे, त्याच्या भयकर देहाचें व त्याच्या अचाट पराक्रमाचें वर्णन नारदानें केलें आहे.

ते ऐकिताचि कापिन्नले । सकळ वीर पार्थेसी ॥

पुढे उभय पक्षाचा "नातरी इळीपळी आडकिना । यासी काय तुळावी खड्गलता" अशा दृष्टातानीं तुलना करून नारदाने सर्वांस भेदरून सोडलें आहे. या वर्णनातही श्रीधराचा हातखडा होता असें आपणास स्पष्ट दिसून येतें.

७) **करुणरसः**—ज्या भवभूतीला "कारुण्य भवभूतिरेव तनुते" असें रसिकांनीं प्रशस्तिपत्र दिलें आहे व जो भवभूति "एको रसः करुण एव" असें प्रतिपादितो त्या श्रेष्ठ, अशा करुणरसाकडे आता वळूं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें या ग्रंथांत वीररसासच अग्रस्थान मुख्यतः मिळाले असल्यामुळें इतर रसा-प्रमाणें या रसासही गौणस्थान मिळालें आहे. कारण उघडच आहे. अश्वमेध म्हटला कीं, प्रतिस्पर्ध्यांशीं जिथें तिथे युद्ध आणि युद्ध; तेथे मृत्यु व मृत्यु तेथें शोक अशी परपरा क्रमप्राप्तच ठरते. भीमाचा वृषकेतूबद्दल, हसध्वजाचा

आपला पुत्र सुधन्वा याबद्दल, पुनः अर्जुनाचा वृषकेतूबद्दल, उलूपी व चित्रांगी यांचा पतिनिधनाबद्दल, टिटवीचा अपत्याबद्दल व कृष्णस्त्रियांचा कृष्णाबद्दल असे विविध शोकप्रसंग या ग्रंथात आले आहेत. या वर्णनात श्रीधराची सामान्य पद्धति अशी दिसते कीं, विरही व्यक्ति प्रथम मृताच्या गुणाचे उत्कटतेनें वर्णन करिते, मग आपल्या कठोरपणाची निर्भर्त्सना करते; त्याच्या हस्तपादादि अवयवांचे चुंबनालिंगन करते, व शोकातिरेकानें भ्रांत होऊन मृत जीवमानच आहे असें कल्पून त्याशीं प्रेमालाप करूं लागते. नंतर अशरण होऊन गडबडा लोळते, आणि सरतें शेवटीं कोणाच्या तरी उपदेशानें तिचे सांत्वन होतें. वरील अनेक वर्णनापैकीं फक्त चित्रांगी व उलूपी यांच्या शोकाचें वर्णन थोडक्यात पुढे देऊः--बभ्रुवाहन विजय मिळवून अर्जुनाचा वध करून नगरात आला, तेव्हा सर्वत्र विजयोत्सव झाला. परंतु ही बातमी त्याच्या मातास कळली, तेव्हा त्याचें स्वागत न होतां उलट त्या त्यास दुःखसागरात पडलेल्या आढळल्या. तो त्यास म्हणतोः--[१९६]

कंठीं बांधीं मंगळसूत्र । कर्णीं घालीं ताटंकपत्र ॥

परंतु त्या त्याकडे अमृतदृष्टीनें विलोकन न करितां एकदम क्रोधानें उसळून म्हणाल्या--[१९७]--

"म्हणे मज न दाखवी रे वदन । पितृघातक्या दुरात्म्या ॥
माझा मारिलासि प्राणेश्वर । जो धर्मरायाचा सहोदर ॥
जयाचा सारथी सर्वेश्वर । सर्व संकटीं रक्षिता ॥

---

१९६ जै. अ. ३८, १२८ ; १९७ जै. अ. ३८, १२९-१८०

मातेच्या व्रताकारण । जेणें स्वर्गमार्गीं बांधिलें सोपान ।।
ऐरावत आणिला जेणें । तो पार्थ कैसा मारिला रे ।।

जेणें समरीं भीष्मद्रोण । वधिला महावीर कर्ण ।।
ऐसा वीर अर्जुन । कैसा रणीं मारिलासी ।।

पोटा येवोनि वैर साधिलें । माझें कंठसूत्र जाळिलें ।।
कर्णभूषण भस्म केलें । पुत्ररूपें पापिया ।।

वैधव्यदीक्षा निश्चित । आम्हालागीं आणिली ।।
म्हणोनि ती गडबडा लोळे । केश सोडिले मोकळे ।।

अति आरक्त झाले डोळे । शोकाग्नीनें तेधवा ।।
तें देखोन दोघी वल्लभा । धरणी देह टाकिती उभा ।।

तो शोकाग्नि जाळित नभा । तेणें सूर्यप्रभा करपली ।।
दोघी गडबडा लोळती । करें शिरातें ताडिती ।।

सखिया त्यातें आवरिती । परि पिशाचगती त्या झाली ।।
नाना विलाप मुखें करिती । पिशाचापरी धावती ।।

धरिता धरेवरी पडिती । वक्षस्थळ पिटोनिया ।।
मग जावोनि प्रेत कवळिती । शिराजवळी बैसती ।।

त्या शोकातें नाहीं मिती । ऐकता रडति श्वापदें ।।
भ्रतारचरणीं ठेऊनि माथा । म्हणती उठा जी प्राणनाथा ।।

विराटगोधनें तत्त्वता । नेलीं असतील कौरवीं ।।
द्रौपदीचें मांडिलें स्वयंवर । तेथें राव मिळाले अपार ।।

यंत्र भेदोनि सत्वर । राजकुमारी वरावी ।।

मग पुन्हां म्हणती पार्थासी । तूं पुत्ररागें रुसलासी ॥
तरी क्षमा करावें अपराधासी । चरण केशीं झाडीन मी ॥
दोघींनीं शिर नेवोनि मुखासमीप । नानापरी करिती विलाप ॥
ऐकता खोल कर्णकूप । उचंबळती शोकजळें ॥
भार्गवें मारिली एक माता । तू वधाव्या उभयता ।......॥
आजि उत्साहसागर आटला । आनदध्वज उलंडिला ॥
कीं मनोरथद्रुम उन्मळिला । कुपुत्रवार्ते करूनी ॥
तव उलूपी म्हणे लवलाहे । पार्थ जीववावया उपाय पाहे ॥
सजीवकमणी आहे । पाताळभुवनीं पितृगृहीं ॥

अशारीतीनें हा शोकसमुद्र सुमारे ऐशी ओव्यावर पसरला आहे. तो विस्तृत आहे, पण गाढ कमी आहे, तो ऐकून श्वापदें रडूं लागलीं व खोल कर्णकूप शोकजळाने उचबळून आले खरे, तरी पण त्याची मात्रा "अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम् " या कोटीप्रत पोंचत नाहीं असें आम्हास वाटतें.

८ ) हास्यरसः—बाकी राहिलेल्या रसापैकीं हास्यरसाचें विवेचन विनोदाच्या प्रकरणात आलेंच असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. आम्हास येथें एवढेंच सागावयाचें आहे कीं,त्याचा आनद सर्व ग्रथभर पसरला असल्यामुळें इतर रसाच्या घनदाट आवरणांतून वाचकास जाणें सुसह्य होतें.

९ ) शान्तरसः — " शातोऽपि नवमो रसः" असे अलंकारिकाचें म्हणणें आहे.आणि या रसासही या ग्रंथात मधून मधून स्थान मिळालें आहे.

ग्रंथारंभींच गोत्रजवधाने झालेल्या धर्मराजाच्या निर्वेदांत याचें आपणांस दर्शन घडतें. संसार हा दुःखमय आहे, शाश्वत सुख परमार्थप्राप्तींतच आहे; म्हणून भक्तियुक्त ज्ञानानें मोक्ष मिरविणे हाच पुरुषार्थ असें संत-कवींप्रमाणें श्रीधराचें मत होतें, म्हणून जेव्हा जेव्हां अशा उपदेशाची संधि त्यास मिळाली, तेव्हां तेव्हा तो त्यानें वाचकास कंटाळा न येईल अशा बेतानें केला आहे. अर्थात् अशा स्थळीं शांतरसास स्थान मिळालें आहे. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं मोक्षलाभाच्या फलश्रुतीची घोषणा कवीनें केली असल्यामुळे एका दृष्टीनें शांतरसासच त्याच्या मनात प्राधान्य द्याव-याचें आहे असेंही म्हणता येईल. आणि ग्रंथाचा उपसंहार, फलश्रुति, व व्रतोद्यापन वगैरे गोष्टीही या विधानाच्या पुष्टीस आणिता येतील. असें जरी असलें, तरी पण वीररसाचा आविर्भाव व परिपोष करण्याचा कवीचा विशेष प्रयत्न सर्व ग्रंथभर स्पष्टपणें दिसून येत असल्यामुळें आम्ही त्यास प्राधान्य दिलें आहे. अध्याय सोळाव्यांत उद्दालक-चंडिकाकथेंत संसारातील सोलीव दुःखाचें वर्णन आलें आहे.[१९८] मयूरध्वजाच्या रत्नपूरवर्णनात उत्कृष्ट शान्तरस पाहावयास सापडतो[१९९]. त्याचप्रमाणें सुमित्रऋषीच्या आश्रमवर्णनात, अश्वमेधसमाप्तीनंतर ब्राह्मण श्रीकृष्णाचा निरोप घेऊन जात असता केलेल्या वर्णनात तो आढळतो. परंतु कुंतलेशानें चन्द्रहासास राज्य व कन्या अर्पण करून ब्रह्मचिंतनार्थ वनवास स्वीकारला. त्या प्रसंगीं तो बऱ्याच विस्तृत प्रमाणावर आला आहे.[२००] त्यानें गालवमुनींना बोलावून सांगितलें कीं:—

---

१९८ जै. अ. १६, ९०-९५ ; १९९ जै. अ. ४५, ४६–५६

२०० जै. अ. ५८, ८३-९२

भूलोकीं राज्य करिता । मज न वाटे सुखवार्ता ॥
माझे देहाची अवस्था । पुढे दुस्तर वाटते[२०१] ॥

त्यानतर गालवानीं त्यास अरिष्टाध्याय सागितला आणि म्हणाले[२०२]: —

नरें व्हावें सावधान । वेगे करावें आत्मचिंतन ॥
वैराग्य करोनिया ॥
निःसग निराहार जितक्रोध । जितेंद्रिय आणि चित्तशुद्ध ॥
विषयत्यागें आत्मबोध । साधनचतुष्टये करोनि ॥
चित्त करावें तदाकार । जैसें जळीं सैंधव टाकिता सत्वर ॥
ते समरसें एकाकार । ऐसे ऐक्य करावे ब्रह्मीं ॥
ऐसा ऐकोनि अरिष्टाध्याय । रायासि झाला वैराग्योदय ॥
राजयाचा निश्चय । राज्यत्यागी जाहला ॥

"तेव्हा गालवानीं सागितले कीं, "चद्रहासास राज्य व कन्या देऊन तू वनाप्रत आत्महित साधण्यास जा." त्याप्रमाणे राजानें केलें. मग राजाने

"त्याग केला वासनाचा । राव नम्र झाला साचा ॥
आश्रय केला जगदीशाचा । राव चालिला तपोवना[२०३] ॥
सर्वसंगनिर्मुक्त । कुतलेश झाला त्वरित ॥
योगसिद्धि पावोनि निश्चित । झाला कैवल्याधिकारी ॥
......मग साधोनी ज्ञानाभ्यास । निरसूनियां मायाविलास ॥
नृप पावला कैवल्यसुखास । जेथें नसे जन्म मरण ॥

---

२०१ जै. अ. ५८, ३०
२०२ जै. अ. ५८, ६१–६४ ; २०३ जै, अ. ५८. ८३-९२

अशा रीतीने जवळ जवळ सर्व अध्यायभर शांतरसाचा परिपोष श्रीधरानें फार चांगल्या रीतीने केलेला आहे व त्याच्या वर्णनात इतर रसांप्रमाणें तो पूर्ण तादात्म्य पावतो असें स्पष्ट दिसून येतें.

१०) भक्तिरसः —भक्ति हा रस मानावा कीं नाहीं याबद्दल प्राचीन व अर्वाचीन साहित्यशास्त्रज्ञांत पुष्कळ मतभेद आहे आणि अजूनही या वादाचा निर्णय लागलेला नाहीं, हें खरें. तरी पण केवळ मराठी संतवाङ्मयासंबधींच जर विचार केला, तर या रसास रससंख्येंत स्थान देणे अवश्य आहे असें आम्हास वाटतें कोणतीही भावना "रस" संज्ञेस पात्र होण्यास तिच्यात उत्कटता व आस्वाद्यमानता हे दोन गुण प्रकर्षानें असले पाहिजेत. हे जर खरें, तर ज्या संतकाव्यानें आज सात–आठशें वर्षें हजारो नव्हे लाखों महाराष्ट्रीयाचीं अंतःकरणें उच्चंबळविलीं आहेत व ज्यातील निर्मळ सात्त्विक आनंद रावरंक, साक्षर-सुशिक्षित, तसेंच निरक्षर-अशिक्षित आजतागायत लुटीत आहेत, त्यातील मूर्धाभिषिक्त भक्तिभावास रसमालिकेंत स्थान देणें अवश्य आहे असे आम्हास वाटते. या दृष्टीने विचार करिता श्रीधराच्या 'जैमिनिअश्वमधा'त भक्तिरसाचीं उदाहरणे जागोजाग सापडतात. कर्म, ज्ञान व उपासना या मोक्षप्राप्तीच्या साधनत्रयींत त्यानें भक्तीसच विशेष प्राधान्य दिलें असून, मुमुक्षूनें कितीही उत्कृष्ट रीतीने कर्ममार्गाचे आचरण केलें अथवा कितीही ज्ञान संपादिलें, तरी भक्तीशिवाय त्यास ते फलप्रद होणार नाहीं असे त्यानें स्पष्ट म्हटलें आहे. तथापि असें प्रतिपादित असताना अथवा अन्य रीतीनें भक्तिमाहात्म्य गात असताना 'भक्ति' हा एक आणखी दहावा रस आहे किंवा तो तसा मानावा याची जाणीव त्यास होती असे दिसत नाहीं. निदान तसे त्यानें स्पष्टपणें कोठेंही म्हटलें नाहीं. जेथें जेथें रससंख्येचे उल्लेख आले आहेत, तेथें तेथें "नवरस" असेंच म्हटलेलें

आढळतें. असो. आता या रसाचा थोडासा मासला पाहूः—चंद्रहासास चांडाळांनीं मारावयास नेलें, त्या वेळीं त्यानें त्या प्रसंगीं जे ईश्वराचें अनन्यभावानें स्मरण केलें आहे, त्यांत भक्तिरस चांगला उतरला आहे. चंद्रहास म्हणतो [२०४]:—

हा काळपर्यंत रक्षिलें । आतां काय देवा उपेक्षिलें ॥
याचें गार्‍हाणें म्यां बाळें । तुजवीण कोणा सांगावें ॥
मातापितागणगोत । माझें सर्व तूं अनंत ॥
तू माझें वदनांत । तूतें पुसोनी प्राण सोडितों ॥
तूंचि पाळोनि मारिशी । तरी मग बाहावें कवणाशीं ॥
मायबाप हृषिकेशी । मज मारविशी चांडाळकरें ॥
प्रल्हाद ध्रुव मत्तगज । ऐसे रक्षिले कीं सहज ॥
तरी मजविषयीं अधोक्षज । कां रे निष्ठुर जाहलासी ॥
तू मजविण होशील परदेशी । आणि वनीं एकटा फिरसी ॥
तेथें राहशील कीं उपवासी । भय पावसी श्वापदांचें ॥
तरी तूतें [२०५]आधीं गिळून । मग मीं पावेन कीं मरण ॥
ऐसें ऐकतां भक्तवचन । लाघव केलें ईश्वरें ॥
अकृत्रिम भक्तीचें सूत्र । प्रेमभावें विचित्र ॥
आपुला भक्त तेव्हां सत्वर । रक्षिला पार्था श्रीवरें ॥

श्रीकृष्ण-यौवनाश्व भेट व अध्याय पंचाण्णवमध्यें वर्णिलेलें भक्तिमाहात्म्य हीं स्थळें वाचनीय आहेत.

---

२०४ जै. अ. ५१, ९३–१०३

२०५ चंद्रहास नेहमीं शाळीग्राम तोंडांत ठेवीत असे त्यास अनुलक्षून

येणेप्रमाणे श्रीधराच्या 'जैमिनिअश्वमेधा'त निरनिराळ्या रसाचा आविर्भाव कसकसा झाला आहे, व त्यात वीररसास प्राधान्य मिळाले असून शान्त व भक्तिरसाचा परिपाकही त्याने कसा केला आहे हे येथवर सोदाहरण दाखविलें. त्यावरून काव्याचा आत्मा जो रस, त्याच्या आविष्करणात श्रीधराचा हातखंडा कसा आहे हेंही वाचकाच्या सहज लक्षात येण्यासारखें आहे. त्याच्या काव्यात रसाची विपुल विविधता दिसून येते व सर्व रसाचे वर्णन त्यास सुरेख साधते, त्यावरून त्याच्या बुद्धीचा अष्टपैलुपणाही प्रत्ययास येतो; परंतु या वर्णनातील उत्कटता व आस्वाद्यमानता काहीं ठराविक मर्यादेपलीकडे जाऊ शकत नाहीं. म्हणूनच त्यास कविवराच्या प्रथम मालिकेंत स्थान देता येत नाहीं.

शेवटीं या ग्रंथातील एक उत्कृष्ट उतारा देऊन हे प्रकरण संपवू.

## यज्ञसमाप्तीनंतरचें भोजनवर्णन [२०६]

नृपाज्ञेने भीमसेन । सर्वांसि देता झाला भोजन ॥
ऐसे ऐकोनि मुनिवचन । जनमेजय प्रश्न करी ॥ ३० ॥
स्त्रीबाळ मुनि भूपा लागून । कैसे दिधले दिव्य भोजन ॥
ते विशद कृपा करून । सकळ सांगा मज स्वामी ॥ ३१ ॥
....................................................

जैमिनि म्हणे नृपनाथा । सावधान ऐके भोजनकथा ॥
श्रवणमात्रें संसारव्यथा । पळोनि जाय दिगंतरा ॥ ३३ ॥
नवरत्नखचित तो मंडप । कनकबद्ध भूमिस्वरूप ॥
रत्नखचित आसने अमूप । चंदनगर्भें मांडियेली ॥ ३४ ॥

---

२०६ जै. अ. ९४, ३०–८३

सभोंवत्या मांडिल्या दीपमाळा । तळीं घातल्या रगमाळा ॥
नाना चदन धूपीं धूपिला । मंडपीं अवघा परिमळ ॥ ३५ ॥
रत्नखचित माडिलीं ताटें । अति विस्तृतीं चोखटे ॥
त्या सभोंवत्या मांडिल्या नेहटे । चौसष्टी वाट्या प्रतिपात्रीं ॥ ३६ ॥
सुगध जळपात्रे क्षालन । करूनि पुढे माडिलीं जाण ॥
प्रतिपात्रीं सुजल भरून । रत्नकमंडलू ठेविले ॥ ३७ ॥
प्रतिपात्रीं रत्नदीप । ठेविता झाला कुलदीप ॥
तें देखतां निवाले सकळ भूप । भोजनशोभा तेथींची ॥ ३८ ॥
.......................................

भीम वाढीतसे अन्न । परामर्श करीतसे मधुसूदन ॥
भाळीं तिलक रेखून । अगीं सुगंधे चर्चिलीं ॥ ४१ ॥
.......................................

देखोनि अन्नाचा परिमळ । रोगें घेतलें देशातर ॥
मन झाले निश्चळ । अन्नीं दृष्टीं लागेना ॥ ४३ ॥
अन्नरुचीचे कौतुकें । त्यापुढे अमृत वाटे फिके ॥
सुरासहित शचीनायके । लाळ घोटिजे त्या स्वादा ॥ ४४ ॥
सविस्तर जरी वर्णू अन्न । तरी ग्रंथ होईल विस्तीर्ण ॥
यालागीं प्रत्येक जाण । यथामती वर्णितो ॥ ४५ ॥
.......................................

चंद्रबिंबासमान । चंद्रकळा षोडश चिरोन ॥
ऐसें देखोनि शुभ्र ओदन । विप्रनयन निवाले ॥ ४७ ॥
भोंवतीं पायसांची हारी । तेणें रत्नवाटी भरिली ॥
रुची देती गोडभारी । अति अपूर्व भक्षाया ॥४८॥

त्या भातावरी वाढिले वरान्न । नेणों तगट ओतिलें सुवर्ण ॥
पीतवर्ण ते सुगधे करून । तोषवीत सर्वांतें ॥४९॥

चक्राकार वर्तुळ । चंद्रबिंबापरी धवळ ॥
ऐसिया पोळियाचे कवळ । मृदुत्व केवळ त्यांच्या ठायीं ॥५०॥
अतिदीर्घ वर्तुळ जाण । साखरमांडे अमृतासमान ॥
तत्क्षीरामाजीं घालितां पूर्ण । होती लीन त्यामाजी ॥५१॥
अनारसे फेणिया गुळवरिया । साडिया पुरिया घारिया ॥
दुग्धें शर्करें घोळिलिया । ऐसी वाढिली पक्वान्नें ॥५२॥
स्नेह कर्दमाजि दिव्य झाले । अनुताप वैराग्यें पचले ॥
मग अनुरागदशेते आले । ऐसे वडे ते नवविध ॥५३॥
एक कथिकेमाजि भिजविले । एक दह्यामाजीं मेळविले ॥
एक दुग्धेचि कालविले । एक भिजविले चिंचरसे ॥५४॥
नानापरी भिजवोनि वटक । ग्रास घेती द्विजनरनायक॥
लवण मरीच हिंगु सम्यक । भिन्न भिन्न ते केले ॥५५॥
सगर्भ शुभ्र खाजा करज्या । पूर्णगर्भ तेलवरिया ॥
घृतशर्करा मुक्त लुचया । मुखीं घालिता अतिगोड ॥५६॥
मधुवर्ण सुवासित । रत्नवाटिमाजिं घालित ॥
जें भोजनीं प्रधान म्हणवित । त्या आज्यातें सादर सेविती ॥५७॥
साडगे पापड कोशिंबिरी । सभोंवत्या त्याचिया हारी ॥
लवण शाका परोपरी । नाना शिखरिणी वाढिल्या ॥५८॥
सांद्र ( मठ्ठा ) तक्राची कथिका । कढोनि झाली रसिका ॥
जीचा घेतां फुरका । रुची आणी मुखातें ॥५९॥

लाडु मोदक अपार । शोभताती वर्तुळ ॥
देखोनिया मुनिवर । पोटामी हात चोळिती ॥६०॥
द्राक्ष फणस आम्रफळें । सोलींव वाढिलीं रंभाफळे ॥
नाना परीचीं रसाळे । पुढे वाढिलीं अपार ॥६१॥
शुभ्रसाय दधिदुग्ध । नवनीताचे गोळे विशद ॥
आनदे जेवी भूपवृंद । द्विजवर ही सावधानें ॥६२॥
रत्नखचित चौरग । त्यावरी बैसले भप अव्यग ॥
सुस्वादें जेवि तो अभग । गोडी तया अन्नाची ॥६३॥
शाक सेवकपक्ति शोभत । त्यामाजी प्रधान असे घृत ॥
भातावरी कथिका सत्य । तेंचि स्नान तयाचें ॥ ६४ ॥
ऐसा स्नाने तो शृंगारिला । वरता तो भात मागितला ॥
तेणें जठराग्नी तृप्त केला । न चाले तयाचें यापुढे ॥ ६५ ॥
ऐसें जेवितां सकळिक । तेथें वर्तलें एक कौतुक ॥
जे अरण्यवासी लोक । ते दिव्यान्न स्वप्नीं न जाणती ॥ ६६ ॥
जे कदमूळे भक्षिती । त्यासी झाली दिव्यान्नभेटी ॥
ते भावावले हातवटी । कोणते कसे भक्षावें ॥ ६७ ॥
शुभ्र देखोनि ओदन । शाकासमाज पाहोन ॥
म्हणती साक्षात् उमारमण । यासी वदन करावें ॥ ६८ ॥
हे केवळ परब्रह्म । यासी भक्षावयाचें काय प्रेम ॥
म्हणोनि ध्यान धरूनि परम । शिवस्मरण करित बैसले ॥ ६९ ॥
कित्येक जेविती शाकाची ओळी । कित्येक ध्यानस्थ बैसलीं ॥
कित्येक बोलती काय हे वर्तुळीं । या वनस्थे न देखिलीं ॥ ७० ॥

दुजा शाहाणा जो म्हणवित । तो तयां सांगत ॥
हें चंद्रबिंब निश्चित । पडतां छिद्र जाहलें ॥ ७१ ॥
ऐसें झालें द्विजनायका । तों भीमें वाढिल्या फेणिका ॥
तों कित्येका झाली शंका । म्हणे भी खगाते केवीं भक्षू ॥ ७२ ॥
दिव्य मोदक पाहोन । उलूक मानिती द्विजजन ॥
म्हणती औदुंबर फळ भक्षून । आश्रमीं येवोनि राहाती जे ॥ ७३ ॥
..........................................

मोकळा देखोनि ओदन । म्हणती कुदपुष्पें आणिलीं चुरोन ॥
दुजा बोले अनृत भाषण । ह्या तों कळ्या मालतीच्या ॥ ७५ ॥
एक वटकातें देखोन । म्हणे हा कंद वर्तुळ पूर्ण ॥
दुजा बोले कळलें शहाणपण । हें तूं नोळखसी रथचक्र ॥ ७६ ॥
कूटस्थानीं नाना भ्रांती । होता अज्ञान प्रवृत्ती ॥
तेवीं अन्नाच्या नाना विकृती । देखता ऋषी भ्रात झाले ॥ ७७ ॥
ऐसिया परी द्विजगण । भुल्ले तेव्हा अन्न देखोन ॥
तें पाहोन भीमसेन । मार्ग दावीत भोजनाचा ॥७८॥
घृत शर्करा दधि दुग्ध । एके ठायीं करिती विशद
त्यावरी दुजा करी क्रोध । म्हणे कथिका ( कढी ) उत्तम ॥७९॥
त्यांवरी सकळ ब्राह्मण । भीमें संतृप्त केले पूर्ण ॥
सतोषोनि नृपगण मग हस्तमुख क्षाळिती ॥ ८२ ॥
ऐसे तृप्त झाले सकळ । सर्वांनीं घेतले ताबूल ॥
सर्वांवरी घातला परिमळ । भीमसेनें स्वहस्तें ॥८३

* * *

— १० —

# शिवलीलामृत

शिवलीलामृत ग्रंथ वासरमणी । देखोनि विकासती सज्जन कमलिनी॥
जीवशिव चक्रवाकें दोनी । ऐक्या येती प्रीतीनें ।। [१]

## १ ग्रंथाचा स्थलकालनिर्देश

लेखनकालाचा ज्यात स्पष्ट उलेख केलेला आहे अशा ग्रथांपैकी ' शिवलीलामृत ' हा श्रीधराचा शेवटचा ग्रथ होय. हा त्यानें शके १६४० विलंबीनाम सवत्सरात फाल्गुन शु. पौर्णिमा रविवार या दिवशीं सपविल्याचें सागितलें आहे.[२] हा ग्रथ त्यानें बारामतीस कऱ्हा ( ब्रह्मकमंडलु नदी ) नदीच्या तीरीं सपविला.[३] या नदीच्या तीरावर एक प्राचीन

---

१ शि. ली. ४, १११

२ शके सोळाशें चाळीस । विलबी नाम संवत्सरास ॥
शुद्ध पौर्णिमा फाल्गुनमास । रविवारीं ग्रथ सपविला ॥
शि. ली. १४, २१२

३ ब्रह्मकमण्डलूच्या तीरीं । द्वादशमती नाम नगरी ॥
अद्वैत ग्रथ निर्धारीं । तेथेंचि जाला जाणिजे ॥
शि ली. १४, २१३

'शिवालय' आहे. त्याला 'काशीविश्वेश्वरा'चे देऊळ म्हणतात. या देवालयात बसून ब्रह्मोत्तरखण्डातील कथा कवीने लिहिल्या आहेत. पुढे पस्तीस वर्षांनीं याच ठिकाणीं मोरोपतानीं आपला 'ब्रह्मोत्तरखण्ड' ग्रंथ रचिला.[४] ही गोष्ट सहज घडून आलेली असली तरी मराठींतील दोन सुप्रसिद्ध कवींची एकाच विषयावरील रचना थोड्याशा कालांतरानें एकाच ठिकाणीं व्हावी हा योगायोग कुतूहलजनक खास आहे ! या ग्रंथात 'शिवमाहात्म्य' वर्णावयाचें होते यास्तव श्रीधराने दक्षिण काशीविश्वेश्वर म्हणून ख्याति पावलेलें बारामतींतील शिवालयाचे स्थळ मुद्दाम निवडले असावे. नाहींतर त्यास पंढरपूर सोडून तेथे जाण्याचे दुसरे कारण दिसत नाहीं.

## २ ग्रंथनाम, विषय व ग्रंथाधार

श्रीधराने 'हरिविजय', 'रामविजय', 'पांडवप्रताप', जैमिनि-अश्वमेध इत्यादि ग्रंथात विष्णुलीला वर्णिल्या. 'शिवमाहात्म्य' सांगावयाचें राहिलें तें या ग्रंथात त्यानें सांगितले आहे. त्या कथा कवीस अमृताहूनही रसाळ वाटल्यामुळें या ग्रंथास त्यानें दिलेलें 'शिवलीलामृत' हें नाव अगदीं सार्थ दिसतें.

'शिवलीलामृता'चे चौदा अध्याय असून एकन्दर ओंवीसंख्या दोनहजार चारशे पन्नास आहे. चौथा अध्याय एकशे पंधरा ओव्यांचा असून तो सर्वांत लहान तर शेवटले दोन दोनशे साठा ओव्यांचे सर्वांत मोठे आहेत. अध्याय सहा,सात व बारा यांत दोनशेच्या वर ओव्या आहेत. पण सर्व ग्रंथाचें सरासरी प्रमाण एकशे पंचाहत्तर ओव्यांचें पडतें यावरून प्रमाणबद्धतेच्या दृष्टीने हा ग्रंथ बांधेसूद दिसतो.

४ पागारकर. मोरोपंत च. आणि का. पृ. १९५–१९६

हा ग्रंथ श्रीधराने 'स्कन्दपुराण ब्रह्मोत्तरखण्डाच्या' आधारे रचल्याचें प्रत्येक अध्यायाच्या शेवटी सागितले आहे. 'स्कन्दपुराण' हें फार मोठें असून त्यात एकूण चौदा खण्डें आहेत. पहिल्या भागात 'महेश्वर' व 'वैष्णव' हीं खण्डें सागून झाल्यावर तिसरें 'ब्रह्मखण्ड' येते. यात पहिले सेतुमाहात्म्य[५] दुसरे 'धर्मारण्य'[६] यानतर तिसरे 'ब्रह्मोत्तरखण्ड' येतें. यात एकंदर बावीस अध्याय आहेत. यातील कथा श्रीधरानें अकरा अध्यायात साराशानें सागितल्या आहेत. अध्याय दोन मधील 'शिवरात्रमहिमा' त्याने लिंगपुराणातून वर्णिल्याचे स्वत.च सागितलें आहे.[७] मुळातील बावीसाव्या अध्यायातील 'बहुलाख्यान' 'शिवलीलामृता'तील बाराव्या अध्यायाच्या एकशेंदोन ओव्यात सागून झाल्यावर कवीने 'भस्मासुर' आख्यानास सुरवात केली आहे. तो सागतो[८]:—

हे शिवपुराणीं कथा सुरस । श्रोतीं ऐकावे सावकाश ।।
कैलासीं असता महेश । प्रदोषकाळीं एकदा ।। इ.

अशा रीतीनें श्रीधरानें या कथेचा आधार स्पष्टपणें सागितला असता ती 'स्कन्द' पुराणांतूनच त्याने घेतली असल्याचा गैरसमज पागारकरांचा झाला.[९] पण या संबंधीं बरीच खरमरीत टीका करणारे प्रा. बनहट्टी याच्याही सूक्ष्म व चिकित्सक दृष्टींतून श्रीधरानें दिलेला हा आधार

५ स्कन्दपुराण. ३, ५२ ; ६ स्कन्दपुराण. ३, ४०

७ सत्यवती हृदयखाणी । रसभरित बोलिला लिंगपुराणीं ।।
शि. ली. २, १८७

८ शि. ली. १२, १०४

९ पागारकर. मोरोपत च. आणि का., पृ. २०२, पादटीप १

कसा निसटला याचें आश्चर्य वाटतें ![10] नाहींतर ' या धूर्त साक्षीदारावर विश्वास ठेवून ते (पागारकर) कसे फसले' इत्यादि आरोप त्यांच्याकडून झाले नसते. पण त्याहूनही आश्चर्यकारक गोष्ट ही कीं, 'भस्मासुर-मोहिनी कथेचा मूळ आधार जसा प्रा. बनहट्टी यांस हातीं असलेल्या 'भागवत स्कन्द-ब्रह्मोत्तरखण्ड' व 'पद्म' या पुराणात आढळला नाहीं[11] तसा श्रीधरानें उल्लेखिलेल्या 'शिवपुराणात'ही तो प्रस्तुत लेखकास सापडला नाहीं !

शिवपुराणात पुढीलप्रमाणें अनेक असुराच्या कथा आहेत :—[12] तारकासुर, त्रिपुरासुर, जालन्दर, दंभासुर, शंखचूड, अधकासुर, बाणासुर, महिषासुर, गजासुर व दुदुभी. तशीच मोहिनीरूप दर्शनानें झालेली 'शिव-वीर्यच्युती'चीही कथा आहे पण 'भस्मासुर-मोहिनी' कथा मात्र त्यात आढळली नाहीं. त्याचप्रमाणें 'शिवलीलामृता'त आलेल्या पुढील कथाही 'शिव'पुराणांत आहेत :—

महानन्दा, भद्रायु अर्जुनभिल्ल, गोकर्णमाहात्म्य व चांडालीचा उद्धार, मित्रसहराजाची कथा, शिवरात्रमाहात्म्य, सतीदेहत्याग, वीरभद्रोत्पत्ति दक्षयज्ञविध्वस, इ यावरून 'स्कन्दपुराणा'तील कथा इतर पुराणातही आलेल्या दिसतात. एवढ, ही 'भस्मासुर-मोहिनी' ची सुप्रसिद्ध कथा श्रीधरानें कोठून घेतली याचा तलास निदान अद्यापि तरी लागलेला नाहीं. श्रीधराचे वाचन फार विस्तृत होतें. तेव्हां शिवपुराणाचा आधार देताना त्याची

---

१० बनहट्टी. मयूरकाव्यविवेचन, पृ. ३१

११ बनहट्टी. मयूरकाव्याविवेचन, पृ. ३१

१२ शिवपुराण अ. ८-१०, १८, १९, २० व ४०

चूकभूल झाली असावी, आणि वरील मोहिनीचा भस्मासूर-मोहिनीशीं त्याच्या मनात काहीं घोटाळा झाला असावा.

असो. आता 'शिवलीलामृता'च्या शेवटच्या दोन अध्यायातील कथांकडे वळूं. तेराव्यात 'दक्षयज्ञ'[१३] 'वीरभद्रजन्म', 'दक्षयज्ञ-विध्वंस' 'शिव-पार्वती विवाह', 'त्रिपुरासुरध', 'तारकासुर', षडानन-जन्म' 'तारक-वध' 'षडानन-विवाहा'चा उपक्रम वगैरे कथा आल्या आहेत. चौदाव्या अध्यायात 'गजानन-षडानन विनोद', 'शंकर-पार्वती विनोद', 'सारीपाटक्रीडा', 'शंकर-भिल्लीण-संवाद' या कथा आल्या आहेत. या सर्व 'स्कन्द' पुराणातल्या म्हणून श्रीधर मोघमपणें म्हणतो पण कोणते खण्ड हें तो सांगत नाहीं. तर सुप्रसिद्ध 'श्रियाळ' आख्यानाचा आधार मुळींच दिलेला नाहीं.[१४]

आता या कथा कोणत्या खण्डातून त्यानें घेतल्या असाव्या याची थोडिशि चर्चा करू. पहिल्या प्रथम 'दक्षयज्ञा'ची कथा येते. 'स्कन्द-पुराणातील 'काशी'खण्डाच्या उत्तरार्धातील अध्याय सत्याऐंशींमध्यें 'दक्षयज्ञ वर्णन', अध्याय अठ्याऐंशीमध्यें 'सतीनाश' व अध्याय एकूण-नव्वदमध्यें 'वीरभद्रजन्म' या कथा आल्या आहेत. पुनः 'स्कन्दपुराण' भाग पहिला 'महेश्वर' (केदारखण्ड) अध्याय एक तें पांच 'दक्षवृत्तान्त',

---

१३ स्कन्दपुराणीं सुत । शौनकादिकाप्रति सांगत ॥
त्रेतायुगीं अद्‌भुत । कथा एक वर्तली ॥ शि. ली. १३, २

१४ शिव म्हणे धन्य भवानी । तुवा मज आणिलें समजावोनि ॥
सूत शौनकादिकां लागोनि । कथा एक विचित्र सांगे ॥
शि. ली. १४, ११४

सतीचें दक्षयज्ञास गमन, तिचा नाश, वीरभद्रोत्पत्ति, दक्षयज्ञविध्वस या कथा आल्या आहेत. पुढे अध्याय वीस ते पसतीस पर्यन्त भवानीची उत्पत्ति-विवाह. कार्तिकजन्म-तारक युद्ध व त्याचा वध. शिवपार्वती द्यूतक्रीडा शिव-भिल्लीण सवाद व मीलन या कथा आल्या आहेत. आणखी एकदां ' महेश्वर कौमारिका ' खण्डात ( अध्याय पधरा ते बत्तीस ) याच कथा आल्या आहेत. त्यातील अध्याय चोवीस मधील ' मदन- दहना ' ची कथा ध्यानात ठेवण्यासारखी आहे.

वर सागितल्याप्रमाणें 'शिवलीलामृता'तील तेराव्या व चौदाव्या अध्यायातील कथा ' स्कन्द'पुराणात अनेक ठिकाणीं पुनरावृत्त झाल्या आहेत. त्यांतील मुख्य कथाभाग जरी एकच असला तरी तपशील मात्र काहीं ठिकाणीं भिन्न आहे. याचीं काहीं उदाहरणे पाहूं.

१ ) वीरभद्राची उत्पत्ति शंकराच्या क्रोधापासून झाल्याचे ' काशीखण्डात ' आहे. तर ' शिवपुराणा'त तो जटेपासून झाल्याचे वर्णिलें आहे :—

उत्पाटयैका जटा रुद्रो लोकमहारकारक: । आस्फालयामास रुषा पर्वतस्य तदोपरी ॥[१५] सा द्विधा भूता... तज्जटाया: समुद्भूत: वीरभद्रो महाबल: ॥ जटेच्या दुसऱ्या भागातून महाकाली झाली. वीरभद्राने ब्रह्मा, विष्णु, इद्र वगैरे सर्व देवांचा व ऋर्षीचा समाचार घेतला, व सर्वांस पळावयास लाविलें. नन्तर त्याचें विष्णूशीं युद्ध झालें. तोही पराभूत होऊन पळाला.[१६] सतीनें योगाग्नीने देहत्याग केला. तर ' स्कन्द 'पुराण म्हणते कीं, सतीनें जठराग्नि प्रदीप्त करून देहदहन केले. आता श्रीधराचे हेच वर्णन पहा[१७]:—

---

१५ शिवपुराण. २०, ३२ , १६ शिवपुराण. ३७
१७ शि. ली. १३, ३०–६४

सतीने यज्ञकुंडात उडी टाकली. शिवगणानीं शिवास वृत्तान्त सांगितला.

ऐकता क्षोभला उमाकांत । जेवीं महाप्रळयींचा कृतांत ॥
हाक देवूनि अद्भुत । जटा आपटी आवेशें ॥[१८]
तो अकस्मात वीरभद्र । प्रगटला तेथे प्रळयरुद्र ॥[१९]

हा तपशील शिवपुराणाशीं जुळतो. पण श्रीधरानें वीरभद्राचें विष्णूशी झालेलें युद्ध गाळले आहे. वीरभद्रास पहाताच देव, ऋत्विज पळू लागले. ते भयाने कांपू लागले, व मळमूत्र विसर्जन होऊन त्याचीं धोतरें गळून पडलीं. चंद्र कुक्कुट रूपाने, शिखी शिखीरूपानें ( अग्नि मोर ), यम बकवेषानें, इंद्र पोपटरूपान अशीं रूपान्तरे करून देव पळूं लागेल. वीरभद्राने पूषाचे दात पाडले. भगदेवाचे नेत्र फोडले व ऋत्विजाच्या खाडमिशा उपटल्या. वीरभद्राने नन्तर दक्षाचें शिर तलवारीने छेदन केले व तें पायाखालीं रगडले त्यास मग मेषशिर लावलें. पुढे त्याचे काय झालें हें श्रीधराने सांगितलें नाहीं.

' शिवपुराण ' सांगतें कीं, वीरभद्रानें भृगूची दाढी उपटली, पूषाचे दात पाडले; नन्दीनें भगदेवतेचे नेत्र काढले, व वीरभद्रानें दक्षशीर हातानें तोडून यज्ञकुंडात टाकले.[२०] स्कन्द माहेश्वरखंडात म्हटलें आहे कीं, वीरभद्रानें दक्षशिर अग्नींत टाकले. भृगूच्या मिशा उपटून त्यास खालीं पाडलें. पूषाचे दात पाडले. स्वधेची विटंबना करून मूत्रपुरिषवृष्टि कुंडात केली. पण देव पक्षाचीं रूपें घेऊन पळाले असें जें श्रीधराचे वर्णन वरतीं आहे त्याला दोहींतही आधार नाहीं. तेव्हा ही कविकल्पना कीं काय ?

---

१८ शि. ली. १३, ३५ ; १९ शि. ली. १३, ३६
२० शिवपुराण. खण्ड, २, ३७

२ ) 'शिव-पार्वती' विवाहांत पार्वतीरूप पाहून सूर्यजामात (ब्रह्मदेव) काममोहित झाला. वीर्यबिंदु पडले. त्यातून साठ सहस्र वालखिल्य जन्मले ते पाहून शंकरानें क्रोधाने त्याचे पाचवें शिर छेदले;[२१] पण 'स्कन्द-माहेश्वर' खण्डांत शिरच्छेद नाहीं शंकरानें पहाताच ब्रह्मदेव ओशाळला, एवढेच आहे

३ ) शिवाच्या तपात मदनानें विघ्न आणिले म्हणून त्यास त्यानें जाळलें.[२२]

फाल्गुनपौर्णिमा साचार । काम जाळिला ते दिवशीं ।।
शिवदूत भूतगण । महाशब्दें हाक देऊन ।।
स्मरगृह शब्द उच्चारोन । नानापरी उपहासती ।।
शिवआज्ञा तैपासून । फाल्गुनमासीं हुताशनी करून ।।
जो हे व्रत न पाळी पूर्ण । अवदसा जाण त्या बाधी ।।

असें 'शिवलीलामृता'त आहे. पण 'माहेश्वर' खण्ड अध्याय चोवीसमध्यें मागें सांगितल्याप्रमाणें नुसते 'मदन-दहन' वर्णिलें आहे. हुताशनीची वर दिलेली श्रीधराची उपपत्ति त्यात नाहीं. ऋग्वेदी यांनीं केलेल्या 'आर्यांचे सण' या पुस्तकात शिमगा सणाची उपपत्ति फार प्राचीन काळापासूनची अत्यन्त चिकित्सक व शोधक रीतीनें दिली आहे. त्यांत वर दिलेली उपपत्ति आढळत नाहीं. श्रीधरानें ती दुसऱ्या कोठून घेतली कीं स्वतःच्या कल्पनेनें ती रचली हें कळण्यास मार्ग नाहीं. श्रीधराच्या

२१ शि. ली. १३, १५८
२२ शि. ली. १३, १२२-१२४

या ग्रंथाची लेखनसमाप्ति मात्र मागें सांगितल्याप्रमाणें फाल्गुन पौर्णिमेसच झाली आहे. हा योगायोग मोठा मौजेचा आहे !

४ ) 'माहेश्वर'खण्डात स्कन्दानें तारकासुराचा शिरच्छेद केला असें सांगितले आहे, तर श्रीधर म्हणतो त्यास मल्लयुद्धात स्कन्दानें पायानीं आवळला व चक्राकार भोंवडून धरणीवर आपटलें तेव्हा तो मृद्घटवत् चूर्ण झाला.[२३]

५ ) 'शिवलीलामृता'तील पुढील कथाचे आधार 'स्कन्द'-पुराणातील वर उल्लेखिलेल्या खण्डांत आढळले नाहींत. श्रीधरानें तर 'स्कन्द'पुराण असें मोघम म्हटलें आहे. यावरून त्याने आठवणीवर भिस्त ठेवून त्या लिहिल्या असाव्या असें वाटतें. त्या कथा अतिशय प्रसिद्ध व लोकप्रिय आहेत यात संशय नाहीं. पण त्यांचे नेमके आधार मात्र सापडत नाहींत असें झालें आहे. त्या कथा अशा:—

१ ) भस्मासूर-मोहिनी आख्यान.[२४]

२) मदनदाह व होळींतील शंखध्वनि.[२५]

---

२३ शि. ली. १३, १९६ ; २४ शि. ली. १२, १०३-११२ .

२५ शि. ली. १३, १२२-१२४

' The mythological origin of ' Holika ' of modern days on the full moon day of Phālguna is described in 'भाविष्यपुराण' ( उत्तरपर्व Chapt. 132 )". Dr. P. V. kane. ' History of Dharmashāstra, ' v. III: p. 844.

३ ) शिवपार्वतीच्या लग्नाची तिथि. मन्मथ संवत्सर चैत्रमासीं शु. ८ मीस.[२६]

४ ) स्कन्दलग्नाचा उपक्रम. स्कन्दपुराणात ही कथा सूत शौनकादिकास सांगतात.[२७]

५ ) श्रियाळचरित्र.[२८] सूत शौनकादिकास सागतात.

६ ) गजानन षडानन विनोद.[२९] सूत शौनकादिकास सागतात. शिवगौरी-विनोद (गगेबद्दल).[३०]

साराश, 'शिवलीलामृता'तील पहिल्या बारा अध्यायातील ( म्हणजे 'भस्मासुर–आख्याना'पर्यन्त ) कथा ( अर्थात दुसरा अध्याय सोडून ) श्रीधरानें मुळाबरहुकूम सारांशानें पण मोठ्या चटकदार रीतीनें सागितल्या आहेत. 'परन्तु शिवलीलामृता'चे पान स्वतःएवढेच करून व वाचकाकडून करवून त्याचें समाधान झालें नाहीं म्हणून त्यानें वाचलेल्या 'स्कन्द' पुराणाच्या इतर खण्डातून व पुराणांतरातून शिवलीलांची भर यात घातली आहे. अर्थात असे करताना त्याच्या पुढें ते ते ग्रंथ नसावेत म्हणून त्यास आपल्या स्मरणशक्तीवरच सर्व भिस्त ठेवावी लागली असावी असे वाटतें. या कारणास्तव वर उल्लेखिल्याप्रमाणें त्याच्या तपशीलात फरक किंवा निरनिराळ्या कथाभागाचे मिश्रण हीं दिसून येतात. श्रीधराचा प्रधान हेतु कथावैचित्र्यानें वाचकाचे मनोरंजन करण्याचा होता; मूळ आधार बिनचूकपणे देण्याचा नव्हता म्हणून तिकडे त्याचें अवधान राहिलें नसावेसें दिसतें. म्हणूनच त्यानें दिलेले आधार अगदीं मोघम आहेत.

---

२६ शि. ली. १३, १४१ ; २७ शि. ली. १३, २०२–२१२
२८ शि. ली. १४, ११६–१८० ; २९ शि. ली. १४, ७–३०
३० शि. ली. १४, ३१–४५

## ३ श्रीधराचा विनय व आत्मविश्वास

श्रीधराचा विनय व आत्मविश्वास हे त्याच्या इतर ग्रंथाप्रमाणें यातही ठळकपणें दिसून येतात. खरें पाहिले असतां, अनेक प्रचंड ग्रंथाची रचना करून प्रसिद्धि व लौकिक मिळविल्यानन्तरचा नव्हे उपलब्ध ग्रंथांपैकीं शेवटचा हा ग्रंथ होय. तरी पण ग्रंथकर्तृत्वाचा अभिमान त्यास शिवला नाहीं. ग्रंथारंभीं शिवस्तोत्र गाऊन तो म्हणतो. —"ईश्वरा तुझा महिमा मन, बुद्धि व तर्क यांस अगोचर आहे. तो वर्णन करणें अशक्य असले तरी द्वितीयेच्या चंद्रास जशी जीर्ण दशा वाहतात तसा मी अल्पमति तुझे गुण वर्णितों आहे. जेथें सत्यवतीहृदयरत्नही तटस्थ राहिला तेथें माझ्या-सारख्या मंदमतीचा काय पाड !"

परी आत्मसार्थक करावया साचार । तव गुणार्णवीं मीन झालों[३१] ॥

हे शब्द ऐकताच दाक्षायणीवर संतुष्ट होऊन म्हणाला "तू ग्रंथास आरंभ कर, मी रस भरीन.[३२] आणि[३३] —

जैसा धरूनि शिशूचा हात । अक्षरें लिहिवी पंडित ॥
तैसे तव मुखें मम गुण समस्त । सुरस अत्यंत बोलवीन मी ॥

असें वरप्रदान मिळताच 'श्रोतीं व्हावें सावधान' असा त्यांस इषारा देऊन त्यानें एकदम कथेस सुरवात केली आहे. व अध्यायाच्या अखेरीसही तोच देव श्रीधरमुखनिमित्त करून बोलवीत आहे असें श्रोत्यांस पुनः आश्वासिलें आहे. या ईश्वरी प्रसादाचे पडसाद पुढेंही मधून मधून

---

३१ शि. ली. १, ३१ , ३२ शि. ली. १, ३२
३३ शि. ली. १, ३३

ऐकावयास मिळतात.[२४] पण हा ग्रंथ प्रासादिक असें एकदां श्रोत्याच्या मनावर ठसवून दिल्यावर आत्मविश्वासानें त्याची जागोजाग स्तुति करून श्रोत्याचें कुतूहल वाढविणें हे क्रमप्राप्तच आले. पहिल्या अध्यायाच्या शेवटीं पुढील-कथा अमृताहूनही गोड आहे. असे आश्वासन देऊन पाचव्यांत कवि म्हणतो, "हा ग्रंथ आम्रवृक्ष आहे. त्याची पद्यरचनाफळें पाडास आलीं आहेत. मात्र कुतर्कवादी वायसास मुखरोग झाल्यामुळें तीं त्यास आवडत नाहींत. सातवा अध्याय कैलासगिरीच असून तेथे उमाविलासाचें वास्तव्य आहे असें त्यानें म्हटलें आहे. पुढें बाराव्यात आपला ग्रंथ म्हणजे सिंहस्थच असून या ग्रंथगौतमींत (भागीरथी) स्नान करताना अर्थजीवनात जे बुडी देतील त्यास कैलास-वैकुण्ठनाथ एकाच ठायीं भेटतील असे म्हटलें आहे. तर शेवटल्या अध्यायात चतुर्दश अध्यायावर नेहमींची अनेक रूपकें त्यानें केलीं आहेत. त्यांत तो म्हणतो, "चौदा भुवनाचे व चौदा विद्यांचें हें सार आहे, कीं हा चौदा रत्नांचा एकत्रित प्रकाश, कीं चौदा काण्ड वेद, कीं चौदा कोहाळीं, कीं चौदा कोठड्याचे हें शिवमंदिरच आहे."

## ४ या ग्रंथाचे विशेष

यावरून स्पष्ट दिसून येईल कीं, या ग्रंथस्तुतींत ऐहिक कल्याणावरच विशेष भर असून मागल्याप्रमाणें साहित्य सौंदर्य व दृष्टान्तरत्ने याचा त्यानें एकदा सुद्धा उल्लेख केलेला नाहीं हें ध्यानात धरण्यासारखें आहे. संसारांत मनुष्यास पूर्वकर्मानुसार दुःख, दारिद्र्य, भय, शोक, काम, क्रोध वगैरेंपासून उत्पन्न होणाऱ्या अनेक आपत्ति भोगाव्या लागतात अशा संकटकाळीं हताश न होतां त्यानें ईश्वरावर दृढ श्रद्धा ठेवून त्याची एक-

---

२४ शि. ली. ४, ११४; ७, ५; ९, १४८; १०, १४७

निश्चपणे उपासना करावी म्हणजे तो त्यास त्यातून मुक्त करून शेवटीं आपल्या पदीं नेतो. हेंच तत्त्व वाचकाच्या मनावर ठसविण्याचा कवीचा मुख्य कटाक्ष आहे म्हणूनच या दृष्टीनें त्यानें जप, तप, मंत्र तंत्र, रुद्राक्ष-धारण, कथाश्रवण, शिवपूजन, नामसंकीर्तन, भस्ममहिमा, अतिथिसेवा, परोपकार इत्यादि उपाय सोदाहरण सांगितले आहेत. त्याचप्रमाणें फल-श्रुतींतही, संतति, संपत्ति व आयुष्य यांचें सौभाग्यवर्धन, गण्डान्तरक्षय, ग्रहपीडा, पिशाच्चबाधा, रोगव्यथा यापासून मुक्ति, ऋणमोचन व शत्रुक्षय इत्यादि ऐहिक दु:खाचा परिहार व सुखाची प्राप्ति याचाच ठळकपणें निर्देश केला आहे. आणि[३५]—

त्रिमास करितां नित्य एक आवर्तन । सर्वसंकटें जाती निरसोन ।।
भावें प्रचीत पहावी वाचोन । नाहीं कारण अभाविकाचें ।।

अशी ग्वाही दिली आहे. या ग्रंथाचा आणखी एक विशेष हा आहे कीं, यांत सांगितलेला भक्तिमार्ग व मंत्रतंत्रादि आचारधर्म सर्व वर्णांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस सारखाच मोकळा आहे. प्रथमाध्यायांत शिवपंचाक्षर मंत्राचें महत्त्व सांगतांना कवि म्हणतो,[३६]:—

स्त्रीशूद्र आदि करूनी । हाचि जप मुख्य चहूं वर्णीं ।।
गृहस्थ ब्रह्मचारी आदिकरूनीं । दिवसरजनीं जपावा ।।

याचीच पुनरुक्ति बाराव्याच्या प्रारंभीं झालेली आहे.[३७] या सार्व-त्रिक मुक्तद्वारामुळें या ग्रंथाची लोकप्रियता समाजाच्या सर्व थरांत झालेली

---

३५ शि. ली १४, १९४ ; ३६ शि. ली. १, ५०

३७ ब्राह्मण क्षेत्रि वैश्य शूद्रवर्ण । ब्रह्मचारी गृहस्थ वानप्रस्थ पूर्ण ।।
स्त्रीबाळ वृद्ध तरुण । शिवकीर्तन श्रवण करावें ।। शि. ली. १२, १

दृष्टीस पडते. मनुष्य या जन्मीं वा जन्मान्तरीं कितीहि पापी वा दुराचारी असला तरी जर कोणत्याही मिषानें त्यास ईशस्मरण घडलें तरी त्यास सद्गति मिळते हे जें तत्त्व वामनपंडितानें आपल्या 'नामसुधे'त प्रतिपादिलें आहे तेंच श्रीधरानें येथे सांगितलें आहे;[३८] व त्यानुसारच येथील अनेक कथाची निवड झालेली दिसते.[३९] उदाहरणार्थ—जारकर्मरत कैकय ब्राह्मण-कन्या 'सुमित्रा,' किरात देशाचा अनाचारी राजा 'विमर्शन', 'मदन' ब्राह्मण व 'पिंगळा' वेश्या, महापातकी ब्रह्मराक्षस ( पूर्व जन्मींची भामिनी ) 'शारदा' वेश्या पण पतिव्रता 'महानन्दा,' आणि जारजारिणी विदुर 'बहुला' या सर्व पतिताचा नाममहिम्यानें उद्धार झाला आहे. त्याचप्रमाणे दाशार्ह', 'कल्मषपाद,' 'चित्रागद', 'वज्रबाहू' व 'विदूर' याचा उद्धार अनुक्रमें, 'कलावती' 'मदयती,' 'सीमतिनी' व 'बहुला' या त्याच्या ज्या स्त्रिया त्याच्या द्वारा झालेला आहे. यावरून सद्गुणी स्त्रियाचें संसारात किती महत्त्वाचे स्थान आहे हें जसे वाचकास पटतें तसेंच निराश झालेल्या पतितांस आत्मोध्दारार्थ झटण्यास उत्साह प्राप्त होतो. स्त्रियाच्या पातिव्रत्यावर कवीचा विशेष कटाक्ष होता हें दैत्य स्त्रियाच्या उदाहरणावरून दिसून येतें.[४०] कारण त्याच्या पावित्र्याच्या नाशा-

---

३८ अजित नाम वदो भलत्या मिसें । सकळ पातक भस्म करीतसे ॥ वामनपंडित. 'नामसुधा'

भलत्या मिसें घडो शिवस्मरण । .........शि. ली. २, २

नेणता बालक अकस्मात । अग्निस्फुलिंग टाकित ॥

परि भस्म यथार्थ करी कीं ॥ शि. ली. २, ४

३९ शि. ली. अ. ३, ४, ७, ९, १०, ११, १२

४० शि. ली. अ १३, १०२–१०४

बरोबर त्याच्या पतीचें वैभवही नष्ट झाले असे त्याने सांगितलें आहे. जारिणींस होणाऱ्या यमयातनाचे सविस्तर वर्णनात हाच हेतु असावा असें वाटतें. सुलभ भक्तिमार्ग, पतिव्रताधर्म, सौभाग्यवर्धन व्रतें वगैरे गोष्टींचा पुरस्कार या कथात केलेला असल्यामुळे हा ग्रथ स्त्रियास विशेष प्रिय व्हावा यात नवल नाहीं.

शिवपूजनाचा त्याग करून परचक्र निवारण्यास धावणाऱ्या शाल्व देशाच्या राजाचा पराजय झाला व उलट एकनिष्ठ शिवभक्त भद्रायुने शत्रूवर विजय मिळविला या उदाहरणावरून प्रयत्न व पराक्रम यांस कमी लेखण्याचा कवीचा उद्देश नसून "परन्तु येथें भगवताचे अधिष्ठान पाहिजे" या रामदासोक्तीचा पुरस्कारच करण्याचा हेतु दिसतो.

ग्रंथाच्या नावाप्रमाणे यात जरी शिवलीलाचा महिमा कवीनें गाईला आहे तरी त्यात इतर देवदेवतास कमी लेखलेलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर शिव-विष्णूत भेद मानूं नये असें कवीने वारवार बजाविलें आहे. उदाहरणार्थ, पहिल्या अध्यायांत दाशार्ह राजानें पूर्वजन्मीं केलेल्या महापातकाच्या गणनेंत 'हरिहरभेद' हें एक आहे.[४१] हरिहरनिंदकास सूर्यपुत्र नानाप्रकारें जाच करतो असे चवथ्यात सांगितले आहे.[४२] पुनः अकराव्यांत यम आपल्या दूतास आज्ञा करतो कीं:–[४३]

शिवद्वेषी जे पापमती । ते अल्पायुषी होती ॥
शिवथोर विष्णु लहान । हरी विशेष हर गौण ॥ :

---

४१ शि. ली. १, १३२ ; ४२ शि. ली. ४, ११३
४३ शि. ली. ११, ११५–११६

ऐसें जे म्हणती त्यालागुन । आणोनि नरकीं घालावें ।।
पुढें तेराव्यातही वीरभद्र याचीच पुनरुक्ति करतो.[४४]

यावरून श्रीधराचा कोणत्याही एका विशिष्ट देवाबद्दल आग्रह नव्हता. "शिव, विष्णु, विठ्ठल, मल्लारि, मार्तण्ड वगैरे सर्व । एकचि असूनि अनेक नामें धरीं।।"[४५] या तत्त्वानुरुप तो एकरूप मानीत होता म्हणूनच शैव वैष्णवामधील वितुष्ट नाहींसे करण्याचा त्यानें हा स्तुत्य प्रयत्न केला आहे.

येथवर या ग्रंथाचे काहीं विशेष सांगितले. यातील विविध कथा सर्वांच्या परिचयाच्या असल्यामळें त्याचा सारांश येथे सांगण्याचें प्रयोजन नाहीं.

मागे उल्लेखिल्याप्रमाणें कवीनें जरी या ग्रथाचें साहित्य–सौंदर्याचा स्पष्टपणें गौरव केला नाहीं तरी त्यात त्याच्या इतर ग्रंथात आढळणारे साहित्यगुण नाहींत असें नाहीं. तर त्याचे सर्व वाङमयीन गुण व विशिष्ट लकबी या ग्रंथातही आहेत. एवढेंच नव्हे, तर आपणास यांत परिणतप्रज्ञाची वाणीही अनुभवास येते. मात्र एवढे खरें कीं, त्यात भक्तिमार्ग व आचार-धर्म याचा प्रकर्ष इतक्या उत्कटतेनें झालेला आहे कीं, त्यापुढें त्याच्या साहित्यगुणांकडे वाचकाचें लक्षच जात नाहीं. शिवलीलाच्या अगाध महिम्याचा एकच एक ठसा वाचकाच्या मनावर कायमचा उमटतो. तेव्हा या गुप्त सौन्दर्याचे थोडेसें दिग्दर्शन करण्याकडे वळणे आता उचित ठरेल.

---

४४ शि. ली. १३, ६०–६२

४५ रामविजयाच्या नमनात असाच स्पष्ट उल्लेख आहे. रा. वि. १,४
श्रीधरवरद पांडुरंग । तेणें शिरीं धरिलें शिवलिंग ॥
शि. ली. १, १४७

# ५ रसपरिपोष

या ग्रथात भक्तिरसाच्या उज्वल पार्श्वभूमीवर कथानुरोधानें शृंगार व करुण यांची उभारणी झालेली दिसते. नव्हे, या दोघाचा एकमेकाच्या पाठशिवणीचा खेळ ग्रथभर चाललेला दिसतो. त्यामुळें ऊन-पावसाप्रमाणे सुखदुःख व आनन्द व शोक एकमेकाची लज्जत वाढवीत आहेत असें भासतें. शेवटच्या श्रियाळचरित्रांत करुणरसाची शीग परमावधीस पोंचली असताही अद्‌भुताच्या आकस्मिक आगमनाने अश्रुसपातात, आनन्दसूर्य प्रकाशतो व दुःखान्तिकेची एकदम सुखान्तिका होते. आणि ‘ ईश्वरीलीला अगाध आहे ’ असें म्हणत श्रद्धाळु वाचक ग्रंथ खालीं ठेवितो.

वरील रसाबरोबर शान्त, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स व हास्य या इतर रसासही प्रसगानुसार या ग्रंथांत स्थान मिळाले आहे. या स्थळाकडे थोडासा अंगुलिनिर्देश करू.

अ ) शृंगाररसः — प्रथम क्रमाने शृंगार येतो. शृंगार या ग्रंथात थोडाबहुत प्रत्येक अध्यायात आला आहे. उदाहरणार्थ,

( १ ) दाशार्ह व कलावती; ( २ ) रंभेचा पूर्ववृत्तान्त; ( ३ ) मदयन्ती व कल्माषपाद; ( ४ ) धर्मगुप्त व अंशुमती; ( ५ ) सीमंतिनी व चित्रागद; ( ६ ) सुमेधा व सोमवन्त या कृत्रिम दापत्याचा संभोग; (७) भद्रायु व कीर्तिमालिनीचा वनविहार;(८)ब्रह्मराक्षसाच्या पूर्वजन्मींच्या स्त्रीभोगाचें वर्णन; ( ९ ) शारदेची पूर्वजन्मींची कथा; ( १० ) महानन्दा व सौदागर; ( ११ ) विदुर-बहुलाः मोहिनी व भस्मासुर; ( १२ ) मदन–दहन; ( १३ ) शकर-पार्वती सवाद; व ( १४ ) शंकर–भिल्लिण सवाद.

या सर्व स्थळापैकीं ' धर्मगुप्त ' व ' अंशुमती ' यांच्या शृंगार–वर्णनाच्याच परिपोष फार सुन्दर झाला असून तो खऱ्या शृंगाराच्या पदवीस प्राप्त झाला आहे त्यात उत्तानता नसून तो औचित्य व शिष्टाचार यान धरून आहे. शंकरपार्वतीच्या शृंगाराचे मदन-दहनांत पर्यवसान झाल्यामुळें तो अपरिपुष्टच राहिलेला आहे. पण शंकर-पार्वतीचा छेकापन्हुतियुक्त संवाद फार चटकदार झाला आहे. तर शंकर-भिल्लिणीचा संवाद वक्रोक्तिनें मोठा हृद्य व मार्मिक झाला आहे. कारण त्यात स्वत: मदनान्तक मदनहत झालेला आहे. देवदेवताचा शृंगार वर्णू नये असे म्हणतात. तेव्हा हाही गौणच. यात मर्यादातिक्रम कोठेही झाला नाहीं एवढेच काय तें म्हणता येईल. इतरत्र तो काहीं ठिकाणीं अयोग्य आलंबन विभावामुळें आभासमय झाला आहे, तर काहीं ठिकाणीं तो पापमूलक असल्यामुळे अरोचक झाला आहे. एवढे मात्र निःसंशयपणे म्हणता येईल कीं, या ग्रंथातील कोणत्याही वर्णनापासून कामुकता व कामप्रवृत्ति उत्पन्न होत नसून कामनिवृत्ती व संयम यांचाच ठसा वाचकाच्या मनावर अधिक ठळकपणें बसतो.

आ ) करुणरसः—करुणरसाचीं स्थळेंही अनेक आहेत. मृग-मृगी व पाडसे याची आत्मबलिदानार्थ अहमहमिका व्याधाच्या पाषाण हृदयालाही पाझर फोडतात (अ. २); कल्माषपादाने ब्राह्मण खाल्ला त्यावेळचा त्याच्या पत्नीचा शोक(अ. ३);सीमंतिनीचा शोक–चित्रांगदमाता लावण्यवती व पिता इंद्रसेन याचा शोक (अ.६); पितरासह सीमंतिनी दुःखार्णवीं पडली एकसरीं –कुंभिनी डळमळू लागली, समुद्रपाणी तप्तलें, पशुपक्षी गुल्मलतास शोक–

लावण्यवतीचा पुत्रशोक अनिवार । नाही मिती शोकातें ॥

सिमतिनी चित्रागदास जन्मकथा सागते तेव्हाचा शोक. लावण्य-वंतीची भेट–वत्सलरस; मुलासह वनवास भोगीत असता सुम ीचा शोक–पक्षी वृक्ष रुदन करती–पक्षी छाया करीत व चचूने बाळास पाणी पाजीत. पुढें तिचा पुत्रशोक.सुमतिभेटींत वज्रबाहूचा शोक(अ.७);भद्रायुच्या वनक्रीडेंत महाव्याघ्रमुखी ब्राह्मण स्त्रीचा आकान्त, (अ.८),भद्रसेनास पुत्राचें मरण सातव्या दिवशीं आहे असें कळले तेव्हाचा त्याचा शोक–पुत्र पुनःजीवन्त झाला तेव्हाचा वत्सलरस (१४)व (अ.११)शेवटीं श्रियाळ–चागुणेचा शोक; अशी अनेक स्थळे शोकरसपूर्ण आहेत. पण त्यातल्या त्यान सीमतिनीचा पतिशोक फारच गाढ झाला आहे तर श्रियाळ–चागुणेच्या शोकास फारच धीरोदात्त स्वरूप आले आहे. अतिथिसतोषार्थ उभयतांनी त्याचे सर्व अनन्वित हट्ट पुरविले. पण शेवटीं 'निपुत्रिकाच्या घरीं अन्नग्रहण कोण करणार?' हे त्याचे शद्व ऐकताच सकळ सत्वही बुडाले व बाळही गेलें म्हणून जो चागुणेनें टाहो फोडला तो दगडालाही पाझर फोडणारा आहे. कवि म्हणतो त्याप्रमाणे —

'शोकक्षोभे च हृदयं प्रलापैरेव धार्यते' हेंच खरे. या सत्वपरीक्षेत उतरल्याबद्दल मिळालेले फलही तितकेंच अद्भुत आहे व त्यायोगें शोकसागराचें पर्यवसान आनंदसागरात झालें आहे. व श्रियाळ–चागुणेची अलौकिक अतिथ्यशीलता अजूनही सर्वतोमुखी आहे. तिचें सर्व श्रेय श्रीधरासच आहे.

इ ) वीररस :— आता वीररसाकडे वळूं. सत्यरथपुत्र धर्मगुप्ताचें दुमर्षणाशीं युद्ध ( अ. ५ ), भद्रायूचें हेमरथाशीं झालेले युद्ध; वीरभद्र व दक्षयज्ञविध्वसन; त्रिपुरमर्दन व तारकवध, इतक्याच स्थळीं वीररसास अवसर मिळाला आहे. पहिल्यात भद्रायूने स्वपराक्रमापेक्षा दैवी

वरानेंच शत्रूवर विजय मिळविला असला तरीही शिवयोग्यानें दिलेल्या खड्गाचें व त्याच्या प्रभावाचें वर्णन बरें झाले आहे. वीरभद्रयुद्धात भयानक व रौद्र या रसानी वीररसास पुष्टि मिळाली आहे. पण परपक्षाचा प्रतिकार त्यात नसल्यामुळें एकपक्षी पराक्रमानें वीररसास रंग चढत नाहीं. त्रिपुरासुर व तारकासुर याच्या युद्धांत मात्र वीररस बराच रंगला आहे. तरी पण श्रीधराच्या इतर ग्रथांतील वीररसापुढें हा फिक्काच वाटतो.

ई) इतर रस :— शोकरसाबरोबर वत्सलरसाचा उल्लेख मागें आलाच आहे. शोकानंतर येणाऱ्या पाराशराचे व शिवयोग्याच्या बोधात शान्त, यमयातनावर्णनात बीभत्स वगैरे रस आले आहेत. पण विशेष ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, या भक्तिपर व आचारप्रमुख गभीर ग्रथांत हास्यविनोदालाही स्थान मिळाले आहे. त्यामुळें क्रुद्ध व उद्विग्न वातावरणातून एकदम सूर्यप्रकाशांत—नव्हे—शीतल चंद्रप्रकाशांत आल्यासारखें वाटतें. तेराव्यातील अग्नि गरोदर झाल्याचें वर्णन मौजेचें आहे गजास्य-षडास्याच्या बालकलहातील विनोद रम्य आहे तर शिव पार्वतींची गंगे-बद्दलची छेकापन्हुति फारच चटकदार झाली आहे. त्याचा सारीपाट खेळ त्यातील रुसवा व शकर-भिल्लिण-सवाद हीं वर्णने फारच हृद्य झालीं आहेत.

अशा रीतीनें या ग्रथात जरी सर्व रसास प्रसगानुरुप आपापल्या योग्यतेनुरूप स्थान मिळालें असले तरी समग्र ग्रंथ वाचल्यानन्तर वाचकाच्या मनावर जो ठसा राहतो तो भक्ति व शान्त या रसांचाच होय. आणि वर सांगितल्याप्रमाणें कवीचे ध्येयही तेंच असल्यामुळे तें त्यास चागलें साधलें आहे असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

## ६ वर्णनें

इतर ग्रंथांप्रमाणें या ग्रंथांतहि स्थलवर्णनें, निसर्गवर्णनें,

स्वभाववर्णने व सौंदर्यवर्णनें हीं वाचनीय व आकर्षक झालीं आहेत. पण मुख्य ध्येयाकडे त्याची ओढ असल्यामुळे तो कोठेंही रेंगाळत नाहीं. तर कुशल चित्रकाराप्रमाणें अवश्य तितके कुंचल्याचे झटके मारून तो पुढें जातो हा त्याचा विशेष आहे. दुसरा मोठा विशेष हा कीं, त्यानें आपल्या आवडत्या दृष्टान्ताचा पाल्हाळ या ग्रंथात कोठेंही केलेला नाहीं. या संयमात त्याची कलादृष्टिही प्रतीत होते.

अ) **स्थलवर्णनें**:—दुसऱ्या अध्यायातील 'शिवमंदिर'वर्णन व तेथील पूजेचा थाट याचे शब्दचित्र अगदीं थोडक्यात फार सुन्दर आहे. तिसऱ्यातील 'गोकर्ण'क्षेत्राचे तर याहूनही भव्य झाले असून कवीनें त्यास 'साक्षात् भूकैलास' असें म्हटले आहे. 'अवंती'नगरी 'उज्जयिनी'व 'महाकाळेश्वर' याचे वर्णन अगदींच एका शब्दात "आश्चर्यकारक रचना" असें केलें आहे. एकन्दरींत श्रीधराच्या स्थलवर्णनात कोणत्याही प्रकारचे वैशिष्ट्य नसून त्यात खास स्थलवर्णन असें दिसत नाहीं.

आ) **निसर्गवर्णनें**:—दुसऱ्या अध्यायातील रात्रीचे वर्णन[४६]—

तों वरून दिग्वधूचें सदन । वासरमणि प्रवेशला ।

असे सूर्यास्ताचें सुंदर वर्णन करून पुढे ब्रह्मांडकरण्डांत काजळ भरलें किंवा हा विशाळ कृष्ण कंबळ-मंडप उभारला आहे या ठराविक उत्प्रेक्षांनीं केलें आहे. तरी पण[४७]—

विगत धवा जेंवी कामिनी । तेंवी न शोभे कदा यामिनी ॥
जरी मंडित दिसे उडुगणीं । परि पतिहीन रजनी ते ॥

४६ शि. ली. अ. २, ३४ ; ४७ शि. ली. २, ३६

ही सुरस उपमा 'नक्षत्रताराग्रहसकुलापि ज्योतिष्मती चंद्रमसेवरात्रिः'॥

या सुप्रसिद्ध सस्कृत वचनाची वाचकास आठवण करून देते. तसेंच पुढील अरुणोदयाच्या वर्णनांत–[४८]

पूर्वदिशा मुख प्रक्षाळित । सुपर्णाग्रज उदय पावत ।
आरक्तवर्ण शोभा दिसत । तेंचि कुकुम प्राचीचें ॥

जरी नावीन्य नसलें तरी तें रम्य आहे. तृतीयाध्यायाच्या आरंभाचें वनपशुवर्णन व पुढील वनवृक्षवर्णन हीं अगदीं ठरीव ठशाचीं आहेत. त्यात जाई, जुई, मालती, मोगरी, शेवती, नारळी, पोफळी व अंजीर वगैरे सामान्यतः उपवनांत असणारीं फलपुष्पे आढळतात. तेव्हा या वर्णनांतही कवीचें चातुर्य व सूक्ष्म निरीक्षण हीं दिसून येत नाहींत.

इ) रूपवर्णनें:—मदोदरी व सुमित्रा, इंदुमती व अंशुमति, सीमतिनी व नागकन्या, महानदा, मोहिनी, पार्वती आणि भिल्लिण अशा अनेक स्त्रियाचे रूपवर्णन कवीने या ग्रंथात केलें आहे. परन्तु त्यात 'सीमतिनी' व 'पार्वती' अशा दोघींचेंच रूपवर्णन विस्तारशः केलें आहे. त्यातही त्याची नेहमींचीच पद्धति दिसून येते. एवढेच नव्हे, तर दोन्ही वर्णनात शब्द, उपमा व उत्प्रेक्षा याचें इतकें साम्य आहे कीं, त्याची अदलाबदल सहज करिता येईल. पार्वतीच्या वर्णनात काहीं भूषणाचा उल्लेख मात्र अधिक आहे एवढेंच. धर्मगुप्त व चित्रांगद यांच्याही वर्णनात विशेष असें काहीं नाहीं.

ई ) स्वभाववर्णनें :–– वरील वर्णनापेक्षा स्वभाववर्णनात कवीचें

---

४८ शि. ली. २, १६०

कौशल्य अधिक दिसून येतें. दुसऱ्या अध्यायातील शरासनी शर लावून कानाडी ओढून सावज लक्षिणाऱ्या व्याधाचें, विशाल देह शेंदुरचर्चित कपाळ व विकाळ वदन असणाऱ्या कल्माषपाद राक्षसाचें, चित्रांगदाच्या पुनर्भेटींत त्याकडे चोरून पहाणारी व सख्यामार्फत विचारपूस करणारी शालीन सीमंतिनी, जीवन्मुक्त वामदेवाचें वगैरे शब्दचित्रे वेधक झालीं आहेत. पण भस्मासुराचा स्वभाव फारच उठावदार झाला आहे. शंकराजवळ देवानीं गाऱ्हाणें आणलेसे पाहून "असुर मान तुकावित सरड्या ऐसी तयावरि" [४९] चिडणारा व शंकरालाच,

जोगड्या उभा धरीं धीर। तुझा संहार करून रक्षा लावीन अंगासी ॥

असें शंकरास म्हणणारा कृतघ्न राक्षस आपल्या पुढें प्रत्यक्ष उभा राहतो. शेवटल्यातील चांगुणा, श्रियाळ व चिलया यांचीं स्वभाववर्णनें तर अत्यंत धीरोदात्त झालीं आहेत. पण तीं अतिमानुष वाटतात. याचप्रमाणें रागद्वेषादि मनोविकाराचें शब्दचित्रही तो चांगलें वठवतो. तारुण्यरूपगर्विता सुमित्रा हिचें वर्णन पहा :—

मद्यमांसीं रत, पुष्ट जाहली बहुत, घूर्णित लोचन उघडीना ॥

श्रियाळाकडे येणारा अतिथि कसा तर—'परम क्रोधी जेवीं दावाग्नि'

पार्वतीप्रकोपाचें वर्णन—'पृथ्वीवर जणू प्रळयवीज पडत आहे, ऊर्वीमंडळ डळमळू लागले व भोगींद्र कंपित झाला, इ.

## ७ अलंकार

श्रीधराचा विशेष भर दृष्टान्त, उपमा व रूपक या अलंकारावरच

४९ शि. ली. १२, १५४

मेहमीप्रमाणें येथेही दिसून येतो. उत्प्रेक्षा, अनुप्रास यांस त्याच्या खालोखाल स्थान दिलेलें आढळतें. प्रारंभींच शिवगुणमहिमा वर्णन करणें अशक्य आहे हें सांगताना व दाशार्हराजाच्या वर्णनात अनेक सुन्दर उपमांचा रूपकाचा व वर्षाव झालेला दृष्टीस पडतो. त्यात शुद्ध द्वितीयेच्या हिमांशूची उपमा व 'दान-मेघे याचकाचा दारिद्र्यधुरोळा निवटिला' हें रूपक-हीं मोठीं हृद्य झालीं आहेत. मद्रायूच्या खड्गावरील उत्प्रेक्षाही कल्पनारम्य आहेत. ( काळाग्नीची कराळ जिव्हाच किंवा प्रलयचपलाविजू कीं काळसर्पाची गरळ ). पार्वतीच्या विष्णुस्तुतींतील अनुप्रास भारदस्त झाले आहेत. सीमंतिनी-चित्रांगद भेटींतील चित्रांगदाच्या निरनिराळ्या दिव्य रत्नांच्या तेजाच्या वर्णनात भ्रान्तिमान् अलंकाराची जी गर्दी उडाली आहे ती कवीच्या सुंदर कल्पनाविलासाची साक्ष देते.[५०]

## ८ संवादचातुर्य

इतर ग्रंथाप्रमाणें यातही कवीचें संवादचातुर्य दिसून येतें. पतीस संयम शिकविणाऱ्या कलावती व मदयंतीचीं भाषणें, व्याध व मृग-मृगी यांचा संवाद, धर्मगुप्त व शुचिव्रत, पार्वती व बटुरूप शिव, भिल्लिण-शंकर, वगैरेंचे संवाद चटकदार झाले आहेत.

## ९ नीतिबोध

त्याचप्रमाणें नीतिबोध, शिष्टाचार, व पातिव्रत्य यांची शिकवणही त्याने प्रसंगानुरूप केली आहे. हरिकथेत व देवालयांत तांबूल-चर्वण, पागोटें घालणें, झोप घेणें, टाळी न वाजविणें वगैरे गोष्टी वर्ज कराव्या असे

---

५० शि. ली. ६, १३०-१३४

दुसऱ्यात व बाराव्यांत प्रतिपादिले आहे. सातव्यात परधन व परकामिनी-विषयीं अभिलाष धरूं नये असें सांगितले आहे, तर शिवयोग्याने भद्रायूस केलेल्या उपदेशात उत्तम नीतिबोध आहे.[५१] बाराव्यातही सामान्यनीति विस्तारानें सांगितली आहे.[५२]

शिवपार्वतीपरिणयांत जानवसा, देवकप्रतिष्ठा, वरामिरवणूक, मधुपर्क, लग्नघटिका, अंत:पट, ॐ पुण्याहं, पाणिग्रहण, लाजाहोम वगैरे विधींचें वर्णन श्रीधराच्या कालानुरूप आहे.

## १० भाषाशैली व व्याकरणविशेष

आता या ग्रंथातील भाषेच्या स्वरूपाकडे वळूं. या ग्रंथातही श्रीधराच्या भाषाव्याकरणविषयक सर्व लकबी आढळतात.

१ ) अप्रयुक्त समासः— शिवआज्ञा, यशदायक, धनइच्छा, मनमृग, मनरंजन, अगम्यागमन, तपानुष्ठान.

अप्रयुक्त रूपेः— दीनवदनी, मृगनेत्री, कमलनयनी, खंजनाक्षी, बिंबाधरी, कामइभ, अपेशसमुद्र, ज्योतिलिंग, जगतात, द्वादशवर्षी.

२)जुने शब्दः—डंबरीं कीर्तिलक्ष्मी परम ।सर्वदाही वसो तुझ्या[५३]।।
( डंबर=ढीग, जमाव. )

धन्य शबराचे निर्वाण ( निश्चय ); अहळबहुळ ( अघळपघळ ) आहाळोनि ( दु:खाक्रांत ); वाड ( मोठा ), पुढती मागुती ( फिरून ); आसुडणे ( फटकणें ); पालाणिली; होय वोहरी महत्पापा, विंदान; विवशी

५१ शि. ली. ८, १ ' अगाध नीति प्रगटविली.'
५२ शि. ली. १२, ६-३८ , ५३ शि. ली. ८, ९

( सुसर ); आवले आवलिती; केणे ( माल ); खेटक ( ढाल ), हेळी ( सूर्य ), बोभाति ( ओरडती ), आसमास ( पुष्कळ ), शिष्यमादी (समूह) आर्त, हळवट ( हलकी, कमी ); वहिले ( तत्काळ ), येरीने; ढवळारे.

३ ) विभक्तिः—चाडाळगी लागून, जियेपासीं, प्रीतिकरून (तृ.), गुरुमुखे करूनि ( तृ· ) चिन्हें करून मंडित, ब्रह्माडकरडा भरले काजळ ( स. ), सर्वसाक्षा (संबोधन), मृगयोनीं जन्मलों ( स. ); जन्मींचें, लग्नाकारणें ( चतु ).

तुझे पां ऐश्वर्य सकळ । माळा गळा घालीत ( स. ) जलपानालागीं ( च )

४ ) म्हणी व सुभाषितः—ओवाळून टाकावें, अपाल्या अंगाची साउली करी पञ्चवक्त्र, ठायीं पडणें ( आकलणे ), अन्यत्र राहटी न करीं, सर्षप कनकाद्रीहून श्रेष्ठ केला,[५४] नगरात थोर वळमा होतसे(आकांत);

तव्याचा जाय बुरसा । मग तो सहजाचि होय आरसा ॥[५५]
महाशब्द करावयाची हौस । त्यात पातला फाल्गुन मास ॥[५६]
मूढास काय उत्तम ग्रंथ । तरुणास सन्यास देणे अनुचित ॥[५७]

ऋणी असणे; ठाण न चळे रणींहून, धणी न पुरे पाहता; हाका फोडितीं, माझे कपाळ उठविले; शिवनामाचा कोल्हाळ करती, काकुळती येणे;

करुणा भाकी पदर पसरी; मृत्तिका घेऊनि घाली वदनीं;
देवावरी काय बोल ठेवून; पुत्र ऋषीचे चरणीं घातले;

---

५४ शि. ली. ८, ८४ ; ५५ शि. ली. १२, ७५
५६ शि. ली. १२, १३० ; ५७ शि. ली. ८, १२३

अमृतात विषबिंदु पडत । तैसा भविष्यार्थ बोलिला ॥ खती वाटे कधीं पाहीन अंबा; रोमांच अंगी उभे ठाकत, निंबलोण करणें; ( पुरुषास स्त्रीवेष ); हें देखता सचील ( सचैल ) स्नान करावे; काय नसते मांडले मोग, तुझे वदन काळे झाले, या शरीराच्या पादुका करून, तुझिया दिव्य चरणा लेववीन; तरी नव्हे उत्तीर्ण, उपकार तुझा गुरुवर्या,[५८] देश नागविला; आम्ही कोणाची पहावी, कीर्तिघोष माजेल; समरभूमि थोर माजली, बिंदूचा सिंधु करून, गगनीं न माय ब्रह्मानंद; अग्निकाष्टे भक्षणे, नगरात हाक गाजली (ओरड), दावा साधून गेला, ऐसी मनीं बांधोनिया गाठी, चळचळा कांपणे, नक्षत्राचा सडा पडला; ख्याती केली दक्षयागीं; मूळ आला हिमाद्रि । गळा येवोनि पडो पहासी ॥

५ ) शब्दाची व्युत्पत्तिः–

अधोक्षजः–[५९] अक्षज नाम इंद्रियज्ञान । ते ज्याने केले आधी दमन॥
म्हणोन अधोक्षज नाम ज्यालागून । अतींद्रियद्रष्टा तो ॥

क्षत्रियः–[६०] क्षेत्रापासुनि सोडवीत निर्मळ । शरणागता रक्षी पार्थिव तो ॥

सीमंतिनीः–[६१] सीमा स्वरूपाची झाली तेथुनी ॥

६ ) सम्स्कृतीकरणः— वेश्या होत्साता पतिव्रता ( महानंदा ),

---

५८ शि. ली. ७, १४४ ; ५९ शि. ली. १२, १४८

६० शि. ली. ८, ११६ , ६१ शि. ली. ६, २०

जन्मादारभ्य; वर्णांना ब्रह्मणो गुरुः; अस्ति–जायते–वर्धते–विपरिणमते–अपक्षीयते, निधान षड्विकार समस्त ।।[६२]

द्वादशवर्षी कुमार; यथारण्य तथा गृह वाटे नृपाला, निर्माय ( मायारहित ), हेतुदृष्टांतवर्जित.

७) नामधातु व धातुरूपें:— आक्रान्तला, आनंदला, सुखावे, घेइजे; पर्णून; पढिन्नलों; धाविन्नला; हासिन्नला.

८) सामान्यरूपः— मौंजिबंधनावीण; गुरुवीण, ध्वनी( स्त्रीलिंगी ).

९) प्रयोग :— गृहस्थ ब्रह्मचारी आदि करुनी हा मंत्र जपावा.

तेणें कुंभिनी पालाणिली, म्या शशिमौळी उपासिला, त्वां शिवदीक्षा घेईजे, मग तो दाशार्ह गर्गे हृदयीं धरून ... मंत्र सांगे, तों वरून वरूण दिग्वधूचे सदन वासरमणी प्रवेशला, मित्रसह शापिला; (पूर्वी वसिष्ठमुनी–प्रथमा,तृतीया अध्याहृत)पुढे म्हणे शिष्यें गुरूसी शापावया अधिकार नाहीं; वसिष्ठें जाणोनि वृत्तांत रायासी; उःशाप देत म्हणे— ब्राह्मणपुत्र राक्षसें धरूनी, भक्षावया सिद्ध झाला, अग्नी प्रवेशली ती, दोन वेळां वरिलासी धूर्जटी.

प्रतिनामें:–१) इंद्र—बिडौजा, शक्र, पुरुहूत, पुरंदर, सहस्त्राक्षक, धराधरशत्रु, सहस्त्रनेत्र, मघवा, वृत्रारि, शचीरमण.

२) गणेशः— इभवक्त्र.

३) चंद्रः— द्विजराज; रोहिणीधव,शशी, इंदु, अत्रिनंदन.

४) यमः— सूर्यनंदन; कृतान्त,भानुपुत्र.

५) ब्रह्मदेवः— द्रुहिण, कमलोद्भव, पद्मज.

६२ शि. ली. १२, ११५

६) सरस्वती:— कंजकन्या.

७) वसिष्ठ :— अब्जनंदन.

८) मारुती:—शक्रारिजनकातकप्रियकर, भूजासंतापहरण, भूगर्भमानससंतापहर, वृत्रारिशत्रुजनकनगरदहन, उर्मिलाजीवनप्राणरक्षण, द्रोणाचलउत्पाटन अजनीहृदयाब्जमिलिंद.

## ११ सादृश्यें

१) धरित्रीचे करुनि पत्र । कुधर कज्जल जलधि मषीपात्र ॥
सुरद्रुमलेखणी विचित्र । करुनि लिहीत कंजकन्या ॥ शि ली १, २७
असितगिरीसमं स्यात्कज्जलं सिंधुपात्रे । (महिम्नस्तोत्र )

.. ............................... .... .. ... .

२) द्वितीयेचा किशोर इंदु । त्यासी जीर्णदशा वाहती दीनबंधु ॥
शि. ली. १, २९

३) जैसा धरूनि शिशूचा हात । अक्षरें लिहवी पंडित ॥
शि. ली. १, ३३ (ज्ञानेश्वरी)

४) अलंकारा शोभा जिची तनु आणी ॥ (कालिदास)

५) भलत्या मिसें घडो शिवस्मरण ।...शुष्क तृणपर्वत अद्भुत ॥
नेणता बाळक अकस्मात । अग्निस्फुलिंग टाकीत ॥
परी भस्म यथार्थ करी कीं ॥ शि. ली. २,२-४ (वामनपंडितकृत 'नामसुधा' )

६) जरी मंडित दिसे उडुगणीं । परि पतिहीन रजनी ते ॥
शि. ली. २, ३६ ('नक्षत्रताराग्रहसंकुलापि'......)

७) योगभ्रष्ट कर्मभूमीसी पावती । शि. ली. २, ४०
( 'शुचीनां श्रीमतां गेहे'... .. वगैरे-गीता)

८) गृहिणी सुंदर आणि पतिव्रता । पुत्र भक्त आणि सभाग्यता ॥
व्युत्पन्न आणि सुरस वक्ता । होय विशेष सुकृतें॥ शि ली.४,३२

९) थोर वस्तूंचे सग्रहण । तेंचि अनर्थासि कारण॥ शि. ली.४,४५

१०) अतिरूप अतिधन । अतिविद्या अतिप्रीति पूर्ण ॥
अतिभोग अतिभूषण। विघ्नासि कारण तेंचि होय॥ शि.ली.४,४६

११) परदारा नयनीं न पहाव्या । दर्शने हरती चित्त ।
स्पर्शनें बळ वीर्य हरित । शि ली.५,७३ (दर्शनात् ग्रसते चित्त ।
स्पर्शनात् ग्रसेते धन सगमात् ग्रसते सत्त्व । नारी प्रत्यक्ष राक्षसी)

१२) परान्ने जिव्हा दग्ध यथार्थ । दुष्ट प्रतिग्रहे दग्ध हस्त ।
स्त्रीअभिलाषें नेत्र दग्ध होत । मंत्रासि सामर्थ्य मग कैंचे ॥
शि. ली. ५, ५३

'परान्नेन मुख दग्धं हस्तौ दग्धौ प्रतिग्रहात्' ॥

१३) अश्रुधारा वाहती खालत्या । वाटे पयोधरलिंगास लाविल्या
गळत्या ॥ शि.ली ६,१४१ (मुक्तेश्वर)

१४) विद्याहीन तो पाषाण देख । जितचि मृत तो शतमूर्ख ॥
त्याचें न पहावे मुख । जननी व्यर्थ श्रमविली॥ शि.ली.७,२३

१५) धन्य ते पुरुष जनीं । परयोषिता एकातीं येउनी ॥
स्वरूप शृगार चतुर तरुणी । प्रार्थिता मन चळेना ॥
शि ली ७, ४३

१६) आत्मा शिव शाश्वत । शरीर क्षणभंगुर नाशिवंत ॥
तरी क्षणिकाचा शोक व्यर्थ । का वो करिशी विचारीं ॥
शि. ली. ७, ११२ (गीता)

१७) चित्राग्नीनें कोणते जाले दहन । तेथे गंगा लिहिली सहितमीन ॥
कोण वाहुनि गेला तेथें ॥ शि. ली.७,११५
न बुडविति नँ वा तारिति(मोरोपत)

१८) सकळ रोगाचें भाण्डार । मूत्र श्लेष्म मांस रक्त ।।
············मातेचा विटाळ पितृरेत ।। शि ली. ७,१२२

१९) गंगेमाजी काष्ठे मिळालीं । तीं एकवटोनिया त्रिघडलीं ॥
(यथा काष्ठ च काष्ठ च इ०) शि.ली. ७, १२९

२०) मायामय प्रपचवृक्षीं । जीव शिव हे बैसले पक्षी ।।
शिव साधक सर्वसाक्षी । जीव भक्षी विषयफळ ।।
द्वासुपर्णासयुजा············( उपनिषद् ) शि.ली.७,१३२

२१) येरी ते इद्रिये लावावीं भजनीं । (एकनाथ)

२२) दाने शोभे सदा हस्त । ककणमुद्रिकाभार समस्त ।।
श्रवणीं कुडलिका यथार्थ । श्रवणार्थी श्रवणाची।।शि ली. ७,१९३
'श्रुतेच कीं··················'वामनपडित.

२३) ज्ञानाचे भूषण क्षमा शाति ।। शि. ली. ७, २०५

२४) स्त्री पतिव्रता चतुर। पडित सभाग्य कुमर ।।
गुरु सर्वज्ञ दयाळु उदार । पूर्वदत्ते प्राप्त होय ।।शि.ली.८,९६

२५) जन्मांधासी दर्पण । व्यर्थ काय दाखवुनियां।।
शि. ली. ८, १२२
अधस्य दीपो बधिरस्य गीतम् । मूर्खस्य कि धर्मकथाप्रसंगः ।।

२६) पाप ताप आणि दैन्य । सत्समागमें जाय जळून ।।
शि. ली. ९, ८२

२७) गंगास्नाने जळे पाप । सुरतरु दैन्य अमूप ।।
अत्रिनंदन (चंद्र) हरी ताप । होतीं दर्शनें करूनिया।।
शि. ली. ९ १

२८) मत्र तीर्थ द्विज देव । गुरु यज्ञ ज्योतिष औषध सर्व ।।
येथे जैसा धरिती भाव। सिद्धि तैशीच तयाची॥ शि.ली. ९, १०७

२९) सर्व याचक केले तृप्त । पुरे पुरे हेचि मात ।।
धनभार झाला बहुत । म्हणोनी साडिती ठाईं ठाईं ।।
( मागावयास धन मागिल देखियेले ) शि.ली. ११, १४२

३०) शिवस्मरण नावडे अणुमात्र । जो अंत्यजाहूनि अपवित्र ।।
तो लेइला वस्त्रें अलंकार सर्वत्र । जैसे प्रेत श्रृंगारिलें॥ शि.ली. १२, २

३१) वल्मीकच्छिद्रवत् कर्ण शि. ली. ॥ १२, ४
'बिले बतोरुक्रमविक्रमान्ये' ( भागवत )

३२ ) वेदशास्त्र उभयहीन। तो केवळ अंधचि जाण ॥ शि ली. १२, ४२

३३ ) गगेसी वोहळ मिळाले । गंगारूप सहज ते ।। शि.ली. १२, ७६
( ज्ञानेश्वरी )

३४ ) मर्कटासी मद्य पान । त्यात जाले वृश्चिकदंशन ।।
आधींच मर्कट (वामनपण्डित).

३५ ) मग कुभिनी होवोनि रथ इ. ।। ( महिम्न—रथक्षोणीयंता )

३६ ) कीं भूलिंगा एकसरा । संतर्पण माडिलें सतीनें ।।
शि. लि. १४, [illegible]२

## १२ दोषदर्शन

आता या ग्रथातील दोषाचें दिग्दर्शन करणे क्रमप्राप्तच आलें आहे. तिकडे वळू. श्रीधराच्या इतर ग्रथांतील गुणाप्रमाणेंच दोषही या ग्रंथात सामान्यत्वें आढळतात. कारण कवीची रचनाशैली एकदा स्थिरावली कीं गुणाबरोबर दोषही तीस चिकटतात.

१ ) भाषाविषयकः—

अ ) जुने शब्दः—याचें प्रमाण या ग्रंथात फारच थोडे आहे. त्याची यादी मागें दिलीच आहे. पण 'हेली' [६३] ( सूर्य ), डंबर, वोहरी ( नाश ), वळसा ( आकांत ), निर्वाण ( निश्चय ), अहळबहळ ( अघळ-पघळ ), विवशी ( सुसर ) वगैरे शब्द जुन्या ग्रंथाच्या वाचकानाही थोडेसे अप्रसिद्धार्थी योजलेले वाटतील.

ब ) अप्रसिद्ध संस्कृत शब्द, दीर्घ समास व संस्कृती वळणः— अप्रसिद्ध संस्कृत शब्दांची मालिका प्रतिनामें योजण्यात फार करून अधिक येते हे 'शिवलीलामृत' असल्यामुळे यात शिवाची नामावलि पहा:-

वृत्रारिशत्रुजनक; बाणवल्लभ, पंचबाणांतक, त्रिपुरहारक, त्रिनयन, त्र्यंबक, कामसिंधुरविदारककंठीरव, हैमवतीधव, शक्रारिजनकांतकप्रियकर, नागेंद्रकुंडल. नागचर्मपरिधान, नागनाथ, नागरक्षण; नागाननजनक, पंचवदन, विरूपाक्ष; दक्षमखदळण,षडास्यजनक; शफरीध्वजदहन; सद्योजात, भाललोचन, त्रिपुरांतक; अर्धनारीनटेश्वर, गिरीश; गंगाधर; भोगी-भूषण; अंधकमर्दन, गोवाहन, पंचमुगुट, इंदिरावरभगिनीमनरंजन, ईशान, ईश्वर, गिरिजारंग, वामघोर; पिनाकपाणी, धराधरेन्द्रनंदिनीमानससरोवर-मराळ, वृत्रारिशत्रुजनकवरदायक ( इंद्रजिताच्या बापास म्हणजे रावणास वर देणारा ); भवरोगवैद्य, वैजनाथ; हिमनगवासी, हिमकेदार; मृडानीवर, चंद्रचूड, कैलासविलास, नीलग्रीव, जाश्वनीळ, हेमाद्रिजामात, सिंधुरवदन-जनक; पद्मनाभमनरंजन, त्रिदोषशमन, नदीवहन, गजांतक, दक्षक्रतुदलना; भूताधिपति, किशोरचंद्रशेखर, कपर्दी, स्वर्धुनीधर, खट्वांगपाणी.

यात नुसतीं 'अमरकोशात'लींच नावें नसून काहीं मुद्दाम द्राविडी-प्राणायामाप्रमाणें साधलेलीं आहेत. त्यामुळें तीं कूटासारखींच वाटतात.

---

६३ 'हेली' हा शब्द ज्योतिषात येतो. Helios=Sun

याच्या पुढें काहीं दीर्घसमासघटित दुर्बोध रचनेचीं उदाहरणे दिलीं आहेत:-

ग्रथारंभींच व तिसऱ्या अध्यायात शंकराचीं अनेक नावें व चवथ्यात मारुतीचीं विशेषणे,[६४] सहाव्या व सातव्या अध्यायाच्या आरभींची शिवस्तुति, त्यातही युद्धवर्णनांत — तो जळज ( शंख ) वाजविला, क्षुरमुखशराने पाच पाट काढले, सर्षप कनकाद्रीहून श्रेष्ठ केला, असभाव्य चेतावला ज्वालामाळी, वगैरे कठीण रचना आहे. नवव्या अध्यायात —

की हाटकनदीपूर देख । पडे पाषाणकाष्ठमृत्तिकादिक ॥
दिव्य काति मुख । तेवीं राक्षस पालटला[६५] ॥
मग शात झाला सप्तकर,। त्रिचरण तै चेतावला[६६] ॥
वाल्मीक सत्यवतीनंदन । औत्तानपाद कयाधुहृदयरत्न ॥
हे शिष्य ज्याचे त्रिभुवनीं जाण[६७] ॥
वेश्यारत अहोरात्र मारकर्दमीं लोळत असे[६८] ॥

चौदाव्याच्या प्रारंभींच्या तीन ओंव्या शिवस्तुतीने भरल्या आहेत.

परतु या दोषासंबधीं विचार करतांना हें ध्यानात ठेविले पाहिजे कीं, हे सर्व अप्रसिद्ध सस्कृत शब्द व जाडे सस्कृत समास नेहमीं देवतावर्णनात किंवा त्याच्या स्तुतिस्तोत्रात येतात. त्यामुळें सदर्भावरून त्याचा अर्थबोध सहज होण्यासारखा असतो. एवढेच नव्हे, तर नामातर देताना प्रथम एखादा सुप्रसिद्ध शब्द योजून मग त्याचे पर्याय शब्द 'अमरकोशा'वरून वा त्याच्या पौराणिक–कथासंदर्भावरून नवीन बनवून तो योजतो.त्यामुळे सामान्य वाचकास ते समजण्यासारखे असतात व

---

६४ शि. ली. ४, ९५-९६ ; ६५ शि. ली. ९, ३०
६६ शि. ली. ११, ६९, ७२ , ६७ शि. ली. ११, १४६
६८ शि ली. १२, ४४

अगदींच आशिक्षितास ते जरी न समजले तरी त्यास कथा-सूत्र समजण्यास कोणतीच अडचण येत नाहीं. असो

२ ) पाल्हाळ.— दृष्टान्ताच्या बाबतींतला नेहमींचा पाल्हाळ या ग्रथात फारसा दिसत नाहीं. तर उलट, पुष्कळ ठिकाणीं आपणास संयमच दिसून येतो. त्याचप्रमाणें सर्व प्रकारच्या वर्णनातही नेहमींचा पाल्हाळ नसून सयम आढळतो. याचे कारण एकच. कथेचा ओढा हेंच तें होय पण याचा बचपा नीतिबोधात भरून निघालेला दिसतो आणि याचें कारण असें दिसते कीं, श्रीधराच्या मनात वाचकाच्या मनावर धार्मिक प्रवृत्तीचा ठसा मुख्यत्वेंकरून उमटावयाचा आहे. दुसऱ्याच अध्यायातील हरिण-हरिणींच्या तोंडीं घातलेली सदाचाराचीं व्याख्यानें अत्यत पाल्हाळिक व अस्थानींही वाटतात. त्याचप्रमाणे अध्याय सात-मधील कृत्रिम दापत्याच्या कामुक संवादात परधन व परकामिनी या-सबधींचा नीतिबोध याच मासल्याचा आहे.शिवयोग्याचा नीतिबोध असाच लाबला आहे: दहाव्या व बाराव्यातील नीतिबोध अशाच प्रकारचा आहे.

३ ) पुनरुक्ति :— स्त्रियांच्या रूपवर्णनात ठराविक शब्द, अलंकार व कल्पना याची पुनरुक्ति आढळते. सर्व ग्रथात एक ठराविक पद्धतींचा अवलंब केलेला दिसतो. त्यात नावीन्य किंवा चमत्कृति नाहीं. त्याचप्रमाणें वनवर्णनातील पशु-पक्षी वृक्षवेली सर्वत्र एकच आढळतात.हीच गोष्ट निसर्गवर्णनाची व ग्रंथस्तुतींतील काहीं ठराविक रूपक-उत्प्रेक्षाची आहे

४ ) अश्लीलता :— सातव्यातील कृत्रिम दापत्याचा संभोग-शृंगार, दक्षिणेंतील लोकाचा अनाचार, ब्रह्मराक्षसाचे स्त्रीभोग, महानदा व सौदागर याचे मीलन वगैरे स्थळातील शृगारवर्णनात अश्लीलतेची झाक मारते खरी पण त्यात पुष्कळ संयम राखल्यामुळें तीं फारशी

दोषार्ह ठरणार नाहींत असें वाटते. त्याचप्रमाणें यमयातनाच्या वर्णनात झालेली ग्राम्यता व बीभत्सता निर्वेद उत्पन्न करून शान्तरसास परिपोषक असल्यामुळे तीं स्थळें ( एका शिवाय ) दूषणीय म्हणता येणार नाहींत.

५ ) अनौचित्य:—आठव्यातील ' वनविहाराच्या वर्णनात वट, पिंपळ, वेडनिंब, बाबुळ, सेवरी या वनवृक्षांबरोबर—डाळिंबी, अंजीर, मोगरे जाई, जुई, मालती, शेवती, द्राक्षे, लवगा वगैरे उपवनवृक्षलतांची नामावळी आहेच ! भस्मासुरास सिंदीचा दृष्टांत वगैरे ठिकाणीं औचित्य दिसत नाहीं.

## १३ 'शिवलीलामृता'चे आधुनिक अवतार व त्यावरील आधुनिक टीका

एखाद्या ग्रंथाचे बुद्धिपुरस्सर अनुकरण होणे हे त्याच्या उत्तमतेचें निदर्शक मानलें जाते. हें अनुकरण केव्हा प्रच्छन्न तर केव्हा उघड तर केव्हा विडंबनात्मक असतें. हे प्रकार अनुकरण करणाऱ्याच्या हेतूवर अवलंबून असतात 'शिवलीलामता'संबंधी या बाबतींत काय घडलें आहे तें आता पाहूं,

१) ब्रह्मोत्तरखंड :— ( शिवलीलामृताची वाढविलेली आवृत्ति ) श्रीधराचा मूळ ग्रंथ चौदा अध्ययांचा आहे तर हा ग्रंथ पंचवीस अध्यायाचा आहे. श्रीधराप्रमाणे ब्रह्मोत्तरखंडाच्या आधारेच थोड्या फरकाने पण विस्तारानें हा ग्रंथ शके १६४०मध्ये लिहिलेला आहे. म्हणजे तो 'शिवलीलामृता' नंतर थोडक्याच दिवसात झाला. तो चाफळ नजीकच्या एका राघो अप्पाजी कुलकर्णी उर्फ रघुकवि यानें लिहिलेला आहे. याचें वर्णन श्रीधराहून सरस झालें आहे असे गो.का.चांदोरकर यांनीं म्हटलें आहे [६९] यात कवीचा

६९ चांदोरकर. (गो.का.) भा. इ. स. म वा. इ. वृ. शके १८३७ पृ. २६ रघुकविकृत 'ब्रह्मोत्तरखंड'.

शुद्ध हेतु असून त्याने कोणत्याही प्रकारचा लपंडाव केलेला नाहीं. उलट, श्रीधराच्या या ग्रंथाची लोकप्रियता जन्मताच किती झाली हें यावरून व्यक्त होतें.

२ ) केशव भिकाजी ढवळे:—सुप्रसिद्ध प्रकाशक केशव भिकाजी ढवळे,मुंबई, यानी सन १९३२ मध्यें प्रकाशित केलेली 'शिवलीलामृता'ची आवृत्ति माझ्या पहाण्यात आली. तिचा विशेष हा कीं, तींत पंधरावा अध्याय छापला आहे व याच्या तीनशें पंचवीस ओव्या आहेत.हा श्रीधराचा नसून त्याच्या या लोकप्रिय ग्रंथात कोणीतरी तो मागाहून घुसडून दिला आहे यात तिळमात्र संशय नाहीं. हा लेखक म्हणतो:—

तुझिया कृपे शिवलीलामृत । चवदा अध्याय वर्णिले यथार्थ ॥
वेदव्यासें स्कंदपुराणात । ब्रह्मोत्तरखंडीं कथिले जे ॥ १२ ॥
परी माझिया मनाची तृप्ति । जाहली नाहीं बा पशुपती ॥
म्हणोनि आणिक हृदयीं स्फूर्ति । देऊनि कथा वर्णवी ॥ १३ ॥

..... .. .. .......... . ......... ....... .....

असो ऐका श्रोते सर्व । ऐसा करिता म्या शिवस्तव ॥
हृदयीं प्रगटोनि दयार्णव । स्फूर्ति देत उत्तम पै ॥ १९ ॥

अशी स्फूर्ति देऊन आज्ञा केली कीं, जैनमतप्रसारानें वेदोक्त कर्म बुडालें, तेव्हा त्याच्या खंडनार्थ शंकरनामें जो मी अवतार धारण केला त्याचें चरित्र हे श्रीधरा ! तू प्राकृतात वर्णन कर. म्हणून मी आता त्या जगद् शंकराचार्यांचे चरित्र सांगतो. पण या कवीने जें चरित्र वर्णिले आहे त्यात अनेक ढोबळ चुका झाल्या असल्यामुळे त्याचें गाढ अज्ञान मात्र प्रगट झाले आहे ! आणि हंसाचें पंक्तींत कावळ्याने शिरण्याचा प्रयत्न करावा तशी त्याची हास्यास्पद स्थिति झाली आहे ! पुढील काहीं गोष्टीं-वरून याची साक्ष पटेल:--

१ ) वेदार्थ समजावा म्हणून परमात्मा पाणिन्यादिरूपे अवतरून व्याकरणादि षट्शास्त्रे करिता झाला. मग श्रुत्यर्थ समजूं लागला. वेदार्थ ज्ञानांस पाणिनीची मदत कशी काय होते ?

२ ) उत्तरदेशीं निर्मळक्षेत्रीं शंकर जन्मला. ' निर्मळची यात्रा ' या क्रमिक पुस्तकातील धड्याचा आधार कीं काय ?

३ ) एक शुक्राचार्यासारखा बुद्धिमान् जैन उद्भवला. त्याने सरस्वती व कृशान प्रसन्न करून घेतले. तो अग्न्या वाटेल ते पदार्थ निर्माण करी. त्याने वादांत सर्व पंडितास जिंकले व आपलें मत स्थापिलें. सर्व जैन होऊ लागले. तो मद्यपान करी व सरस्वतीला मद्याचा नैवेद्य दाखवी. मंडनमिश्र कुमारिलभट्टाचा पट्ट शिष्य. तो जैन नव्हता. अत्यत कर्मठ होता.

४ ) शंकरास हें समजल्यावर तो त्याच्याकडे गेला (स्थळाचें नाव नाहीं). वादास सभा भरली. मंडनाने पडद्यामागें मद्यघटात सरस्वती बसविली. ती शंकराच्या प्रश्नास उत्तर देई. एका शंकेचे उत्तर तिला देता येईना. तेव्हा शंकर पडद्यामागे गेला. तो प्रकार पाहून त्याने तिला शाप दिला व तिने त्याला उलट शाप दिला. मंडनमिश्र हरला. शंकराने सर्व जैन ग्रंथ समुद्रात बुडविले. फक्त एक अमरकोश रक्षिला. असे जैन पाखंड त्याने मोडले.

मूळ इतिहासाहून हा वृत्तात किती विपर्यस्त व अज्ञानमय आहे हे सुज्ञ वाचकास सागणे न लगे. जिज्ञासूस यासंबधींची सविस्तर माहिती श्रीदासगणूच्या ' श्रीशंकराचार्य–चरित्र ' या ग्रथात मिळेल.[७०]

---

७० दासगणू. श्रीशंकराचार्य चरित्र.अ.१६, ८६-११५ व अ.१७

या वर्णनानन्तर मूळ ' शिवलीलामृता ' तील सीमतिनी, दाशार्ह वगैरे कथांचा उल्लेख केला आहे. ग्रंथाची फलश्रुति पुन. यात सांगितली आहे इतके करूनही लेखकाच्या मनाची मळमळ शान्त झाली नाहीं तेव्हां तो पुनः उघड सांगतो:—

शिवलीलामृताचे चवदा अध्याय । हा पंधरावा कोठील काय ।।
ऐसा मनीं विकल्प होय । तरी सांगता ऐकिजे ।। २४४ ।।

चौदा अध्यायांत पूर्वयुगातील शिवलीला सांगितल्या तर पंधराव्यांत कलियुगातील लीला सांगितली आहे. नंतर या पंधराव्याची फलश्रुति सांगून 'शिवलीलामृताचे' बेचाळीस ओव्यांत सार दिलें आहे तो म्हणतो: --

ब्रह्मानंद म्हणे श्रीधर । या बेचाळीस ओंव्या समग्र ।।
शिवलीलामृताचें होय सार । श्रोतीं निरंतर परिसाव्या ।। ३०३ ।।

... ........ ........ ...... ..................

आतां शेवटीं मी श्रीधर । श्रोतियांप्रति जोडुनी कर ।।
विनवितों ही सादर । अंतरामाजीं ठेवावी ।। ३१६ ।।

अशा रीतीचे या अध्यायाचे स्वरूप आहे त्यावरून तो बनावट आहे हे स्पष्ट होत आहे एखाद्या अर्धशिक्षित शिवभक्तानें श्रीधराच्या नावावर घुसडून दिला आहे. पण मोठें आश्चर्य हे कीं, ढवळे यांच्या-सारख्या नामवन्त प्रकाशकाने त्याची छाननी करून न घेताच तो छापून प्रसिद्ध करावा! निदान पुढील आवृत्तींत तरी तो त्यांनीं गाळावा अशी त्यास विनती आहे.

असो. पण एका अर्थी हे क्षम्य म्हटले पाहिजे, कारण श्रीधराच्या ' जैमिनिअश्वमेधा'च्या शेवटीं आपलेच नाव घुसडून कोणा बिडावप्रमाणे यानें सर्वच ग्रंथाचे चौर्यकर्म केले नाहीं !

३ ) **कुळकर्णी–लीलामृतः—** हें उघड उघड विडंबन आहे. यावरील साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकराची खरपूस टीका सुप्रसिद्ध आहे. ते म्हणतात, " श्रीधरकवीच्या काव्यग्रथाचें विकृतानुकरण ( Parody ) या नात्यानें हा ग्रथ चागलाच साधला आहे.[७१] "

४ ) **आधुनिक टीकाः—** 'शिवलीलामृतातील नवमतवाद'.[७२] लेखकः पंडित रघुनाथशास्त्री कोकजे.

वरील लेखात ' शिवलीलामृता 'च्या पाचव्या अध्यायातील अशुमति व धर्मगुप्त याच्या एकान्तातील भेटीस अनुलक्षून[७३] इदूचे दादा ( कल्पित पात्रे ) इदूस विचारतात कीं,तुझ्या धर्मांची काळजी 'शिवलीलामृत'कारास अधिक होती कीं नाहीं ? नन्तर लगेच आपल्या पत्नीस प्रश्न करितात कीं, त्याने ( श्रीधरानें ) असें सरभरित वर्णन का केले ? व बायकांनीं ते वाचण्याची रूढि का पडली ? व .आपणच उत्तरतात कीं, न्या पोथ्या विचारयुक्त वाचल्या पाहिजेत. त्या वर वर वाचून काय उपयोग ?

वरील पडित हे धर्मसुधारणामडळाचे एक आद्य सस्थापक आहेत. अशुमती व धर्मगुप्त याच्या प्रेमविवाहावरून 'शिवलीलामृता'तही नवमत-वादाचा पुरस्कार केलेला आहे असा निष्कर्ष काढून कुमारिकानीं ती कथा विचारपूर्वक वाचून त्याचें अनुकरण करावे असें त्यानी ध्वनित केले आहे. यात 'शिवलीलामृत'काराची व पर्यायाने तो ग्रथ वाचणाऱ्या स्त्रियाची पडितजींनीं थोडेशी टिगल केली आहे हे उघड आहे. प्रथमतः ही गोष्ट न

७१ केळकर–ग्रंथ. उतारे-टीका. पृ. ३४९

७२ 'स्त्री.' ऑगस्ट, १९४२ ; ७३ शि. ली. ५, ८३

तिचे रसभरित वर्णन 'शिवलीलामृत'काराचे पदरचें नसून ते ' स्कन्दपुराण-ब्रह्मोत्तरखण्डा'नुसार आहे. पुन: केवळ रसभरितवर्णनावरून नवमतवाद श्रीधरास मान्य होता हें अनुमान कालविपर्यासदोषपात्र असल्यामुळे अनुचित व अग्राह्य ठरते. पुराणात प्रेमविवाह व नवमतवादच जर हुडकावयाचा तर सावित्री-सत्यवान, नळ-दमयन्ती, दुष्यन्त-शकुन्तला, कृष्ण–रुक्मिणी, अर्जुन-सुभद्रा, अशीं सुप्रसिद्ध व सुपरिचित उदाहरणें काय थोडीं आहेत ? तीं सोडून पंडितजींनीं या अपरिचित जोडप्याकडे धाव मारण्याचे श्रम का घ्यावे हे समजत नाहीं. शिवाय अंशुमती तीन दिवसाची मुदत मागून आपल्या पित्याची अनुमति या प्रेमविवाहास मिळविते, व मगच त्याचा विवाह होतो. शकुन्तलेनेंही असेच उत्तर दिले आहे नाहीं का ? ती म्हणते–

अनुरक्त जरी याच पदीं विनय सोडु का ? ।
गुरुजनासि कळुनि वळुनि होय तें बरें ॥

अशा प्रकारच्या प्रेमविवाहास आजही कोणी नावें ठेवील असे वाटत नाहीं. मग उगीच त्या 'शिवलीलामृत'काराची टिगल का ? उघड उघड त्यानीं त्याचा पुरस्कार केला असता तर ते अधिक उचित झाले असतें.

५ ) 'सह्याद्रि' मार्च १९४५ या अंकात रावसाहेब ना. गो. चापेकर म्हणतात:—" आमच्या विवेकशून्यतेचें उदाहरण कोणास पाहिजे असेल तर त्याने ' शिवलीलामृत ', ' शनिमाहात्म्य ', ' सत्यनारायण-कथा ' यासारखीं मूर्खपणाच्या भाकडकथानीं भरलेलीं चोपडीं किती श्रद्धेने ( भक्तीनें ) समाजातील स्त्रीपुरुष वाचीत असतात या गोष्टीचा विचार करावा. वरील सारखे ग्रंथ हे आमच्या धर्मविषयक सडलेल्या कल्पनाचें मूर्तिमंत स्वरूप होय. "

प्रस्तुत ' शिवलीलामृता'संबधींच बोलावयाचें आहे. त्यातील कथा ' स्कन्द'पुराण ' ब्रह्मोत्तरखंडा'नुसार लिहिलेल्या आहेत. यातील कथा कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म, पाप, पुण्य व त्याप्रमाणें सुखदुःख भोग व ईश्वराच्या ज्ञानयुक्त भक्तीनें मोक्ष, हिंदुधर्माच्या या तत्त्वावरच आधारलेल्या आहेत. श्रुति स्मृति-पुराणे इत्यादि ग्रंथ रावसाहेबास मान्य असतां त्यापैकीं एका सुप्रसिद्ध पुराणाधारे लिहिलेल्या ग्रथास धर्मविषयक सडलेल्या कल्पनाचे मूर्तिमन्त स्वरूप म्हणावे याचे आश्चर्य वाटतें! रावसाहेबाचा आरोप फारच मोघम आहे. सडलेल्या कल्पनाची एक दोन उदाहरणें त्यानीं दिली असतीं तर त्या सबधाने विचार करता आला असता. असो.

६ ) एक विशेष उल्लेखः—

पाहिल्याच अध्यायात मंत्रजपार्थ गुरू करावा मुख्य वर्ण इत्यादि सागून त्याचे गुणविशेष वर्णिले आहेत. वेदशास्त्राध्ययनाने जरी एखाद्यास अपरोक्षज्ञान झालें असलें व संताशीं तद्विषयक चर्चाहि त्यानें केली असली तरी तो गुरुविना तरत नाहीं. पुढें कवि म्हणतो [७४]:—

एक म्हणती स्वप्नीं आम्हाते । मंत्र सागितला भगवते ॥
आदरे सांगे लोकातें । परी तो गुरुविण तरेना ॥
प्रत्यक्ष येऊनिया देव । सागितला जरी गुह्यभाव ॥
तरी तो न तरेचि स्वयमेव । गुरूसी शरण न रिघता ॥

येथे कवीचा कटाक्ष नामदेव-तुकारामादि सताच्या चरित्रास अनुलक्षून असावासा वाटतो.

---

७४ शि. ली. १, ६२-६३

आतां 'शिवलीलामृतां'तील एक नमुनेदार उतारा देऊन हें प्रकरण संपवू.

## शिवभिल्ली-संवाद[७५]

दिव्य स्वरूप विलोकिता पूर्ण । पचबाणें व्यापिला पंचवदन ॥
तपध्यान विसरून । वृत्तात पुसे तियेतें ॥ ९२ ॥

म्हणे नारी तूं कोठील कोण । कामानळ शातवीं वरुषे घन ॥
तुझें स्वरूपलावण्य । त्रिभुवनामाजीं पै नाहीं ॥ ९३ ॥

तुझा वदनइदु विलोकून । चकोर जाले माझे नयन ॥
तरी आतां वरी मजलागून । तुजआधीन मी जालो ॥ ९४॥

यावरी बोले भिल्लिणी । उमेऐसी ललना टाकुनी ॥
का बैसलासी घोरवनीं । कैलासभुवन त्यजोनियां ॥ ९५ ॥

मी तो परनारी निश्चित । न घडे कदा काळीं सुरत ॥
तुवां मज जिकिलें नाहीं यथार्थ । तरी तपस्वी कैसा तू ॥ ९६ ॥

यावरी बोले पिनाकपाणी । मी दुर्गेवरी आलों रुसोनी ॥
तिचें मुख न पाहें परतोनी । नाम स्वप्नीं न घे तिचें ॥ ९७ ॥

यावरी भिल्ली काय बोलत । पति माझा रागिष्ट अत्यंत ॥
हे त्रिभुवन जाळील क्षणात । अणुमात्र गोष्ट कळताचि ॥ ९८ ॥

यावरी बोले जगन्नाथ । ते बहुकाळाची कठिण अत्यंत ॥
दक्षयागीं उडी घालित । क्रोध अद्भुत नावरे तीते ॥ ९९ ॥

---

७५ शि. ली. १४, ९२-११०

पुढें गेली पर्वताचे पोटीं । मागती तीस सावरीं धूर्जटी ।।
परी ते कौटाळीण मोठी । अतिकपटी मी जाणे ॥ १०० ॥
भिल्ली म्हणे ऐकिलें कानीं । कीं ती कपटी आहे तिशीहुनी ॥
शिरीं ठेविली स्वर्धुनी । भोळी भवानी अत्यंत ॥ १०१ ॥
दुर्गेऐसी पट्टराणी । टाकूनि का हिंडसी वनीं ।।
परललना देखोनि नयनीं । गळा येवोनि पडो पाहसी ॥ १०२ ॥
मागुती बोले कैलासनाथ । क्षणात सृष्टि घडामोडी करित ।।
शुभनिशुभादि दैत्य । युद्ध करूनि मर्दिले तिणे ॥ १०३ ॥
ती येथे जरी आली धावुन । उदड प्रार्थना केली पूर्ण ॥
तरी मी न जायें घरा परतोन । स्वर्गभुवन कैलासीं ॥ १०४ ॥
तिसीं मीं न करी सभाषण । तू वरीं मी जाले तुज आधीन ।।
जिकडे नेसी तिकडे येईन । वचना आधीन तुझ्या मी ॥ १०५ ॥
यावरी बोले गोरटी । भवानी बैसली तुझे पाठीं ।।
दोन वेळा वरिलासी धूर्जटी । तिची गती केली तेहे ॥ १०६ ॥
माजा पाड काय तुज । केव्हा टाकुनि जाशी मज ।।
द्यूतीं पण खेळता सहज । तुझे तुवा हारविलें ॥ १०७ ॥
न बोले मदनदहन । भिल्लिणी मागुती करी नृत्य गायन ।।
मग उठिला पचद्वयनयन । तिसी आलिगनें द्यावया ॥ १०८ ॥
अबा चालली सत्वर । दीर्घ शब्दे बोले त्रिपुरहर ।।
मुखचंद्र दावी सुदर । भाक घेई माझी आता ॥ १०९ ॥
तूं मज माळ घालीं येऊन । मी तुज नव जाये टाकून ॥
मग जगदंबा बोले हासून । तरी माझे भुवना यावे तुम्हीं ॥ ११० ॥

* * *

## — १८ —

# श्रीधराचे छोटे ग्रंथ

श्रीधराचे छोटे ग्रंथ खालीलप्रमाणें आहेत: —

१) पांडुरंगमाहात्म्य, २) व्यंकटेशमाहात्म्य, ३) मल्लारिमाहात्म्य, ४) ज्ञानेस्व(श्व)रचरित्र व ५) अंबिकाउदय.

यापैकीं शेवटल्या 'अंबिकाउदय' या ग्रंथाचा उल्लेख रा. का. ना. साने यांनीं केला आहे,[1] व हा ग्रंथ श्रीधराच्या विद्यमान वंशजाकडे पंढरपुरास पहावयास मिळतो असें म्हटलें आहे. पण मला हा ग्रंथ तेथे आढळला नाहीं, व त्याचा उल्लेख कोणत्याही बाडात आढळला नाहीं. मात्र 'अंबिकाध्यान', 'अंबिकापंचक' अशीं दोन संस्कृत स्तोत्रें आढळलीं. त्याचा उल्लेख मागें संस्कृत स्तोत्रांत आलाच आहे.[2] कदाचित् 'अंबिका-उदय' हा ग्रंथ मध्यंतरी गहाळ झाला असण्याचा संभव आहे.'ज्ञानकोशा'त या ग्रंथाचा उल्लेख आहे पण ती माहिती मूळ संशोधन करून मिळविलेली दिसत नाहीं. ती बऱ्याच ठिकाणीं चुकीची आहे.

१ भा. इ. सं. मं. अहवाल. शके १८३३, लेख १३

२ श्रीधर च. आणि का. भा.२, प्र. ११, पृ. १९२

आता जे वरील चार ग्रंथ मला पहावयास मिळाले त्याची माहिती पुढें यथाक्रम दिली आहे:—

## १ पांडुरंगमाहात्म्य

हा ग्रंथ विनायक दादोबा पुरदरे आणि कपनी यांनीं मुबईत कर्नाटक छापखान्यात छापून शके १८२४ त प्रकाशित केला आहे. पढरपुरच्या श्रीधराच्या दप्तरात मला एक हस्तलिखित प्रत पहावयास मिळाली. तिच्या शेवटीं लेखकाने 'हस्ताक्षर भास्कर बाबुराव कुलकर्णी, मौजे कुरुल, परगणे माहुळ लिखिते' एवढेंच म्हटले आहे. मूळ प्रतीच्या वा नकलेच्या लेखनाचा स्थलकालनिर्देश त्यात केलेला नाहीं. ही मोठी उणीव आहे. प्रत सुवाच्य व शुद्ध आहे; कोणत्याही ग्रंथाच्या दोन प्रतींत फरक असावयाचाच. पण तो या दोन प्रतींत फारच थोडा आहे. छापील प्रतींची एकूण ओंवीसंख्या सातशे एकावन्न आहे. तर हस्तलिखित प्रतींत फक्त सातशे अठ्ठेचाळीसच ओव्या आहेत. छापील प्रतींत पहिल्या अध्यायात एक व शेवटल्यात अकरा अधिक आहेत, तर दुसऱ्यांत तीन व बाकीच्या सहांत एक एक मिळून नऊ ओंव्या कमी असल्यामुळे अखेर तीन ओंव्याचा वाढवा झाला आहे. इतर ग्रंथाच्या हस्तलिखित प्रतींत आढळ-णाऱ्या फरकाच्या मानाने हा फरक अगदीं उपेक्षणीय आहे. पुढें एक महत्त्वाचा पाठभेद नमुन्याकरता दाखविला आहे:—

हस्तलिखित प्रत:—(अध्याय दहा)

बहुत दिवसपर्यंत । हें माहात्म्य होते गुप्त ।।<br>
त्यावरी कठिण सस्कृत । कोणास ठाऊक नव्हते ।।

व पुढें–"परंतु भोळे भक्त तारावयाकरिता कृपावन्त पंढरीनाथानें हे प्राकृत टीका करविली आहे" अशा अर्थाची ओवी आहे.

छापील प्रतींत:—'त्यावरी संस्कृत' बद्दल 'जगदुद्धारक अद्‌भुत। श्रुत नव्हतें कोणासी ते[३] ॥

असा पाठभेद आहे, व पुढील अर्थाची ओंवीं तींत मुळींच नाहीं. श्रीधराची प्राकृत भाषेची तरफदारी करण्याची पद्धति आहे तीस अनुसरून पहिला पाठ असल्यामुळे तो ग्राह्य वाटतो. असो; आता ग्रथातील विषयाकडे वळूं.

नावाप्रमाणेंच या ग्रंथात पढरपुराचे व पाडुरगाचे माहात्म्य दहा अध्यायात वर्णिलें आहे. आणि ते नगर दक्षिण द्वारका किंवा दक्षिण वाराणसी आहे असे त्याने सागितले आहे. हे वर्णन स्वतत्र नसून 'पद्म'पुराणानुसार केलेले असल्याचे श्रीधराने प्रारभीं व प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं म्हटलें आहे. तरी पण कथावैचित्र्याच्या मोहाने अध्याय चारमध्यें "पाडुरगाच्या देवालयावरून जाणारे एका गधर्वाचें विमान भैरवाने मर्यादातिक्रमाबद्दल कसे खालीं पाडिले ही 'स्कन्द'पुराणातील कथा श्रीधराने घेतली आहे. पण तसे केल्याचे त्याने स्पष्ट म्हटले आहे.[४]

आतां अध्यायवार कथासाराश सागूः—

हे माहात्म्य 'पद्म'पुराणाप्रमाणेच येथेंही शिवपार्वतींच्या संवादरूपाने सागितलें आहे. प्रथमतः मेघश्याम पंढरीस का आला ही कथा शिवाने

३ पाडुरंग मा. १०,५८

४ गंधर्व भैरवे पाडिला भूमि । ही कथा नाहीं या महात्मीं ॥
स्कंदपुराणाचें महात्मीं । अवलोकावें तेथें असे ॥
पाडुरग मा. ४,९४

सागितली आहे. ती थोडक्यात अशी:—एकदा शचीस विष्णुसगमाची इच्छा झाल्यावरून विष्णूनें ती कृष्णावतारात पुरी करण्याचें तिला वचन दिले. तिने साठ हजार वर्षे तप केल्यावर ती गोकुळात राधारूपाने जन्मली तेथें बाळकृष्ण भोगून ती गुप्त झाली. आणि पुढे द्वारकेत वेष पालटून प्रगटली. तिला अकावर घेतलेली पाहून रुक्मिणी रुसून लोहदडक्षेत्रीं दिण्डीरवनात तप करण्यास निघून गेली. कृष्णास रुक्मिणी नाहींशी झाल्याचें समजताच तो तिच्या शोधार्थ वेषान्तर करून आला. त्याच्या भेटींतील संवाद विशेष चटकदार झालेला नाहीं. पुढे लोहदण्डक्षेत्र, दिण्डिरवन हीं नावे कशीं पडलीं याबद्दलचा इतिहास सागून व पुढें आता अद्भुत कथारस आहे, असें कुतुहल निर्माण करून हा अध्याय सपविला आहे.

दुसऱ्यात—सुप्रसिद्ध भक्त पुडलीक याचा पूर्वेतिहास सागून कुक्कुट महायोग्याच्या दर्शनाने त्याच्यासारखाच मातापितराचा भक्त तो कसा झाला व त्यास पाडुरंगाने दर्शन कसे दिलें हा कथाभाग वर्णिला आहे येथील पाडुरगवर्णन फार सुदर झाले आहे.[5] त्यातील वर्णन 'झुलव्याच्या दोन पिशव्या दोन्ही जघनीं विठोबानें खोविल्या होत्या हे विशेष आहे.[6] तिसऱ्यास तीन शिराच्या वृत्रासुराचा इद्राने वध करविला म्हणून त्याच्या शापाने इन्द्र दिण्डीरवनात 'वीट' होऊन पडला. पुढें पुडलिकानें तीच वीट विठोबास उभें रहाण्यास दिली. त्या स्पर्शाने इद्र उद्धरला. पुढे नदीस 'चन्द्रभागा' हे नाव का पडले ही कथा सागून नीरा-भीमासगमापासून पढरीपर्यन्तचीं अनेक तीर्थे व त्याचे महत्त्व कवीने वर्णिलें आहे. त्यातील महासिद्धेश्वर स्थळ फार महत्त्वाचे आहे सगमाच्या पूर्वेस शतधनुष्यावर सिद्धेश्वराचे देऊळ आहे.

५ पडुरग मा. २, ८०–८७ , ६ पांडुरग मा. २, ८६

यास ' महासिद्धेवर ' म्हणतात. 'वेदान्तसूर्य' ग्रंथ श्रीधराने येथेंच लिहिला.[७] पुंडलिकाच्या विटेवर कटीवर कर ठेवून विठोबा उभा राहिला यावर कवीने अनेक उत्प्रेक्षा केल्या आहेत एकींत श्रीधर म्हणतो:—"देवा ! आपले दान देण्याच्या तयारींत कटीवर कर ठेविले आहेस कीं काय? मी दरिद्री आहे. मला आपले दान दे; व पढरिराया ! येथून माझे दारिद्य विच्छिन्न कर." चवथ्यात विंदुतीर्थवर्णन आहे.हे हरीचे मुख्य स्थळ असून तें एक कोसपर्यन्त भूविवरात आहे. तेथें पाडुरग रुक्मिणीसहित आहे. हें वर्णन फार सुदर झाले आहे. पाचव्यात कवडीचुंबक रत्नकेतु वैश्य कोरडी भक्ति करीत असल्यामुळे राक्षस कसा झाला व तो ' भास्करक्षेत्रस्नानाने ' कसा उद्धरला ही कथा आली आहे. सहाव्यात पाडुरंगाच्या देवालयात वागण्याचे नियम दिले असून सर्व तीर्थं करून जे भागले ते येथें कसे तृप्त होतात हे सागितले आहे. चंद्रसेनराजाची मुलगी ' पद्मा ' ही पंढरीस तप करून कृतार्थ कशी झाली हें सातव्यात सागितले आहे. हरिदर्शनसमयीं काममोहित झालल्या पद्मेचे वर्णन फार चागलें झाले आहे.[८] रुद्रकोपोद्भव गयासुराने सुरवर त्रस्त केले. यज्ञानिमित्त त्यास वर देऊन त्याच्या देहाचे सार्थक कसें झालें ही कथा आठव्यात आहे. येथें गयावर्जन केले असता पितृऋण फिटते. असें या तीर्थाचें महत्व कवीने सांगितले आहे. भास्करतीर्थ म्हणजे इकडील प्रयाग, पंढरपूर हें 'वाराणसी' व 'वेणुनाद' हे गया अशी या तीर्थाची योग्यता आहे, हें त्याने नवव्यात सागितले आहे दहाव्यात पुन: पुंडलिकानें पढरपुरात कसा विठोबाला उभा करून ठेविलें आहे हें सागून ' एको विष्णुर्महद्भूतम्' या सुप्रसिद्ध श्लोकावर त्याने उत्कृष्ट रूपक केलें आहे.[९]

---

७ पाडुरंग मा. ३, ८८ ; ८ पाडुरग मा. ७, १२–२०
९ पाडुरग मा. १०, ७–२७

नन्तर कवि म्हणतोः- [10]

ऐसें पंढरीचे भूत । येणे बहुतांचा केला घात ।।
भैदाचीं लक्षणे समस्त । याजपाशीं तीं ऐका ।।
जो याला भावार्थी भेटे । तयाशी ठकवितो बहुत नेटे ।।
हिंडे भक्ताचिया पेठे । प्रेमाचे पाश घालुनी ॥
प्रेमपाश घालुनी । जीवे मारी मुळींहूनी ॥
वासना पिशवी ते क्षणी । ने ती हिरोनी भैद जाणे
सचित बटवा होता । तो ही नेला पाहता पाहता ।।
देहबुद्धी कोहळे तत्वत्ता । क्षण न लागता तेणे नेले ।।
भक्त भाग्यवंत बहुत । येणें बुडविलें निरंजनात ।।
पुनः जन्मासी न येत । ऐसे करीत भैद हा ।।
अनत जन्मींचीं पुण्यें बहुत । तयाचे कसोटीसीं सापडत ।।
कटीं ठेऊनिया हस्त । पाळती घेतो भैद हा ।।
जितुके येती याचे भेटी । तितुक्यासी जपतो घालावया पोटीं ।।
बाळिया बळकट जगजेठी । भीमातीरीं उभा असे ।।

या ठिकाणची व्याजस्तुति समर्पक श्लिष्टपदांनीं फारच बहारदार व हृदयंगम झाली आहे.

नारायणो नाम नरो नराणां । प्रसिद्धचोरः कथितः पृथिव्याम् ।।
अनेकजन्मार्जितपापसचय । हरत्यजस्र स्मृतमात्र एव ।।

या सुप्रसिद्ध सस्कृत स्तोत्रात व नाथांच्या—

---

१० पांडुरंग मा. १०, २८–३४

"असा कसा देवाचा देव बाई ठकडा ? । देव एक पायानें लगडा ग
बाई ।। असा धृ. ॥"

या पदात श्रीधराच्या 'मैदाची' किंचित् छटा दिसते. पण त्यात ही मौज नाहीं खास.

आता या ग्रथातील काहीं विशेषांकडे वळू. श्रीधरकालीन समाजस्थितीचे यात आपणास थोडेसे प्रतिबिंब पडलेलें दिसते. पढरीसारख्या पवित्र क्षेत्रात सतत रहाण्याचे भाग्य लाभले असून काहीं लोक विठ्ठलास न भजता क्षुद्र देवाच्या भजनीं लागतात. बाकी जनरीतच अशी दिसते.

नित्य उगवणाऱ्या सूर्यनारायणास कधींही नमन न करिता म्हसोबापुढे मात्र आवडीनें लोटागणें घालणारे वेडे पीर असतात. पढरपूर टाकून काहींजण तुळजापुरास जातात. तेथेंहि समाधान न पावून पुढें मल्लिकार्जुनास जातात व शेवटीं असे निराशेचे उद्गार काढतात कीं, "कसलें तीर्थ कसले क्षेत्र. जेथें जावें तेथे धोंडापाणीच !" अशा मूर्खास काय म्हणावें ? काहीं लोक क्षेत्रीं राहून पापाचरण ..रतात. पण त्याचें तें पाप शुभ्रवस्त्रावर बिब्याच्या डागाप्रमाणे वज्रलेप होतें. काहीं कवडीचुंबक कोरडी भक्ति करतात. ते आपली गाजराची तुला करून विमानाची वाट पहात बसतात. कवडीसाठीं तर त्याचा प्राण खालींवर होत असतो. अन् ते म्हणतात काय ?- तर आम्ही उदार भक्त ! अशा दांभिकापासून देव दूरच असतो. गयावर्जन तर दूरच राहो ! पण साधें पिंडदानही ते कधीं करीत नाहींत. असे लोक पशु होत. पण पशुही एकवेळ बरे. कारण, ते निराभिमानो तरी असतात. परन्तु या मूढाचा अभिमान काहीं पुसू नका !

दुसरी गोष्ट अशी कीं, या ग्रथांत परंपरा दिलेली आहे. पण तींत

गंभीरानंदानन्तरचा ' ब्रह्मानंद ' व पूर्णानंदानन्तरचा ' दत्तानंद ' हे दोन दुवे गळलेले दिसतात. त्याचप्रमाणें आपला पिता व गुरू जो ब्रह्मानंद याचा यतिराजमुकुटमणि, कैवल्यदाता, व ज्ञानी असा गौरवपर उल्लेख करून श्रीधरानें त्याची समाधि भीमेच्या वाळवटात बिंदुस्थानाजवळ असल्याचें सांगितले आहे; व मार्गशीर्ष शु. २ रविवार, असा समाधि-कालही दिला आहे. हा योग शके १६१५ श्रीमुख संवत्सरीं येतो हे मागे आलेंच आहे. [११]

तिसरी गोष्ट भाषाशैलीची. ' हरिविजय', 'रामविजया'दि पुढील सुप्रसिद्ध ग्रंथात श्रीधराच्या भाषेचीं जीं वैशिष्ट्यें पूर्णत्वास पोचलेलीं दिसतात त्याचे या ग्रंथात बीजरूपानें दर्शन घडते. हें पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल. सूर्यआराधक, तमच्छेदक, ब्रह्महत्यारि असे समास, व पद्मनेत्री, कल्याणरुपे, अशीं संबोधनाचीं रूपे, चिच्छक्तिरुक्मिणीविलासा, श्रीधरमानसराजहंस, ब्रह्मांडमंडपामाझारी अशीं दीर्घ व संस्कृतप्रचुर पदे, सूर्यास–सूर्यनारायण, सहस्त्रकिरण, देवभूषण, आदित्य व तमच्छेदक. पार्वतीस–अपर्णा, मृडानी, शंकरास–शिव, त्रिनयन, जाश्वनीळ; ब्रह्मदेवास-कमलोद्भव, चतुरानन अशीं प्रतिनामे वगैरे विशिष्ट लकबी या ग्रंथात तुरळक अशा आढळतात. मात्र यातील स्वभाववर्णने व सृष्टीवर्णनें फारच आटोपशीर असल्यामुळें व येथे दृष्टान्ताचा पाल्हाळ नसल्यामुळे हा ग्रंथ खरोखर सुबोध झाला आहे. भाविक वाचकास तो गोडहा वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. वर दिलेल्या दुसऱ्या व तिसऱ्या गोष्टींवरून या ग्रंथाचा लेखनकाल शके १६१५ तें शके १६२४ च्या दरम्यान असला पाहिजे असें ठरते.

---

११ श्रीधर च. आणि का., भा. १, प्र. १, पृ. ९

## २ व्यंकटेशमाहात्म्य

या ग्रथासबधीं श्रीधर म्हणतोः—

'ब्रह्माण्ड'पुराणात व्यकटेशमाहात्म्य सुन्दर रीतीनें सागितले आहे. पण ते संस्कृतमध्ये आहे. ते सुगम प्राकृत भाषेत निजभक्तास समजवावे असा हेतु होता. परन्तु हातून ग्रथाचा आरभ होईना तेव्हां[१२]—

स्वप्नामाजि त्रिपतिराणा । त्रिवार येउनी सागितलें ॥
तुझिये मुखींचें कीर्तन । ऐकता मज समाधान ॥
...........................................
परि हें माझे महात्म्य । निजमुखे वर्णी तू ॥
ऊठ ऊठ रे श्रीधरा । वेगें साग माझिया चरित्रा ॥
प्रेमळ भक्त पवित्रा । कथामृते निववी ॥
मग—ब्रह्मानदे श्रीधर । श्रोतया विनवी जोडूनि कर ॥
हरिलीला रसाळ फार । अतिसादर परिसिज ॥

श्रीधराने अशी प्रस्तावना करून पुढे कथेस सुरुवात केली आहे.

याचे दहा अध्याय असून पुढील प्रमाणें विषय आले आहेत.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अध्याय | पहिला | ओंव्या | ७६ | — | विषयः | —व्यकटगिरिमाहात्म्य |
| ,, | दुसरा | ,, | ६५ | — | ,, | प्रसादमहत्त्व व शेषाद्रिवर्णन |
| ,, | तिसरा | ,, | ५९ | — | ,, | नारायणब्राह्मण—आख्यान |
| ,, | चौथा | ,, | ७७ | — | ,, | वृषभासुर(?) हननं, अजनीजन्म-कथन |

१२ व्यकटेश मा. १, १०–११, १५, ७६

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ,, | पाचवा | ,, | ७३ — | ,, | हनुमन्त–जन्मकथा |
| ,, | सहावा | ,, | ४० — | ,, | ब्राह्मणउद्धरणम् |
| ,, | सातवा | ,, | ४४ — | ,, | चोलपुत्रोत्पत्ति |
| ,, | आठवा | ,, | ६५ — | ,, | चोलस्वप्नदर्शन |
| ,, | नववा | ,, | ७७ — | ,, | यात्रारथोत्छाहवर्णन |
| ,, | दहावा | ,, | ७४ — | ,, | कृष्णशर्मा–आख्यानवर्णन |
| | | | ६५० | | |

हे मुळास धरून वर्णिले आहे. न्यूनाधिक कोठे पडले असल्यास संभाळून घ्यावें अशी विनन्ती कवीने केली आहे. शतअश्वमेध केल्याचे पुण्य ग्रंथपठनाने मिळेल अशी फलश्रुति सांगितलेली आहे.

याच्या दोन प्रति आहेतः—

प्रत पहिलीः—१७५७ मन्मथनाम संवत्सरे आषाढ शुद्ध. द्वितीया रविवार या दिनीं लेखन समाप्त.

प्रत दुसरीः—शके १७७४ परिधाविनाम संवत्सरे वैशाख व।। १४ सोमवार मु. बागलकोट येथे समाप्त.

यातील अध्याय दोनमधील शेषाद्रिवर्णन व नऊमधील रथोत्सव-वर्णन हीं फार चांगलीं झालीं आहेत. हा ग्रथ जवळ जवळ सहाशें पन्नास ओव्याचा आहे.

## ३ मल्हारिमाहात्म्य

हे मुंबईचे पाठक पुस्तकविक्रेते व प्रकाशक यानीं प्रकाशित केलें आहे. श्रीधराच्या दप्तरातही मला हे आढळलें.

मथळा:–मल्लारिमहात्म्य श्रीदेवदत्तप्रसन्न श्रीब्रह्मानदयती, श्रीमल्लारि-महात्म्यप्रारभ. दोन अध्यायात आहे.

आरंभ:—श्रीगणेशायनमः । श्रीविठ्ठलगुरुभ्यो नमः ।
मणिमल्लमर्दन जगदीश्वर । चिच्छक्तिमहाळसाप्रियकर ।।
ब्रह्मानदजगदाधार । निर्विकार जगद्गुरू ॥१॥

............ ...... ........................

मुमुक्षु ज्ञानी चतुर पडित । तयाप्रति श्रीधर विनवित ।

मणिमल्लमर्दन आमचें कुलदैवत । तयाचे चरित परिसा आतां ॥४॥

हे 'ब्रह्माण्ड'पुराणात व्यासाने वर्णिले आहे. त्यावरून श्रीधराने घेतलें आहे. याची कथा थोडक्यांत अशी:—

मणिमल्लाने विप्रास छळलें. विप्रकन्या हरण केली. तेव्हा सर्वजण इन्द्राकडे गेले. तो म्हणाला:—"ब्रह्मदेवाच्या वराने तो मत्त झाला आहे. तुम्ही विष्णूकडे जा". विष्णुवर्णन फारच सुरेख झालें आहे. विष्णूनें त्यास शकराकडे नेले. कैलास, नन्दी व शकर याचीं वर्णनेही फार सरस उतरलीं आहेत. शकराच्या घोड्याचे वर्णन फार सुन्दर आहे. कवि म्हणतो कीं, तो चन्द्रकिरणे आटून घडविला आहे कीं काय ? किंवा क्षीरसागराने आपल्या हृदयशाळेमधून हा पाठविला ? मणिमल्ल व स्कन्द याचीं भाषणें वीररसपूर्ण झालीं आहेत. युद्धवर्णनाचा मासला पहा:—

हरिद्राचूर्ण उधळलें अपार । तेणें पीतवर्ण झाले अबर ।।
कुरंगधर आणि दिनकर । गेले लपोन त्यामाजि [13] ।।

---

१३ मल्लारि मा. १, १८४

पुढे युद्धात शंकराने मणिदैत्याचे शिर उडविलें व तो दिव्यरूप पावून विमानात बसून गेला. पहिल्या अध्यायात एकशें नव्याण्णव ओंव्या आहेत. दुसऱ्यात विष्णूचें व मल्लाचें युद्ध झाले त्यात तो ही मेला व दिव्य-देह धरून गेला. पुढे कल्पवृक्षाखालीं दोन लिंगे उत्पन्न झालीं. त्याचीं मल्लारि व म्हाळसा यानीं पूजा केली. मार्गशीर्ष शु. ॥ चपाषष्ठीस रविवारीं मणिमल्लमर्दन परमेश्वर प्रेमपुरक्षेत्रात म्हणजे पेंभर स्थळीं अवतरला. म्हणून त्या दिवसापासून सहा दिवस उत्सव करावा. ब्राह्मणास रोटवृंताकशाक व क्षीरोदन याचें भोजन द्यावे. काहीं बुद्धिहीन मूर्ख म्हणतात कीं, या दिवशीं पलाडु (कादे) भक्षण करावे. पण यास मुळात आधार नाहीं.[१४] पुढे श्रीधर सागतो, आमचे सर्व पूर्वज योगीश्वर होते. त्यानीं हाच देव अर्चिला. पुण्य-कारक नाझरें नगराखालीं वाटवरीं वडिलाची भक्ति पाहून तो अवतरला.[१५]

ज्ञानानद ब्रह्मानंद। उभय बंधु जगप्रसिद्ध ॥
त्यांचे चरणाब्जीं मिलिंद । श्रीधर स्वानद अभग[१६] ॥

संस्कृतमधील बावीस अध्यायाचा साराश श्रीधरानें दोन अध्यायात वर्णिला आहे, असे म्हणून व पुनः एकवार गुरुस नमन करून हा अध्याय एकशे छपन्न ओंव्यात सपविला आहे. एकूण ओंव्या तीनशे पचावन्न आहेत. लेखनाचा स्थलकाल दिलेला नाहीं.

## ४ ज्ञानेस्व ( श्व ) र चरित्र

श्रीब्रह्मानंदयति. प्रसंग ( २ ) दोनी

श्रीधराच्या आजपर्यन्तच्या चरित्रकारानीं वा सशोधकांनीं ज्ञानेश्वर

१४ मल्लारि मा. २, १३२
१५ मल्लारि मा. २, १५३
१६ मल्लारि मा. २, १५४

चरित्राचा उल्लेख केलेला नाहीं. तेव्हा हें लघुचरित्र प्रथमत.च वाचकांपुढे येत आहे. श्रीधराने ज्ञानेश्वरासबंधींचा आपला नितान्त आदर आपल्या ग्रंथात अनेक ठिकाणीं व्यक्त केला आहे. या स्वतत्र चरित्ररचनेने त्यात आणखी चागलीच भर पडली आहे. याचे दोन प्रसग आहेत. त्यातील साराश पुढे यथाक्रम दिला आहे:—

**प्रसंग पहिला:** –नेहमींच्या रिवाजाप्रमाणे मगलाचरण करून श्रीधराने आपला पिता व गुरू जो ब्रम्हानद यास वदन केले आहे. गुरूची जो निन्दा करील तो चाण्डाळाहून नीच व गुरुद्रोही जाणावा. व्यासाने भविष्योत्तरपुराणात कलियुगाचे वर्णन केले आहे पण ते पुराण गुप्त झाल्यामुळे दुर्मिळ झाले. ते ब्रह्मानदस्वामींस दैवयोगे आढळलें. त्यात व्यासाने निजतार्थानें ज्ञानेश्वरचरित्राचा उल्लेख केला असल्याचे त्यास समजलें. यासबधीं श्रीधर म्हणतो.—[१७]

निवृत्ति ज्ञान सोपान । हे तिही देवाचे अश पूर्ण ॥
इतुकें सत्यवतीहृदयरत्न । सागोनिया गेला पूर्वी ॥

ही गोष्ट ब्रम्हानंदयीतराजोंने मला सागितली म्हणून हें चरित्र मी सतापुढें वर्णित आहे. ज्ञानोबाचा कुलवृत्तान्त वगैरे वर्णन करून झाल्यावर त्याच्या काव्यासबंधीं व त्याच्यासबंधीं श्रीधराने पुढील काव्यमय उद्गार काढले आहेत[१८]:—

ज्याचिया मुखकमळापासून । चिद्रस द्रवला परिपूर्ण ॥
त्या वाङ्मये अमृते करून । त्रिजग पूर्ण धालें हो ॥

---

१७ ज्ञानेश्वर. च. प्र. १, ११ , १८ ज्ञानेश्वर च. प्र. १,१३-१४

येक मुखाचा ब्रह्मदेव । कीं साक्षाद् द्विबाहु माधव ॥
कि अभाळलोचन सिव । स्वयमेव अवतरला ॥

पुढें प्रायश्चित्त प्रकरणासंबंधीं श्रीधर म्हणतो[१९]: —

ब्राह्मणीं लिहिले पत्र । यास जो प्रायश्चित्त म्हणे अपवित्र ॥
तोच चाडाळ निर्धार । विटाळ त्याचा न व्हावा ॥

पुढे निवृत्तीनें तिघा भावडास उपदेश दिला ज्ञानेश्वराने चौदाव्या वर्षी (?) ज्ञानेश्वरीटीका केली.[२०] पण निवृत्ति ज्ञानोबास म्हणाले, ती दिव्य असली तरी श्रीधराचार्यानुसार तू लिहिली आहेस. आता स्वानुभवाने एखादी ग्रथरचना कर. त्यावरून ज्ञानोबानें अनुभवामृत'ग्रथ करून दाखविला. पुढे ज्ञानदेव नामदेवाबरोबर तीर्थयात्रेस गेले.

ब्रह्मानद ज्ञानेश्वर । तेथे अभिन्नपणे श्रीधर ॥
वर्णी हे लीला चरित्र । ज्ञानेशाचे आवडी ॥[२१]
असे म्हणून पहिला प्रसग त्याने सपविला आहे.

प्रसग दुसराः—

निवृत्ति सोपान मुक्तेश्वरी । तिहीं टीका केल्या गीतेवरी ॥
परी आगळी ज्ञानेश्वरी । निवृत्तिराजे वर दिधला[२२] ॥

---

१९ ज्ञानेश्वर च. प्र. १, ११८
२० ज्ञानेश्वर च. प्र. १, १२९
२१ ज्ञानेश्वर च. प्र. १, १३४
२२ ज्ञानेश्वर च. प्र २, ४–५

ज्ञानेश्वरी वरी टीका प्राकृत । करिती ते व्यर्थ सीणत ।।
जैसे पदकावरी खापरे जडीजेत । शोभिवत दिसेना ते ।।

इतर कवींची गीतेवरील रचना म्हणजे सूर्यापुढें दिवटीसारखी आहे. तरी पण ज्या कवीश्वरानीं टीका केल्या आहेत, त्याहीं क्षोभ धरू नये अशी श्रीधराने विनति केली आहे.[२३] व तो पुढे सागतो[२४]:—

माझे ज्ञानेश्वरी । बैसले असे अहोरात्रीं ।।
प्रेम नावरे निर्धारीं । म्हणोनि आगळे बोलिलो ।।

या चरित्राप्रमाणे ज्ञानोबाने बावीसाव्या वर्षी समाधि अजान वृक्षाखालीं घेतली. ज्याचें ज्ञान कोणास होत नाहीं म्हणून त्यास निजवृक्ष-म्हणतात. पुढे अर्थासबधी तो म्हणतो[२५]:—

पाहता ज्ञानेश्वरीचा अर्थ । मी डोलें वैकुटनाथ ।।
ज्यासी नावडे तो दैत्याश । कलियुगीं ॥

पुढे ज्ञानेश्वरीवर अनेक सुन्दर रूपकें करून समाधिवर्णन केलेले आहे. त्यावेळीं नामदेवाने केलेला आक्रोश करुणरसाने थबथबलेला आहे. नन्तर ब्रह्मानदाच्या समाधीचा काल श्रीधराने दिला आहे तो असा[२६]:—

श्रीमुखसवत्सर सतेज । मार्गेश्वर शुद्ध बीज ॥
ब्रह्मानदमहाराज । समाधिस्थ पाडुरगीं ॥

२३ ज्ञानेश्वर च. प्र. २, ८ , २४ ज्ञानेश्वर च. प्र. २, ९
२५ ज्ञानेश्वर च. प्र. २, ८६ , २६ ज्ञानेश्वर च. प्र. २, १६२

पुढें आणखी दोन ओव्यात माता-पितराचा उल्लेख करून हा प्रसंग एकशे चौसष्ट ओव्यात संपविला आहे[२७] पोथींत याच्या ओव्या तीनशे म्हटल्या आहेत, पण त्या दोनशे अठ्याण्णवच होतात.

वरील उल्लेखावरून ब्रह्मानंदाच्या समाधीचा काल शके १६१५ म्हणजे रविवार ता. १९ नोव्हेंबर सन १६९३ असा येतो.

* * *

२७ ज्ञानेश्वर च. प्र. २, १६४

— १२ —

## उपसंहार

याते दिवं पितरि तद्वचसैव सार्धम्
विच्छेदमाप भुवि यस्तु कथाप्रबन्धः ।
दुःखं सतां तदसमाप्तिकृतं विलोक्य
प्रारब्ध एव स मया न कवित्वदर्पात् ॥

सुप्रसिद्ध संस्कृत कवि व लेखक बाणभट्ट याने आपल्या कादंबरीचा पहिला भाग लिहिल्यानंतर तो दिवंगत झाला व त्याचा दुसरा भाग लिहा-वयास घेण्याच्या अगोदर त्याच्या मुलाने जो उपरिनिर्दिष्ट श्लोक लिहून ठेविला आहे त्याचे कॉलेजमध्यें अध्ययन करीत असताना याच अनुभवा तून आपणासही एक दिवस जावे लागेल असें जर मला कोणीं सांगितले असतें तर त्या भविष्यवाणीवर माझा विश्वास तरी बसला असता काय? पण कित्येक वेळा आयुष्यात अकल्पित घटना घडतात हेच खरें. ती. कै काकानीं पंढरपुरला जाऊन श्रीधरस्वामींच्या वाडातून टिपणें गोळा करून त्याच्या चरित्राविषयींची सर्व साधनसामुग्री गोळा केली, त्याच्या ग्रंथाचें परिशीलन केलें, आतापर्यंत श्रीधरस्वामींवर व त्याच्या ग्रंथावर प्रकाशित झालेल्या सर्व वाङ्मयाचा बारकाईने अभ्यास केला आणि अंतीं कॅन्सरसारख्या

असाध्य व दुर्धर रोगानें त्याना पछाडले तरी त्यानीं आपला कृतनिश्चय ढळू दिला नाहीं. प्रस्तुत ग्रथाचे दोन्ही भाग त्यांनीं प्रचड वेगाने लिहून काढले. परतु सरतेशेवटीं रोगानें त्याच्यावर मात केलीच व अखेरीस मृत्यूनें त्याना आमच्यातून ओढून नेलेंच ! वास्तविक या ग्रथाचा उपसहार त्याच्याच हातून व्हावयास पाहिजे होता म्हणजे तो अधिक सफाईदार व योग्य झाला असता, परतु तें पुरे करण्याचे काम माझ्याच नशीबीं आलें आहे व ते काम मी केवळ पुत्रकर्तव्य म्हणूनच पार पाडीत आहे. अन्यथा हें काम पुरें करण्यास माझ्या अगीं कदापिही पात्रता नाहीं हें सागावयास पाहिजे असें नाहीं हा माझा अल्पसा प्रयत्न जरी दोषपूर्ण असला तरी विद्वज्जन मला त्याबद्दल उदार अंत:करणानें क्षमाच करतील असा मला भरवसा वाटतो

## १ ग्रंथकर्त्यास स्फूर्ति

रा. ब का. ना. साने यानीं 'श्रीधरस्वामी' या मथळ्याखालीं एक लेख लिहून श्रीधरस्वामींच्या चरित्रसशोधनाचा मूळ पाया घातला. त्यात त्यानीं शेवटल्या कलमात खालीलप्रमाणे म्हटले आहे[१]:—

“ श्रीधराचा भक्त नाझरें व पंढरपूर येथें जाऊन सामग्री मिळवून त्याच्या ग्रथाचें मार्मिकतेने अवलोकन करून जर या लोकप्रिय कवीचें चरित्र लिहील व त्याच्या ग्रंथाचें गुणदोषविवेचन करील, तर त्याने नि:सशय मोठेच काम बजाविलें असे होईल. ”

वरील विधान रा. साने यानी केल्याला आज जवळ जवळ चाळीस वर्षे लोटलीं. वर म्हटल्याप्रमाणे “ श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन ”

१ भा. इ. सं. म., अहवाल, शके १८३३, लेख १३

हा ग्रंथ आज प्रसिद्ध होत आहे व साने यांची उक्ती आज खरी होत आहे हे पाहून कोणाही मराठी भाषाभिमान्यास आनंद व कौतुकच वाटेल. परन्तु, दुःखाची गोष्ट एवढीच की, या ग्रंथाचे प्रकाशन पाहाण्यास आज रा. का. ना. साने अगर या पुस्तकाचा ग्रंथकर्ताही हयात नाहीं ! श्रीधराच्याच भाषेत सांगावयाचे झाले तर असें म्हणता येईल कीं—

जे आले ईश्वराच्या चित्ता । ते कोण निवारू शके आता ॥
ललाटीं लिहितो जो विधाता । ते सर्वथा न चुकेचि ॥

' ज्ञानेश्वरे रचिला पाया आणि तुका झालासे कळस ' असे म्हणतात त्याप्रमाणेच रा. ब. का. ना. साने यांनीं श्रीधरचरित्राच्या मूळ संशोधनाचा पाया घातला व प्रस्तुत ग्रंथकर्त्यांने त्या पायावर ही इमारत उभी करून व त्या इमारतीवर ' काव्यविवेचना'चा कळस चढवून ती जितकी डौलदार व शोभिवन्त करता येईल तितकी करण्याचा प्रयत्न केला आहे व तशी ती झाली आहे किंवा नाहीं हे पाहाण्याचें काम सर्वथा विद्वान् वाङमयसेवकाच्याच हातीं आहे. या इमारतीकडे जो लक्षपूर्वक पाहील त्यास दोषस्थळे आढळणार नाहींत असे नाहीं. परन्तु या दोषस्थलाकडे विद्वानानीं सहृदयतेने पाहावे हीच त्यास नम्र विनंति आहे. कारण, ग्रंथकर्ता कॅन्सरसारख्या असाध्य व दुर्धर रोगानें पछाडला असताना सुद्धा अंगीकृत कार्याकडे यत्किंचितही दुर्लक्ष न करता तें कार्य आपल्या निर्याणापूर्वीच हातावेगळे करावे या उत्कट इच्छेनेच जणू काय प्रेरित होऊन त्यानीं तें पुरे केले. पुन्हा एकदा ग्रंथाकडे नजर टाकण्यास अगर त्यावर कुंचला फिरविण्यासही निर्घृण काळाने अवसर दिला नाहीं.

## २ ग्रंथकर्त्याचे प्रयत्न व पूर्व तयारी

सन १९११ साली रा. ब. का. ना. साने यांचा 'श्रीधरस्वामी' हा

लेख वाचल्यानन्तर प्रस्तुत ग्रंथकर्त्यानें सन १९१८ सालीं पंढरपुरास जाऊन तेथील बाडाचे अवलोकन केले. त्यावेळेस त्याला श्रीधरस्वामींच्या मठात भरगच्च बाडे भरलेलीं आढळून आलीं. मध्यन्तरींच्या काळात श्रीधराचा 'जैमिनिअश्वमेध' या ग्रथाचे परिशीलन करून सन १९३३-३४ सालीं 'विविधज्ञानविस्तारा'त लेखमाला लिहिली.

तदनन्तर सन १९४० व १९४१ सालीं पुन्हा दोनदा पढरपुरास जाऊन तेथें एक महिनाभर वास्तव्य करून श्रीधरस्वामींच्या बाडाचे सूक्ष्म परीक्षण करून व त्यातील टिप्पणे काढून सन १९४४ सालीं औरगाबाद नभोवाणीवर 'श्रीधराची कविता' या विषयावर भाषण केले. हे भाषण ऑक्टोबर १९४५ च्या 'हैद्राबाद समाचार'च्या अंकात प्रसिद्ध झाले आहे. त्यानतर 'महाराष्ट्र–साहित्यपत्रिके'च्या जुलै १९४५ च्या अंकात 'श्रीधराविषयीं आणखी काहीं माहिती' या मथळ्याखालीं एक लेख लिहिला. पुढे 'चित्रमयजगत्'च्या डिसेंबर १९४५ च्या अंकात 'श्रीधर-स्वामी नाझरेकर–नवीन माहिती' या मथळ्याखालीं आणखी एक लेख लिहिला. हे चालू असतानाच मोगलाईच्या मराठवाड्यातील जवळ जवळ शंभर दुर्मीळ हस्तलिखित पोथ्या मिळवून आणून व त्याचे परिशीलन करून त्यावरही हैद्राबाद 'समाचार' मध्ये एक लेख लिहिला व औरगाबाद नभोवाणीवर भाषणही केले. याच्या जोडीला श्रीधरस्वामींच्या 'हरिविजय,' 'रामविजय,' 'पाडवप्रताप' इ. थोर ग्रथाचा बारकाईनें अभ्यास केल्यानन्तर व त्यावरील आता-पर्यन्त झालेल्या वाङ्मयाचाही अभ्यास करून श्रीधरस्वामींच्या कवितेचे वाङ्मयीन दृष्ट्या मूल्यमापन करून इतर साहित्यसेवकानीं आज-पर्यन्त श्रीधरस्वामींबद्दल व त्याच्या काव्याबद्दल केलेलीं विधानें कशीं निराधार व निर्मूल आहेत हें सप्रमाण व सोदाहरण दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

## ३ प्रस्तुत ग्रंथाचें समालोचन

प्रस्तुत ग्रथाचे एकूण दोन भाग आहेत. पहिल्या भागात श्रीधर स्वामीचे चरित्र आलें आहे या भागाचा समारोप ग्रथकर्त्यानें स्वतःच पहिल्या भागाच्या अखेरीस केलेला आहे तेव्हा त्याची पुनरुक्ति येथे करीत बसण्याचे कारण नाहीं. फक्त जून १९४८ नन्तर ग्रथकर्ता इहलोक सोडून गेल्यानन्तर जी काहीं माहिती श्रीधरस्वामीच्या विद्यमान वशजा-कडून उपलब्ध झाली तेवढ्याचाच अंगुलिनिर्देश करू:—

## भाग पहिला

अ ) प्रकरण ३ रें:—

या प्रकरणात ग्रथकर्त्यांनें खालील प्रमाणे म्हटलें आहे[२]. —

"ज्ञानदेव, तुकाराम, रामदास वगैरे सत कवींची छायाचित्रे प्रसिद्ध झालीं आहेत पण श्रीधराच्या बाबतींत एवढे सुदैव नाहीं. हीच गोष्ट त्याच्या हस्ताक्षराच्या सबधीं. विश्वसनीय असे त्याचे हस्ताक्षर आज उपलब्ध नाहीं. भावे यानीं 'शिवलीलामृता'च्या अध्याय नऊमधील त्याचे म्हणून जे छापलें आहे त्याबद्दलची त्याची त्यासच खात्री नाहीं शिवाय, 'शिवलीलामृता'चे मूळ हस्तलिखित श्रीधराच्या दप्तरात नसल्याचे पा. मा. चादोरकर यानीं प्रसिद्ध केलें आहे. तेव्हा या दोन्ही बाबतींत निराशाच आहे."

उपरिनिर्दिष्ट विधानातील श्रीधरस्वामींच्या या ग्रथात समाविष्ट केलेल्या छायाचित्रासबधीं सागावयाचे म्हणजे प्रस्तुत ग्रथकर्त्यानेंच

---

२ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ३, पृ. ४०

आपल्या हयातींत हैद्राबाद (दक्षिण) येथील सुप्रसिद्ध चित्रकार श्री. आळदकर याच्याकडून श्रीधरस्वामींचा शिष्य सामराज याच्या वर्णनाप्रमाणे एक पेन्सिल स्केच काढून घेतलें होतें व ते त्यानीं पसत केले होते म्हणून आम्ही श्री आळंदकराकडेच हे काम सोपविलें. सामराजाच्या वर्णनात पिवळा पितांबर, डोक्यावर सुदर फेटा, कपाळावर काळा कस्तुरीतिलक इ. वर्णन आले आहे. परन्तु, हल्लींच्या महर्घतेंमुळे तीन रंगी छायाचित्र काढून घेणे अशक्य झाल्यामुळे एक रंगीच छायाचित्र काढले आहे, म्हणून या ग्रंथाच्या वाचकास दुधाची तहान ताकावरच भागवावी लागणार असल्यामुळे ते आमच्यावर रुष्ट होणार नाहींत अशी आशा आहे

श्रीधरस्वामींचे हस्ताक्षर —

ता १८ ऑगस्ट १९५० च्या 'केसरीच्या' अकात श्रीधर-स्वामींचे विश्वसनीय हस्ताक्षर व तसेच त्याचे विश्वसनीय छायाचित्र कोणाच्या सग्रहीं उपलब्ध असल्यास कृपा करुन कळवावे अशी जाहीर विनती मी केली होती या बाबतींत श्रीधरस्वामींच्या काहीं लाबच्या व काहीं जवळच्या वशजाचीं पत्रे आलीं त्यात त्यानीं मला कळविले कीं, श्रीधरस्वामींचे छायाचित्र अगर त्याचे विश्वसनीय हस्ताक्षर उपलब्ध नाहीं. म्हणून मी ऑक्टोबर १९५० मध्ये पढरपुरास श्रीधरस्वामींच्या मठात जाऊन वरील गोष्टी उपलब्ध झाल्यास पहाव्या म्हणून प्रयत्न केला तेथें बाडे चाळता चाळता मला दोन तीन हस्ताक्षराचे नमुने एकमेकाशीं जुळते असलेले असे सापडले. ते नमुने भा.इ.स.मडळाच्या डिसेंबर १९५० च्या पाक्षिक सभेपुढें विद्वानाच्या विचारार्थ ठेविले पाक्षिक सभेस उप-स्थित असलेल्या विद्वान् सभासदानीं मी आणलेले नमुने पुस्तकात छापावे

असा अभिप्राय दिल्यावरून या ग्रथाच्या परिशिष्टात दोन नमुने छापले आहेत यासबधीची विस्तृत माहिती परिशिष्टात जोडली आहे.

पुढे याच प्रकरणात ग्रथकर्त्याने खालीलप्रमाणे म्हटले आहे[३]:–

"दत्तानदाला दोन मुलगे नव्हते एकटा ब्रह्माजीपतच होता.

नाझरे येथील श्री. तातोबा नाझरेकर ( नाझरेकर घराण्यातील एक विद्यमान वशज) यानी मला एक वशावळ पाठविली आहे.श्री.तातोबा आपल्या पत्रात म्हणतात की, दत्तानन्दास ब्रह्माजीपत व चद्राजीपत असे दोन मुलगे होते. हे खरे मानले तर चद्राजीपत हे श्रीधरस्वामींचे सख्खे चुलते होतात. परतु, श्री. तातोबा नाझरेकर याच्याजवळ चद्राजीपताचा जन्मशक अगर तत्सम खात्रीलायक सबळ अन्य पुरावा नसल्यामुळे त्यानी केलेले विधान विश्वासार्ह वाटत नाही. तरी पण पुढे यासबधी अधिक माहिती उपलब्ध झाल्यास यथावकाश प्रसिद्ध करू शिवाय,श्रीधरस्वामींनी आपल्या सख्या चुलत्याचा ( चद्राजीपताचा ) उल्लेख त्यानी आपल्या एकाही ग्रथात अगर स्फुट प्रकरणात देखील केलेला आढळत नाही. कारण, ज्यानी आपल्या चुलत-चुलत्याविषयी म्हणजेच रगनाथस्वामीविषयी " श्रीरग आम्हा चुलता गुरू हो" असे आदरयुक्त उद्गार काढले आहेत तर ते आपल्या सख्या चुलत्याविषयी म्हणजेच चद्राजीपताविषयी कोठेही उद्गार काढणार नाहीत हें सभवनीय नाही. सबब श्री. तातोबा नाझरेकर याचें म्हणणे अग्राह्य वाटतें.

---

३ श्रीधर. च आणि का., भा. १, प्र. ३, पृ ४७

आ ) प्रकरण सहावें: —समाधिमंदिराचे छायाचित्र व शब्दचित्र:—

या ग्रंथात जोडलेल्या समाधिमंदिराच्या छायाचित्रात ' श्रीधर-समाधि शके १६५१ 'हीं जीं अक्षरें आहेत तीं मी तेथे ऑक्टोबर १९५० मध्ये गेलो होतो तेव्हा रंगवून घेतलीं आहेत यानंतर दुसरी गोष्ट सांगावयाची म्हणजे श्रीधरस्वामींचे विद्यमान वंशज रा. तुकारामपंत यांचा फोटो विद्यमान वंशजाच्या फोटोंत नसल्या कारणाने ते श्रीधरस्वामींच्या समाधिच्या चौथऱ्यावर पुढील भागीं बसलेले छायाचित्रात दाखविले आहेत. समाधीवरील शिलालेख ' भूप्राणागमशीमिते .. " इ फार जीर्ण झाला असल्यामुळें तो छायाचित्रात जेवढा स्पष्ट दिसावा तेवढा दिसत नाहीं.

इ ) प्रकरण सातवें ——श्रीधराचा विद्यमान वंश:—

या प्रकरणात ग्रंथकर्त्यांने खालील प्रमाणे म्हटलें आहे[४]:—

" सांप्रत कृष्णाजीपंत हेच श्रीधराच्या वंशातील वडील असे वंशज आहेत. हे सध्या सांठांच्या घरात आहेत. "

वर उल्लेखिलेले रा कृष्णाजीपंत हे सन १९४२ सालीं निवर्तले असे त्यांचे चिरंजीव वे. शा. स. नारायणशास्त्री नाझरेकर यांनीं मला कळविले तसेंच हल्लींचे विद्यमान वंशज वे शा. स नारायणशास्त्री यांची प्रथम पत्नी ' सुभद्रा ' ही शके १८६७ मध्ये निवर्तली. या गोष्टी श्रीधरस्वामींची वंशावळ भाग २ . ' श्रीधर ते आज ' यात दाखविल्या आहेत[५] ही वंशावळ सन १९५१ पर्यंत आणलेली आहे

---

४ श्रीधर च. आणि का., भा. १, प्र. ७, पृ. १०९

५ श्रीधर. च. आणि का., भा. १, प्र. ७, पृ. ११२

# भाग दुसरा

अ ) प्रकरण नववें:—श्रीधराची कवितातपदा:—

या प्रकरणात ग्रंथकर्त्याने श्रीधरस्वामींच्या कवितेची मोजदाद केली आहे, व त्याची एकूण संख्या ५७, ८१८ अशी दाखविली आहे.[६] मी जेव्हा ऑक्टोबर १९५० मध्ये पंढरपुरास गेलो होतो त्यावेळेस वाडातील पोथ्यांशीं ओवींसंख्या ताडून पाहाता त्यात जे काहीं फरक आढळले ते खालीं नमूद केले आहेत:—

'वेदान्तसूर्य' या ग्रंथाची ओवीसंख्या २४४३ भरते. म्हणजे या ठिकाणीं एकोणतीस ओव्याचा फरक पडतो. याचे विवेचन पुढे केले आहे याशिवाय श्रीधरस्वामींच्या वाडात मला खालील ग्रंथ पहावयास सापडले त्याचे विवेचन या ग्रंथाच्या परिशिष्टात जोडलेले आढळेल: —

| ग्रंथनाम | अध्याय | | कवितासंख्या |
|---|---|---|---|
| १ अंबिकाउदय | ६ | | ४९२ |
| २ तत्त्वगीता ( संस्कृत ) फक्त दुसरा अध्याय | | | ११७ |
| ३ पंढरीमाहात्म्य | ३१ | (छापील पोथी ) | १२६८ |
| ४ वेदान्तसूर्य ओवींसंख्येचा फरक | | | २९ |
| | | एकूण | १९०६ |

म्हणजे ग्रंथकर्त्याने या प्रकरणात दिलेल्या ५७, ८१८ या एकूण कवितासंख्येत १९०६ हा आकडा मिळविला कीं, एकूण कवितासंख्या ५९, ७२४ भरते. म्हणजे ती जवळ जवळ साठ हजाराच्या घरात येते

६ श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ९, पृ १३६

आ) प्रकरण दहावे.—आत्मप्रकाश:—

श्रीधरस्वामींच्या वडिलाचा--म्हणजेच ब्रह्मानदाचा हा ग्रथ अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. या ग्रंथाचा काल शके १६०३ नसून तो शके १६०४ हा आहे असे ग्रंथकर्त्याने सिद्ध केलें आहे. या ग्रथाने श्रीधरस्वामींचा जन्मशक निश्चित होतो. तदनतर दत्तानंदाच्या समाधिकालाचाही या ग्रथात उल्लेख आल्यामुळे त्या कालाचीही निश्चिती झाली आहे. एवढेंच नव्हे, तर हा ग्रथ म्हणजे श्रीधरस्वामींच्या अलकारिक भाषाशैलीचे व वेदान्तज्ञानाचे उगमस्थान आहे.

इ) प्रकरण ११ वे:—-श्रीधराची स्फुट कविता:—

ग्रथकर्त्यानें या प्रकरणात एकूण एकशे सात स्फुट प्रकरणाचा उल्लेख केला आहे. आतांपर्यन्त विनायकराव भावे यानीं हीं स्फुट प्रकरणे पन्नाहत्तरच आहेत असा उल्लेख त्यानीं आपल्या 'महाराष्ट्र-सारस्वता'त केलेला आहे. तसेच भावे यानी म्हटल्याप्रमाणे 'गोकुळलीला' तीन भाग नसून पाच भाग आहेत असे ही ग्रंथकर्त्याने सिद्ध केले आहे. शिवाय 'स्फुट-प्रकरणाचा' लेखनकालही ग्रथकर्त्याने निश्चित केला आहे म्हणजे शके १६२० पासून ते शके १६२२ पर्यन्त श्रीधरस्वामींनीं हीं स्फुट प्रकरणे लिहिलीं असावीं असें सागितले आहे. तसेच अक्षरगणवृत्तापेक्षा ओवीछदच आपल्या रचनेस सुलभ होईल याचाही निश्चय श्रीधरस्वामींनीं ही 'स्फुट प्रकरणे' लिहिल्यानतर स्वानुभवाने केला असावा असे प्रतिपादिले आहे.

पुढे याच प्रकरणात श्रीधरस्वामीच्या बाडातील स्तोत्रककलापातील काहीं उतारे देऊन ग्रथकर्त्याने द. अ. आपटे याचा 'श्रीधरस्वामीनीं

संस्कृतची एक ओळही लिहिली नाहीं ' हा आक्षेप खोडून काढला आहे.

ई ) प्रकरण १२ वे —हरिविजयः —

या प्रकरणात ग्रंथकर्त्याने श्रीधरस्वामींची सर्व वैशिष्ट्ये दाखविली आहेत. उदाहरणार्थः - 'हरिविजया'चा ग्रंथलेखनकाल, ग्रंथाचे नामाभिधान करण्याची कुशलता, श्रीधरस्वामींची ग्रंथविस्तारभीरुता, त्यांनीं घेतलेले मूळ आधार, त्याचा विनय व आत्मविश्वास, काव्यातील रसपरिपोष, काव्यात योजलेले अलङ्कार, साहित्यविषयक भाषणे, श्रीधरस्वामींची वर्णनशैली, त्यांची विद्वत्ता व वेदान्तप्रतिपादनाचा हव्यास, श्रीधरकालीन समाज-स्थिति, श्रीधरस्वामींची भाषाशैली व व्याकरणविशेष, त्यांनीं आपल्या ग्रंथात योजिलेले जुने अप्रसिद्ध प्राकृत शब्द, त्यांच्या भाषेचे संस्कृती वळण, त्यांच्या काव्यातील दोषदर्शन व शेवटीं 'हरिविजयातील' काहीं उत्कृष्ट उतारे देऊन हे प्रकरण संपविलें आहे

उ ) प्रकरण १३ वें: —रामविजयः —

या ग्रंथाचेही वरील प्रमाणेंच विवेचन केलें आहे. या विवेचनातील विशेष म्हणजे श्रीधरस्वामींनीं मूळ रामायणाप्रमाणेच सात काण्डाचे चाळीस अध्याय कसे केले आहेत व विषयाच्या महात्त्वानुरूप काव्यरचना कमीजास्त करुन कवीने आपली कलात्मकता कशी दाखविली आहे हे सांगितले आहे. शिवाय श्रीधरस्वामींनीं या ग्रंथात केलेला एकोणीस रामायणाचा उल्लेख प्रशंसनीय आहे. श्रीधरस्वामींनीं ' हनुमन्नाटक ' व ' आनन्दरामायण ' या ग्रंथाचा आधार ' रामविजय' रचताना कसा घेतला आहे व मूळ वाल्मीकि-रामायणास सोडून कोणत्या कथा ' रामविजया'त समाविष्ट केल्या आहेत याचा ही छडा लावण्याचा प्रयत्न ग्रंथकर्त्याने केलेला आहे. श्रीधरस्वामींनीं

आपली ग्रंथरचना केवळ मनोरजनाकरिताच केलेली नसून 'रामायणातील' उद्बोधक कथानीं श्रोत्यास नीतिसदाचारसपन्न करून परपार्थप्रवण करणे याकरिताच केलेली होती हेंही सागितले आहे. नन्तर श्रीधरस्वामींचा दृष्टान्ताचा हव्यास कसा होता हे ग्रथकर्त्यानें यदृच्छया काहीं अध्याय घेऊन कोष्टकरूपानें सोदाहरण दाखविलें आहे शेवटीं रसाळपणा व मनोरंजकता या गुणात 'रामविजय' या ग्रथाचा क्रम 'हरिविजय' या ग्रथाच्या खालींच लागतो असा अभिप्राय देऊन व 'रामविजया'तील काहीं उत्कृष्ट उतारे देऊन हें प्रकरण सपविले आहे.

ऊ) प्रकरण १४ वें:—वेदान्तसूर्यः—

या प्रकरणात पृ. ३२५–३२६ मध्ये या ग्रथाची नकल कृष्णा आराध्ये यानें करून ठेविली आहे असें सागितले आहे. श्रीधरस्वामींच्या वाडात मूळ प्रत नाहीं असे ग्रथकर्त्यानें नमूद केले आहे, व "वोव्या येकुन दोनि हजार च्यारसे चौदा" असे कृष्णा आराध्ये याने म्हटले आहे. हीच प्रत मला पढरपुरच्या दप्तरात पाहावयास सापडली. या पोथींतील प्रत्येक प्रकरणाच्या ओंवीसख्येची बेरीज केली असता ती ओंवीसख्या दोन हजार चारशे त्रेचाळीस भरते असे आढळून आले. म्हणजे ही सख्या पोथीच्या शेवटल्या पानावर जी 'दोनि हजार च्यारसे चौदा' अशी कृष्णा आराध्ये याने घातली आहे ती आतील संख्येशीं जुळत नाहीं. ग्रथकर्त्याच्या हातून अनवधानानें ही गोष्ट चुकून राहिली असावी असे वाटतें. हीच हस्तलिखित प्रत खानापूरकर यानीं प्रसिद्ध केलेल्या छापील प्रतीशीं ताडून पाहाता छापील प्रतीची ओवीसख्या २४४६ भरते.[७]

७ रामचद्र सदाशिव राजाध्यक्ष खानापुरकर. 'वेदान्तसूर्य,' प्रस्तावना (स. १८७४)

खालीं हस्तलिखित प्रतींतील व छापील प्रतींतील ओंवीसंख्या अध्यायवार दिल्या आहेत:—

| अध्याय न. | हस्तलिखित प्रत ओंवीसंख्या | छापील प्रत ओंवीसंख्या |
|---|---|---|
| १ | २८१ | २८१ |
| २ | १९८ | १९८ |
| ३ | २१८ | २१८ |
| ४ | १७७ | १७७ |
| ५ | १९४ | १९४ |
| ६ | २०१ | २०१ |
| ७ | २४२ | २४१ |
| ८ | २०९ | २०८ |
| ९ | १९८ | १९७ |
| १० | १७८ | १७८ |
| ११ | १७० | १७० |
| १२ | १८० | १८० |

प्रस्तुत ग्रथाच्या प्रकरण नऊमध्ये 'वेदान्तसूर्य' या ग्रंथाची ओंवीसंख्या दोन हजार चारशें चौदा अशी जी ग्रथकर्त्यानें नमुद केली आहे ती अनवधानानें झाली आहे.[८] हा आकडा २४१४ नसून २४४३ असा पाहिजे. 'वेदान्तसूर्य' या ग्रथाच्या छापील प्रतींत एकूण ओंवीसंख्या २४४६ भरते. म्हणजे कृष्णा आराध्ये याच्या हस्तलिखित

८ श्रीधर. च. आणि का. भा. २, प्र. ९, पृ. १३५

प्रतीपेक्षां या छापील प्रतींत तीन ओव्या जास्त आहेत. त्या कशा व कोठे आल्या आहेत याचा छडा लावूं:—

फक्त प्रकरण ७, ८ व ९ मध्येच हा एक एक ओवीचा फरक दिसून येतो.

सातव्या प्रकरणात छापील प्रतींत ओंवी १५२ ही कृष्णा आराध्ये यांच्या हस्तलिखित प्रतींत सापडत नाहीं. ती ओवी येणेप्रमाणे.—

कोणी घातार्थ शस्त्र मारी । तें उलटून लागे त्याचे शिरीं ॥
योगी तया उपचार करी । भेदबुद्धी नसेचि ॥ १५२ ॥

छापील प्रतींत आठव्या प्रकरणात ओवी नंबर २०७ ही कृष्णा आराध्येच्या पोथींत नाहीं. ती ओंवी येणेप्रमाणे:—

परि धैर्य न साडावे यथार्थ । श्रवण मनन पुण्यपंथ ॥
निजध्यासे करुनि निश्चित । निजस्वरूपीं रमावे ॥ २०७ ॥

प्रकरण नऊमध्ये हस्तलिखित प्रतींतील ओंवी नंबर १७३ याच्या दोन ओव्या छापील प्रतींत केलेल्या आहेत:—

कृष्णा आराध्ये ( हस्तलिखित प्रत ):—

तो सिद्धिबळे खेळो लागला । तरी तो अवघाच येथून चेवला ॥
जेसा पर्वत चढता कोंसळला । व्यर्थ गेला तैसा तो ॥ १७३ ॥

छापील प्रत:

तो सिद्धिबळे खेळो लागला । नाना शास्त्रीं प्रवीण झाला ॥
अष्टांग योगीं मीनला । तरी हें वर्म नेणेचि ॥ १७३ ॥

तरी अवघाचि येथोनि चेवला । जैसा पर्वत चढता कोसळला ॥
कीं ब्राह्मण यातिभ्रष्ट जाहला । व्यर्थ गेला तैसा तो ॥१७४ ॥

तेव्हा छापील प्रत रा. खानापुरकरानीं कोणत्या प्रतीवरून छापली याचा उल्लेख त्यानीं आपल्या प्रस्तावनेंत नमूद केलेला आढळत नाहीं.

ए ) प्रकरण १५ वे : पाडवप्रताप: -

या प्रकरणात ग्रंथकर्त्यांने 'पाडवप्रताप' या लोकप्रिय ग्रंथास कवीने 'हारिविजय', 'रामविजय', इ. ग्रथाप्रमाणे 'पाडवविजय' हे नाव का दिले नाहीं याची मनोरंजक चर्चा केली आहे, व हें नाव कवीला मुक्तेश्वराच्या एका सुन्दर पण थोड्याशा अश्लील रूपकावरून कसे सुचले असावे याचें थोडक्यात दिग्दर्शन केले आहे. नन्तर ग्रंथाधारासंबंधीं सारस्वतकार भात्रे यांचे विधान कसें निर्मूल आहे हे सोदाहरण दाखविले आहे. मूळ भारतास सोडून कवीने आपल्या 'पाडवप्रतापा'त कोणत्या कथा घेतल्या आहेत याचाही ग्रंथकर्त्यानें अंगुलिनिर्देश केला आहे. नतर कवीनें सक्षेपकुशलता कशी दाखविली आहे याबद्दलही चर्चा करून कवीच्या संक्षेपकुशलतेतच त्याच्या लोकप्रियतेचे बीज आहे हे सिद्ध केलें आहे. तदनन्तर विनायकराव भावे व ह. भ. प. पागारकर या दोन विद्वानाचे श्रीधरस्वामींवरील आक्षेप म्हणजे त्यानीं मुक्तेश्वराचा तर्जुमा केला आहे हे कसे निराधार आहेत याचे विस्तृत विवेचन करून मुक्तेश्वर व श्रीधरस्वामी या दोन्ही कवींच्या काव्यातील उतारे देऊन आपले विधान सिद्ध केले आहे. तसेंच दोघाच्याही काव्यातील फरक कसे व कोठे आहेत याचाही स्थलनिर्देश करून हे प्रकरण संपविले आहे.

ग) प्रकरण १६ वे: जैमिनिअश्वमेध: —

या समग्र-ग्रंथाचेही ग्रंथकर्त्याने सांगोपांग विवेचन करून कवि-मालिकेत श्रीधरस्वामींचे स्थान कोणते हे सांगितले आहे. तसेंच या ग्रंथाच्या एकूण शहाण्णव अध्यायावर चौऱ्याण्णवाव्या अध्यायाने भोजनवर्णन करून कसा कळस चढविला आहे हें मनोरंजक रीतीने निवेदन केले आहे.

क) प्रकरण १७ वे शिवलीलामृत: —

या ग्रंथाचेंही वरील ग्रंथाप्रमाणेच सूक्ष्मदृष्ट्या विवेचन करून सुप्रसिद्ध प्रकाशक केशव भिकाजी ढवळे यांनी या ग्रथांत पंधरावा अध्याय कसा घुसडला आहे हे दर्शविले आहे. नन्तर या ग्रंथावरील आधुनिक टीका, उदाहरणार्थ, कुलकर्णीलीलामृत, पंडित रघुनाथशास्त्री कोकजे यांनी 'स्त्री' मासिकात केलेली चर्चा, तसेच विद्वान् श्री ना. गो. चापेकर यांनी मार्च १९४५ च्या सह्याद्री'च्या अंकात केलेलीं विधाने, इ. यांचाही परामर्श घेऊन या ग्रंथाचे विवेचन संपविले आहे.

ख) प्रकरण १८ वे श्रीधराचे छोटे ग्रंथ: —

यात श्रीधरस्वामींच्या छोट्या ग्रंथाचे थोडक्यात विवेचन केले आहे या प्रकरणात ग्रंथकर्त्याने म्हटलें आहे की, 'अंबिकाउदय' व 'तत्त्वगीता' हे दोन ग्रंथ ग्रंथकर्त्यास पहावयास सापडले नाहींत. परंतु, मी ज्यावेळीं पंढर-पुरास गेलो होतो त्यावेळीं मला ते पहावयास मिळाले म्हणून या ग्रंथात उणीव राहू नये यासाठीं या दोन ग्रंथाचे परीक्षणही परिशिष्टात जोडले आहे. या छोट्या ग्रंथापैकीं 'ज्ञानेश्वरचरित्र' हें अगदीं प्रथमच लोकापुढे येत आहे.

नन्तर पंढरपुरास मी गेलों असतांना 'पाडुरगमाहात्म्य' या ग्रंथाच्या काहीं छापील व काहीं हस्तलिखित पोथ्या मला पहावयास सांपडल्या. त्याचा अंगुलिनिर्देश करून हा बराच लांबलेला उपसहार आटोपता घेऊं:—

| अ.नं. | शककाल | हस्तलिखित प्रत | छापील प्रत | अध्यायसख्या | ओंवीसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | १७८५ | — | बाबुराव शेट्ये, मुंबई | १० | ७४६ |
| २ | शक दिला नाहीं. | नक्कल करणाराने आपलें नाव दिले नाहीं | — | १० | ७५० |
| ३ | शक दिला नाहीं. | भास्कर बाबुराव कुलकर्णी | — | १० | ७४८ |
| ४ | १७५० | मनोहर अवधत गोसावी | - | ३२ | १४०९ |

वरील चार प्रतींपैकीं एकच प्रत नंबर एकची प्रत फक्त छापील प्रत असून बाकीच्या तीन प्रति हस्तलिखित आहेत. या तिन्ही प्रती श्रीधरस्वामींच्या वाडात मला पहावयास सापडल्या. अ. न.४ ची प्रत ही मनोहर अवधूत गोसावी नाझरेकर—देशपाडे याने नकल करून ठेविली आहे. हा श्रीधरस्वामींचा पणतु होय. हे बत्तीस अध्यायाचे 'पाडुरगमाहात्म्य' स्कन्द-पुराणानुसार लिहिलेले आहे. याशिवाय एकतीस अध्यायाची पंढरी-माहात्म्याची छापील प्रत आहे. त्याची ओवीसख्या १२६८ आहे.हे 'पंढरी-माहात्म्य' श्रीधरस्वामींनीं 'पद्म' पुराणासुसार लिहिलेले आहे. 'पाडुरंग-माहात्म्य' व 'पंढरीमाहात्म्य' या दोहोंतील विषय जवळ जवळ एकच आहेत. या 'पंढरीमाहात्म्या'संबंधीं माहिती परिशिष्टात जोडलेली आहे.

प्रस्तुत ग्रथाची काय काय वैशिष्ट्यें आहेत त्याचा थोडक्यात आतापर्यंत नामनिर्देश केला याचा हेतु एवढाच कीं, वाचकास या ग्रथांत नवीन माहिती ग्रथकर्त्यांनें कोणती ग्रथित केली आहे तिचा एका दृष्टि-क्षेपात परिचय व्हावा

## ४ आभारप्रदर्शन

आता शेवटलें गोड काम म्हणजे आभारप्रदर्शनाचें. प्रस्तुत ग्रथाच्या प्रकाशनासाठीं पुणे विद्यापीठ व उस्मानिया विद्यापीठ हैद्राबाद ( दक्षिण ), या दोन विद्यापीठानीं प्रत्येकीं रुपये पाचशेची देणगी मजूर केलेली आहे. त्याबद्दल उपरिनिर्दिष्ट दोन्ही विद्यपीठाचा मी सर्वथा ऋणी आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या खर्चाच्या मानाने पाहता ही देणगी जरी अल्प असली तरी गुण-ग्राहकतेच्या दृष्टीनें ती बहुमोलाचीच आहे हें निःसशय.

तसेंच मला पितृस्थानीं असलेल व प्रस्तुत ग्रंथकर्त्यांचे विद्वान् जिवलग स्नेही महामहोपाध्याय डॉ.पाडुरग वामन काणे, महामहोपाध्याय प्रा. द .वा. पोतदार,डॉ.के.ना वाटवे, भाडारकर इन्स्टिटयूटचे श्री.गोडे,भा.इ स.मडळाचे नैष्ठिक कार्यकर्ते श्री शंकरराव जोशी,श्री चितामणराव कर्वे,रा.खरे व इतर विद्वान् मडळी यानीं वेळोवेळीं या ग्रथाच्या प्रकाशनाच्या बाबतींत जे साहाय्य व मार्गदर्शन केलें त्याबद्दल मी त्या सर्वाचा ऋणी आहे.त्याचप्रमाणे पुण्यातील फर्ग्युसन कॉलेज ग्रथालय, सर परशुरामभाऊ कॉलेज ग्रथालय, महाराष्ट्र-ग्रंथालय, भा. इ. स. म. चे ग्रथालय व इतर ग्रथालयातील चालकानीं वेळोवेळीं प्रस्तुत ग्रंथास लागणारे सदर्भग्रंथ देऊन मला उपकृत केले आहे, त्याबद्दल त्याचाही मी ऋणी आहें. श्रीधरस्वामींचे विद्यमान वशज वे. शा. स. नारायणशास्त्री नाझरेकर यांनीं मला वाडे पाहाण्यास परवानगी दिली

त्याबद्दल त्याचाही मी आभारी आहे. सरतेशेवटीं, माझे स्नेही व सहाध्यायी श्री. द. रा कानेगावकर, एम् ए, प्रफुल्ल प्रिंटिंग प्रेसचे चालक, यांनीं आपल्या छापखान्यात हा ग्रंथ छापून दिला त्याबद्दल त्याचाही मी ऋणी आहें. तसेच ' इंदिरा ' प्रेसचे चालक यांनीं या ग्रंथातील छायाचित्राच्या छपाईचें काम उत्तम रीतीने केले, त्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

या ग्रंथात श्रीधरस्वामींच्या अप्रकाशित ग्रंथातील जे उतारे ठिकठिकाणीं आले आहेत त्यातील लेखन मुळाप्रमाणेच ठेविले आहे.

' श्रीधर: चरित्र आणि काव्यविवेचन ' हा ग्रंथ ग्रंथकर्त्याच्या मूळहस्तलिखित प्रतीप्रमाणे त्यात आवश्यक तेवढे फेरबदल करुन व ग्रंथकर्त्याच्या निर्याणानंतर त्यात उणीवा राहू नयेत म्हणून जी माहिती उपलब्ध झाली त्या माहितीची अल्प भर टाकून सर्व दृष्टींनीं जितका सुंदर व चांगला करता येईल तितका करण्याचा यथामति व यथाशक्ति प्रयत्न केला आहे. त्याचा अंशत: जरी उपयोग या ग्रंथाच्या सुज्ञ व रसिक वाचकास झाला तरी केलेल्या श्रमाचे चीज झाल्सें वाटेल इत्यलम् ॥

पुणे.
ता. ५-३-७१

विनायक चिंतामण जोशी

* * *

# परिशिष्ट १ : अंबिकाउदय

ग्रथा नाम अंबिकाउदय । ज्यामाजि अंबेचा उदय ॥
पुढें आहे कथा अद्भुत । श्रोतीं होईजे सादर ॥[१]

## प्रास्ताविक

हा ग्रंथ 'श्रीधराचे छोटे ग्रंथ' या प्रकरणात समाविष्ट व्हावयास पाहिजे होता. परन्तु, प्रस्तुत ग्रंथकर्त्यास त्यावेळेस श्रीधराच्या दप्तरात पहावयास सापडला नाहीं असा उल्लेख मागे आलाच आहे.[२] या ग्रंथाचा उल्लेख रा. ब. का.ना.साने यानीं केला आहे.[३] पण या ग्रंथाविषयीं अधिक माहिती अद्यापपर्यन्त कोठेच प्रसिद्ध झालेली नाहीं व ती प्रथमतःच या ग्रंथात प्रसिद्ध होत आहे. हा ग्रंथ अप्रकाशित आहे.मी ऑक्टोबर १९५० मध्यें ज्यावेळीं पंढरपुरास गेलो होतो त्यावेळीं मला तो श्रीधराच्या दप्तरात पहावयास सापडला व या ग्रंथात उणीव राहू नये म्हणून त्याचें परीक्षण करण्याचा यथामति प्रयत्न केला आहे.

---

१ अ. उ २, ८९

२ श्रीधर. च. आणि का., भा. २, प्र. ९, पृ. १३६ व प्र. १८, पृ. ५८९

३ भा. इ. स. म., अहवाल, शके १८३३, लेख १३

# १ ग्रथलेखनकाल

ज्याप्रमाणें श्रीधरानें 'हरिविजय,' 'रामविजय,' 'पाडवप्रताप,' 'शिवलीलामृत' इत्यादि मोठ्या ग्रंथातून जसा स्थलकालविषयींचा उल्लेख केला आहे तसा या ग्रंथात केलेला नाहीं. ही पोथी अगदीं जीर्ण झालेली असून ती सोळा अगुळें लाब व नऊ अगुळें रुद अशी आहे. हस्ताक्षर चागले नाहीं लेखनात अशुद्धता मुबलक प्रमाणात पहावयास सापडते. पोथीच्या शेवटल्या पानावर खालीलप्रमाणें मजकुर आहे: —

"शके १७४७ पार्थीव नाम संवछरे आषाढ अधिक मासे कृष्णपक्षे दशमी रविवारे ते दिनीं श्रीपाडुरंगक्षेत्रीं ग्रथ अंबिकाउदये लिहिला. हा ग्रथ श्रीधर गोसावी नाझरेकर देशकुलकर्णी याचा असे. कोण्ही अभिलाष करूं नये. जो आभलाष करील त्याचा निर्वंश होईल हे सत्य. कस्टेन लिखित ग्रंथं यत्नेन प्रतिपालयेत् ।।"

श्रीधराची 'वेदान्तसूर्य' या प्रकाशित ग्रथाची हस्तलिखित पोथी मला पहावयास मिळाली. त्या पोथींत नकल करणाराने आपलें नांव लिखिते 'नारायणसुत कृष्णा आराध्ये' असे घातलेलें आहे. तसें नकल करणाराने आपलें नांव 'अंबिकाउदय' या ग्रथांत घातलेलें नाहीं. तेव्हा वर जो शक नमूद केला आहे त्यावरून असा अदाज बांधतां येतो कीं, श्रीधराचा नातु अवधूत (अच्युतानंद) अगर श्रीधराचा पणतु मनोहर यांनीं अगर श्रीधराच्या कोणीतरी शिष्यापैकीं तो नकल करून ठेविला असला पाहिजे. श्रीधराच्या वाडात श्रीधराचीं 'स्फुट प्रकरणें' व इतर ग्रंथ श्रीधराचा पणतु मनोहर याने नकललेले आढळतात. मूळ ग्रंथाची प्रत श्रीधराच्या वाडात नाहीं.

## २ ग्रंथनामाभिधान

या ग्रंथाचे नाव श्रीधरानें आपल्या ' हरिविजय, '' रामविजय ' अगर ' पांडवप्रताप ' याप्रमाणे ' अंबिकाविजय ' अगर ' अंबिका-प्रताप ' असें न देतां ' अंबिकाउदय ' असें दिले आहे. याचें कारण तो असें देतो कीं—

ग्रंथा नाम अंबिकाउदय । ज्यामाजि अंबेचा उदय ॥

..........………. ……………………

दैत्य ज्यावेळेस देवावरही मात करू लागले व सर्व देव भयभीत होऊन विष्णूच्या पाठीशीं आश्रयार्थ लपले तेव्हां त्या दैत्याचा सूड उगविण्याकारिताच अंबेचा उदय झाला व अशा त्या अंबेचे पराक्रम ज्या ग्रंथात वर्णिले आहेत त्या ग्रंथास ' अंबिकाउदय ' हें नाव दिलें आहे त्यात त्याची चतुरस्रताच दिसून येते.

## ३ ग्रंथाधार

श्रीधरानें या ग्रंथाची मूळ कथा कोठून घेतली हें स्पष्टपणे आपल्या ग्रंथात नमूद केले आहे. पहिल्याच अध्यायात अंबिकास्तवन झाल्यावर तो म्हणतो [४]:—

ग्रंथा नाम अंबिकाउदय । सप्तशती ग्रंथान्वये ॥
बोलिला तो ऋषिवर्य । मार्कण्डेय पुराणीं हे ॥

---

४ अं. उ. १, १०

पुन्हा याच अध्यायाच्या शेवटीं तो म्हणतो[५]:--

मार्कण्डेयपुराणींचे समत । ब्रह्मानंद अद्‌भुत ॥
श्रीधर वर्णित । लीला त्याची ॥

याशिवाय प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं तो सांगतो:—

इति श्रीमार्कण्डेयपुराणे सप्तशती आधारे सुमेधा–सुरथसंवादे अंबिकाउदये......नाम तृतीयोऽध्यायः ॥

यावरून श्रीधरानें ही कथा मूळ 'मार्कण्डेय' पुराणातील 'सप्तशती'च्या आधारे घेतली आहे हे निश्चित होतें.

## ४ संक्षेपकुशलता

आता मूळ मार्कण्डेय'पुराणात या कथेचे तेरा अध्याय असून एकूण श्लोकसंख्या ५८९ आहे.[६] 'सप्तशती'मध्येही तेरा अध्याय असून 'सप्तशती'ची श्लोकसंख्या ७१७ भरते म्हणजे 'सप्तशती'च्या श्लोकसंख्येत व 'मार्कण्डेय'पुराणाच्या श्लोकसंख्येत जवळ जवळ १२८ श्लोकाचा फरक पडतो. काही विद्वानाचें म्हणणे असे पडतें कीं, पुराणाच्या पोथ्याच्या प्रतींत वेगवेगळ्या श्लोकसंख्या व कथाही आडळतात. तर 'सप्तशती'चे पाठ करणारे काहीं विद्वान् सागतात कीं, हा फरक जरी वरकरणीं दिसला तरी पाठ म्हणताना र्‍हस्व–दीर्घांची संख्या जमेत धरता 'सप्तशती'ची संख्या व 'मार्कण्डेय'पुराणाची संख्या बरोबर एकमेकाशीं जुळते. असो. हा

५ अं. उ. १, ६४
६ लेले ( का. वा. ) मार्कण्डेयपुराण, भा. २, अ. ५२–१३४

वादग्रस्त मुद्दा विद्वानांच्या निर्णयार्थ पुढें ठेवून आता श्रीधराच्या 'अंबिका-उदय' या ग्रंथाची ओवीसंख्या किती भरते व 'मार्कण्डेय' पुराण व 'सप्तशती' यांच्या श्लोकसंख्येशीं त्याचें कसें प्रमाण पडतें याचा तुलनात्मक दृष्टीनें विचार करूं:—

| मार्कण्डेयपुराण | | सप्तशती | | अंबिकाउदय | |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय | श्लोकसंख्या | अध्याय | श्लोकसंख्या | अध्याय | ओवीसंख्या |
| ७८ | ७८ | १ | १४६ | १ | ६४ |
| ७९ | ७० | २ | १४४ | २ | ८९ |
| ८० | ४४ | ३ | ६६ | ३ | १०५ |
| ८१ | ३८ | ४ | ४२ | ४ | ७१ |
| ८२ | ७९ | ५ | ७८ | ५ | ८८ |
| ८३ | २० | ६ | २० | ६ | ७५ |
| ८४ | २६ | ७ | २६ | | |
| ८५ | ६१ | ८ | ६१ | | |
| ८६ | ३९ | ९ | ३४ | | |
| ८७ | २८ | १० | १८ | | |
| ८८ | ५१ | ११ | ४७ | | |
| ८९ | ३८ | १२ | २४ | | |
| ९० | १७ | १३ | ११ | | |
| | ५८९ | | ७१७ | | ४९२ |

वरील कोष्टकावरून असें दिसून येईल कीं,श्रीधराने मूळ तेरा अध्यायातील कथा अवघ्या सहाच अध्यायात सांगितली आहे. तसेंच 'सप्तशती'मध्ये श्लोकसंख्या ७१७ आहे. त्याच्या त्यानें ४९२ ओव्या केल्या आहेत.आता श्रीधरानें मूळातील कोणत्या कथा गाळल्या आहेत अगर दुसरा कोठला भाग गाळला आहे तें पाहूं:—

'मार्कण्डेय' पुराणात मधुकैटभवधकथा ७८ व्या अध्यायांत आहे; तर श्रीधरानें हीच कथा 'अंबिकाउदय' या ग्रंथात पहिल्या अध्यायात सांगितली आहे. 'मार्कण्डेय'पुराणात अ. ७९–८० मध्यें 'माहिषासुर' युद्ध वर्णन व नंतर'महिषासुरवध–कथा'अशा दोन अध्यायात आहेत तर श्रीधरानें युद्धवर्णन व महिषासुरवध या दोन गोष्टी एकाच अध्यायात म्हणजेच दुसऱ्या अध्यायांत सांगितल्या आहेत. 'मार्कण्डेय'पुराणात अ. ८१ व अ. ८२मध्यें 'देवीमाहात्म्य' सांगितलें असून अ.८३ मध्यें 'धूम्रलोचनवध'कथा सांगितली आहे.श्रीधरानें'देवीमाहात्म्य'गाळलें असून तिसऱ्या अध्यायात'धूम्रलोचन'–हनन कथा सांगितली आहे.'मार्कण्डेय'पुराणात अ.८४मध्यें'चण्डमुण्ड'वध-कथा आली आहे व अ.८५मध्यें 'रक्तबीजवध'कथा आली आहे. श्रीधरानें या दोन्ही कथा एकाच अध्यायात म्हणजेच चौथ्या अध्यायात आणल्या आहेत. 'मार्कण्डेय' पुराणात अ. ८६ मध्यें 'निशुम्भ'वधकथा व अ. ८७ मध्यें 'शुम्भवध'कथा आल्या आहेत. या दोन्ही कथा श्रीधराने एकाच अध्यायात म्हणजेच पांचव्या अध्यायात समाविष्ट केल्या आहेत. 'मार्कण्डेय'पुराणात अ.८८,८९ व ९० मध्यें अनुक्रमें 'नारायणी'-स्तुति, ग्रंथपठणाची फलप्राप्ति व 'देवीमाहात्म्य' अशीं आलीं आहेत, तर श्रीधरानें आपल्या 'अंबिकाउदय' ग्रंथात या सर्व गोष्टी एकाच अध्यायात म्हणजेच सहाव्या अध्यायांत आणल्या आहेत. यावरुन कवीची संक्षेपकुशलता स्पष्ट दृग्गोचर होते.

# ९ कथासार

‘ अंबिकाउदय ’ या ग्रंथातील कथा अध्यायवार सक्षेपतः सागू.

अध्याय पाहिला:–

या अध्यायाचे नाव ‘ मधु–कैटभमर्दनं नाम प्रथमोऽध्याय: ’ असें आहे. प्रारभीं, नेहमींप्रमाणे सरस्वती, गुरु, जगदबा, भवानी, अबिका, इ देवदेवतांचें स्तवन झाल्यानन्तर देवीचे अवतार किती झाले व तिने रणात दैत्य कसे मारले वगैरे वर्णन करून ‘सुरथ’ राजाची गोष्ट सागितली आहे. त्याचे राज्य शत्रूंनीं हिरावून नेले त्यावेळेस कवि म्हणतो[७]:—

ईश्वर झाला पाठिमोरा । नसती विघ्ने येती घरा ॥
महारत्ने होती गारा । कोणी न पुसे तयाते ॥

असे सागून ‘सुमेधा’ नावाचा वैश्य त्यास भेटला. सुरथ–सुमेधा–संवाद होतो. दोघेही ऋषी–आश्रमात जातात. ऋषीनें त्याना दु:खाचे कारण विचारलें. ऋषी त्यास महामायेचें आदिकारण सागतो. मधु–कैटभ दैत्य विष्णु निद्रिस्त असता त्याच्या कानातील मळापासून कसे जन्माला आले–ब्रह्मदेवावर दैत्याचा हल्ला–विष्णुला ब्रह्मदेवानें जागें केले–विष्णूच्या क्रोधायमान दृष्टींतून आदिमाया प्रगट होते, त्यामुळे दोघे असुर मोहित झाले. विष्णूदैत्ययुद्ध. विष्णूलाच दैत्य दमबाजी करतात कीं, तूच वर माग. ‘ तुमचे प्राणदान द्या ’ असे विष्णु सागतो. विष्णु त्याना जघनीं घेऊन मारतो. मास–मेद खालीं टाकतो, ब्रह्मदेवानें विष्णुस्तवन केले. त्यानतर माया प्रगटली व—

७ अं. उ. १, १४

ब्रह्मदेवे प्रीति पूजिली । मग सृष्टी अवघी घडली ॥[८]
तिच्या वरदें करूनिया ॥

असा या अध्यायाचा शेवट गोड आहे.

अध्याय दुसरा:–

या अध्यायाचे नाव 'महिषासुर–मर्दन' असे आहे.

महिषासुराचे वर्णन मोठे भयानक आहे:—[९]

द्वादश योजने प्रमाण । एकेक शृंग लबायमान ॥
विशाल शरीर गर्जे दारुण । कालही ऐकोन दचके पै ॥
धडक हाणोनि कनकाद्रि । वाटे टाकील कीं समुद्रीं ॥
कीं सुरानीं ही धरित्री । करील वाटे पिष्टवत् ॥
शृंगानि पर्वत कोलीत । ऊर्ध्व जाता कदुकवत् ॥
देवाचीं विमाने भगत । भयाभित सुर पळती ॥
देवीचे पाठीसी सर्व दडती । नक्षत्रें भूमीवरी रिचवती ॥
गर्जनसरसी दैत्याच्या ॥

नतर देवीचे वर्णनही मोठे उत्कृष्ट आहे:—

देवी निघाली देदिप्यमान । तेहतीस कोटी देव सपूर्ण ॥
भार पाठीसी निघाले ॥ इ.

देवीच्या तेजाने चद्र–सूर्य उचंबळले. देवी–महिषासुराचे युद्धवर्णन, विजा कडाडल्या–बाणाचा वर्षाव इ.शेवटीं देवीने महिषासुराचे खूर तोडले.

---

८ अ उ. १ ६२ , ९ अं. उ. २, ४५–५०

त्याने नाना रूपे धारण केलीं. देवीनें त्याच्या पोटांत त्रिशूळ घालून त्याचें पोट फाडून टाकलें.

अध्याय तिसरा:—

या अध्यायाचें नाव 'धूम्रलोचनहननं नाम तृतीयोऽध्यायः' असे आहे.

'दिती'ला दोन मुलगे होते. एकाचे नाव 'हिरण्यकश्यपु' व दुसऱ्याचें नाव 'हिरण्याक्ष'. ते आवळे-जावळे होते. शापाने असुर झाले. दोघानी महातप केले व अपर्णारमण तोषविला. उन्मत्त झाले.

हिरण्याक्ष बळें अद्भुत । पृथ्वी काखेसीं घालून ॥[10]
रसातळाला पळत होता.
हिरण्याक्ष मारोन आवेशें । धरा धरिली दतावरी ॥
प्रल्हादाकारणें स्तंभात । प्रगटला नरहरी अद्भुत ॥
हिरण्यकश्यपाचा अंत । करून भक्त राक्षिला ॥
असो हा गतकथार्थ । पुढे ऐका अंबिकाचरित ॥

हिरण्याक्षाला दोन मुलगे झाले. एक शुंभ व दुसरा निशुंभ. त्या दोघानीं तप करून हेरंबतात प्रसन्न केला. देवाना त्रास दिला. तेव्हा[11]—

सकल देव आणि हिमपर्वत । दुर्गेचें तेव्हा स्तवन करित ॥
गाऱ्हाणे सागती समस्त । शुंभ निशुंभाचे ते वेळे ॥
भवानीच्या मुखातून कालिका निघाली ती—[12]
इन्दिरापतीची बहिण । हिमनगकुमारी जाहली ॥

१० अं. उ. ३, ५–७ ; ११ अ. उ. ३, १४
१२ अ. उ. ३, १६

नंतर ब्रह्मनंदन शुभ–निशुंभाकडे जाऊन म्हणाला कीं, हिमालयाची कुमारी तुम्हास योग्य स्त्री आहे. नारदाने तिचे केलेले लावण्यवर्णन फारच चटकदार आहे:—[१३]

सुंदर स्त्रीविणें संसार । जैसे दीपेवीण मंदिर ॥
कीं रवि शशीवीण अंबर । कलाहीन जेवी दिसे ॥

अशी नारदानें तेथे कळी लावली. तिचे लावण्य ऐकून दैत्याची स्थिति कशी झाली—[१४]

गळीं गोंविला मीन । कीं फासीं सापडला हरिण ॥
तैसे दैत्यदारुण । पंचशरे भेदिले ॥

शुंभ–निशुंभानीं सुग्रीव दैत्याला दूत म्हणून पाठविलें. सुग्रीवाने शुभ–निशुंभाना उपदेश केला. पण काय उपयोग ? महासर्प उशाला घेऊन सुखनिद्रा कशी येईल ? सुग्रीव हिमाचलाला येऊन देवीस म्हणाला, " तू स्वखुषीनें आली नाहींस तर तुला बळेच उचलून नेतील " देवीचे उत्तर मजेदार व मार्मिक आहे. ती म्हणते–ज्याप्रमाणे महेश, मशक, वडवानळ-काक, इंद्रापुढें रंक, केसरीपुढे जंबुक त्याप्रमाणेच—

शुंभ –निशुंभ दैत्य । मजसी भिडो पाहाती शतमूर्ख ॥

देवी सुग्रीवास सांगते त्यांना युद्धास घेऊन ये. देवीचें वर्णन. ती सिंव्हासनावर बसून लढावयास निघाली. संग्रामाची झुंज. एक दिवस

---

१३ अ. उ. ३, २९ ; १४ अं. उ. ३, ३२

युद्ध झाले. शुंभ-निशुंभ धूम्रलोचनास लढावयास पाठवितात. देवीनें त्याच्यावर अर्धचंद्रबाण सोडला व मग—[१५]

वृक्षाग्रींचे लक्षून फळ । झेपावे जैसा पक्षी चपळ ॥
तैसे धूम्राक्षाचे सीरकमळ । उडवीलें क्षण न लागता ॥

धूम्राक्षाची सेना शुभ–निशुभाजवळ घायाळ होऊन आली. शेवटीं कवि म्हणतो[१६]:—

ब्रह्मानंदे म्हणे श्रीधर । आता वीररस माजेल अपार ॥
तो अंबिकाउदये परिकर । श्रोती सादर परिसीजे ॥

असे म्हणून हा अध्याय संपविला आहे

अध्याय चौथा:----

या अध्यायाचे नांव'चण्ड–मुण्ड–रक्तबीज हननन नाम चतुर्थोऽध्याय: असें आहे.

धूम्रलोचन रणागणात पडला हे ऐकून शुभ–निशुभानीं चडमुडाना लढावयास पाठविले. सैन्याचे वर्णन मोठें टापाटिपीचे आहे. पायदळ-त्याच्या मागें तुरग–त्याच्यामागें रथ व नतर दैत्य. दैत्याची रूपवर्णने–अश्वमुख, खररमुख, गजमुख, माजरमुख इ. नन्तर[१७]—-

लोटला सकळ देवमेळा । अतिकल्होळ तेव्हा गाजला ॥
वाटे कल्पात जाहला । डळमळिला भूगोल ॥

---

१६ अ. उ. ३, १०६ , १७ अं. उ. ४, १३
१५ अं. उ. ३, १०४

देवीच्या बाणाचा वर्षाव झाला. दैत्य पळत सुटलेले पाहून चंड–मुंड पुढे सरसावले. अंबिकेच्या एका शरापासून अपार शर निघाले. चण्डा–वर देवी तुटून पडली व त्याचे हृदय तिने फाडलें. तरवारीने त्याचें डोके उडविले. मुसळ घेऊन मुंडाचें मुंड तात्काळ फोडलें. देवानी पुष्पवृष्टी केली. शुंभ- निशुंभ शोक करतात व म्हणतात—

कालाची विपरीत गति । स्त्रीच्या हातें दैत्य पाडिती ।।

नंतर रक्तबीजाला लढावयास पाठविलें.

अंबेने सोडिले शर । भेदिले रक्तबीजाचे शरीर ।।
रक्तधारा सुटल्या अपार । परि नवल थोर वर्तलें ।।
जितका रक्तबिंदु पडत । तितके रक्तबीज होती ।।
त्याचे अंगीं बाण सतत । रक्तोद्भव होति अद्‌भुत ॥[१८]

कोटी कोटी दैत्य निर्माण झाले. मग महामायेने त्यांचीं शिरे वरच्यावर छेदून करपात्रीं रुधिर धरलें व अपार प्राशन केलें. नन्तर काय झालें ते पहा—

जैसा उगवता वासरमणी । एकही नक्षत्र न दिसे गगनीं ॥
तैसे रक्तबीज संहारूनी । विजय भवानी जाहली ।।[१९]

रणात एकही प्रेत दिसले नाहीं. मुख्य रक्तबीजाला देवीने उभा चिरला व वरच्यावर खालीं रक्त पडू न देता गिळून टाकला. शेवटीं–[२०]

---

१८ अं. उ. ४, ५८–५९ , १९ अं. उ. ४, ६५
२० अ. उ. ४, ७१

अंबिकाउदय दिव्य ग्रंथ । पुढें शुभ–निशुंभाचे युद्ध ।।
ब्रह्मानदें श्रीधर । अभंग साचार वर्णील तें ।।

अशी पुढील अध्यायाच्या कथेतील सूचना देऊन हा अध्याय सप-विला आहे.

अध्याय पाचवा:—

या अध्यायाचें नाव 'शुभ–निशुभमर्दन नाम पचमोऽध्याय:' असे आहे.

या अध्यायातही सैन्यवर्णन मागील प्रमाणेच आहे. देवीने निशुभाचा रथ तोडिला. तो देवीवर चाल करून आला. देवीनें त्याचे कंठनाळ तोडले. शुभाचा शोक इतर दैत्य त्यास भावाचा सूड घेण्यास सागतात. शुंभ लढावयास जातो. देवीस म्हणतो:– माझ्या बंधूला मारलास तेव्हा आज तुला जिकून " स्त्री करीन उदय बळेंचि तू मला लवकर माळ घाल नाहींतर तुझें शिरकमळ उडवून टाकीन." देवीचे उत्तर मोठे खोचक व समर्पक आहे. ती म्हणते:—[२१]

तू केवळ केलासी रणनोवरा । तुज अवस्था वरील पामरा ।।
तुझ्या आतड्याचे पोवते सत्वर । गळा तुझ्या घालीन ।।

हे वाचून 'पाडवप्रतापा'तील द्रौपदीने जे दुःशासनास उत्तर दिले आहे त्याची आठवण झाल्यावाचून कशी राहील ?

नन्तर शुभाचें व देवीचे तुमुल युद्ध होते

---

२१ अ. उ. ५, ६८

मरण विसरोन पतग । अग्नीवरी पडे सर्वांग ।।
तैसा घेऊनि करींचें खड्ग । देवीवरी कोसळला ।। तोंच—[२२]

देवीनें त्याला उचलून गरगर फिरविला व खालीं आपटून त्रिशुळाने त्याचे उदर फाडले. शेवटीं कवि मोठ्या काकुळतिनें म्हणतोः—[२३]

श्रीधर म्हणे जननी ये । उचलोनि मज घेई कडिये ॥
सत सभेस घेऊनि जाये । तेणे होय ब्रह्मानद ।।
अबिकाउदय दिव्य ग्रथ । पंचमाध्याय सपला येथ ।।
पुढे देव अभ्दुत । स्तवन करिती सहाध्यायीं ॥

असा भक्तिपूर्वक गोड शेवट केला आहे.

अध्याय सहावा:--

या अध्यायाचे नाव 'देवीस्तवन फलश्रुतिवर्णन नाम षष्ठोऽध्यायः' असे आहे.

शुंभ–निशुंभ मारल्यावर देवानीं जयजयकार केला. सबध त्रिभुवनात आनंदी–आनद झाला. किन्नरानीं सुस्वर आवाज काढले. अष्टनायकाचें नृत्य झालें. देवानीं देवीचे यश गायिलें. सर्व देवानीं व ऋषींनीं अबिका–स्तवन केलें. नतर आबिकाध्यानवर्णन आहे. कपाळावर कुंकू–मळवट तोंडात विडा. सरळ नासिका–कृष्ण केश अगावर अलकार वगैरे.

शेवटीं ग्रंथाची फलश्रुति सागून कवि म्हणतोः—[२४]

२२ अं. उ. ५, ८१ ; २३ अं. उ. ५, ८७–८८
२४ अं. उ. ६, ७०–७३

मार्कंडेयाप्रीत कमलोद्भव । कथा हे सागे अपूर्व ।।
सुमेधाते सुरथाप्रति सर्व । तेथ कथा निरोपिली ।।
ते प्राकृतभाषे समग्र । वर्णी ब्रह्मानदे श्रीधर ।।
ग्रथास सप्तशती आधार । प्रमाण पूर्ण पाहावें ।।
सहा अध्ये निश्चित । अंबिकाउदय दिव्य ग्रथ ।।
अंबे हो का तुज प्रीत्यर्थ । करी कृतार्थ भक्ताते ।।

'प्रेमपान्हा पाजून ब्रह्माण्डाहूनही थोर करी' असे देवीला आळवून हा वीररसप्रधान ग्रथ समाप्त केला आहे.

## ६ ग्रथफलश्रुति

श्रीधरानें सहाव्या अध्यायात ग्रथाची फलश्रुति सागितली आहे ती अशी:—

त्रिकाळ पठणानें सतती, संपत्ती, विद्या प्राप्त होतील. सकळ गडांतराचा नाश होऊन आयुष्यवृद्धी होईल. शत्रूचा पराजय–सर्वांना आनद, तुष्टी, पुष्टी, ऐश्वर्य इ. लाभेल.

एक सवत्सर पठणाने नष्टधन लाभेल. तीन सवत्सर पठणाने राज्यछत्र लाभेल. षण्मास त्रिकाल पठणाने महारोगाचिंता हरेल, व त्याच्या वशात दारिद्र्य नाहींसे होईल. त्रिमास ग्रथपठणाने शत्रूचा नाश होईल, व अचल ग्रहपीडा नाहींशी होईल. दुःस्वप्न निरसन होईल. हा ग्रथ अष्टमी, नवमी व चतुर्दशी या दिवशीं वाचावा.

आजकालच्या चिकित्सक युगात लोक वरील फलश्रुतीवर कितपत विश्वास ठेवितील याबद्दल शंका आहेच. परन्तु, श्रीधरकालीन

समाज भाविक असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं श्रद्धेला उणेपणा नव्हता. लोकाना देवादिकाच्या मनोरजक कथा सागून त्याना भक्तिमार्गाकडे प्रवृत्त करावे हेच ध्येय कवीपुढें असल्याकारणाने ते त्याने कथाकीर्तन, प्रवचन व ग्रंथलेखन इ. साधनानीं उत्तम तऱ्हेने पार पाडलें असे म्हणावयास प्रत्यवाय दिसत नाहीं.

## ७ रसपरिपोष

अ ) वीररस:— ' अबिकाउदय ' या ग्रथात वीररसासच प्राधान्य दिले गेले आहे. बाकीचे रस आनुषगिक आहेत. या ग्रथात वीर-रसाचे नद दुथडी भरून वाहाताना दिसतात. विशेषत: महिषासुरमर्दन, चण्ड-मुण्ड व रक्तबीजहनन, शुम्भ निशुम्भवध इ. प्रसगीं देवीचें दैत्याशीं झालेल्या युद्धामध्यें वीररसाचा परिपोष उत्कटत्वाने दिसून येतो. दैत्याच्या सन्याचे वर्णन–पायदळ सैन्य, त्याच्यामागे तुरग, त्याच्यामागे रथाचे थाट, त्याच्यामागे पर्वताकार शरीरे ज्याचीं आहेत असे प्रचड दैत्य इ. चालले आहेत. वाद्याचा गजर सुरू झाला. संग्रामाची झुंज लागली. देवीचा दैत्या-वर व दैत्याचा देवीवर अस्त्राचा व बाणाचा वर्षाव, विजाचा कडकडाट, मेघाचा गडगडाट, अस्त्राचा चमचमाट यानीं भूगोल डळमळून गेला, इ सागून कवि म्हणतो :—[२५]

ब्रह्मानदे म्हणे श्रीधर । आता वीररस माजेल अपार ।।
तो अंबिकाउदये परिकर । श्रोतीं होईजे सादर ॥

पुढे चौथ्या अध्यायात चडमुड–रक्तबीजवध–कथेत कवीने या

२५ अं. उ. ३, १०६

रसाचा परिपोष अतिशय सुदर रीतीने करून बहार उडवून दिली आहे. चडमुडाचे सैन्य देवीवर चाल करून आले तेव्हाचे वर्णन पहा:--[२६]

हाकें गाजविती अबर । देवीसमीप आले भार ।।
वातवेगें करुनिया ।।
मिसळती दोन्ही दळें । असंभाव्य रण माडलें ।।
असख्य शक्ति ते वेळे । उठावल्या एकदाचि ।।
लोटला सकळ देवमेळा । अति कोल्हाळ तेव्हा गाजला ।।
वाटे कल्पात जाहला । डळमाळिला भूगोल ॥
चपळा जैशा झळकती । तैशा असिलता तळपती ।।
परस्परें बाण सोडिती । जैशा वर्षती मेघधारा ।।
शस्त्रास्त्रे वरुषे भवानी । जाती दैत्यचक्रें संहारुनी ।।
शिराचे चेंडु ते क्षणीं । गगनमार्गीं उसळती हो ।।

वरील विवेचनावरून वीररसवर्णनात कवीचा किती हातखडा आहे हे काय सागावयास पाहिजे ?

आ ) शृगाररस: —

या रसास या ग्रथात फारच अल्पस्थान आहे व तेंही एकदाच पहावयास सापडतें. तिसऱ्या अध्यायात सर्व देव शुम्भ–निशुम्भाचे गाऱ्हाणे घेऊन दुर्गेकडे जाऊन तिचे स्तवन करू लागले त्यावेळीं भवानीच्या मुखातून कालिका निघाली. तिचे नारदानें शुम्भ–निशुम्भ दैत्याकडे जाऊन केलेले वर्णन फारच मोहक आहे. नारद त्या दैत्यास सागतो:–[२७]

२६ अं. उ. ४, १२–१४ ; २७ अ. उ. ३, २९

सुन्दर स्त्रीविणे ससार । जैसे दीपेवीण मंदिर ॥
कीं रविशशिवीण अबर । कलाहीन जेंवी दिसे ॥

हे नारदाने तिचे केलेले लावण्यवर्णन ऐकून दैत्याची स्थिति कशी झाली तरः—[२८]

गळीं गोविला मीन । कीं फासीं गोविला हरिण ॥
तैसे दैत्य दारुण । पचशरें भेदिले ॥

त्यानीं सुग्रीवास दूत म्हणून देवीकडे पाठविले. सुग्रीव देवीला म्हणाला, "तू स्वखुशीनें आली नाहींस तर तुला बळजबरीनें घेऊन जाईन." नन्तर देवीचें वर्णन पहा:—

आकर्णपर्यन्त विशाळ नयन, अगात चोळी, गळ्यात एकावली, मुक्ताहार, वाकी, चालताना नूपुरे रुणझुताहेण हें सुग्रीवाचे वर्णन ऐकून शुम्भास मूर्छा आली.

त्यानन्तर पाचव्या अध्यायात शुम्भ–निशुम्भ देवीवर चाल करण्यास गेले असता त्यावेळचे वर्णन मोठे मजेदार आहे:—

शुम्भ–निशुम्भाच्या मिरवणुकीपुढे भेरी, शंख. ढोलगीं, डफडीं, सनया, शृंगें, बुरगे, कहाळ, दौडगी व दुटाळ इ. वाद्याचा गजर चालू असताना.—[२९]

शुम्भ–निशुम्भ रणनोवरे । रणमडपा चालिले गजरें ॥
मुक्ति नवरी वरितील निर्धारें । देवीच्या हस्तें करूनिया ॥

---

२८ अ. उ. ३, ३२ , २९ अ. उ. ५, ३५

त्यानन्तर देवीचीं व शुंभाचीं प्रत्युत्तरें मोठीं मजेदार आहेत. शुम्भ देवीस म्हणतोः—“ माझ्या बधूला मारलास तेव्हा—

तुज जिकून समरांगणीं । स्त्री करीन उदय बळेंचि ॥[30]
तू मज घाली लौकरी माळ । नातरी छेदीन तुझे सीरकमळ ॥

यावर देवी उत्तरतेः—[31]

तू केवळ केलासी रणनोवरा । तुज अवस्था वरील पामरा ॥
तुझ्या आतड्याचे पोवते सत्वर । गळा तुझ्या घालीन ॥

उपरिनिर्दिष्ट स्थळीं शृंगार रसात आलंबन एकपक्षीं असल्यामुळे शृंगाराचा परिपोष होणें शक्य नाहीं व कवीस ते अभिप्रेतही नाहीं. त्यामुळे येथे खरा शृंगार नसून ‘शृंगाराभास’ आहे.

इ ) हास्यरसः—

हा ग्रंथ जरी देवीच्या स्तुतिपर असला तरी सुद्धा यात हास्यरसास एकदोन स्थळीं स्थान मिळालें आहे.

दुसऱ्या अध्यायात महिषासुराचे व देवीचे युद्ध होते. युद्धात देवीने त्रिशूळ घालून महिषासुराचें पोट फाडले व त्याला पायदळीं घालून इतर दैत्याचा संहार करण्यास ती निघाली, तेव्हा दैत्याची घाबरगुंडी कशी उडाली ती पहाः—[32]

---

३० अं. उ. ५, ६६–६७
३१ अं. उ. ५, ६८ , ३२ अं. उ. २, ८०–८४

देवी आम्हास न सोडी । म्हणवोन दैत्य तातडी ॥
स्त्रीवेष धरून नेसती लुगडीं । बोडती दाढी आणि मिशा ॥
आम्ही पुरुष नव्हे निश्चिती । देवीपुढे करुणा भाकती ॥
एक सन्यासी होऊनी बसती । एक धरिती मोहन ॥

........ ............... .. .. ...............

एक रोगी होऊनी । लटिकेच कुंथत पडती मेदिनी ॥
एक वृद्ध दशा धरूनि । लटिकेंच खोकत बैसले ॥

अशी दैत्यांची तारांबळ उडालेली पाहून कोणास हसे लोटणार नाहीं ?

ई ) करुणरस:—

या रसासही थोडासा वाव या ग्रंथात मिळाला आहे. निशुम्भास देवीनें रणात मारल्यानन्तर शुम्भाचा शोक मोठा हृदयद्रावक आहे. तो म्हणतो:—[३३]

म्हणे गेला गेला वीर । भूमीवरीं टाकिलें शरीर ॥

असा शोक करून तो म्हणतो, “ माझा भाऊ मला सोडून गेला. आता मला पाठिराखा कोणीच नाहीं.” त्याला मूर्च्छा येते. मग दैत्य त्यास सावध करून उठून बसवितात वगैरे वर्णन मोठें करुणास्पद आहे.

उ ) इतर रस:—

भयानक, रौद्र व बीभत्स या रसासही प्रस्तुत ग्रथात अल्प स्थान मिळाले आहे.

३३ अ. उ. ५, ६३

दैत्यांची वर्णनें--त्यांचीं काजळासारखीं शरीरें, शृंगांनीं पर्वत कोलीत, शुभ्र दाढा, कपाळीं लाल शेंदूर इ. वर्णनांत भयानक रसाचा परिपोष उत्तम रीतीनें झालेला दिसतो. तसेंच मधुकैटभवधप्रसंगीं त्यांचा व विष्णूचा संवाद, महिषासुर, शुम्भ–निशुम्भ इ. दैत्यांचें देवीशीं भाषण व देवीचें त्यास उत्तर इ. प्रसंगांत रौद्र रसाचा परिपोषही चांगला झालेला आहे. मधु–कैटभ जन्मकथा, रक्तबीजहननकथा, इ. प्रसंगीं बीभत्स रसासही थोडासा वाव मिळाला आहे.

## ८ अलंकार

काव्यांत नुसताच रस असून चालत नाहीं. तर त्याची शोभा द्विगुणित होण्यासाठीं त्यास अलंकारांचें साहाय्य लागतेंच. श्रीधरानें इतर ग्रंथांप्रमाणें या ग्रंथांतही उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, दृष्टान्त, अतिशयोक्ति इ. अलंकारांनीं आपला ग्रंथ नटविलेला आहे. कथासार सांगतांना यांचीं उदाहरणें जागोजाग दिलेलीं असल्यामुळें विस्तारभयास्तव त्यांची पुनरुक्ति येथें केली नाहीं.

## ९ सुभाषितें

ज्याप्रमाणें श्रीधराचे ‘ हरिविजय, ’ ‘रामविजय,’ ‘पांडवप्रताप,’ इ थोर ग्रंथ जसे साहित्यभाषणांनीं, सुभाषितांनीं व म्हणींनीं विखुरलेले आढळतात तसे या ग्रंथांतही त्यांची रेलचेल पुष्कळ आहे कांहीं उदाहरणें ( मागील विवेचनांतील गाळून ) खालीं दिलीं आहेत:—

१) टाकुनियां शुद्ध पथ । आडमार्गें जो गमन करित ॥
त्यास अपाय येतील यथार्थ । त्यास संदेह नसेचि ॥ अं.उ.३,३९

२) जैसा वेदार्थ करितां पंडित । ते शतमूर्खासि न मानें ॥
अं. उ. ३, ४४

३ ) तत्त्वविचार मद्यपियास । काय व्यर्थ सांगोनिया ॥
अ. उ. ३, ४६

४ ) सिकता शिजविले बहु काळ । परि ते कदा नव्हे मवाळ ॥
अ. उ. ३, ४९

५ ) दूध उकिरडा ओंतिले । कीं मसणीं मंडप दिधले ॥
कस्तुरीने लिपीले । टोणगीयाचें अग व्यर्थ ॥ अ. उ. ३, ५२

६ ) बळेंच लाविला अग्नी । मग अनर्थास काय उणे ॥ अ. उ.

७ ) षोडशोपचारें पूजिलें प्रेत । तें जैसे बोलें व्यर्थ ॥अं. उ. ३, ५३

८ ) तेलबिंदु जळीं पडता । पसरे चहूकडे तत्त्वता ॥ अं. उ. ४

९ ) सत्पात्रीं दान देतां । कीर्ती प्रगटे सर्वत्र ॥ अं. उ. ४

१० ) जैसे उगवता सूर्यमडळ । भगणे सर्व झाकोळती ॥
अं. उ. ४, १८

## १० वर्णनें

अ ) स्वरूपवर्णनें:-क ) शेवटच्या अध्यायात देवीचे वर्णन फारच सुदर आहे. कपाळावर कुंकु, अगात चोळी, मळवट, तोंडात विडा, सरळ नासिका, सुरग वेणी, कृष्ण केश, शुभ्र पुष्पे, सुवास झळकत, अगावर अलंकार[३४]—

केशाग्रभागीं गुच्छ परिकर । तोच समुद्र वाटत ॥

ब्रह्माडाची मोहनमाळा कण्ठात धारण केली आहे. मोत्याचे हार इ.

३४ अं. उ. ६, २७

ख ) राक्षसाची वर्णने[३५]:—पर्वताकार शरीरे, शृगानीं पर्वत कोलीत। उंर्ध जाला कंदुकवत् । देवाचीं विमाने भंगत । भयाभीत सुर पळती ॥

रक्तबीजाचे वर्णन[३६].—सिंदुरवर्ण, काजळासारखे काळे शरीर, लाल केस, निर्नासिक इ.

दैत्याच्या सैन्याचे वर्णन[३७]:-—दैत्याचीं तोडे कशी होतीं तर काहीं अश्वमुख तर काहीं गजमुख, खरमुख, शब्द करिती धावत, वृषभमुख, व्याघ्रमुख, माजरमुख, बोकडवदन, सिहवदन, महिषवदन इ. इ.

( ब ) युद्धवर्णनें:—यात तर श्रीधराचा हातखंडा आहे. वीर-रसामध्ये याचे दिग्दर्शन केलेच आहे. तेव्हा येथे पुनरुक्ति करण्याची गरज नाहीं.

( क ) सैन्यातील घोड्याचीं वर्णनें[३८].—श्यामकर्ण, पिवळ्या शेपट्या, आरक्त खुर, ताम्रवर्ण डोळे, चपळ, माणिकासारखे तेजाळ इ. काहीं घोडे जाभळे, सोनेरी, पाढरे, शशिवर्ण इ. अशी वारू रणागणांत धीराचे असतात. काचीचे चपळ वारु रणांत धीर धरत नाहीत. इ.

घोड्याचें अलकारवर्णन:-—

रत्नखाचित नाचत समरभूमिसी । नूपुरे गर्जती चरणीं ॥

हत्तींचें वर्णन[३९]:—

---

३५ अ. उ. २, ४७-५०

३६ अं. उ. ४, ५०—५८ , ३७ अ. उ. अ. ४

३८ अं. उ. अ. ५ ; ३९ अ. उ. ५, ३०—३२

ऐरावतीचे सुत । झुली घातल्या रत्नखचित ॥
वरी रत्नजडित चवरी ढोल । घटा वाजती सबळ ॥ इ.

हत्तींच्या मागे चक्रे झळकत होतीं व त्या रथांवर—

धनुष्ये शक्ति नाना शस्त्रे । रथावरी रचिलीं अपार ॥
कुशल सुत बैसले धुरे । वाक्दोरे लावुनिया ।

रथाच्या मागे रणवाद्ये होतीं. त्यात भेरी, शंख, ढोलगीं. इ. इ.

## ११ कल्पनासादृश्य

मुळातील काहीं श्लोकाच्या कल्पना या ग्रंथात आढळतात. विस्तारभयास्तव एकदोनच उदाहरणे खालीं दिलीं आहेतः—

( १ ) चुक्षुभुः सकला लोकाः समुद्राश्च चकम्पिरे ।
चचाल वसुधा चेलुः सकलाश्च महीधराः ॥
उर्वी कांपे थरथर, डळमळिला भूगोल, उचंबळले सप्तसमुद्र ।

( २ ) शोणितौघा महानद्यः सद्यस्तत्र विसुस्रुवुः ।
अशुधाचे चालिले पूर । ...... इ.

## १२ वेदान्ताची छटा

श्रीधराला वेदान्ताचा अतिसोस होता. त्याच्या प्रत्यक्ष ग्रंथातहे वेदान्तप्रतिपादन असतेच त्याप्रमाणे या ग्रंथातही एकदोन स्थळीं प्रत्ययास येतें:—

सहाव्या अध्यायात अंबास्तुतींत कवि म्हणतोः—[४०]

---

४० अ. उ. ६, १६

जीव शिव दोन्हीं बाळके । अंबे तुवा वाढविलींस कौतुके ॥
जीव तुझें स्वरूप नोळखे । म्हणउन पडला अवनीं ॥
जीव शिव दोन्हीं स्तन । दोही पक्षी धरिले आवरून ॥ इ.

या ओव्या 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया' या मन्त्राची आठवण करून देत नाहींत काय ?

## १३ उपसंहार

एवंच, वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, श्रीधराचा हा ग्रंथ जरी छोटा असला तरी त्यात उत्तम काव्याचीं सर्व लक्षणें दृग्गोचर होतात. महाकाव्याला ( १ ) Grand Action व ( २ ) Grand Style याची आवश्यकता लागते असें म्हणतात या दोन्ही गोष्टी या ग्रंथात सापडतात. हा ग्रंथ वाचीत असताना सुप्रसिद्ध ग्रीक कवि 'होमर' याचे आपण 'इलीयड'च वाचीत आहोत कीं काय असा क्षणभर भास झाल्यावाचून राहात नाहीं. याच ग्रंथाचा जर कवीनें अधिक विस्तार केला असता तर हे एक उत्तम 'महाकाव्य' म्हणूनच मराठी वाङ्मयात अजरामर राहिले असते 'इति सहृदया: प्रमाणम्' इति शम् ॥

* * *

# परिशिष्ट २ : तत्त्वगीता

( लेखन मुळाप्रमाणेच ठेविले आहे )

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागात पृष्ठ त्र्याण्णवमध्ये ग्रंथकर्त्यांने म्हटलें आहे कीं, ' तत्त्वगीता ' हा ग्रंथ श्रीधराच्या दप्तरात त्यास आढळला नाहीं. हा ग्रंथ मिळाल्यास पुन्हा एकदा प्रयत्न करुन पहावे म्हणून मी ऑक्टोबर १९५० मध्यें जेव्हा पंढरपुरास गेलो होतों त्यावेळीं मला तो पहावयास सापडला म्हणून थोडक्यात या ग्रंथाविषयीं खालीं माहिती दिली आहे.

हा ग्रंथ संस्कृतमध्ये आहे. विनायकराव भावे यांनीं आपल्या ' सारस्वता 'त या ग्रंथातील खालील दोन ओळी छापल्या आहेत[1]:—

ब्रह्मानन्दप्रसादेन तत्त्वगीता प्रकाशिता ।
श्रीधरानन्दनाम्ना वै सर्वलोकहिताय च ।।

इति श्रीआनन्दसाम्प्रदायभूषण श्रीब्रह्मानन्दपुत्रश्रीधरानन्देन विरचिता तत्त्वगीता समाप्ता ।।

या व्यतिरिक्त आणखी माहिती या ग्रंथाविषयीं अद्यापपर्यन्त

---

१ भावे. म. सा. पृ. ३३६ (तळटीप)

कोठेंच प्रसिद्ध झालेली नाहीं. ती प्रथमतःच या ग्रथात प्रसिद्ध होत आहे.

श्रीधराच्या बाडात मला फक्त दुसरा अध्यायच सापडला. पहिला अध्याय मिळाला नाहीं. ही पोथी सोळा अगुळे लाब व नऊ अंगुळें रुद आहे. पोथी जीर्ण झाली असून हस्ताक्षर चागलें नाहीं. लिखाणात नकलकाराची अशुद्धता पुष्कळ दिसून येते. दुसऱ्या अध्यायाची एकूण कवितासख्या एकशे सतरा भरते. उपरिनिर्दिष्ट मजकुर श्री. भावे यानीं जो आपल्या 'सारस्वता'त छापला आहे तो पोथीच्या शेवटीं आहे. शिवाय खालील मजकूर पण वरील मजकुराच्या पुढेच आहे:—

"हस्ताक्षर मनोहर अवधूत गोसावी नाझरेकर—वास्तव्य हालीं श्रीक्षेत्रपढरी शके १७४५ सुभानुनाम सवछरे अश्विन शुध १५ रविवार दिनमान ४० नक्षत्र चित्रा प्रहर दिवसा ग्रथ अद्य तत्त्वगीता सम्पूर्णमस्तु ॥"

म्हणजे श्रीधराचा पणतु मनोहर याने श्रीधरानन्तर सुमारे शभर वर्षांनीं ( खरीं चौऱ्याण्णव वर्षे ) हा ग्रथ नकल करून ठेविला आहे. मळ-प्रत श्रीधराच्या दप्तरांत नाहीं.

## विषय

हा ग्रंथ वेदान्तपर असून गुरुशिष्यसवादरूपाने वर्ण्य विषयाचे कथन केलें आहे. शिष्य गुरूस म्हणतो:——

"मी गर्भवासाला कटाळून तुम्हास शरण आलो आहे.तेव्हा,हे गुरो, मी 'पुनरपि जनन पुनरपि मरण' या चक्रव्यूहातून सहीसलामत कसा बाहेर पडू शकेन याबद्दल मार्ग दाखवा. पुढे शिष्य म्हणतो, 'गुरो ! मीं सर्व शास्त्रें

वाचून पाहिलीं. परन्तु, याबद्दलचें ज्ञान मला कांहीं झालें नाहीं. हे गुरो ! मी मन्दबुद्धि आहे, तेव्हा याबद्दल मला सविस्तर सांगावें.'' नन्तर—

यिति ( इति ) पृष्टस्तु शिष्येण ब्रह्मानन्दयतेश्वरः । (ती?)
उवाच त प्रसन्नात्मा सच्चिदानन्दाविग्रहः ॥
साधु शिष्य महाप्राज्ञ श्रृणुष्वेकाग्रमानसः ।
सक्षेपात् कथयिस्यामि तत्त्वज्ञान यथोदित ॥ ( ष्या ? )
पचभूतात्मक चैतत् पिडब्रह्माण्ड केवलम् ।
उभयो तद्विजात तु गुरुपुत्रौ सहेतुकौ ॥ (योस्त)
स्थूल देहाचीं गुरूने एकन्दर पचवीस तत्त्वे सागितलीं.
पृथ्वीपासून:–अस्थि, मास, त्वचा, रोम व नाडी इ.
आपापासूनः —लाळ, मूत्र, रक्त, रेत व मज्जा.
तेजापासूनः—क्षुधा, तृषा, आलस्य, रति व निद्रा.
वायूपासूनः—धावन वल्गनं रोधो प्रसाराकर्षे वातजः ।(र्षं)
आकाशापासून·—कामक्रोधशोकमोहभयश्चाकाशसंभवः इ.भय–वम्
यानन्तर लिंगदेहाचीं पचवीस तत्त्वे सागितलीं आहेत.
स्थूल अवस्थेपासून—जाग्रति, वैखरी वगैरे उत्पन्न झाल्या.

पुढ हिरण्यगर्भदेहाचीं लक्षणें सागितलीं आहेत. महाकारण म्हणजे काय ? मोहमाया पराशक्ति महाकारणमुच्यते ॥

नन्तर विराटदेहाची उत्पत्ती, स्थिति व प्रलय सांगितला आहे. पुढे ब्रह्म म्हणजे काय ? माया कशी उत्पन्न झाली ? इ. विवेचन करून शेवटीं गुरु म्हणतातः —

वाचा ( वाचो ? ) यत्र निवर्तन्ते तत्र किं वर्णयाम्यहम् ॥
सक्षेपात् कथिता पुर्वी तत्त्वज्ञानैकसौरसं ।(पूर्वी. सौरसी)
जानन्ति गुरुभक्ता वै तत्त्वगीता सुबोधिनि ॥(तत्त्वगीता सुबोधिनीम्!)
कामक्रोधविमुक्ता ये ब्रह्मज्ञानान्वितायःत्र ॥ ( ब्रह्मज्ञानान्विताश्च ये ? )
तस्य देय तथा पुत्र नान्यस्मै च कदाचन ॥
गुरुभाक्ति समासाद्य तत्त्वगीता तु यः पठेत् । ( गुरुभाक्ति ? )
स येव मोक्ष प्राप्नोति पुनर्जन्म न विद्यते ।। ( स एव मोक्षं ? )

असे म्हणून ही गोड गीता सपविली आहे.

× × ×

श्रीधरास वेदान्ताचा पाहिला धडा त्याच्या वयाच्या चोवीसाव्या वर्षी त्याचा पिता व गुरु ब्रह्मानद याने आपला ' आत्मप्रकाश ' ग्रथ लिहून दिला. तेव्हापासून त्याला वेदान्ताचे वेड लागले. त्याने आपल्या प्रत्येक ग्रथात उदा ' हरिविजय ' ' रामविजय ' ' पाडवप्रताप ' इ. वेदान्ताचे घुटके आपल्या श्रोतृवृदास पाजण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. एवढेच काय, पण 'जैमिनीअश्वमेधा'त तर त्यानें शृगारात वेदान्त, युद्धवर्णनात वेदान्त–सिद्धान्त गोविले आहेत. एवढ्याने समाधान झाले नाहीं म्हणून ' वेदान्तसूर्य ' या नावाचा स्वतत्र ग्रथ या विषयावर त्याने फारच उत्कृष्ट रूपके करून लिहिला. इतके करूनही त्याचे समाधान झालेलें दिसत नाही, म्हणून कीं काय ' तत्त्वगीता ' हा संस्कृतमध्ये ग्रथ लिहून त्याने आपली वेदान्तप्रातिपादनाची तृषा भागवून

घेतलेली दिसते. या ग्रंथांत ' आत्मप्रकाश व ' वेदान्तसूर्य ' या ग्रंथातील विषय पुनरुक्त झाले आहेत. फरक एवढाच कीं, वरील.दोन ग्रंथ प्राकृत-मध्यें आहेत तर हा ग्रंथ सस्कृतमध्यें आहे; म्हणून द. अ. आपटे यांनीं आपल्या कविचरित्र खंड दोन, भाग दोन मध्यें जो श्रीधरावर आरोप केला आहे कीं, त्यानें संस्कृतची एक ओळही लिहिली नाहीं हें विधान या ग्रंथानें कसे भ्रामक व निर्मूल आहे हें सिद्ध केलें आहे.

* * *

# परिशिष्ट ३ : श्रीधरस्वामींचें हस्ताक्षर

ग्रंथकर्त्यांनें या ग्रंथाच्या पहिल्या भागांत तिसऱ्या प्रकरणात पृष्ठ चाळीसमध्यें खालीलप्रमाणें म्हटलें आहे:—

" श्रीधराचे विश्वसनीय असें हस्ताक्षर आज उपलब्ध नाहीं. "

यासबधीं आतापर्यन्त जे प्रयत्न झाले ते येणेंप्रमाणें:—

१ ) विद्यार्णव विनायकराव भावे यानीं आपल्या 'महाराष्ट्र सारस्वता'त 'शिवलीलामृता'तील जो श्रीधराच्या हस्ताक्षराचा नमुना छापला आहे त्यात ते म्हणतात, " श्रीधराचें समजलें जाणारें हस्ताक्षर." यावरून या हस्ताक्षराबद्दल भावे याना खात्री नव्हती अतएव ते विश्वसनीय नाहीं हेंच खरें.[1]

२ ) दुसरा प्रयत्न—इतिहाससशोधक पा. मा. चादोरकर यानीं भा. इ. सं. मं. च्या पंचम संमेलन वृत्तात ( शके १८३९ ) 'शिवलीलामृता'चें हस्तलिखित श्रीधराच्या दप्तरात नसल्याचें साागितलें आहे.

तेव्हा प्रस्तुत ग्रथांत श्रीधराचे विश्वसनीय हस्ताक्षर मिळाल्यास छापावें या इच्छेनें कसोशीनें प्रयत्न चालविले. पढरपुरास श्रीधराच्या दप्तरात

१ भावे. म. सा. पृ. ३३६ नंतर

हस्ताक्षर मिळाल्यास पुन्हा एकदा प्रयत्न करून पाहावा म्हणून तेथे गेलो असताना कांहीं बाडें चाळता चाळता दोनतीन हस्ताक्षराचे नमुने जवळ जवळ एकच वळण असलेले सापडले. पढरपुरच्या काहीं विद्वानास हे नमुने दाखविले. हे दोनतीन नमुने श्रीधराच्या हस्ताक्षराचे असावे असे त्यानाही बाह्य व अंतःप्रमाणावरून वाटल्यावरून या प्रश्नाची पूर्ण शहानिशा करावी या हेतूनें भा. इ. स. मं. च्या डिसेंबर १९५० च्या पाक्षिक सभेपुढे तज्ज्ञाच्या विचारार्थ ठेविले. पाक्षिक सभेमध्ये या विषयाची बरीच चर्चा होऊन सभेला उपस्थित असलेल्या सदस्यानीं मीं पढरपुराहून आणलेले दोन नमुने सदरहु ग्रथांत छापावे असा अभिप्राय दिल्यावरून या ग्रथाच्या वाचकाच्या अवलोकनार्थ छापले आहेत. या हस्ताक्षराचे मूळ फोटो नेगेटिव्ह फिल्मसकट भा. इ. स मंडळांत ठेविले आहेत ते जिज्ञासूंनीं पाहावे.

एका हस्ताक्षराचे पान ' पाडवप्रताप ' या पोथीवरील पहिले मल पृष्ठ आहे. दुसऱ्या हस्ताक्षराचा नमुना श्रीधरानीं जीं काहीं पाठातरें एका बाडात लिहून ठेविलीं होतीं त्या बाडाच्या चामड्याच्या मलपृष्ठावरील हा मजकूर आहे. यात श्रीधरानें आपल्या मातापितराचा, कुलाचा वगैरे सर्व उल्लेख केला असून हे पाठान्तर लिहिण्याच्या कालाचाही स्पष्ट उल्लेख केला आहे. ' शके १६१७ युवा नाम सवत्सरे ' असे म्हटले आहे. हा काल श्रीधराच्या कालाशीं जुळता असल्यामुळें व हा नमुना पहिल्या हस्ताक्षराच्या नमुन्याशीं जुळता असल्यामुळे या ग्रथात छापिलेले दोन्ही नमुने विश्वसनीय आहेत असे समजण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

* * *

# परिशिष्ट ४ : पंढरीमाहात्म्य

ही पोथी छापील असून नारायण रामचद्र सोहोनी यानीं आपल्या जगदीश्वर छापखान्यात ता. १५ ऑगस्ठ १८८० रोजीं छापून प्रकाशित केली आहे. या पोथींत एकूण एकतीस अध्याय असून ओंवीसख्या एक हजार दोनशें अडुसष्ट आहे.

## १. ग्रंथाधार

पढरीमाहात्म्यातील कथा श्रीधरानें पद्मपुराणातून घेतली आहे. पाहिल्याच अध्यायात तो म्हणतोः—[१]

पद्मपुराणींचें उत्तम । श्रीपाडुरंगमाहात्म्य ॥

ते वदवी जेणें परम । सुखसागर उचबळे ॥

याशिवाय प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं त्यानें खालीलप्रमाणे म्हटले आहेः—

इति श्रीपद्मपुराणे पढरीमाहात्म्ये...प्रथमोऽध्यायः ॥

---

१ पढरी. मा. १, ३

## २ कथासार

प्रारंभीं गणेशस्तवन, सरस्वतीस्तवन झाल्यावर कवि म्हणतो:–[२]

ब्रह्मानदें श्रीधर । श्रोतया विनवी वारवार ।।
पाडुरगकथासागर । येथून आता परिसिजे ।।

असें सांगून मेघश्याम पंढरीस रहावयास का आला ही हकीकत सागितली आहे. नन्तर दिण्डिरवन हें नाव का दिले ती कथा सागून पहिला अध्याय समाप्त केला आहे. दुसऱ्या अध्यायात पुडलीकाची कथा आली आहे, या अध्यायाच्या शेवटीं कवि म्हणतो:—[३]

श्रीधर म्हणे ऐसी हे पढरी । स्वामी माझा भीमातिरी ।।
समाधिस्थ निर्विकारी । ब्रह्मानंद उभा असे ।।

तिसऱ्या अध्यायांत भीमानदी पढरीस कशी आली हे सागितले आहे.

चौथ्या अध्यायात ज्या वीटेवर पाडुरंग उभा आहे ' ते वीट पूर्वी कोण होती' ही कथा सागितली आहे.

पाचव्या अध्ययात पढरपुरक्षेत्राचा महिमा वर्णिला आहे. यालाच 'दक्षिण–द्वारका' म्हणतात.

सहाव्या अध्यायात ' चद्रभागा ' हे नाव कसें ठेविले हे सागितलें आहे. बृहस्पतीची पत्नी ' तारा ' हिला चंद्रानें भोगली. त्याने चद्राला

---

२ पंढरी. मा. १, ५ ; ३ पढरी. मा. २, १०९

शाप दिला कीं,तुला क्षयरोग लागेल. चंद्र गुरूस शरण आला. गुरूनें त्याला सागितलें कीं, दिडिरवनात जाऊन तेथें पवित्र सूर्यतीर्थ आहे त्यात स्नान कर. सूर्याचे आराधन कर म्हणजे तुझा क्षयरोग जाईल. पुढे दिाडरवनाचे वर्णन आलें आहे.

सातव्या अध्यायात भीमा--नीरा सगम कसा झाला हें कवीने सागितलें आहे. तो म्हणतो[४]:—

बिदुतीर्थाचे वायव्य कोणी । तीन योजनें दूर तेथुनि ॥
नृसिहपुर उत्तम अवनीं । तेथे भीमानीरा संगम ॥

आठव्या अध्यायात ब्रिदुतीर्थाचा महिमा सागितला आहे.

नवव्या अध्यायात सुश्रमा ब्राह्मणाची गोष्ट सागितली आहे.

दहाव्या अध्यायात बिदुतर्थािच्या पूर्वेस रामेश्वरलिग आहे त्याचें माहात्म्य वर्णिलें आहे.

अकराव्यात शखतीर्थाचें माहात्म्य, बाराव्यात भूतेश ब्राह्मणाची व चडीची गोष्ट सागितली आहे, तेराव्यात कृष्णतीर्थाचा महिमा वर्णिला आहे. चौदाव्यात 'उभग्र' दैत्याची गोष्ट आली आहे. पधराव्यात भृगु राजाची गोष्ट सागून या अध्यायाच्या अखेरीस कवीनें पढरीचा महिमा खालीलप्रमाणें वर्णिला आहे[५]:—

बहुकाळाचे आदि क्षेत्र । ब्रह्मादिदेवाचे माहेर ॥
संत–भक्ताचें निजघर । तें पढरपुर जाण पा ॥

---

४ पंढरी. मा. ७, २ ; ५ पंढरी. मा. १५, २२–२३

पंढरीपुढें भीमातटीं । क्षेत्र वामभागे वाळुवंटीं ॥
बिंदुस्थानाचे निकटीं । ब्रह्मानंद समाधिस्थ ॥

सोळाव्यात वराहशक्तीचे सामर्थ्य वर्णिलें आहे. सतराव्यात त्रिवेणी-माहात्म्य सागून शेवटीं कवि म्हणतो[६]:—

येथेचि काशि गया प्रयाग । तिन्हीं क्षेत्रं अव्यग ॥
जेथें स्वामी माझा पाडुरग । तीर्थ सर्व येती तेथे ॥

अठराव्यात लक्ष्मीतीर्थ कश्यपतीर्थ, कपिलतीर्थ, चक्रतीर्थ इ. तेरा तीर्थांचें माहात्म्य वर्णिले आहे. एकोणिसाव्यात भास्करतीर्थाचा महिमा सागून कवि म्हणतो[७]:—

जो पापी परम अघोरी । तो न जाय पढरपुरीं ॥
जेणें न देखिली पढरी । पशु निर्धारी तोचि पै ॥
संसारा जो आला प्राणी । तेणे पढरी पाहावी नयनीं ॥
विटेवरी उभा मोक्षदानी । वाट पाहे भक्ताची ॥
पाडुरग तोचि ब्रह्मानद । उभयनामीं तो अभेद ॥
श्रीधरस्वामी प्रसिद्ध । भीमातीरीं नादतसे ॥

वीसाव्यात कश्यपतीर्थाचा महिमा—एकवीसाव्यांत गोपाळतीर्थाचा महिमा–बावीसाव्यात त्रिवेणीस्नानमाहात्म्य—तेवीसाव्यात मगळ राजानें ‘ मगला ’ देवीची स्थापना कशी केली—चोवीसाव्यात व पचवीसाव्यात पढरपूर क्षेत्रातील मुख्य देव कोणते, त्याची पूजा केव्हा करावी इ.सागितले

६ पंढरी. मा. १७, ३२ ; ७ पढरी. मा १९, २६–२८

आहे. सव्वीसाव्यात चद्रसेनराजाची मुलगी 'पद्मा' हिने पाडुरंगाचा ध्यास कसा घेतला हें सागून कवि म्हणतो:—[८]

श्रीधर म्हणे येथुन । पुढे पंढरीचे आहे कथन ॥
हे ऐकतांचि सुखसदन । ब्रह्मानदे हेलावे ॥

सत्तावीसाव्यात व अठ्ठाविसाव्यात पंढरीक्षेत्राचा महिमा वर्णन केला आहे. त्यात तो म्हणतो:—[९]

ऐसे हे पंढरीक्षेत्र । ते केवळ माझे शरीर ॥
क्षेत्र सर्व लिंगाकार । अविनाश अचळ पै ॥

प्रात:काळीं उठून चद्रभागेचें स्नान करून विठ्ठलपूजन करावे. ज्याला जन्मयात्रा चुकवावयाची असेल त्याने निरंतर पंढरपुरास वास्तव्य करावे. अठ्ठाविसाव्या अध्यायाच्या अखेरीस कवि म्हणतो:—[१०]

बहुत दिवसपर्यंत । हे माहात्म्य होते गुप्त ॥
त्याहीवरी सस्कृत । कोणा ठाऊके नव्हते पै ॥
तारावया भोळे भक्त । कृपावत पढरीनाथ ॥
तेणे ही टीका प्राकृत । मज हाते करविली ॥
सस्कृतमध्यें जे बोलिले । तितुकेंचि हे कथिले ॥
श्रवण करावे भले । ब्रह्मानदे म्हणे श्रीधर ॥

एकोणतिसाव्यात गयासुराची गोष्ट सांगितली आहे. तिसाव्यात गयेच्या यात्रेचा महिमा वर्णन केला आहे

८ पंढरी. मा. २६, ४८ , ९ पढरी. मा. २७, २५
१० पंढरी. मा. २८, ६४–६५

एकतिसाव्यांत कवि म्हणतो[११]:—

प्राणी देखतांच पंढरी । भूत संचरे अंतरीं ॥
ससारासी उरी । कैचि उरेल साग पा ॥

...... ..... ..........................

संचित बटवा होता । तोही नेला पहाता पहाता ॥
देहबुद्धिचे कोहळे तत्त्वता । क्षण न लगता नेले पै॥[१२]

शेवटीं कवीने आपली आनदपरपरा देऊन ग्रथफलश्रुति सागितली आहे.

× × ×

प्रस्तुत ग्रथाच्या अठराव्या प्रकरणात ग्रथकर्त्यानें ‘पाडुरगमाहात्म्य’ या श्रीधराच्या छोट्या ग्रथाचे थोडक्यात विवेचन केलेच आहे. ‘पंढरी-माहात्म्या’त जवळ जवळ त्याच ग्रथातील कथाभाग आला असल्यामुळें येथे या ग्रथाचे स्वतत्र विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. फक्त एकाच मुद्याचा उल्लेख करणे आवश्यक वाटतें तो हा कीं, ‘पाडुरगमाहात्म्या’त ‘‘श्रीधरानें आपली परंपरा देताना गंभीरानंदानंतरचा ‘ ब्रह्मानंद ’ व पूर्णा-नदानतरचा ‘दत्तानंद’ हे दोन दुवे गळलेले दिसतात ’’ असें ग्रथकर्त्याने म्हटले आहे. परंतु, ‘पंढरीमाहात्म्या’त गभीरानदानन्तरचा ‘ब्रह्मानद’ हा दुवा जरी गळला असला तरी पूर्णानन्दानन्तरचा ‘दत्तानन्द’ हा दुवा गळलेला दिसत नाहीं. ‘पांडुरगमाहात्म्या’चा लेखनकाल शाके १६१५ ते १६२४ चे दरम्यानचा असला पाहिजे असे ग्रथकर्त्याने म्हटलें आहे. तेव्हा

११ पढरी मा. ३१, १४ ; १२ पंढरी. मा. ३१, ३३

पंढरीमाहात्म्य' हा ग्रंथ श्रीधराने 'पांडुरंगमाहात्म्या'नन्तर केला तरी उपरिनिर्दिष्ट कालातच लिहिला असला पाहिजे. 'पांडुरंगमाहात्म्या'च्या दहा अध्यायाने कवीचे समाधान झाले नाहीं म्हणून त्याने पांडुरंगाविषयीं व पंढरपुराविषयींल आपल्या गाढ प्रेमाचा व भक्तीचे द्योतक म्हणूनच की काय पुन्हा हा ग्रंथ विस्तृत प्रमाणावर एकतीस अध्यायात लिहून आपल्या मनाचे समाधान केले असावे

* * *

# परिशिष्ट ६ : श्रीधर :ग्रंथप्रकाशनाचा समारम्भ-वृत्तान्त

प्रस्तुत ग्रंथाचा प्रकाशनसमारम्भ श्रीधरस्वामींच्या पुण्यतिथिच्या दिवशीं म्हणजे माघ वद्य ३ शके १८७३ ( शनिवार ता. २४ फेब्रुवारी १९५१ ) रोजीं पंढरपूर येथे पुरुषाच्या बारीच्या भव्य मंडपात सायंकाळीं सहा वाजता महामहोपाध्याय प्रा.द.वा पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या थाटाने पार पडला. या समारम्भास पंढरपूर येथील प्रतिष्ठित नागरीक हजर राहिले होते. तसेच 'नाझरे' या गावाहून श्रीधरस्वामींचे भक्त व वंशजही या समारम्भास आले होते एकूण जनसमुदाय दीड ते दोन हजारापर्यन्त होता.

सुरवातीस पंढरपूर येथील सुप्रसिद्ध गायिका कु पंचवाडकर यांचे स्वागतपर पद्य झाल्यावर पंढरपूर येथील कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. बबनराव बडवे यांचे प्रास्ताविक भाषण झालें. तदनन्तर, श्री मेघश्याम चिंतामण जोशी यांनीं समारम्भास आलेले संदेश वाचून दाखविले त्यातील प्रमुख संदेश म्हणजे मुंबई राज्याचे पन्तप्रधान श्री बाळासाहेब खेर, कारवार येथील मराठी साहित्यसमेलनाचे अध्यक्ष श्री. अ. का प्रियोळकर, प्राचार्य

सोनोपंत दाडेकर, डेक्कन कॉलेजचे डॉ हर्ष, भाडारकर इन्स्टिटयूटचे श्री. गोडे इत्यादींचे होते. सदेश वाचून दाखविल्यानन्तर श्री. मेघश्याम चितामण जोशी यानीं प्रस्तुत ग्रथास पुणे विद्यापीठ व उस्मानीया विद्यापीठ, हैद्राबाद-दक्षिण, यानी प्रत्येकी रुपये पाचशेची देणगी मजूर केल्याबद्दल त्या दोन्ही विद्यापीठाचे आभार मानले. यानन्तर सौ. सुलोचनाबाई जोशी यानीं ग्रथकर्त्याचा परिचय करून दिला. नन्तर श्री विनायक चितामण जोशी यानीं प्रस्तुत ग्रथाचा परिचय करून देताना या ग्रथात ग्रथकर्त्याने नवीन माहिती कोणती ग्रथित केली आहे याचा नामनिर्देश केला नन्तर श्री तुकारामपन्त नाझरेकर यानीं प्रदर्शनात माडलेल्या श्रीधरस्वामींच्या प्रकाशित व अप्रकाशित ग्रंथासंबधी माहिती निवेदन केली यानन्तर श्री एन् के. जोशी यानीं श्रीधर–ग्रथ-प्रकाशन–सस्थेसबधी माहिती सागितली. नन्तर, पढरपूर व नाझरे येथील काहीं विद्वान मडळींचीं प्रस्तुत समारम्भास समयोचित अशीं भाषणे झालीं शेवटी, महामहोपाध्याय प्रा द. वा. पोतदार याचे अध्यक्षीय भाषण झाले. त्यानीं आपल्या भाषणात सशोधनाचे महत्व काय आहे हे अनेक मनोरजक उदाहरणे देऊन श्रोतृवृदास पटवून देऊन ‘ प्रस्तुत ग्रथ आज प्रकाशित झाला’ असे उद्घोषित केले सरतेशेवटीं, ‘ वदे मातरम् ’ हें राष्ट्रगीत झाल्यावर हा गोड कार्यक्रम रात्री नऊ वाजता सपला.

* * *

# शुद्धिपत्र

मुद्राराक्षसाच्या लीला तर विश्रुतच आहेत. तेव्हा काना, मात्रा वेलांटी व अनुस्वार याचे बाबतींत न्यूनाधिक्य, विपर्यय व लोप इत्यादि त्याने केलेले अनर्थ कोठवर दर्शवावे ? म्हणून केवळ अर्थबोधास अवश्य तेवढ्याचाच खालीं उल्लेख करून ' शेषं सदर्भेण योजयेत् ' अशी वाचकास प्रार्थना करीत आहे.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | पादटीप १२ | म. मा. २,२५२ | म. मा. २,१५२ |
| ९ | १४ व १६ | ज्ञा. च. २, २६१,२६२ | ज्ञा. च. २, १६१, १६२ |
| १० | २२ | व्होवावयास | व्होवयास |
| १० | २३ | मग | मज |
| २० | ७ | उपदेशसाहस्त्री | उपदेशसाहस्री |
| २९ | १६ | मैराळ, सतीदास | मैराळ सतीदास |
| २९ | १६ | वडवानलसिद्ध नागेश | वढवाळसिद्धनागेश |
| ३१ | २४ | कळो निति | कळोनि हि |
| ५१ | १७ | १६१० | १६४० |
| ५६ | १९ | गुणनिधिगुणगुम्या | गुणनिधिगुणगम्या |

| | | | |
|---|---|---|---|
| ६७ | २ | काल्पिला | कल्पिला |
| ६९ | ७ | अबिकासरस्वीतीचा | अम्बिकासरस्वतीचा |
| ७१ पादटीप | २० | मोक्षोपायाभिनेय सहिता सारसामिता । | मोक्षोपायाभिधानेय सहिता सारसमिता । |
| ८१ | १ | गडातर, निवृत्ति | गडातरनिवृत्ति |
| ९२ पादटीप | ८ | पेडसे.'रसतरागिणी,' पृ. १७१ | पेडसे. 'रसतरागिणी,' पृ. १७७ |
| ९६ | ३ | यैसी कोण मत | यैसें कोण मत |
| ९९ | १२ | माठी | मोठी |
| १०२ पादटीप | १५ | ज्ञा. च. २,२६१ | ज्ञा. च. २,१६१ |
| १२३ | २ | जिल्हा विजापुरातील बागलकोट येथे गदग येथेही काहीं शिष्य आहेत. | जिल्हा विजापुरातील बागलकोट येथे व गदग येथेही काहीं शिष्य आहेत |
| १४५ | १८ | वेणी–दाढाच्या | वेणी–दाढीच्या |
| १५० | ७ | प्रकृतिपुरषाचे | प्रकृतिपुरुषाचे |
| १५६ | २ | विराच्या | वीराच्या |
| १६२ | ६ | उचबळता | उचबळत |
| १६८ | ४ | नलनजालवत् | नलिनीजलवत् |
| १७४ | २० | साधुदशन | साधुदर्शने |
| १७७ | १४ | चैघकुल | चैद्यकुल |
| १८० | १९ | भगवतपत | भगवन्तपन्त |
| १८७ | १९ | प्रभा साप्रात | प्रभासा प्रात |

| | | | |
|---|---|---|---|
| १९४ | २० | गरुणाम् | गुरुणाम् |
| २०० | ३ | निश्वासार्ह | विश्वासार्ह |
| २०६ | ३ | फुलाची | फलाची |
| २११ | पादटीप ३७, ओळ २ री | प्रवृतीन् | प्रवृत्तीन |
| २१३ | १८ | ज्ञाले | झाले |
| २१६ | १९ | वर्णून | पर्णून |
| २३० | २२ | मत्तिका | मृत्तिका |
| २३१ | १५ | एक योग तर दुसरे योग. | एक योग तर दुसरे याग. |
| २४० | ७-८ | पुत्रवादन | पुत्रवदन |
| २४४ | १८ | वेशभूषा | वेषभूषा |
| २४५ | १५ | कुडा | कुर्डी |
| २४७ | १ | कठार | कुठार |
| २४७ | ११ | तिशब्द | प्रतिशब्द |
| २४९ | १८ | स्वअधरीं | स्वअन्धरी |
| २५१ | २ | सर्वनामावळी | सर्व नामावळी |
| २५५ | २ | आशिष्ठ | अशिष्ट |
| २५९ | ६ | शैवाते | शिवाते |
| २६१ | ३ | कर टाळिया | करटाळिया |
| २६१ | १० | कीं मुगुटाभोंवतीं रत्ने। | कीं मुगुटाभोवतीं रत्नें। |
| २६३ | २ | यादव कुळसकळ छेदीन। | यादवकुळ सकळ छेदीन। |
| २६३ | पादटीप | १५४ | १५५ |
| २६५ | ८ | शृंगाळामाजी | शृगाळामाजी |

| | | | |
|---|---|---|---|
| २६७ | १३ | सर्व दाही | सर्वदा ही |
| २७७ | १९ | चडाशोर्निशिका | चडाशोर्निशि का |
| २८६ | पादटीप ६३, ओळ ९ | नाव | नाव |
| ३११ | ९ | यवन | यौवन |
| ३१४ | १३ | विघ्नकणिपाळ | विघ्नफणिपाळ |
| ३२१ | १० | चाळी | चोळी |
| ३२३ | १४ | वस्त्र | वस्त |
| ३३१ | ७ | विषयभ | विषयमान |
| ३४४ | १८ | 'महाभरता'च्या | 'महाभारता'च्या |
| ३५१ | २-३ | व्यापक अर्थानेच घेणे प्राप्त त्याचप्रमाणे ही 'टीका'हा शब्द ........ | व्यापक अर्थानेच घेणे प्राप्त आहे. त्याच-प्रमाणे 'टीका' हा शब्द .. ... . .. . |
| ३५१ | १५ | माथितार्थ | मथितार्थ |
| ३७३ | १० | ठसणें | उसणें |
| ३७६ | १५ | युद्ध | शुद्ध |
| ३७७ | १६ | वेदान्ताबरोबर | वेदान्त्याबरोबर |
| ३९१ | १४ | ग्राणि | आणि |
| ३९४ | ११ | अमप्राण | अप्रमाण |
| ४०४ | १४ | सात्यापरता | सत्यापरता |
| ४२२ | ७ | शाफरीव्वज | शफरीध्वज |
| ४३७ | १६ | ठर्यी | ठायीं |

| | | | |
|---|---|---|---|
| ४४४ पादटीप | ६ | केतकर. ज्ञानकोश. 'सत्याषाढसूत्रें' | केतकर. ज्ञानकोश. 'सत्याषाढसूत्रे' वि. ७ पृ. (अ) ६०९–६१० |
| ४५२ | १८ | कल्पना येऊन | कल्पना घेऊन |
| ४५३ | १४ | अध्याम | अध्याय |
| ४५६ | २ | हुःख | दुःख |
| ४५७ | १४ | आज्ञाभंग नरेद्राणाम् | आज्ञाभगो नरेद्राणाम् |
| ४५८ | १३ | अलवद | अलवण |
| ४६१ | २ | येतली | घेतली |
| ४६२ | १९ | चरनेच्या | रचनेच्या |
| ४६३ | १८ | रम्व | रम्य |
| ४६४ | १ | कार्यात | कामात |
| ४७५ पादटीप | ६३ | जै. अ. ३, ८५, ५, ५९ | जै. अ. ३, ८५ |
| ४७९ | १२ | नहदेहाची | नरदेहाची |
| ४८६ | २ | " तेथे भीम किती बापुडे ! " त्याना जिकील | " तेथे भीम किती बापुडे ! " हा भीम त्याना जिकील. |
| ४८६ | १७ | कोटिग्रह्माडे | कोटीब्रह्माडे |
| ५०० | १४ | वा श्रुतिमधुर | या श्रुतिमधुर |
| ५०१ | १६ | रोहिती | रोधिती |
| ५०३ | २१ | समस्तवस्तुविष | समस्तवस्तुविषय |
| ५१३ | ९ | उममेयाचा | उपमेयाचा |
| ५२८ | ११ | सवे | सर्व |

| | | | |
|---|---|---|---|
| ५३२ | १९ | प्रतिस्पर्ध्यांशीं जिथे तिथे युद्ध आणि युद्ध, | प्रतिस्पर्ध्यांशीं जिथें तिथे युद्ध; आणि युद्ध तेथे...... |
| ५३६ | ३ | मिरविणे | मिळविणे |
| ५४९ | ५ | त्रिपुरासुरध | त्रिपुरासुरवध |
| ५५० | १३ | तर ‘ शिवपुराणा’त तो जटेपासून... | तर ‘ शिवपुराणा’त तो शंकराच्या जटेपासून .. |
| ५५१ | ७ | घोतरे | धोतरे |
| ५५७ पादटीप | २७ | ह्मब्रचारी | ब्रह्मचारी |
| ५६७ | ३–४ | चित्रागदाच्या पुनर्भेटींत त्याकडे चोरून पाहाणारी व सख्यामार्फत विचारपूस करणारी शालीन सीमातिनी.. | चित्रागदाच्या पुनर्भेटींत त्याकडे चोरून पाहाणाऱ्या व सख्यामार्फत विचारपूस करणाऱ्या शालीन सीमतिनीचें. . |
| ५६८ | ३–४ | अनेक सुंदर उपमांचा रूपकांचा व वर्षाव... | अनेक सुंदर उपमाचा व रूपकाचा वर्षाव .. |
| ५६८ | २० | टाळी न वाजविणे | टाळी वाजविणे |
| ५७१ | ६ | आम्ही कोणाची पाहावी | आम्हीं कोणाची आस पाहावी |
| ५७७ | ११ | नागद्रकुडल | नागेन्द्रकुण्डल |

| | | | |
|---|---|---|---|
| ५८३ | २२ | बिडाव | त्रिडाडी |
| ५८४ | ११ | सरभरित | रसभरित |
| ५८८ | ११ | जालें | जालो |
| ६०३ | ६ | माझे ज्ञानेश्वरी। | माझे मन ज्ञानेश्वरीं। |
| ६०३ | ९ | निजवृक्ष | अजानवृक्ष |
| ६०३ | १२ | ज्यासी नावडे तो दैत्याश। कलियुगीं॥ | ज्यासी नावडे हा ग्रथ। तो दैत्याश सत्य कलियुगीं॥ |
| ६१३ | १ | कवितातपदा | कवितासपदा |
| ६२१ | २० | पुराणासुसार | पुराणानुसार |
| ६३६ | १८ | सिव्हासनावर | सिहासनावर |
| ६४४ | ११ | रुणझुताहेण | रुणझुणताहेत |
| ६५४ | ८ | तांद्विजात | ताद्विजान |
| ६५९ | २ | १८८० | १८८७ |
| ६६१ | पादटीप ४, | पढरी.मा.७,२ | पढरी. मा. ७, २० |

* * *

## शुद्धिपत्र- पुरवणी

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ग्रथकर्त्याचें प्रकाशित वाङ्मय पृ. ११ | | (पुणे, ३०-९-१९४६) | (पुणे, दैनिक समाचार ३०-९-१९४६) |
| ३७६ | ९ | १ तत्त्वज्ञान | ११ तत्त्वज्ञान |
| ३९३ | शीर्षक | श्रीधर चरित्र : प्रकरण | १५ वें : पाडवप्रताप |
| ३९४ | शीर्षक | १५ वे : पाडवप्रताप | श्रीधर-चरित्र : प्रकरण |
| ४८४ | ३ | १६ श्रीधराचा विनोद | १७ श्रीधराचा विनोद |
| ५३१ | शीर्षक | १ वें : जैमिनीअश्वमेध | १६ वे: जैमिनीअश्वमेध |
| ५९९ | शीर्षक | १७ वे : शिवलीलामृत | १८ वे: श्रीधराचे छोटे ग्रथ |
| ६१७ | ३ | हस्तलिखित प्रत : छापील प्रत | छापील प्रत : हस्तलिखित प्रत |

* * *

# ग्रंथकारनामसूचि

★ ★ ★

# विषयसूचि

* * *

# प्रस्तुत ग्रंथाविषयीं कांही विद्वानांचे अभिप्राय

महामहोपाध्याय डॉ. पा. वा. काणे, आंग्रेवाडी,
एम्. ए., एलएल. एम्., डी. लिट्. गिरगाव बॅक रोड, मुंबई ४
ता. ३० एप्रिल १९५०

कै. प्रो. चिंतामण नीळकंठ जोशी, एम. ए. यांचा माझा स्नेह सुमारे पन्नास वर्षांचा होता. त्यांचें संस्कृत काव्य, अलंकारशास्त्र, वेदान्त यांचेही सूक्ष्म अध्ययन होतें त्याशिवाय ते १९११ मध्ये इंग्लिश व मराठी हे विषय घेऊन एम्. ए. झाल्यानंतर त्यांनीं मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाला वाहून घेतले. त्यांनी सरकारी हायस्कूलमध्ये नोकरी धरून त्या नोकरींतच ते हेडमास्तरपर्यन्त चढले. हैद्राबाद येथे उस्मानिया युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यावर तेथें त्यांची मराठीचे प्राध्यापक म्हणून नमणूक झाली. ते काम त्यांनीं वीस वर्षे केलें व त्या काळात आणि नंतरही मराठीचे मूळ स्थान जो निझामींतील मराठवाडा त्यात हिंडून अनेक हस्तलिखिते जमवून त्यानीं मध्यकालीन मराठी संतकवि यांच्या वाङ्मयाचा खोल व सूक्ष्म अभ्यास केला. या त्यांच्या कार्याचे निवेदन ते करीत तेव्हां एखाद्या उत्कृष्ट मराठी कवीचे चरित्र व त्याच्या ग्रंथाचे समतोलपणानं पूर्ण रसग्राही पद्धतीने विवेचन त्यांनीं करावे असे माझे म्हणणें पडे. त्याप्रमाणें त्यानीं श्रीधर कवींचे चरित्र लिहिण्याचें ठरवून त्यावर अनेक वर्षे अविरत श्रम केले. अखेर अखेर त्याना कॅन्सरसारख्या दुर्धर रोगाशीं झगडावें लागले. पण त्यातही त्यानीं श्रीधर चरित्र व त्याच्या वाङ्मयाचे मूल्यमापन करून एक ग्रंथ छापण्याच्या स्थितीपर्यन्त आणून ठेविला. दुर्दैवाने ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीच ते कालवश झाले. त्यांच्या चिरंजीवानीं तो हस्तलिखित ग्रंथ मला वाचण्यास दिला.

तो वाचून माझी खात्री झाली कीं, हा ग्रंथ प्रसिद्ध केल्यास चरित्रात्मक व काव्यविवेचनात्मक अशा उत्कृष्ट ग्रंथाची मराठी वाङ्मयात भर पडेल. म्हणून तो छापण्याविषयीं त्यांच्या चिरंजीवास मी सांगितलें. हा ग्रंथ कै. जोशी यांनीं अतिशय मेहेनतीनें व पूर्ण संशोधन करून लिहिला आहे. त्याबद्दल त्यांचें अभिनन्दन करावें तितके थोडेंच.विषाद वाटतो तो इतकाच कीं, त्यांचा हात या ग्रंथावरून फिरता तर तो याहूनही चांगल्या स्थितींत वाचकांचें हातीं पडला असता. तथापि आहे ह्या स्थितींतही हा ग्रंथ उत्कृष्ट आहे, इतकेंच येथें नमूद करितो.

पा. वा. काणे



## डॉ. के. ना. वाटवे,

एम्. ए., पी. एच्. डी.
मराठीचे प्राध्यापक,
सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें.

योगकुंज, चिमणबाग,
टिळक रस्ता, पुणें २
ता. २२–५–१९५१

हैद्राबाद येथील उस्मानिया विद्यापीठात मराठीचे प्रधान प्राध्यापक असलेले माझे ज्येष्ठ व्यवसायबंधु कै. प्रा. चिंतामणराव जोशी यांच्या संशोधनवृत्तीची व त्यांच्या व्यासंगाची ओळख मला फार वर्षांपासून आहे. मराठवाड्यातील वाङ्मयाचे त्यांचे परिशीलन ग्रंथरूपाने सुप्रसिद्ध असून त्यांचे अनेक संशोधनपर लेख मासिकांतून प्रगट झालेले आहेत श्रीधरस्वामींच्या अफाट काव्यसंपदेकडे प्रा. जोशी यांचे लक्ष जवळ जवळ तीस वर्षांपूर्वी लागलें. मधून मधून आपलें संशोधन ते मासिकांतून मांडीत

असत. या तीस वर्षांच्या व्यासगाचा परिपाक म्हणजे त्याचा हल्लीं प्रसिद्ध झालेला ' श्रीधर. चरित्र आणि काव्यविवेचन ' हा ग्रंथ होय.

'श्रीधरः चरित्र आणि काव्यविवेचन ' हा विषय आजवर अनेकानीं हाताळलेला आहे. त्यापैकीं कोणासही उणेपणा न आणता असे म्हणता येईल कीं, श्रीधराचे चरित्र व त्याची काव्यसंपदा याचे जवळ जवळ संपूर्ण विवेचन या ग्रंथात आहे. श्रीधराचीं सर्व बाडे चाळून मूळ ग्रंथकर्त्यानें व उरलीं सुरलीं पाहून ग्रंथकर्त्यांच्या चिरंजीवानीं या माहितीस परिपूर्णता आणली आहे. ती आणताना प्रतिकूल आक्षेपाचें खंडन करून स्वतःचें ठाम मत मांडले आहे. काव्याचे मूल्यमापन व इतर प्रमाणाची ग्राह्याग्राह्यता याबाबत कोणाचा मतभेद होईलही; पण 'श्रीधरविषयक सर्व काहीं' वाचकाच्या समोर आणून ठेवण्याचे श्रेय कोणासही हिरावून घेता येणार नाहीं. प्रत्येक महाराष्ट्र कवीबद्दल असें संपूर्ण विवेचन व्हावयास हवें.

मूळ ग्रंथकर्त्यांच्या परिश्रमाबद्दल योग्य तो आदर मर्मज्ञ वाचकास वाटेलच. पण मला विशेष कौतुक वाटते तें त्याच्या दोघा सुविद्य चिरंजीवाचें. पितृनिधनानंतर पित्याचा ग्रंथ प्रकाशित करणें इतकेच नव्हे तर तो शोधून, परिपूर्ण करून व वाढवून अव्यग्र करणें. हे पितृ–ऋण फेडण्याचे नमुनेदार उदाहरण त्यानीं सर्व सुपुत्राना घालून दिलें आहे असे माझें स्पष्ट मत आहे. पिता–पुत्राच्या या पवित्र वाङ्मयतपश्चर्येचें चीज मराठी वाचक उदारपणें करतील असा मला भरंवसा वाटतो.

के. ना. वाटवे

**श्री. म. माटे,** एम्. ए.
मराठीचे माजी प्राध्यापक,
सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणे.

नातूबाग,
पुणे २.
ता. ३०-६-१९५१

के.प्रो.चिंतामण नीळकंठ जोशी यांचा व माझा फार दिवसांचा परिचय होता. प्रो.जोशी यांचा श्रीधराचा व्यासंग सुमारे वीस पंचवीस वर्षांचा तरी खास असला पाहिजे. श्रीधराच्या चरित्रात पुष्कळच नवीन माहिती आलेली आहे, आणि ती श्री. जोशी यांच्या संशोधनामुळेच उपलब्ध झालेली आहे. श्रीधरकवीचा जीवनक्रम, त्याची ग्रंथनिष्पत्ति, त्याच्या संवयी व आवडी-निवडी इत्यादींसंबधाने पुष्कळ उपयोगी व मनोरंजक माहिती जोशी यांनीं हस्तगत करण्याची शिकस्त केली आहे ती माहिती व तिच्यावरून काढलेलीं अनुमानें पहाता हा पहिला खंड खरोखरच वाचनीय झालेला आहे. तथापि या ग्रंथाचे खरे बळ म्हणजे त्याचा दुसरा खंड होय. श्रीधराचे ग्रंथ श्री. जोशी यांनीं फारच बारकाईने व विविध प्रश्न मनाशीं धरून वाचले आहेत, हे स्वच्छ दिसून येते. रसिकता, चिकित्सा, वाङ्मय-मूल्याची जाणीव, परमतसहिष्णुता, स्वमताचा योग्य तितका आग्रह, टीका करताना ठेवावयाचा अवश्य तो संयम हे सारे गुण जोशी यांच्या लिखाणात उत्कटत्वाने दिसतात. जेथे मतभेद झाला तेथे श्रीधराची गयही केली नाहीं. मतमतांतरांचा परामर्श तपशिलवार घेतलेला असून केलेले निर्णय व बांधलेलीं अनुमानें स्वीकार्य बनविलीं आहेत.

श्री. म. माटे

* * *

